सुलभ

# हिन्दी-मराठी कोश

[ तीस हजारांवर शब्दसंख्या ]

संपादक

**यशवंत रामकृष्ण दाते,** बी. ए., एल्‌एल्‌. बी.

कोशकार

केशव भिकाजी ढवळे, गिरगांव, मुंबई २

मूल्य सात रुपये

# निवेदन

हिन्दी ही आतां राष्ट्रभाषा म्हणून सर्वमान्य झाली आहे. लवकरच तिचा सर्व भारतांत इंग्रजीच्या ऐवजीं उपयोग होऊं लागेल. ह्याकरितां भारताच्या प्रत्येक नागरिकास हिन्दी भाषेचें ज्ञान करून घेणें अपरिहार्य आहे. अर्थातच हिन्दी भाषेचें बिनचूक ज्ञान होण्यास हिन्दी भाषेच्या कोशाची आवश्यकता आहे हें वेगळें सांगावयास नको.

कांहीं वर्षांपूर्वीं महाराष्ट्र राष्ट्रभाषा-प्रचार-समितीकरितां एक लहानसा हिंदुस्तानी-मराठी कोश रचण्यांत आला होता. त्याची योजना मींच केली होती व तो तयार होत असतांनाही वेळोवेळीं संपादकीय साहाय्य केलें होतें. त्याची आतां दुसरी आवृत्तीही निघाली आहे. तो कोश प्रथमच केला असल्यामुळें त्याचा आकार लहान धरण्यांत आला होता; परंतु दिवसेंदिवस हिन्दी भाषेचा अभ्यास व तिचें कार्यक्षेत्र अधिकाधिक वाढत जात असल्यामुळें आतां त्यापेक्षां थोडा मोठ्या आकाराचा व अधिक शब्द देणारा कोश अभ्यासकांस अधिक उपयुक्त होईल ह्यांत शंका नाहीं. किंबहुना हिन्दी शब्दसागराप्रमाणें मोठा व सर्वव्यापी हिन्दी-मराठी कोशही ह्यापुढें महाराष्ट्रीय विद्यार्थ्यांस अवश्य वाटेल अशी आमची आपेक्षा आहे. तथापि सध्या आम्ही हा मध्यम आकाराचा कोश तयार केला आहे. ह्यांत व्यवहारांत लागणारे सर्व हिन्दी शब्द देण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. जे शुद्ध संस्कृत अथवा तत्सम शब्द हिन्दी व मराठी ह्या भाषांत सामान्यपणें प्रचारांत असून एकाच अर्थानें वापरण्यांत येतात तेवढेच शब्द ह्या कोशांत देण्यांत आलेले नाहींत. जेथें हिन्दीमध्यें संस्कृत शब्दांचे अर्थ मराठीपेक्षां निराळे होतात तेथें ते शब्द व अर्थ दिले आहेत.

प्रत्येक शब्दाचें व्याकरण देऊन व्युत्पत्ति दिग्दर्शित कली आहे व जेथें एकाच शब्दाचे निरनिराळे अर्थ होतात तेथें ते स्वतंत्र आंकडे घालून दिले आहेत.

सामान्य नागरिकास हिन्दी भाषेंतील ग्रंथ वाचून समजण्यापुरेसे व व्यवहारांत नेहमीं येणारे सर्व शब्द ह्या कोशांत दिले आहेत. महाराष्ट्रीय जनतेनें ह्या कोशाचा त्वरित स्वीकार केल्यास ह्यापुढें अधिक कार्य करण्यास आम्हांस सुलभ होईल व ह्यापेक्षां मोठ्या आकाराचा व अधिक शब्दांचा संग्रह करणारा कोश तयार करण्यास आम्हांस संधि मिळेल.

आमचा सुलभ मराठी-हिन्दी कोश प्रसिद्ध झाल्याबरोबरच हा कोश तयार करण्याचें काम आम्हीं हातीं घेतलें. परंतु मध्यंतरीं आमची भारताच्या संविधानाचें भाषांतर इंग्रजींतून हिन्दीमध्यें व नंतर मराठीमध्यें तयार करणाऱ्या संसदेच्या विशेषज्ञ-अनुवाद-समितीवर नेमणूक झाल्यामुळें हें काम पूर्ण होण्यास विलंब लागला. श्री. केशव भिकाजी ढवळे ह्या मंडळीनें हा कोश प्रकाशनास घेतल्यामुळें आमचे पुढील श्रम वांचले ह्याकरितां त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

यशवंत रामकृष्ण दाते

नागपूर
मकरसंक्रमण, १८७४
ता. १४ जानेवारी, १९५३

## संक्षेप विवरण

| | |
|---|---|
| अ. | अरबी |
| अव्य. | अव्यय |
| इं. | इंग्रजी |
| क्रि. अ. | क्रियापद अकर्मक |
| क्रि. वि. | क्रियाविशेषण |
| क्रि. स. | क्रियापद सकर्मक |
| दे. | देश्य |
| ध्व. | ध्वनि |
| न. | नपुंसकलिंगी नाम |
| पु. | पुल्लिंगी नाम |
| पोर्तु. | पोर्तुगीज |
| फा. | फारसी |
| वि. | विशेषण |
| सं. | संस्कृत |
| सर्व. | सर्वनाम |
| स्त्री. | स्त्रीलिंगी नाम |

सुलभ

# हिन्दी-मराठी-कोश

## अ

**अंक**-पु. (सं.) १. अंक; आंकडा. २ चिन्ह; खूण. ३ लेख. ४ तीट; टिळा. ५ डाग. ६ मांडी. ७ वेळ (एकदां, दोनदां इ.) ८ शरीर. ९ भाग; अंक (नाटक).

**अंकगणित**-पु. (सं.) अंकगणित.

**अँकटा**-पु. (सं.) खडा.

**अँकटी**-स्त्री. (सं.) अगदीं लहान खडा.

**अँकडी**-स्त्री. (सं.) १ आंकडी. २ बाणाचें टोंक. ३ वेल. ४ हूक.

**अंकन**-पु. (सं.) १ चिन्ह करणें; खूण करणें. २ लिहिणें. ३ मोजणें, गणती करणें.

**अंकपाली**-स्त्री. (सं.) दाई.

**अंकमाल**-पु. (सं.) आलिंगन.

**अँकरोरी-रौरी**-१ कच (दगडाची). २ खापराचे बारीक तुकडे.

**अँकवार**-स्त्री. (सं.) १ कूस; छाती. २ भाडां.

**अँकाई**-स्त्री. (सं.) अजमास; अटकळ.

**अँकाना**-क्रि. स. (सं.) १ चिन्ह करणें; खूण करणें. २ अंदाज करविणें; पारख करविणें.

**अँकुडा**-पु (सं.) आंकडा; हूक.

**अंकडी**-स्त्री. (सं.) आंकडा; हूक.

**अंकुर**-पु. (सं.) १ अंकुर; कोंब २ रक्त; रुधिर ३ लोम: रोम. ४ पाणी; जल. ५ टोंक. ६ कळी.

**अंकुरना**-क्रि. अ (स) अंकुरणें.

**अंकुरित**-वि. (सं.) अंकुरित.

**अंकुश**-पु. (सं.) अंकुश.

**अँकुसी**-स्त्री. (सं.) हूक; आंकडी.

**अँकोर**-पु. (सं) १ मांडी. २ छाती; कूस. ३ लांच. ४ शिदोरी. ५ आलिंगन. ६ भेट; नजराणा.

**अँखडी**-स्त्री. (सं.) १ नेत्र; डोळा. २ नजर; दृष्टि.

**अँखमिचनी**–स्त्री (सं.) अँाख-मिचौली पहा.

**अँखिया**–स्त्री. (सं.) छाप; ठसा.

**अँखुआ**–पु. (सं.) १ अंकुर; मोड. २ कोवळी पालवी.

**अँखुआना**–क्रि. अ. (सं.) अंकुरणें.

**अंग**–पु. (सं.) अंग.

**अंगड-खंगड**–वि. (सं.) उरले सुरले, तुटकें फुटकें.

**अँगडाई**–स्त्री. (सं.) आळेपिळे; आळोखे पिळोखे.

**अंगण**–पु. (सं.) आंगण; चौक.

**अंगन**–पु. (सं.) अंगण पहा.

**अँगरखा**–पु. (सं.) अंगरखा.

**अँगरा**–पु. (सं.) निखारा; अंगार.

**अँगराग**–पु. (सं.) अंगराग; उटी; उटणें.

**अँगरेज**–पु. (पोर्तु.) इंग्रज.

**अँगरेजी**–वि. इंग्रजी.

**अँगलेट**–पु. (सं.) अंगलट; ठेवण; घडण.

**अंगविकृति**–स्त्री. (सं.) अपस्मार; फेंफरें.

**अंगविक्षेप**–पु. (सं.) १ अंगविक्षेप. २ नृत्य; नाच.

**अंगविद्या**–स्त्री. (सं.) सामुद्रिक विद्या.

**अंगसंग**–पु. (सं.) संभोग; मैथुन.

**अंगसिहरी**–स्त्री. (सं.) हुडहुडी; कांपरें.

**अंगहार**–पु. (सं.) १ अंगविक्षेप; हावभाव. २ नृत्य.

**अंगार**–पु. (सं.) अंगार; निखारा.

**अंगारा**–पु. (सं.) निखारा; अंगार.

**अँगारी**–स्त्री. (सं.) १ ठिणगी. २ शेगडी; आगटी. ३ रोटी; गाकर.

**अँगारी**–स्त्री. (सं.) १ गंडेरी. २ उसाचें वाढ.

**अँगिका**–स्त्री. (सं.) चोळी.

**अँगिया**–स्त्री. (सं.) चोळी.

**अंगीकार**–पु. (सं.) स्वीकार; अंगीकार.

**अंगीकृत**–वि. (सं.) अंगीकृत; स्वीकृत,

**अंगीठी**–स्त्री. (सं.) शेगडी.

**अंगुठी**–स्त्री. अंगूठी पहा.

**अंगुल**–पु. (सं.) अंगुळ.

**अँगुली**–स्त्री. (सं.) बोट; अंगुली.

**अंगुश्तनुमाई**–स्त्री. (फा.) दोषारोपण; बदनामी; कलंक.

**अंगुश्तरी**–स्त्री. (फा.) अंगठी.

**अंगुश्ताना**–पु. (फा.) अंगुस्तान.

**अँगुसा**–पु. (सं.) अंकुर.

**अँगुसी**-स्त्री. (सं.) १ नांगराचा फाळ. २ सोनाराची नळी.

**अँगूठा**-पु. (सं) अंगठा.

**अंगूठी**-स्त्री. (सं.) अंगठी.

**अंगूर**-पु. (फा.) १ द्राक्ष. २ अंकुर; कोंब; मोड.

**अँगेठा**-पु. (सं.) अँगीठा पहा.

**अँगेठी**-स्त्री. (सं.) अंगीठी पहा.

**अँगोछा**-पु. (सं.) १ आंगपुसणें; पंचा; टॉवेल. २ उपवस्त्र; उपरणें.

**अँगोरा**-पु. (दे.) मच्छर.

**अँगौरिया**-पु. (सं.) खंडकरी; कूळ.

**अंघस**-पु. (सं.) पाप; अपराध; पातक.

**अंघिया**-स्त्री. (दे.) चाळण (बारीक).

**अंचल**-पु. (सं.) १ अंचल; पदर. २ किनारा; कांठ.

**अंचवना**-क्रि.स. (सं.) अचवना पहा.

**अंछर**-पु. (सं.) १ जादूटोणा. २ अक्षर. ३ तोंड येण्याचा रोग.

**अंजन**-पु. (सं.) अंजन.

**अंजनहारी**-स्त्री. (सं.) १ रांजणवाडी. २ कुंभारीण (किडा).

**अंजरपंजर**-पु. (सं.) १ हाडांचा सांपळा. २ बरगडी.

**अँजल-अँजला**-पु. (सं.) ओंजळ.

**अँजली-अँजुली**-स्त्री. (सं.) ओंजळ.

**अंजली पुट**-पु. (सं.) ओंजळ.

**अंजाम**-पु. (फा.) १ समाप्ति; पूर्ति; शेवट. २ परिणाम; फळ.

**अंजीर**-पु. (सं.) अंजीर.

**अंजुमन**-स्त्री. (फा.) १ संस्था; समिति; मंडळी. २ सभा; परिषद.

**अँजुरी, अँजुली**-स्त्री. (सं.) अजली पहा.

**अँजोर**-पु. (सं.) १ उजेड; प्रकाश. २ चांदणें.

**अंजोरना**-क्रिस. (सं.) १ छिनावणें; हिसकावून घेणें. २ प्रकाशित करणें.

**अंजोरा**-वि. (सं.) प्रकाशमान.

**अंझा**-पु. (सं.) खाडा; सुटी.

**अंटना**-क्रि. स. (सं.) १ मावणें; समावणें. २ बरोबर बसणें. ३ भरून जाणें. ४ पुरे पडणें.

**अंटा**-पु. (सं.) १ गोटी (मोठी). २ सूत इ. चा (गुंडा). ३ कौडी (मोठी). ४ बिलियर्ड.

**अंटागुडगुड**-वि. (अनु.) १ कैफ किंवा नशा चढलेला. २ बेशुद्ध; अचेत.

**अंटाचित**-क्रिवि. (सं.) उताणा; चारी मुंड चित.

**अँटिया**–स्त्री. ( सं. ) मोळी; पेंढी; भारा.

**अंटी**–स्त्री. ( सं. ) १ बेचक; दोन बोटांमधील अंतर किंवा जागा. २ सुताची गुंडाळी. ३ विरोध; बिवाड. ४ कडोसरी.

**अंटौतल**–पु. ( सं. ) ढापणी; अंधारी ( बैलाच्या डोळ्याची ).

**अंठी**–स्त्री. ( सं. ) १ गांठ; ग्रंथी. २ कोय; बाठ. ३ अठीळ.

**अंड**–पु. ( सं. ) १ अंड; २ अंडें; ३ घुमट.

**अंडकटाह**–पु. ( सं. ) विश्व; ब्रह्मांड.

**अंडबंड**–वि. ( अनु. ) असंबद्ध; विसंगत.

**अंडा**–पु. ( सं. ) अंडें.

**अंडुआना**–क्रि.स. ( सं. ) खच्ची करणें.

**अंडुआबैल**–पु. ( सं. ) सांड; पोळ.

**अंत**–पु. ( सं. ) अंत.

**अंतकाल**–पु. ( सं. ) अंतकाल; मरण; मृत्यु.

**अंतक्रिया**–स्त्री. ( सं. ) क्रियाकर्म.

**अंतग**–पु. ( सं. ) निपुण; पारंगत.

**अंतघाई**–वि. ( सं. ) दगाबाज; विश्वासघातकी.

**अंतडी**–स्त्री. ( सं. ) आंतडी.

**अंतपाल**–पु. ( सं. ) द्वारपाल.

**अंतर**–पु. ( सं. ) अंतर.

**अंतर**–क्रि. वि. ( सं. ) १ अलग; पृथक; विलग. २ आंत; मध्यें.

**अंतरंग**–वि. ( सं. ) १ अत्यंत जवळचा; निकटस्थ; जिव्हाळयाचा. २ मानसिक.

**अंतरंग**–पु. ( सं. ) जिव्हाळयाचा मित्र.

**अंतरग्नि**–पु. ( सं. ) जठराग्नि.

**अंतरजामी**–पु. ( सं. ) अंतर्यामी पहा.

**अंतरपट**–पु. ( सं. ) अंतःपट; अंतर-पाट; पडदा.

**अँतरा**–पु. ( सं. ) १ खाडा; सुटी. २ एकअंतराड ( ज्वर ) ३ कोपरा.

**अँतरा**–वि. ( सं. ) एकांतराड.

**अंतरा**–क्रि. वि. ( सं. ) १ मध्य. २ निकट. ३ अतिरिक्त; शिवाय. ४ पृथक.

**अंतरा**–पु. ( सं. ) १ अंतरा. २ दिवस ( पहाट व सायंकाळ यांचे मधील वेळ )

**अंतरात्मा**–पु. ( सं. ) अंतरात्मा.

**अंतराल**–पु. ( सं. ) १ अंतराल. २ घेरा; मंडल.

**अंतरिक्ष**–पु. ( सं. ) अंतरिक्ष.

**अंतरिक्ष**-वि. ( सं. ) अंतर्धान पावलेलें.

**अंतरिख**-अंतरिक्ष पहा.

**अंतरिच्छ**-अंतरिक्ष पहा,

**अंतरित**-वि. ( सं. ) १ लपविलेलें; आंत ठेवलेलें. २ झांकलेलें. ३ अंतर्धान पावलेलें; तिरोहित.

**अंतरीप**-पु. ( सं. ) १ बेट. २ भूशिर.

**अंतरीय**-पु. ( सं. ) धोतर.

**अंतरीय**-वि. ( सं. ) आंतील.

**अंतरोटा**-पु. ( सं. ) लुगड्याच्या आंतून नेसण्याचें वस्त्र.

**अंतर्गडु**-वि. ( सं. ) व्यर्थ; वृथा; विनाकारण.

**अंतर्गत**-वि. ( सं. ) अंतर्गत.

**अंतर्गत**-पु. ( सं. ) मन; हृदय; चित्त.

**अंतर्गति**-स्त्री. ( सं. ) चित्तवृत्ति; भावना.

**अंतर्घट**-पु. ( सं. ) अंतःकरण; मन.

**अंतर्ज्ञान**-पु. ( सं. ) अंतर्ज्ञान.

**अंतर्दशाह**-पु. ( सं. ) मृताबद्दल पहिले दहा दिवसांत होणारें क्रियाकर्म इ.

**अंतर्दृष्टि**-स्त्री. ( सं. ) अंतर्दृष्टि.

**अंतर्द्धान**-पु. ( सं. ) अंतर्धान.

**अंतर्द्धान**-वि. ( सं. ) गुप्त; अदृश्य.

**अंतर्द्वार**-पु. ( सं. ) १ चोर दरवाजा. २ खिडकी. ३ मागील दार.

**अंतर्निविष्ट**-वि. ( सं. ) अंतःकरणस्थ; हृदयांतील.

**अंतर्बोध**-पु. ( सं. ) आत्मज्ञान.

**अंतर्भाव**-पु. ( सं. ) १ समावेश; अंतर्भाव. २ मनोभाव; अभिप्राय; आशय. ३ नाश.

**अंतर्भूत**-पु. ( सं. ) प्राण; जीव; आत्मा.

**अंतर्भूत**-वि. ( सं. ) अंतर्भूत.

**अंतर्भूमि**-स्त्री. ( सं. ) भूगर्भ.

**अंतर्मना**-वि. ( सं. ) उदास; विकल; व्याकूळ.

**अंतर्मुख**-वि. ( सं. ) अंतर्मुख.

**अंतर्यामी**-पु. ( सं. ) परमेश्वर.

**अंतर्लीन**-वि. ( सं. ) गर्क; गढलेला.

**अंतर्वती**-वि. स्त्री. ( सं. ) गर्भिणी.

**अंतर्वत्नि**-वि. स्त्री. ( सं. ) गर्भिणी.

**अंतर्वाणी**-पु. ( सं. ) शास्त्रज्ञ; पंडित; विद्वान.

**अंतर्विकार**-पु. ( सं. ) भूक, तहान, पीडा इ. शरीर धर्म.

**अंतर्वेद**-पु. ( सं. ) अंतर्वेद; दोआब.

**अंतर्वेदी**-वि. ( सं. ) अंतर्वेदी मध्यें राहणारा.

**अंतर्हास**-पु. (सं.) गूढ हास्य; अप्रकट हास्य; मनांतल्या मनांत हंसणें.

**अंतर्हित**-वि. (सं.) अंतर्हित; लुप्त.

**अंतवर्ण**-पु. (सं.) शूद्र.

**अंतशय्या**-स्त्री. (सं.) १ मृत्युशय्या. २ मरण; मृत्यु. ३ स्मशान; मसणवटा.

**अंतस्ताप**-पु. (सं.) मनस्ताप; खेद.

**अंतावरी**-स्त्री. (सं.) आंतडी.

**अंतेउर, अंतेवर**-पु. (सं.) अंतःपुर; जनानखाना.

**अंतेवासी**-पु. (सं.) १ शिष्य; चेला. २ अंत्यज; चांडाळ.

**अंतःशल्य**-वि. (सं.) मर्मभेदी.

**अंतःशुद्धि**-पु. (सं.) अंतःकरणशुद्धि.

**अंत्ययुग**-पु. (सं.) कलियुग.

**अंत्या**-स्त्री. (सं.) चांडाळीण.

**अंत्र**-पु. (सं.) आंतडें.

**अंदर**-क्रि. वि. (फा.) आंत.

**अंदरी-अंदरूनी**-वि. (फा.) आंतील.

**अंदाज**-पु. (फ़ा.) अंदाज; अटकळ; २ ढब; ढंग. ३ हावभाव.

**अंदाजन**-क्रि. वि (फा.) अंदाजें; सुमारें.

**अंदाजा**-पु. (फा.) अंदाज पहा.

**अंदु-अंदुक**-पु. (सं.) १ पैंजण; २ दोरखंड.

**अंदेशा**-पु. (फा.) १ चिंता; फिकीर. २ संशय; शंका; संदेह. ३ भय. ४ हानि; नुकसान.

**अंदोर**-पु. (सं.) हुल्लड; आरडाओरड; कल्लोळ.

**अंदोह**-पु. (फा.) १ दुःख; शोक. २ संदह.

**अंधखोपडी**-स्त्री. (सं.) ठोंब्या; अज्ञानी; मूर्ख.

**अंधड़**-पु. (सं.) १ झंझावात; वावटळ. २ तुफान; वादळ.

**अंधधुंध**-पु. (सं.) अंधाधुंद पहा.

**अँधरा**-वि. (सं.) अंधळा.

**अंधस**-पु. (सं.) भात.

**अंधा**-वि. (सं.) १ अंधळा. २ प्रकाशशून्य.

**अंधाधुंध**-स्त्री. (सं.) १ अंदाधुंद. २ अंधार.

**अंधाधुंध**-वि. (सं.) १ बेधडक. विचार न करितां. २ जोरानें; धडाक्यानें.

**अँधार**-पु. (सं.) अँधेरा पहा.

**अँधारी**-स्त्री. (सं.) आँधी पहा.

**अंधिका**-स्त्री. (सं.) १ रात्र. २ जुवा. ३ एक नेत्र रोग.

**अँधियारा**-पु. (सं.) अंधेर.

**अँधियारा**-वि. (सं.) १ उदास. २ अंधकारमय. ३ धूसर.

**अंधु**-पु. (सं.) विहीर.

**अंधेर**-पु. (सं.) अँधेरा पहा.

**अंधेरखाता**-पु. (सं.+आ) अनागोंदी कारभार.

**अँधेरा**-पु. (सं.) अंधेर.

**अँधेरिया**-स्त्री. (सं.) १ अंधेर. २ ३ कृष्णपक्ष. ४ अंधेरी रात्र.

**अँधेरी**-स्त्री. (सं.) १अंधेर. २ अंधेरी रात्र; कृष्णपक्ष. ३ अंधेरी ( बैल किंवा घोडयाच्या डोळयावर बांधण्याची ).

**अंधौटी**-स्त्री. (सं.) झांपड; अंधेरी (घोडा, बैल इ. च्या डोळयावर बांधण्याची).

**अंध्र**-पु. (सं.) शिकारी.

**अंबक**-पु. (सं.) १ डोळा. २ तांबें. ३ बाप.

**अंबर**-पु. (सं.) अंबर.

**अंबरबारी**-पु. (सं.) दारूहळद.

**अंबरबेली**-स्त्री. (सं.) आकाशवेल.

**अँबराई**-स्त्री. (सं.) आंबराई.

**अँबरांत**-पु. (स.) १ वस्त्राचा कांठ. (२) क्षितिज.

**अंबा**-स्त्री. (सं.) १ माता; आई. २ पार्वती; गौरी.

**अँबाड़ा**-पु. आमडा पहा.

**अंबापोली**-स्त्री. (सं.) आंबेपोळी.

**अंबार**-पु. (फा.) ढीग; रास.

**अंबारखाना**-पु. (फा.) भांडार; खजीना.

**अंबारी**-स्त्री. (फा.) १ अंबारी. २ सज्जा.

**अंबिका-अंबालिका**-स्त्री.अंबा पहा.

**अँबिया**-स्त्री. (सं) कैरी.

**अँबिरथा**-वि. (सं.) वृथा; व्यर्थ.

**अंबुताल**-पु. (सं.) शेवाळें.

**अंबोह**-पु. (फा.) झुंड; समूह; थवा.

**अँवदा**-वि. (सं.) पालथा.

**अंश**-पु. (सं.) अंश.

**अंशक**-पु. (सं.) १ भाग; तुकडा. २ दिवस. ३ हिस्सेदार; भागीदार.

**अंस**-पु. (सं.) अंश पहा.

**अंसकूट**-पु. (सं.) वशिंड.

**अँसुआ-अँसुवा**-पु. (सं.) आँसु पहा.

**अऊत**-वि. (सं.) निपुत्रिक.

**अऋण**-वि (सं.) अऋणी; ऋणमुक्त.

**अएरना**-क्रि.स. (सं.) अंगीकारणें.

**अकंटक**-वि. (सं.) निष्कंटक.

**अकंपन**-वि. (सं.) स्थिर; निश्चल.

**अक**-पु. ( सं. ) १ पाप; पातक. २ दुःख.

**अकच**-वि. ( सं. ) टक्कल पडलेला.

**अकच्छ**-वि. ( सं. ) १ नागवा; नग्न; २ व्यभिचारी.

**अकड़**-स्त्री. ( सं. ) १ ताठा; घमेंड; २ तणाव; ताण; ३ पीळ.

**अकड़ना**-क्रि.अ. (सं.) १ आकसणें. २ घमेंड करणें. ३ हट्ट करणें.

**अकड़बाज**-वि. ( सं.+फा. ) घमेंडखोर; शेखीबाज.

**अकड़बाजी**-स्त्री. ( सं.+फा. )शेखी; घमेंड.

**अकड़ाव**-पु. ( सं. ) १ पीळ. २ ताण.

**अकड़्**-वि. ( सं. ) घमेंडखोर.

**अकड़ैत**-वि. (सं. ) अकड़ू पहा.

**अकत**-वि. ( सं.)अख्खा; सर्व; सबंध.

**अकथ - अकथनीय**-वि. ( सं. ) अकथनीय; अवर्णनीय.

**अकथ्य**-वि. ( सं. ) अकथनीय.

**अक़द**-पु. ( अ. ) १ करार, २प्रतिज्ञा.

**अकधक**-पु. (सं ) धामधुम.

**अक़दस**-वि. ( अ. )पवित्र; श्रेष्ठ.

**अकनना**-क्रि.स. ( सं. ) कान देऊन ऐकणें; कानोसा घेणें.

**अकबक**-पु. ( सं. ) १ प्रलाप; असंबद्ध बडबड; बकवाद. २ भीती; धडकी; धागधुग. ३ छक्कापंजा.

**अकबक**-वि. ( सं. ) चकीत.

**अकबकाना**-क्रि.अ. (सं.) १चकीत होणें. २ गांगरणें.

**अकबर**-वि. (अ.) महान; श्रेष्ठ; थोर.

**अकबरी**-स्त्री. (अ.) १ एक पक्वान्न. २ एक प्रकारची लांकडावरील नक्षी. ३ एक जुनें सोन्याचें नाणें.

**अक़बाल**-पु. इक़बाल पहा.

**अकर**-वि. (सं.) १ कठिण; बिकट. २ हस्तरहित. ३ करमाफ.

**अकरकरा**-पु. (सं.) अक्कलकाढा.

**अकरा**-वि. (सं.) १ किंमती; महाग. २ श्रेष्ठ; उत्तम; अमूल्य.

**अकराल**-वि. (सं.) १ जो भयंकर नाहीं असा; सौम्य. २ भयंकर; भीतिप्रद.

**अकरास**-पु. (सं.) १ आळोखेपिळोखे. २ आळस; सुरती.

**अकरुण**-वि. (सं.) कठोर, निर्दय.

**अकर्त्तव्य**-वि. (सं.) करण्यास अयोग्य.

**अकर्त्तव्य**-पु. (सं.) अनुचितकर्म.

**अकर्त्तक**-पु. (सं.) स्वयंभू.

**अकर्म**-पु. (सं.) दुष्कर्म.

**अकल**-वि. (सं.) १ अवयवरहित. २ अखंड; सर्वांगपूर्ण. ३ अगम्य; निराकार (परमेश्वराचें विशेषण). ४ अस्वस्थ; बेचैन.

**अकल्लखुरा**-वि. (सं.+फा.) १ अप्पलपोट्या. २ एकलकोंड्या. ३ मत्सरी.

**अकस**-पु. (अ.) आकस; द्वेष; वैर.

**अकसर-अक्सर**-क्रि. वि. (अ.) प्रायः; बहुधा.

**अकसर**-वि. (सं.) एकटा.

**अकसीर-अक्सीर**-स्त्री. (अ.) १ किमया; रसायन. २ रामबाण, अचूक गुणकारी औषध.

**अकस्मात**-क्रि. वि. (सं.) अकस्मात

**अकह-अकहुवा**-वि. (सं.) अवर्ण-नीय.

**अकांड**-क्रि. वि. (सं.) अकस्मात; एकाकी.

**अकांडजात**-वि. (सं.) जन्मतःच मरणारा.

**अकांडतांडव**-पु. (सं.) अकांड-तांडव.

**अकांडपात**-वि. (सं.) अकांडजात पहा.

**अकाज**-पु. (सं.) १ कार्यनाश; हानि. २ कुकर्म; दुष्कर्म.

**अकाज**-क्रिवि. (सं.) व्यर्थ; निष्प्र-योजन.

**अकाट्य**-वि. (सं.) अखंडनीय; मजबूत.

**अकाथ**-क्रिवि. (सं.) व्यर्थ; निष्फळ; निरर्थक.

**अकाथ**-वि. (सं.) अकथनीय.

**अकादर**-वि. शूर; साहसी; हिम्मती.

**अकाम**-वि. (सं.) निरिच्छ; निस्पृह; कामनारहित.

**अकाम**-पु. (सं.) दुष्कर्म.

**अकाम**-क्रि. वि. (सं) व्यर्थ; निष्प्र-योजन.

**अकामा**-वि. स्त्री. (सं.) वयांत न आलेली.

**अकाय**-वि. (सं.) अशरीरी.

**अकारज**-पु. (सं.) नुकसान; हानि.

**अकारण-अकारन**-वि. (सं.) १ विनाकारण. २ स्वयंभू.

**अकारथ**-वि. क्रि. (सं.) व्यर्थ; विनाकारण.

**अकारिब**-वि.अने. (अ.) नातेवाईक; निकटचा; जवळचा.

**अकार्य्य**-पु. ( सं. ) १ कार्याचा अभाव. २ हानि. ३ कुकर्म; दुष्कर्म.

**अकार्य्य**-वि. ( सं. ) निष्प्रभावी.

**अकाल**-पु. ( सं. ) १ कुसमय; अवेळ. २ दुष्काळ. ३ महागाई. ४ न्यूनता; तोटा.

**अकास**-पु. ( सं. ) आकाश.

**अकासकृत**-पु. ( सं. ) वीज.

**आकिंचन**-वि. ( सं. ) अकिंचन; दरिद्री.

**आकिल**-स्त्री. अक्ल पहा.

**अ़क़ीक़**-पु. (अ.) एक तांबूस रत्न; लाल.

**अकीर्ति**-स्त्री. ( सं. ) अपकीर्ति; बदनामी.

**अकुल**-वि. ( सं. ) अकुलीन.

**अकुल**-पु. ( सं. ) वाईट कुल; नीच कुल.

**अकुलाना**-क्रि. अ. ( सं. ) १ उतावीळ होणें. आकुल होणें. २ व्याकुल होणें; घाबरणें.

**अकुशल**-पु. ( सं. ) अशुभ; अहित; अमंगल.

**अकुशल**-वि. ( सं. ) अकुशल; अ-प्रवीण.

**अकूत**-वि. ( सं. ) अपरिमित; अ-गणित; असंख्य.

**अकूपार**-पु. (सं.) १ समुद्र. २ मोठें कांसव. ३ कातळ.

**अकूहल**-वि. ( दे. ) असंख्य; खूप.

**अकृच्छ्र**-पु. ( सं. ) सुगमता.

**अकृच्छ्र**-वि. ( सं. ) सोपें; सुगम.

**अकृत**-वि. ( सं. ) १ प्राकृतिक. २ स्वयंभू. ३ विकृत.

**अकृत**-पु. ( सं. ) १ प्रकृति; स्वभाव २ मोक्ष.

**अकृती**-वि. ( सं. ) काम करण्यास अयोग्य; निकामी.

**अकेला**-वि. ( सं. )एकटा; एकाकी.

**अकेला**-पु. ( सं. ) एकान्त स्थान; निर्जनस्थान.

**अकेले**-वि. क्रिवि. ( सं. ) १ एकाकी. २ केवळ; फक्त.

**अकैतव**-पु. ( सं. ) निष्कपटता; सरळपणा.

**अकैया**-पु ( सं. ) गोणी; पोतें.

**अकोट**-क्रि. ( सं. ) कोडो; असंख्य.

**अकोतरसो**-वि. ( सं. ) एकशें एक

**अकोसना**-क्रि. स. ( सं. ) शिवी-गाळ करणें; खरडपट्टी काढणें.

**अकौटा**-पु. ( सं. ) धुरा; आस.

**अक्का**-स्त्री. ( सं. ) आई; अक्का.

**अक्केदुक्के**-इक्केदुक्के पहा.

**अक्खड**-वि. (सं.) १ हट्टी. २ उच्छृंखल; उद्धट. ३ निर्भय; बेडर. ४ अशिष्ट; असभ्य. ५ फटकळ. ६ मूर्ख.

**अक्खर**-पु. (सं.) अक्षर.

**अक्खा**-पु. (सं.) घोडयाच्या पाठीवर लादण्याची गोणी.

**अक्रम**-वि. (सं.) क्रमरहित; क्रमहीन.

**अक्रम**-पु. (सं.) व्यतिक्रम; विपर्यय.

**अक्ल**-स्त्री. (अ.) अक्कल; बुद्धि; समज.

**अक्लमंद**-वि. (फा.) बुद्धिमान; हुशार.

**अक्ली**-वि. (फा.) १ अक्लेविषयीं; २ उचित.

**अक्ष**-पु. (सं.) अक्ष.

**अक्षत**-वि. (सं.) न तुटलेला; संपूर्ण; शाबूत.

**अक्षत**-पु. (सं.) मंगलाक्षता; अक्षत.

**अक्षबंध**-पु. (सं.) नजरबंदी.

**अक्षय-अक्षया**-वि. (सं.) अक्षय; अविनाशी.

**अक्षर**-वि. (सं.) १ अक्षर. २ अविनाशी.

**अक्षर**-पु. (सं.) अक्षर.

**अक्षरन्यास**-पु. (सं.) लेख.

**अक्षरमुख**-पु. (सं.) विद्यार्थी.

**अक्षरौटी**-स्त्री. (सं.) १ वर्णमाला. २ लेख.

**अक्षवाद**-पु. (सं.) १ जुगाराचा अड्डा. २ कुस्तीचा आखाडा.

**अक्षसूत्र**-पु. (सं.) रुद्राक्षमाला.

**अक्षांति**-स्त्री. (सं.) संताप; जळफळाट.

**अक्षांश**-पु (सं.) अक्षांश.

**अक्षीव**-वि. (सं.) शांत; धीर गंभीर.

**अक्षीव**-पु. (सं.) मीठ (समुद्रांतील)

**अक्षोट**-पु. (सं.) अक्रोड.

**अक्स**-पु. (अ.) १ प्रतिबिंब; पडछाया. २ तजवीर; चित्र.

**अक्सर** क्रि. वि. अकसर पहा.

**अक्सी-तसवीर**-पु. (फा.) फोटो; छायाचित्र.

**अक्सीर**-स्त्री. (अ.) १ कोणत्याही धातूचें सोनें बनविणारें रसायन. २ रामबाण औषध.

**अक्सीर**-वि. (अ.) अव्यर्थ; हटकून गुणकारी; अमोघ.

**अखंग**-वि. (सं.) अविनाशी.

**अखंड**-वि. (सं.) अखंड.

**अखंडल**-वि. (सं.) अखंड.

**अख**–पु. ( दे. ) बाग.

**अखडैत**–पु. ( सं. ) पहिलवान; मल्ल; तालीमबाज.

**अखती-अखतीज**–स्त्री. ( सं. ) अक्षतृतीया; अक्षयतृतीया.

**अखनी**–स्त्री. ( अ. ) मांसाचा रस्सा.

**अखबार**–पु. ( अ. ) वर्तमानपत्र.

**अखबार-नवीस**–पु. ( अ.+फा. ) संपादक; पत्रलेखक.

**अखय**-वि. ( सं. ) अक्षय.

**अखर**–पु. ( सं. ) अक्षर.

**अखरना**–क्रि. स. ( सं. ) डांचणें; मनाला लागणें.

**अखरा**–वि. ( सं. ) १ खोटा. २ बनावट; कृत्रिम.

**अखरा**–पु. ( सं. ) १ अक्षर. २ कोंडा मिसळलेलें जवाचें पीठ.

**अखरोट**–पु. ( सं. ) अक्रोड.

**अखरोट-जंगली**–पु. ( सं. ) जायफळ.

**अखर्ब**–वि. ( सं. ) मोठा; लांब.

**अखलाक**–पु. ( अ. ) १ शील. २ शिष्टाचार. ३ संवय.

**अखसत**–पु. ( सं. ) तांदूळ.

**अखा**=वि. ( सं. ) आखा पहा.

**अखाडा**–पु. ( सं. ) आखाडा.

**अखात**–पु. ( सं. ) आखात.

**अखाद्य**–वि. ( सं. ) अभक्ष्य.

**अखारा**–पु. ( सं. ) आखाडा.

**अखीन**–वि. ( सं. ) क्षीण न होणारा.

**अखीर**–पु. ( सं. ) अखेर.

**अखूट**–वि. ( सं. ) १ कमी न होणारा; अक्षय; अखंड. २ अधिक; पुष्कळ.

**अखेट**–पु. ( सं. ) आखेट पहा.

**अखेटक**–पु. ( सं. ) आखेटक पहा.

**अखोर**–वि. ( फा. ) १ सालस; सज्जन. २ सुंदर; सुस्वरूप. ३ निर्दोष. ४ निकामी; तुच्छ.

**अखोर**–पु. ( फा. ) १ केरकचरा; रद्दी वस्तू. २ खराब चारा.

**अखोह**–पु. ( सं. ) उंचसखल अथवा खडबडीत जमीन.

**अखौट-अखौटा**–पु. ( सं. ) जात्याच्या खालच्या तळीच्या मधील खुंटी.

**अख्लाह**–अव्य. ( सं. ) उद्वेग अथवा आश्चर्यसूचक उद्गार.

**अख्ज**–पु. ( अ. ) घेणें; ग्रहण करणें.

**अख्तर**–पु. ( अ. ) तारा.

**अख्तियार**–पु. इख़्तियार पहा.

**अख्यात**-वि. ( सं. ) अप्रसिद्ध.

**अख्यान**–पु. ( सं. ) आख्यान पहा.

**अख्यायिका**–स्त्री. ( सं. ) आख्यायिका.

**अगंड**–पु. ( सं. ) हातपाय तोडलेलें धड.

**अगज**-पु. (सं.) पर्वतापासून उत्पन्न होणारा.

**अगज**-पु. (सं.) १ हत्ती. २ शिलाजित.

**अगट**-पु. (दे.) मांस विक्रीचें दुकान.

**अगटना**-क्रि. अ. (सं.) एकत्र होणें; जमा होणें.

**अगड**-पु. (सं.) ऐट; अभिमान; घमेंड.

**अगडधत्ता**-वि. (सं.) १ उंचापुरा; लांबटांग्या. २ श्रेष्ठ; मोठा.

**अगडधत्ता**-पु. (सं.) अमरवेल.

**अगड़बगड़**-वि. (अनु.) क्रमविहीन; वेडेंवांकडें.

**अगड़बगड़**-पु. (अनु.) १ अगापिछा नसलेलें बोलणें. २ अनावश्यक खटाटोप.

**अगणनीय**-वि. (सं.) १ सामान्य; २ बेसुमार; अगणित; असंख्य.

**अगणित**-वि. (सं.) अगणित.

**अगण्य**-वि. (सं.) अगणनीय पहा.

**अगति**-स्त्री. (सं.) १ दुर्गति; दुर्दशा; २ नरक.

**अगती**-वि. (सं.) पापी; दुराचारी.

**अगत्तर**-वि. (सं.) येणारा.

**अगत्ता**-क्रि. वि. (सं.) १ पुढें; भविष्य काळांत. २ शेवटीं; अंतीं. ३ अकस्मात.

**अगद**-वि. (सं.) निरोगी; चांगला.

**अगद**-पु. (सं.) अगद; औषध.

**अगन-अगनी**-स्त्री. (सं.) अग्नि.

**अगनित**-क्रि. (सं.) अगणित.

**अगनू**-स्त्री. **अगनेउ**-पु. **अगनैत**-पु. (सं.) आग्नेय दिशा.

**अगम-अगम्य**-वि. (सं.) अगम्य.

**अगर**-पु. (सं.) अगर.

**अगर**-अव्य. (फा.) जर; जरी.

**अगरचे**-अव्य (फा.) यद्यपि; जरी.

**अगरबत्ती**-स्त्री. (सं.) उदबत्ती; अगरबत्ती.

**अगरी**-स्त्री. (सं.) १ अडसर. २ अनुचित बोलणें.

**अगर्व**-वि. (सं.) निगर्वी.

**अगलब**-क्रिवि. बहुतेक; अनेक हिश्यांनी.

**अगलबगल**-क्रिवि. (फा.) इकडे तिकडे; आसपास.

**अगला**-वि. (सं.) १ पुढील; पुढचा; अग्र भागाचा. २ प्राचीन. ३ आगामी.

**अगला**-पु. (सं.) १ पुढारी; अग्रेसर; प्रमुख. २ चतुर मनुष्य. ३ पूर्वज. ४ पतिसूचक शब्द; (मराठी 'हे').

**अगवाई-अगवानी**-स्त्री. (सं.) सामोरें येणें; स्वागत करणें.

**अगवाडा**-पु. (सं.) घराच्या पुढचा भाग; घराचें पुढील अंगण.

**अगस्त**-पु. (इं.) ऑगस्ट.

**अगद्**-वि. (सं.) १ हातीं लागण्यास कठीण; चंचल. २ अवर्णनीय. ३ अगम्य. ४ कठीण.

**अगहन**-पु. (सं.) मार्गशीर्ष.

**अगहाट**-पु. (सं.) इनाम जमीन.

**अगहुँड**-वि. (सं.) पुढारी.

**अगहुँड**-क्रि. वि. (सं.) पुढें.

**अगाउ**-वि. (सं.) अगाऊ.

**अगाडी**-क्रि. वि. (सं.) १ पुढें; समोर. २ भविष्यकालीं. ३ समक्ष.

**अगाडी**-पु. (स.) १ पुढील भाग. २ आघाडी.

**अगाध**-वि. (सं.) अगाध.

**अगार**-पु. (सं.) १ घर; निवास-स्थान. २ रास; ढेर; समूह.

**अगार**-क्रि. वि. (सं.) पुढें; प्रथम.

**अगारी**-क्रि. वि. अगाडी पहा.

**अगाव**-पु. (सं.) उसाचा शेंड्या-कडील निरस भाग; वाढें.

**अगास**-पु. (सं.) १ दाराच्या पुढील ओटा. २ आकाश.

**अगाह**-वि. (सं.) अथांग; अतिशय खोल. २ अतिशय. ३ सचिंत; उदास; विमनस्क.

**अगाह्**-वि. (फा.) विदित; ज्ञात.

**अगाही**-स्त्री. (सं.) पूर्व सूचना; जाणीव; कल्पना.

**अगियाना**-क्रि. अ. (सं.) दाह होणें; अंग इ. गरम होणें.

**अगिन**-स्त्री. (सं.) १ विस्तव. अग्नि; २ अगाव पहा.

**अगिन**-वि. (सं.) अगणित; असंख्य.

**अगियाबैताल**-पु. (सं.) आग्या-वेताळ.

**अगिरी**-स्त्री. (सं.) १ घराच्या पुढील भाग. २ दार.

**अगिला**-वि. (सं.) अगला पहा.

**अगीठा**-पु. (सं.) पुढील भाग.

**अगीतपछीत**-क्रिवि. (सं.) पुढें मागें.

**अगु**-पु. (सं.) राहू ग्रह.

**अगुआ**-पु. (सं.) १ पुढारी; नेता; अग्रणी. २ मार्गदर्शक; वाटाड्या. ३ लग्न जमविणारा मध्यस्थ. ४ सरदार.

**अगुआई**-स्त्री. (सं.) १ पुढाकार; अग्रेसरत्व. २ मार्गदर्शन.

**अगुआना**-क्रि. स. (सं.) पुढारी बनविणें.

**अगुआनी-अगुवानी**-स्त्री. अगुआई पहा.

**अगुण**-वि. (सं.) १ निर्गुण; गुणरहित. २ अडाणी; मूर्ख.

**अगुण**-पु. (सं.) अवगुण; दोष.

**अगुवा**-पु. (सं.) अगुआ पहा.

**अगूढ़गंधा**-स्त्री. (सं.) हिंग.

**अगोचर**-वि. (सं.) अगोचर.

**अगोट**-पु. (सं.) १ अडथळा. २ पडदा. ३ आश्रय; आधार.

**अगोटना**-१ अडविणें. २ कैदेंत, पहाऱ्यांत ठेवणें. ३ लपविणें. ४ स्वीकारणें. ५ पसंत करणें; निवडणें.

**अगोटना**-क्रि.अ. (सं.) अडणें; गुरफटणें.

**अगोता**-क्रिवि. (सं.) पुढें; समोर.

**अगोता**-स्त्री. (सं.) अगवानी पहा.

**अगोरदार**-पु. रखवालदार; पहारेकरी.

**अगोरना**-क्रि.स. १ वाट पाहणें; मार्ग-प्रतीक्षा करणें. २ रखवाली करणें; पहारा करणें. ३ अडविणें.

**अगौंढ़ी**-स्त्री. (सं.) अगाव पहा.

**अगौद़**-पु. (सं.) आगाऊ.

**अगौरा**-पु. (सं.) अगाव पहा.

**अग्निकर्म**-पु. (सं.) १. अग्निहोत्र; हवन. २ अग्निसंस्कार; प्रेतदहन.

**अग्निक्रिया**-स्त्री. (सं.) प्रेतदहन.

**अग्निसात्**-वि. (सं.) भस्मसात्.

**अग्रगण्य**-वि. (सं.) अग्रगण्य.

**अग्रज**-पु. (सं.) १ मोठा भाऊ; २ नायक; नेता; ३ ब्राह्मण.

**अग्रज**-वि. (सं.) श्रेष्ठ; उत्तम.

**अग्रणी**-वि. पु. (सं.) अग्रणी; पुढारी.

**अग्रभूमि**-स्त्री. (सं.) घराचें छत.

**अग्रशोची**-पु. (सं.) दूरदर्शी.

**अग्रसर**-वि. (सं.) अग्रेसर.

**अग्रह**-पु. (सं.) वानप्रस्थाश्रमी.

**अग्रहायण**-पु. (सं.) मार्गशीर्ष.

**अघट**-वि. (सं.) १ कठिण; दुर्घट. २ अयोग्य; अनुपयुक्त. ३ अक्षय; कमी न होणारा.

**अघटित**-वि. (सं.) १ न झालेला; २ असंभाव्य; कठिण. ३ अवश्य होणारा; अनिवार्य. ४ अयोग्य; अनुचित. ५ अधिक; पुष्कळ.

**अघवाना**-क्रि.स. (सं.) १ पोटभर जेऊं घालणें; तृप्त करणें.

**अघाना**-क्रि.अ. (सं.) १ पोटभर खाणें. २ तृप्त होणें. ३ दमणें; थकणें.

**अघारि**-वि. (सं.) पापनाशक.

**अघी**-वि. ( सं. ) पापी.

**अघेरन**-पु. ( दे. ) जवाचें भरड पीठ.

**अघोर**-वि. (सं.) १ सौम्य; घोर नाही असा. २ घोर; भयंकर.

**अघोरी**-पु. ( सं. ) अघोरी पंथाचा अनुयायी; घृणित व्यक्ति.

**अघोरी**-वि. ( सं. ) घृणित.

**अघोप**-वि. ( सं. ) निःशब्द; नीरव.

**अघ्रान**-पु. ( सं. ) वास घेणें; वास घेण्याची क्रिया.

**अघ्रानना**-क्रिवि. ( सं. ) हुंगणें; वास घेणें.

**अचंभा**-पु. ( सं. ) अचंबा; आश्चर्य.

**अचक**-वि. ( सं. ) भरपूर; खूप.

**अचक**-पु. ( सं. ) १ घाबरगुंडी. २ विस्मय

**अचक्का**-पु. ( सं. ) अनभिज्ञ; अजाण.

**अचक्कामें**-क्रि वि. ( सं. ) अचानक; एकाएकी.

**अचगरी**-स्त्री. ( सं. ) खोडकरपणा.

**अचना**-क्रि. स. ( सं. ) आचमन करणें; पिणें.

**अचपल**-वि. ( सं. ) १ धीमा; शांत. २ चंचल; अचपल.

**अचपली**-स्त्री. ( सं. ) खेळ; क्रीडा.

**अचभौन**-पु. ( सं. ) अचंबा.

**अचमन**-पु. आचमन.

**अचरज**-पु. ( सं. ) आश्चर्य; विस्मय.

**अचवन**-पु. ( सं. ) १ आचमन; पिणें. २ आंचवणें.

**अचवना**-क्रि. स. ( लं. ) आंचवणें.

**अचवाई**-वि. ( सं. ) धुतलेला; स्वच्छ; साफ.

**अचांचक**-क्रिवि. ( सं. ) अचानक.

**अचाक, अचाका, अचान**-अचानक.

**अचानक**-क्रिवि. ( सं. ) अचानक.

**अचार**-पु. ( फा. ) लोणचें.

**अचारी**-पु. ( सं. ) कर्मठ; नित्यकर्म व्यवस्थित करणारा.

**अचाह**-स्त्री. ( सं. ) अनिच्छा; अप्रीति; नावड.

**अचाह**-वि. ( सं. ) निरिच्छ.

**अचिंत**-वि. ( सं. ) निश्चित; चिंता-रहित.

**अचिंतनीय**-वि. ( सं. ) दुर्बोध; अवघड; कठीण.

**अचिंत्य**-वि. ( सं. ) १ दुर्बोध. २ ज्याचा अंदाज करतां येत नाहीं असा; आकस्मिक.

**अचिर**-क्रिवि. ( सं. ) शीघ्र; जलद.

**अचिरात**-क्रि. वि. ( सं. ) शीघ्र; लवकर.

**अचाँता**-वि. (सं) १ आकस्मिक. २अत्यंत; अंदाजा बाहेर अधिक.

**अचींता**-वि. (सं.) निश्चिंत; बेफिकीर.

**अचूक**-वि. क्रिवि. (सं.) अचूक.

**अचेत**-वि. (सं.) १ मूर्च्छित; बेशुद्ध. २ व्याकूळ; विव्हळ. ३ बेसावध. ४ अनभिज्ञ, मूढ. ५ जड.

**अचेत**-पु. (सं.) माया; अज्ञान.

**अचैन**-पु. (सं.) बेचैनी; व्याकुलता.

**अचैन**-वि. (सं.) बेचैन.

**अचोना**-पु (सं.) भांडें; पंचपात्र.

**अच्छ**-पु. (सं.) स्फटिक. २ अस्वल ३ स्वच्छ पाणी. ४ डोळा. ५ रुद्राक्ष.

**अच्छ**-वि. (सं.) स्वच्छ; निर्मळ.

**अच्छत**-पु. (सं.) अक्षत.

**अच्छर**-पु. (सं.) अक्षर.

**अच्छरा**-स्त्री. (सं.) अप्सरा.

**अच्छा**-वि. (सं.) उत्तम; छान; ठीक; बरा.

**अच्छाई**-स्त्री. (सं.) चांगलेपणा.

**अच्छिन्न**-वि (सं.) १ छिद्ररहित. २ शाबुत; न फुटलेला.

**अछक**-वि. (सं.) भुकेला; क्षुधित.

**अछत**-क्रिवि. (सं.) १ विद्यमान असतांना; समोर; सम्मुख. २ शिवाय; अतिरिक्त.



**अछतानापछताना**-क्रि. अ. (सं.) हळहळत बसणें.

**अछन**-पु. (सं.) दीर्घकाळ; बरेच दिवस.

**अछन**-क्रिवि. (सं.) हळूहळू; धीरे धीरे; थांबून थांबून.

**अछना**-क्रि अ. (सं.) असणें; विद्यमान असणें.

**अछप**-वि (सं.) प्रकट; जाहीर.

**अछय**-वि. (सं.) अक्षय.

**अछरा-अछरी**-स्त्री. (सं.) अप्सरा.

**अछरौटी**-स्त्री. (सं.) वर्णमाला.

**अछल**-वि. (सं.) निष्कपट; भोळाभाबडा; साधा.

**अछवाना**-क्रि. स. (सं.) साफ करणें; स्वच्छ करणें.

**अछाम**-वि. (सं.) १ जाडा; लठ्ठ; बलवान; भारी; पुष्ट.

**अछूत**-पु. (सं.) अस्पृश्य; हरिजन.

**अछूत**-वि. (सं.) १ अस्पृष्ट; स्पर्श न केलेला. २ कोरा; नवीन. ३ पवित्र.

**अछेद-अछेद्य**-वि. (सं.) अभेद्य.

**अछेव**-वि. (सं.) निर्दोष; निष्कलंक.

**अछेह**-वि. (सं.) सतत; निरंतर; लागोपाठ. २ खूप; भरपूर.

**अछोप**-वि. (सं.) १ नग्न; आच्छादन रहित. २ नीच; तुच्छ.

**अछोभ**-वि. (सं.) शांत; क्षोभरहित; सौम्य. २ नीच. ३ निर्भय; निडर.

**अछोह**-पु. (सं.) १ शांति; स्थिरता. २ निर्दयता.

**अछोह अछोही**-वि. (सं.) निर्दय; निष्ठुर.

**अजंट**-पु. (इं.) एजंट; गुमास्ता; अडत्या.

**अजगर**-पु. (सं.) अजगर.

**अजगरी**-स्त्री. (सं.) आळशीपणा.

**अजगुत-अजुगुत**-पु. (सं.) १ आश्चर्यकारक गोष्ट; चमत्कार. २ अयुक्त गोष्ट.

**अजगुत-अजुगुत**-वि.(सं.)अद्‌भुत; आश्चर्यकारक.

**अज़ग़ैब**-पु. (फा.+अर.) अदृष्टस्थान.

**अजगैबी**-वि. (फा +अर.) १ गुप्त. २ रहस्यपूर्ण.

**अज़दहा**-पु. (फा) अजगर.

**अजन**-वि. (सं.) १ अनादि. २ स्वयंभू. ३ निर्जन; शून्य.

**अजनबी**-वि. (फा.) १ अज्ञात; अपरिचित; अनोळखी; नवा. २ नवशिका. ३ परदेशी.

**अजन्म-अजन्मा**-वि. (सं.) अजन १ पहा.

**अजब**-वि. (अ.) विलक्षण; अद्‌भुत; अजब.

**अज़मत**-स्त्री. (अ.) १ थोरवी; महत्त्व; प्रताप. २ चमत्कार.

**अज़माइश**-स्त्री. आज़माइश पहा.

**अज़माना**-क्रि. आज़माना पहा.

**अजय**-पु. (सं.) पराजय.

**अजय-अजय्य**-वि. (सं.) अजिंक्य.

**अजया**-स्त्री. (सं.) १ भांग; गांज्या. २ बकरी.

**अजरायल**-वि. (सं.) १ अजर. २ निर्भय; बेडर.

**अजवायन**-पु. (सं.) ओवा.

**अजस**-पु. (सं.) अयश; अपयश.

**अजस्र**-क्रिवि. (सं.) नेहमी; सदा; निरंतर.

**अज़दह**-क्रिवि. (फा.) अमर्याद; पुष्कळ.

**अजहुँ-हूँ**-क्रिवि. (सं.) आतां-पावेतों.

**अजाचक**-वि. (सं.) संपन्न.

**अजाजी**-स्त्री. (सं.) पांढरें व काळें जिरें.

**अज़ाजील**-पु. (अ.) सैतान; दुष्ट आत्मा.

**अजाती**-वि. ( सं. ) जातिबहिष्कृत.

**अजान**-वि. ( सं. ) १ अजाण; अज्ञ. २ अपरिचित; अज्ञात.

**अजान**-पु. ( सं. ) अनभिज्ञता.

**अज़ाब**-पु. ( अ. ) १ दुःख; यातना; कष्ट. २ पाप. ३ संकट; आपत्ति. ४ ... प्रायश्चित्त.

**अजाय**-वि. ( सं.+फा. ) अनुचित; अयोग्य.

**अजायब**-वि. ( अ. ) अजब.

**अजायबखाना**-पु. (अ.+फा.) वस्तु-संग्रहालय; अजबखाना.

**अजार**-पु. ( फा. ) आजार.

**अजारा**-( पु. ) इजारा पहा.

**अजिन**-पु. ( सं. ) कातडें; त्वचा.

**अजिर**-पु. ( सं. ) १ अंगण. २ वायु; हवा. ३ शरीर.

**अजी**-अव्य. ( सं. ) अहो; अरे.

**अजीज**-वि. (अ.) १ प्रिय; आवडता २ प्रतिष्ठित.

**अज़ीज़**-पु. १ मित्र. २ नातेवाईक.

**अजीब**-वि. ( अ. ) विलक्षण; अजब.

**अज़ीम**-वि. ( अ. ) थोर व पूज्य.

**अज़ीयत**-स्त्री. ( अ. ) अत्याचार.

**अजीरन-अजीर्ण**-पु. ( सं ) १ अजीर्ण; अपचन. २ अधिकता; बाहुल्य ( व्यंगयार्थी ).

**अजुगुत**-पु. अजगुत पहा.

**अजूबा**-वि. (अ.) विलक्षण; अद्भुत

**अजूह**-पु. ( सं. ) युद्ध; लढाई.

**अजे-अजेइ-अजेय**-वि. ( सं. ) अजिंक्य.

**अजोग**-वि. ( सं. ) अयोग्य.

**अजौं**-क्रिवि. ( सं. ) अद्यापि; अजूनहि.

**अझोरी**-स्त्री.( सं. ) झोळी.

**अटंबर**-पु. ( सं. ) रास; ढेर; ढीग.

**अटक**-स्त्री. ( सं. ) १ अडवणूक; प्रतिबंध. २ अडचण. ३ आवश्यकता; नड; जरूरी. ४ संकोच; भीड.

**अटकन**-पु. अटक पहा.

**अटकना**-क्रि. अ. ( सं. ) १ गुंतणें; अडकणें; गुरफटणें. २ थांबणें; अडणें; ३ प्रेमांत सांपडणें. ४ वादविवाद करणें; झगडणें.

**अटकर**-स्त्री. अटकल पहा.

**अटकरना**-क्रि. स. ( सं. ) अनुमान करणें.

**अटकल**-स्त्री. ( सं. ) १ अटकळ; अंदाज. २ कल्पना; अनुमान.

**अटकलपच्चू**-पु. अनुमान धपका.

**अटकाना**-क्रि. स. ( सं. ) १ खोळंबून ठेवणें. २ अडविणें; हरकत घेणें.

**अटकाव**-पु. ( सं. ) प्रतिबंध; अडथळा; विघ्न; अडचण.

**अटखट**-वि. (अनु.) मोडकातोडका

**अटन**-पु. (सं.) चालणें; फिरणें; भ्रमण.

**अटपट**-वि. (सं.) १ बिकट; कठीण. २ गूढ; गुंतागुंतीचा. ३ असंबद्ध.

**अटपटाना**-क्रि. अ. (सं.) १ घाबरणें; अडखळणें. २ संकोचणें; मागेंपुढें करणें.

**अटपटी**-स्त्री. (सं.) खोडकरपणा; द्वाडपणा; उचापत.

**अटम्बर**-पु. (सं.) अवडंबर; देखावा.

**अटल**-वि. (सं.) अटळ.

**अटहर**-पु. (सं.) १ रास; ढीग. २ फेटा. ३ अडचण.

**अटा-अटारी**-स्त्री. (सं.) १ गच्ची. २ माडी. ३ माळा.

**अटाला**-पु. (सं.) १ ढीग; रास. २ सामान; सामग्री. ३ कसायांचा मोहल्ला.

**अटूट**-वि. (सं.) १ अखंड. २ सतत; लागोपाठ. ३ पुष्कळ; अलोट.

**अटेरन**-पु. (सं.) सूत गुंडाळण्याचा फाळका.

**अटेरना**-क्रि.स (सं.) १ फाळक्यावर सूत गुंडाळणें. २ प्रमाणाबाहेर मद्य पिणें.

**अट्टहास-अट्टाहास**-पु. (सं.) खोखो हंसणें; खिदळणें.

**अट्टा**-पु. (सं.) मचाण.

**अट्टालिका**-स्त्री. (सं.) गच्ची.

**अट्टी**-स्त्री. (सं.) लड.

**अट्ठा**-पु. (सं.) अठ्ठया (पत्त्यांतील).

**अट्ठाइस-अट्ठाईस**-वि. (सं.) अठ्ठावीस.

**अट्ठानबे**-वि. (सं.) अठ्ठयाण्णव.

**अट्ठावन**-वि. (सं.) अठ्ठावन.

**अट्ठासी**-वि. अठ्ठासी पहा.

**अठई**-स्त्री. (सं.) अष्टमी.

**अठकौसल**-पु. (सं.) १ विचार-विनिमय; गोष्टी. २ सल्ला.

**अठखेली**-स्त्री. (सं.) विनोद; क्रीडा.

**अठत्तर**-वि. (सं.) अठहत्तर पहा.

**अठन्नि**-स्त्री. (सं.) अधेली.

**अठपहला**-वि. (सं.) अष्टपैलू; अष्टकोनी.

**अठलाना**-क्रि. अ. (हिं.) १ ऐट दाखविणें. २ नखरा करणें. ३ मस्त होणें.

**अठवाँस**-पु. (सं.) अष्टपैलू वस्तू.

**अठवाँस**-वि. (सं.) अष्टपैलू; अष्टकोणी.

**अठवाँसा**-वि. (सं.) आठोळा; आठव्या महिन्यांत झालेला.

**अठवाँसा**-पु. सीमंत विधि.

**अठवारा**-पु. (सं.) आठवडा; सप्ताह.
**अठसिल्या**-पु. (सं.) सिंहासन.
**अठहत्तर**-वि. (सं.) अठ्याहत्तर.
**अठान**-पु. (सं.) १ अयोग्य कर्म; २ वैर; शत्रुत्व.
**अठाना**-क्रि. (सं.) रातावणें.
**अठारह**-वि. (सं.) अठरा.
**अठासी**-वि. (सं.) अठ्यायशीं.
**अठान**-पु. (सं.) १ अनुचित; कर्म. २ वैर; शत्रुत्व,
**अठारह**-वि. (सं.) अठरा.
**अठासी**-वि. (सं.) अठ्यायशीं.
**अठिलाना**-क्रिअ. अठलाना पहा.
**अठेल**-वि. (सं.) बलवान.
**अठोतरसो**-वि. (सं.) अेकशेंआठ
**अडंगा**-पु. (सं.) १ पायांत पाय घालणें. २ अडथळा; अडवणूक.
**अडंबर**-पु. (सं.) आडंबर पहा.
**अड़**-पु. (सं.) हट्ट; जिद्द.
**अड़काना**-क्रि.स. अडाना पहा.
**अडग**-वि. (सं.) स्थिर; अचल.
**अड़गोड़ा**-पु. (सं.) लोढणें.
**अड़चन**-स्त्री (सं.) अडचण; अडथळा; आपत्ति.
**अड़ड़पोपो**-पु. (दे.) १ हस्तसामुद्रिक. २ पाखंडी. ३ थापाड्या.
**अड़तालिस**-वि. (स.) अठ्ठेचाळीस.
**अड़तीस**-वि. (सं.) अडतीस.
**अड़दार**-वि. (सं.+फा.) १ अडेलतट्टू. २ मस्तवाल.
**अड़ना**-वि.अ. (सं.) १ अडणें २ हट्ट करणें.
**अडबंग**-वि. १ (सं.) उंचसखल; वेडावांकडा. २ कठिण; दुर्गम. ३ विलक्षण; अद्‌भुत.
**अडसठ**-वि. (सं.) अडुसष्ट.
**अड़ान**-पु. (सं.) मुक्काम; वाटसरूंचें विश्रांतिस्थान.
**अडाना**-क्रि.स. (सं.) १ अडविणें. २ ठांसणें. ३ सांडणें; लोटणें.
**अडाना**-पु. (सं.) टेकण; आधार.
**अडानी**-पु. (दे.) मोठा पंखा.
**अड़ार**-पु. (सं.) १रास; समूह; ढीग. २ लाकडांचा ढीग. ३ जळाऊ लाकडांची वखार.
**अडियल**-वि. (सं.) १ अडेल तट्टू. २ सुस्त; आळशी.
**अड़ी**-स्त्री. (सं.) १ हट्ट; जिद्द. २ अडथळा; प्रतिबंध.
**अडीठ** वि. (सं.) १ दृष्टीस पडत नाहीं असा; लुप्त; अदृष्ट;. २ लपलेला.
**अडूसा**-पु. (सं.) अडुळसा.
**अंडोर**-पु. (सं) गोंगाट; गलबला.

**अडोल**-स्त्री. ( सं. ) १ स्थिर; अटल. २ स्तब्ध.

**अडोस-पडोस**-पु. ( सं. ) आसपास. २ जवळजवळ; अंदाजे.

**अड़ोसी, पड़ोसी**-शेजारीपाजारी.

**अड्डा** पु. ( सं. ) अड्डा.

**अढ़तिया**-पु. ( सं. ) १ अडत्या. २ २ दलाल.

**अढ़न**-पु. ( दे. ) धाक; भीड.

**अढ़ना**-क्रि.स. ( सं. ) आज्ञापिणें; कामाला लावणें.

**अढ़िया**-स्त्री. ( दे. ) लांकडाचें अथवा लोखंडाचें लहान भांडें.

**अढुक**-पु. ( दे. ) ठोकर; ठेंच.

**अढुकना**-क्रि.अ. ( दे. ) १ ठोकर खाणें. २ टेकणें; आधार घेणें.

**अढ़ैया**-पु. ( सं. ) १ अडीच शेराचें माप. २ अडीचकीचा पाढा.

**अणि-अणी**-स्त्री. ( सं. ) १ टोंक. २ धार. ३ किनारा; कांठ. ४ हद्द; सीमा.

**अणीय**-वि. ( सं. ) अतिसूक्ष्म; बारीक.

**अणु**-पु. ( सं. ) अणु; कण.

**अणु**-वि. ( सं. ) अतिसूक्ष्म.

**अणुभा**-स्त्री. ( सं. ) वीज.

**अणुवीक्षण**-पु. ( सं. ) १ सूक्ष्मदर्शक यंत्र. २ छिद्रान्वेषण.

**अतंद्रिक**-वि. ( सं. ) १ आलस्यरहित; चलाख; चपळ. २ व्याकुल; बेचैन.

**अतंद्रित**-वि. ( सं. ) अतंद्रिक १ पहा.

**अतः**-क्रि.वि. ( सं. ) ह्याकरितां; अतः.

**अतएव**-क्रि.वि. ( सं. ) अतएव; ह्यामुळें; ह्याकरितां.

**अतट**-पु. ( सं. ) पर्वत शिखर; शिखर.

**अतथ्य**-त्रि. ( सं. ) १ अन्यथा; खोटें; असत्य. २ असमान.

**अतनु**-पु. ( सं. ) कामदेव; अनंग.

**अतवान**-वि. ( सं. ) अत्यंत; पुष्कळ; अधिक.

**अतर**-पु. ( अ. ) अत्तर.

**अतरदान**-पु. ( अ. + फा. ) अत्तरदाणी.

**अतरल**-वि. ( सं. ) घट्ट; दाट.

**अतरसों**-क्रिवि. ( सं. ) तेरवां.

**अतरिख**-पु. ( सं. ) अंतरिक्ष.

**अतर्कित**-वि. ( सं. ) आकस्मिक.

**अतर्क्य**-वि. ( सं. ) अतर्क्य.

**अत्तवार**-पु. ( सं. ) आदितवार; रविवार.

**अता**-स्त्री. ( अ. ) दान; देणगी.

**अताई**-वि. ( अ. ) १ दक्ष; कुशल; निपुण. २ धूर्त; चलाख. ३ अर्ध शिक्षित

**अतालिक**-पु. (अ.) शिक्षक; गुरु; अध्यापक.

**अति**-वि. (सं.) अति, अतिशय; अधिक.

**अति**-स्त्री. (सं.) अधिकता.

**अतिकाल**-पु. (सं) १ विलंब; उशीर. २ कुसमय.

**अतिक्रम**-पु. (सं.) अतिक्रम.

**अतिगंध**-पु. (सं.) चाफा (फूल किंवा वृक्ष.)

**अतिथि**-पु. (सं.) पाहुणा: अतिथि.

**अतिपात**-पु. (सं.) १ अव्यवस्था; गडबड. २ हानि.

**अतिमात्र**-वि (सं.) अतिशय; पुष्कळ.

**अतिमृत्यु**-पु. (सं.) मोक्ष; मुक्ति.

**अतिरिक्त**-क्रिवि. शिवाय; अतिरिक्त.

**अतिरिक्त**-वि. (सं.) १ उरलेला; शेष. २ निराळा; वेगळा.

**अतिरोग**-पु. (सं.) क्षयरोग.

**अतिरोहण**-पु. (सं.) जीवन.

**अतिवाद**-पु. (सं.) १ सत्यवचन. २ कटु भाषण. ३ गर्वोक्ति.

**अतिवृष्टि**-स्त्री. (सं.) अतिवृष्टि; मोठा पाऊस.

**अतिवल**-वि. (सं.) बेहद्द; अतिशय.

**अतिशय**-वि. (सं.) अतिशय; अत्यंत.

**अतिशयोक्ति**-स्त्री. (सं.) अतिशयोक्ति.

**अतिशीलन**-पु. अभ्यास.

**अतिसंध**-पु. (सं.) १ प्रतिज्ञा किंवा आज्ञा भंग. २ नियमाविरुद्ध आचरण.

**अतिसंधान**-पु. (सं.) १ विश्वासघात. २ अतिक्रमण.

**अतीत**-वि. (सं.) १ गत; भूत. २ विरक्त. ३ पृथक; विलग. ४ मृत.

**अतीत**-क्रिवि. (सं.) बाहेर; पलीकडे.

**अतीत**-पु. (सं.) १ साधु; संन्याशी. पाहुणा; अतिथि.

**अतुराई**-स्त्री. (सं.) आतुरता; उत्कंठा.

**अतुल-अतूल**-वि. (सं.) १ अतुल; अपार. २ वजन न केलेला; न तोललेला.

**अतुलनीय**-वि. (सं.) १ अपरिमित; अपार. २ अनुपम; बेजोड.

**अतुल्य**-वि. (सं.) अतुल.

**अत्ता**-पु. ईश्वर.

**अत्ता**-स्त्री. (सं.) १ मोठी बहीण. २ आई. ३ मावशी.

**अत्तार**-पु. (अ.) १ अत्तर विकणारा; सुगंधी. २ औषधें विकणारा.

**अत्यंत** वि. (सं.) अत्यंत.

**अत्यंतिक**-वि. ( सं. ) १ निकटचा. २ भटक्या.

**अत्यय**-पु. (सं.) १ मृत्यु; नाश. २ मर्यादातिक्रमण. ३ दंड; सजा. ४ कष्ट. ५ दोष.

**अत्यस्थ**-वि. येथील; येथला.

**अत्यागी**-वि. (सं.) दुर्व्यसनी.

**अत्याचार**-पु. १ अत्याचार; जुलूम. २ पाप; दुराचार. ३ ढोंग; पाखंड.

**अत्याचारी**-वि. (सं.) अत्याचारी.

**अथक**-वि. (सं.) न थकणारा.

**अथच**-अव्य. ( सं. ) आणखी; आणिक.

**अथना-अथयना-अथवना**-क्रि.अ. (सं.) अस्त होणें.

**अथमना**-पु. (सं.) पश्चिम दिशा.

**अथाई**-स्त्री. ( सं. ) १ बैठकीची जागा. २ गांव पंचायतीची जागा. ३ घराच्या पुढील ओटा. ४ मंडळ; सभा. ५ जमाव.

**अथान-अथाना**-पु. (सं.) लोणचें.

**अथाना**-क्रि. अ. (सं.)अथना पहा.

**अथाना**-क्रि. स. (सं.)थांग पहाणें; खोली पहाणें. २ धुंडणें; शोधणें.

**अथावत**-वि. (सं.) अस्त पावलेला.

**अथाह**-वि. (लं.) १ अथांग. २ गूढ; कठिण.

**अथाह**-पु. (सं.) १ जलाशय. २ समुद्र.

**अथोर**-वि. (सं.) पुष्कळ; खूप.

**अदंभ**-वि. (सं.) १ सच्चा; निष्कपट. २ स्वाभाविक; अकृत्रिम,

**अदग**-वि. ( सं. ) १ डागरहित; निष्कलंक. २ निरपराध; निर्दोष.

**अदद**-पु. (अ.) संख्या.

**अदना**-वि. (अ.) १ तुच्छ; क्षुद्र; नीच. २ सामान्य.

**अदब**-पु. (अ.) अदब; शिष्टाचार.

**अदबदकर - अदबदाकर**-क्रिवि. (सं.) हट्टानें; निश्चयानें.

**अदभ्र**-वि. (सं.) पुष्कळ; खूप.

**अदम**-पु. (अ.)अभाव. २ परलोक.

**अदमहाजिरी**-स्त्री. ( अ. ) गैरहजेरी; अनुपस्थिति.

**अदम्य**-वि. (सं.) दुर्दम्य; प्रबळ,

**अदय**-वि. (सं.) निर्दय; अदय.

**अदरक**-पु. (सं.)आलें.

**अदरकी**-स्त्री. (सं.) आलेंपाकवडी.

**अदरा**-पु. (सं.) आर्द्रा.

**अदराना**-क्रि. अ. (सं.) गौरवामुळें चढून जाणें.

**अदराना**-क्रि. स. (सं.) गौरव करून चढविणें.

**अदर्शनीय**-वि. (सं.) कुरूप; बेढब.

**अदल**–पु. (अ.) न्याय.

**अदलबदल**–पु. (अ.) परिवर्तन; अदलाबदल.

**अदली**–वि. (अ.) न्यायी.

**अदवान**–पु. (सं.) पायगताची दोरी.

**अदहन**–पु. (सं.) उकळतें पाणी; आधण.

**अदाँत**–वि. (सं.) १ दंतरहित. २ विषयासक्त.

**अदा**–वि. (अ.) १ चुकता; बेबाक. २ हावभाव पहा; नखरा. ३ ढंग; रीति; पद्धति.

**अदाता – अदान – अदानी** – वि. (सं.) कंजूष; कृपण.

**अदाबंदी**–स्त्री. (फा.) वायदा.

**अदालत**–स्त्री. (अ.) न्यायालय.

**अदावत**–स्त्री. (अ.) अदावत; वैर; शत्रुत्व.

**अदिन**–पु. (सं.) वाईट दिवस; कुसमय; दुर्दिन.

**अदिव्य**–वि. (सं.) सामान्य; साधारण; लौकिक.

**अदिष्ट**–बि. (सं.) अदृष्ट.

**अदिष्टी**–वि. (सं.) १ अदूरदर्शी; अविचारी. २ अभागी; दुर्दैवी. ३ दुष्ट; मूर्ख.

**अदीन**–वि. (सं.) १ उद्धट; अविनम्र. २ उदार.

**अदीब**–पु. (अ.) साहित्यिक.

**अदीह**–वि. (सं.) सूक्ष्म.

**अदृप्त**–वि. (सं.) निरभिमानी; गर्वरहित; निगर्वी.

**अदृश्य**–वि. (सं.) अदृश्य.

**अदृष्ट**–पु. (सं.) अदृष्ट; भाग्य; प्रारब्ध.

**अदृष्टपूर्व**–वि. (सं.) अदृष्टपूर्व.

**अद्धा**–पु. (सं.) १ अर्धा. २ अर्ध्या-तासाचा टोला.

**अद्धा**–क्रिवि. (सं.) साक्षात्; प्रत्यक्ष; समक्ष.

**अध**–क्रिवि. (सं.) खालीं.

**अधःकाय**–पु. (सं.) कमरेच्या खालील अंग.

**अधः**–वि. (सं.) अर्धा.

**अधकचरा**–वि. (सं.) अर्धाकच्चा; अपरिपक्व.

**अधकच्छा**–पु. (सं.) नदीकांठची उताराची जमीन.

**अधकपारी**–स्त्री. (सं.) अर्धशिशी.

**अधखिला**–वि. (सं.) अर्धे उमललेलें; अर्धविकसित.

**अधखुला**–वि. अधखिला पहा.

**अधगति**–स्त्री. (सं.) अधोगती.

**अधगो**-पु. (सं.) शिश्न किंवा गुद.

**अधगोहुआँ**-पु. (सं.) जवमिश्रित गहूं.

**अधडी**-वि. (सं.) १ निराधार; आधाररहित. २ असंबद्ध.

**अधन्ना**-पु. (सं.) अर्धाआणा.

**अधम**-वि. (सं.) अधम.

**अधमरा - अधमुआ** - वि. (सं.) अर्धमेला; मृतप्राय.

**अधमर्ण**-पु. (सं.) ऋणी; कर्जदार.

**अधमांग**-पु. (सं.) पाय; चरण; शरीराचा अधोभाग.

**अधमाई**-स्त्री. (सं.) अधमता; अधमपणा.

**अधर**-वि. (सं.) १ चंचल; धरता येत नाहीं असा. २ नीच. ३ पराभूत.

**अधरोत्तर**-वि (सं.) १ उंचसखल; खडबडीत. २ चांगला वाईट; बरा-वाईट. ३ कमीअधिक.

**अधरोत्तर**-क्रिवि (सं.) वरखालीं.

**अधर्षणी**-वि. (सं.) निर्भय; प्रबल.

**अधवा**-स्त्री. (सं.) विधवा.

**अधसेरा**-पु (सं.) अर्धा शेर.

**अधाधुंध**-क्रि.वि. (सं.) अधाधुंध पहा.

**अधारी**-स्त्री. (सं) १ आधार; आश्रय. २ प्रवासी पिशवी. ३ कुबडी.

**अधिकृत**-वि. (सं.) उपलब्ध; हातांत आलेला.

**अधिकृत**-पु. (सं.) अधिकारी; अध्यक्ष.

**अधिक्रम**-पु. (सं.) चढाई; आरोहण.

**अधिक्षिप्त** वि. (सं.) १ टाकलेला. २ अपमानित; निंदित; तिरस्कृत. ३ आक्षेपित.

**अधिनायक**-पु. (सं.) १ अधिनायक; सर्वाधिकारी. २ मालक

**अधिमास**-पु. (सं.) अधिकमास.

**अधिया**-स्त्री. (सं.) १ अर्धा हिस्सा. २ अर्धेल-ली.

**अधीन**-वि. (सं.) अधीन.

**अधान**-पु. (स.) सेवक; नोकर.

**अधीर**-वि. (सं.) १ घाबरलेला; व्याकूळ; विव्हल; धैर्यरहित. २ अधीर; उतावळा. ३ असंतोषी.

**अधीरा**-वि अधीर; अधीरा.

**अधुना**-क्रिवि. (सं.) हल्लीं; सांप्रत.

**अधुनातन**-वि. सांप्रतचा; हल्लीचा; आधुनिक.

**अधृत**-वि. (सं.) निर्भय; निडर.

**अधूरा**-वि. (सं) अधवट; अपूर्ण.

**अधेड़**-वि (सं.) मध्यम वयाचा.

**अध्यक्षर**-क्रिवि (सं) अक्षरशः.

**अध्यवसाय**-पु. (सं.) १ सतत उद्योग. २ उत्साह. ३ निश्चय.

**अध्यशन**-पु. (सं.) अजीर्ण; अपचन.

**अध्यारोप**-पु. (सं.) मिथ्या आरोप.

**अनंतर**-क्रिवि. (सं.) १ नंतर; मागाहून; मागून. २ निरंतर; लागोपाठ.

**अनंतर**-वि. (सं.) निकटस्थ; मध्यें अंतर नसलेला.

**अनआहिवात**-पु. (सं.) वैधव्य.

**अनकना**-क्रि. (सं.) १ ऐकणें. २ चाोरून ऐकणें; आडून ऐकणें.

**अनक़रीब**-क्रिवि. (अ.) सुमारें; जवळ जवळ.

**अनख**-पु. (सं.) १ राग; रुसवा. २ दुःख; खिन्नता. ३ द्वेष; ईर्षा. ४ काजळाची टिकली.

**अनख**-वि. (सं.) नखविरहित.

**अनखना**-क्रि.अ. (सं.) रागावणें; क्रोध करणें; रुष्ट होणें.

**अनखाहट**-स्त्री. (सं.) राग; रुसवा.

**अनखी**-वि. (सं.) रागीट; चिडका.

**अनखौहा**-वि. (सं.) रागीट; चिडका.

**अनगढ़**-वि. (सं.) १ अनगढ़; स्वयंभू. २ बेडौल. ३ अडाणी; असंस्कृत.

**अनगन**-वि. (सं.) अगणित; असंख्य; खूप.

**अनगना**-क्रि.स. (सं.) कालें शाकारणें.

**अनगना**-वि. (सं.) अगणित; असंख्य.

**अनगना**-पु. (सं.) गर्भारपणांतील आठवा महिना.

**अनगिन-अनगिनत-अनगिना**-अनगना पहा.

**अनगैरी**-वि. (अ.) अनोळखी; अपरिचित; नवखा.

**अनघ**-वि. (सं.) १ निष्पाप; निर्दोष. २ पवित्र; शुद्ध.

**अनघ**-पु. (सं.) पुण्य.

**अनघरी**-स्त्री. (सं.) कुसमय.

**अनघैरी**-वि. (सं.) अनाहूत; अनिमंत्रित.

**अनचहा**-वि. (सं.) अनिच्छित; अप्रिय.

**अनचाहत**-वि. (सं.) प्रेम न करणारा.

**अनजान**-वि. (सं.) १ अज्ञानी; अडाणी. २ अनोळखी; अपरिचित.

**अनट**-पु. (सं.) १ अन्याय; अत्याचार. २ उपद्रव.

**अनडुह**-पु. (सं.) बैल.

**अनडुही**-स्त्री. (सं.) गाय.

**अनत**-वि. ( सं. ) न वांकलेला; सरळ.

**अनत**-क्रिवि. ( सं. ) अन्यत्र.

**अनति**-वि. ( सं. ) थोडा.

**अनति**-स्त्री. (सं.) अहंकार; अहंभाव.

**अनधिकार**-पु. ( सं. ) १ अनधिकार. २ विवशता; लाचारी. ३ अयोग्यता; अक्षमता.

**अनधिकार**-वि. ( सं. ) १ अधिकार-रहित. २ अयोग्य; कुचकामी.

**अनध्यक्ष**-वि. ( सं. ) जो दिसत नाहीं असा; अप्रत्यक्ष.

**अनन्नास**-पु. ( पोर्तु. ) अननस.

**अनन्य**-वि. ( सं. ) अनन्य.

**अनन्यपूर्वा**-वि. स्त्री. ( सं. ) कुमारिका.

**अनन्वित**-वि. ( सं. ) १ अयोग्य; अयुक्त. २ पृथक्; विलग.

**अनपच**-पु. (सं.) अपचन; अजीर्ण.

**अनपढ़**-वि ( सं. ) १ अशिक्षित; निरक्षर. २ मूर्ख.

**अनपत्य**-वि. ( सं. ) संतानरहित; अपत्यहीन .

**अनपराध-अनपराधी**-वि. ( सं. ) निरपराधी.

**अनापायी**-वि. ( सं. ) १ स्थिर; निश्चल. २ अनश्वर.

**अनपेक्षा**-वि. ( सं. ) निरपेक्ष; अपेक्षारहित.

**अनपेक्षित**-वि. ( सं. ) अनपेक्षित.

**अनबन**-पु. ( सं. ) बेबनाव; बिघाड; फूट.

**अनबिधा-अनबेधा**-वि. ( सं. ) न छेदलेला; न भेदलेला.

**अनबोल**-वि. ( सं. ) १ मुका. २ मुखस्तंभ; अबोल्या; घुम्या. ३ मौन धरणारा; चुप बसलेला.

**अनब्याहा**-वि. ( सं. ) अविवाहित.

**अनभल**-पु. ( सं. ) अहित.

**अनभाया**-वि. ( सं. ) अप्रिय; नावडता.

**अनभावता**-वि. ( सं. ) अनभाया पहा.

**अनभिव्यक्त**-कि. ( सं. ) गूढ; गुप्त; अस्पष्ट.

**अनभी**-पु. ( सं.) अचंबा; आश्चर्य.

**अनभो**-वि. ( सं. ) अपूर्व; अलौकिक; अद्भुत.

**अनमन-अनमना**-वि. ( सं. ) १ उदासीन; सुस्त; खिन्न. २ आजारी; अस्वस्थ.

**अनमिल**-वि. ( सं. ) १ विजोड; विसंगत. २ पृथक; न मिसळलेला.

**अनमिलता**-वि. (सं.) अप्राप्य; अलभ्य

**अनमेल**-वि. (सं.) १ बेजोड; विसंगत. २ शुद्ध; भेसळ नसलेला.

**अनमोलना**-क्रि. स. (सं.) डोळे उघडणें.

**अनमोल**-वि. (सं.) १ बहुमोल; अनमोल. २ सुंदर; उत्तम.

**अनय**-पु. (सं.) १ आपत्ति; दुर्भाग्य. २ अनीति; अन्याय.

**अनरना**-क्रि. स. (सं.) अनादर करणें.

**अनरस**-पु. (सं.) १ रसहीनता. २ कोप. ३ दुःख; खेद.

**अनरसा**-वि. (सं.) १ उदास. २ अस्वस्थ; बेचैन.

**अनरीति**-स्त्री. (सं.) १ वाईट चाल; कुरीति. २ अन्यथाचार.

**अनरुचि**-स्त्री. (सं.) अरुचि.

**अनरूप**-वि. (सं.) १ कुरूप. २ असदृश.

**अनर्गल**-वि. (सं.) १ अनिर्बंध. २ २ व्यर्थ; विचारशून्य. ३ अखंड; पाठोपाठ; एकसारखें.

**अनर्घ**-वि. (सं.) १ बहुमूल्य; किमती. २ स्वस्त; अल्पमूल्य.

**अनर्थ**-पु. (सं.) अनर्थ.

**अनर्थक**-वि. (सं.) निरर्थक

**अनर्ह**-वि. (सं.) अयोग्य; अपात्र.

**अनल**-पु. (सं.) अनल, अग्नि.

**अनलचूर्ण**-पु. (सं.) दारुःअग्निचूर्ण.

**अनलस**-वि. (सं.) चपल; आळशी नसलेला.

**अनलेख्य**-वि. (सं.) अगोचर; अदृष्य.

**अनवकांक्षा**-स्त्री. (सं.) निरपेक्षता; निस्पृहता.

**अनवगाह**-वि. (सं.) १ गंभीर. २ खोल; अथांग.

**अनवग्रह**-वि. (सं.) अप्रतिबंध; स्वच्छंद.

**अनवट**-पु. (सं.) १ जोडवें. २ घाण्याच्या बैलाच्या डोळ्याची ढापणें.

**अनवद्य**-वि. (सं.) निर्दोष· निष्कलंक.

**अनवद्यांग**-वि (सं.) डौलदार; सुंदर.

**अनवधान**-पु. (सं.) गैरसावधपणा.

**अनवधि**-वि. (सं.) असीम; बेहद्द.

**अनवधि**-क्रिवि. (सं.) निरंतर; सतत; सदैव.

**अनवय**-पु. (सं.) कुल; वंश.

**अनवर**-वि. (अ.) १ चमकदार. २ शोभिवंत.

**अनवसर**-पु. (सं.) १ फुरसतीचा अभाव. २ कुवेळ; कुसमय.

**अनवस्थ**-वि. ( सं. ) १ उतावळा. २ अव्यवस्थित.

**अनवस्था**-स्त्री. ( सं. ) १ अव्यवस्था; अनियमितता. २ आतुरता; अधीरता.

**अनवस्थित**-वि. ( सं. ) १ अधीर; उतावळा. २ निराधार.

**अनवहित**-वि. ( सं. ) १ बेसावध. २ बेपर्वा.

**अनवाँसा**-पु. ( सं. ) गवताची पेंढी.

**अनवाद**-पु. ( सं. ) कटु वचन.

**अनसमझा**-वि. ( सं. ) १ अज्ञानी; अडाणी; ज्याला समजत नाहीं असा. २ अज्ञान.

**अनसहत**-वि. ( सं. ) असह्य.

**अनहित**-पु. ( सं. ) १ अहित. २ शत्रु.

**अनहोता**-वि. ( सं. ) १ दरिद्री; निर्धन. २ अलौकिक; आश्चर्यपूर्ण.

**अनहोनी**-वि. ( सं. ) १ अचंब्याची; नवलपूर्ण. २ न होणारी; अशक्य.

**अनहोनी**-स्त्री. ( सं. ) असंभाव्य गोष्ट.

**अनाकनी-अनाकानी**-स्त्री. ( सं. ) टंगळमंगळ; ऐकले न ऐकलेसें करणें; काणाडोळा; दुर्लक्ष.

**अनाखर**-वि. ( सं. ) बेडौल.

**अनागत**-वि. ( सं. ) १ अनुपस्थित. २ पुढें होणारा; भावी. ३ अपरिचित. ४ अपूर्व; अद्‌भुत. ५ अनादि.

**अनागत**-क्रिवि. ( सं. ) अचानक; अकस्मात.

**अनाज**-पु. ( सं. ) धान्य.

**अनाड़ी**-वि. ( सं. ) अडाणी.

**अनाढ्य**-वि. ( सं. ) दरिद्री; कंगाल.

**अनापशनाप**-पु. ( सं. ) वायफळ बडबड.

**अनायत**-स्त्री. ( अ. ) कृपा; दया; मेहेरबानी.

**अनायत्त**-वि. ( सं. ) स्वतंत्र.

**अनायास**-वि. ( सं. ) १ सहज; आयासाशिवाय. २ एकाएकी; अकस्मात.

**अनार**-पु. ( फा ) डाळिंब.

**अनार**-पु. ( सं. ) अन्याय; अनीति.

**अनारी**-वि. ( फा. ) १ डाळिंबी. २ आडाणी.

**अनाविल**-वि. ( सं. ) स्वच्छ; साफ.

**अनासिर**-पु. ( अ. ) मूलतत्व.

**अनास्था**-स्त्री. ( सं. ) १ अनादर. २ अश्रद्धा.

**अनाहदवाणी**-स्त्री. ( सं. ) आकाशवाणी.

**अनित्य**-वि. (सं.) १ अनित्य. २ असत्य.

**अनिभ्य**-वि. (सं.) दरिद्री; कंगाल.

**अनियत**-वि. (सं.) १ अपरिमित; असीम. २ अनिश्चित. ३ अस्थिर.

**अनियारा**-वि. (सं.) १ टोंकदार; तीक्ष्ण अणीदार. २ धारदार; धारेचा.

**अनिरवा** -पु. (सं.) भडकलेलें जनावर.

**अनिर्दिष्ट**-वि. (सं.) १ अनिर्दिष्ट. २ अनियत. ३ अपरिमित; असीम.

**अनी**-स्त्री. (सं.) १ अणी; टोंक. २ नावेचा पुढील भाग. ३ जोडयाचा पुढील भाग. ४ पाण्यांत गेलेलें जमीनीचें टोंक. ५ ग्लानी.

**अनी**-स्त्री. १ सेना; फौज. २ झुंड; समूह.

**अनीक**-वि. (सं.) १ सेना; फौज; झुंड. २ युद्ध.

**अनीक**-पु. वाईट; खराब.

**अनीठ**-वि. (सं.) १ अनिष्ट. २ वाईट.

**अनीत-अनीति**-स्त्री. (सं.) अनीति.

**अनीश**-वि. (सं.) १ ईशरहित. २ अनाथ. ३ सर्व श्रेष्ठ.

**अनीस**-पु. (सं.) अनाथ.

**अनीस**-पु. (अ.) दोस्त; मित्र.

**अनुक**-पु. (सं.) विषयी, कामुक मनुष्य.

**अनुकर्त्ता**-पु. (सं.) १ अनुकरण करणारा. २ हुकमाप्रमाणें चालणारा.

**अनुकांक्षा** - स्त्री. (सं.) इच्छा; आकांक्षा.

**अनुकार**-पु. (सं.) अनुकरण; नक्कल.

**अनुकीर्त्तन**-पु. (सं.) वर्णन; कथन.

**अनुकृति**-स्त्री. (सं.) अनुकरण; नक्कल.

**अनुक्रिया**-स्त्री. (सं.) अनुक्रम.

**अनुक्रोश**-पु. (सं.) दया; अनुकंपा.

**अनुक्षण** -क्रिवि. (सं.) १ प्रतिक्षण. २ निरंतर; एकसारखें.

**अनुग**-वि. (सं.) अनुगामी; अनुयायी.

**अनुग**-पु. (सं.) नोकर; सेवक.

**अनुगत**-वि. (सं.) १ सदृश. २ अनुकूल; अनुगामी; अनुयायी.

**अनुगृहीत**-वि. (सं.) १ उपकृत. २ कृतज्ञ.

**अनुचिंतन**-पु. (सं.) विचार; चिंतन.

**अनुदर**-वि. (सं.) कृश; सडपातळ.

**अनुधावन**-पु. (सं.) १ अनुसरण. २ नक्कल; अनुकरण. ३ शोध; तपास; पिच्छा. ४ विचार; चिंतन.

**अनुनाद**-पु. (सं.) १ प्रतिध्वनि. २ गुंजारव.

**अनुपगत**-क्रिवि. ( सं. ) दूरचा.

**अनुपात**-पु. ( सं. ) १ प्रमाण. २ त्रैराशिक.

**अनुपान**-पु. ( सं. ) औषधाबरोबर खाण्याची वस्तु.

**अनुप्रेक्षा**-स्त्री. ( सं. ) १ टक लाऊन निरखून पहाणें. २ मनन.

**अनुयोग**-पु. ( सं. ) प्रश्न; विचारणा; विचारपूस.

**अनुराध**-पु. ( सं. ) विनंती; प्रार्थना; आराधना.

**अनुरूपक**-पु. ( सं. ) प्रतिमा; मूर्ति.

**अनुरोध**-पु. ( सं. ) १ अडकाठी; बाधा. २ प्रेरणा; उत्तेजन. ३ आग्रहपूर्वक विनंति; आदर.

**अनुशय**-पु. ( सं. ) १ वैर; आकस. २ वादविवाद; बोलाचाली.

**अनुशयी**-वि. ( सं. ) १ वैरी; शत्रु. २ भांडखोर. ३ पश्चात्ताप झालेला. ४ अनुरक्त; लीन.

**अनुशार**-पु. ( सं. ) राक्षस.

**अनुषंग**-पु. ( सं. ) १ करुणा; दया. २ संबंध. संगत.

**अनुष्ठान**-पु. ( सं. ) १ अनुष्ठान. २ आरंभ; सुरुवात.

**अनुसंधान**-पु. ( सं. ) १ पाठलाग. २ शोध; तपास. ३ प्रयत्न.

**अनुसृति**-स्त्री. ( सं. ) १ अनुसरण. २ नक्कल; अनुकरण.

**अनुस्यूत**-वि. ( सं. ) १ शिवलेला. २ गुंफलेला. ३ क्रमवार; सलग.

**अनुहरण**-पु. ( सं. ) १ अनुकरण. २ नक्कल.

**अनुहरत**-वि. ( सं. ) अनुरूप.समान. २ उपयुक्त; योग्य.

**अनुहार**-वि. ( सं. ) सदृश; समान; तुल्य.

**अनुहार**-स्त्री. ( सं. ) १ भेद; प्रकार. २ आकृति. ३ समानता.

**अनुहारी**-वि. ( सं. ) अनुकरण करणारा.

**अनूक**-पु. ( सं. ) १ पूर्व जन्म. २ कुल; वंश. ३ स्वभाव; शील. ४ पाठीचा कणा. ५ कमानीच्या मध्यभागचा दगड.

**अनूठा**-वि. ( सं. अपूर्व; विचित्र; अद्भुत. २ चांगला; सुंदर.

**अनूढा**-स्त्री. ( सं. ) प्रेमिका.

**अनूदित**-वि. ( सं. ) १ वर्णन केलेला; सांगितलेला. २ भाषांतरित; अनुवादित.

**अनून**-वि.१ अखंड; समग्र. २ अधिक.

**अनूप**-वि. ( सं. ) जलप्राय: जेथें पाणी अधिक आहे असा. २ अनुपम सुंदर.

**अनूप**-पु. ( सं. ) १ जलप्राय प्रदेश; जलमय प्रदेश. २ म्हैस.

**अनूप**-वि. ( सं. ) अनुपम; सुंदर.

**अनेरा**-वि. ( सं. ) व्यर्थ; निष्प्रयोजन. २ खोटा.

**अनह**-वि. (सं.) अप्रेम; अप्रीति; विरक्ति.

**अनहा**-पु. ( सं. ) वेळ; समय; काल.

**अनैस**-पु. ( सं. ) अहित.

**अनैस**-वि. (सं.) वाईट.

**अनैसे**-क्रि.वि. ( सं. ) वाईटहेतूनें; वाईट तऱ्हेनें.

**अनैहा**-पु. ( सं. ) उपद्रव; उत्पात.

**अनोखा** वि. ( सं. ) १ विलक्षण; विचित्र; अद्भुत. २ नवा; नूतन. ३ सुंदर.

**अन्ना**-स्त्री. ( सं. ) १ दाई. २ सोनाराची लहान शेगडी.

**अन्यमन**-वि. ( सं. ) उदासीन; विमनस्क.

**अन्यारा**-वि ( सं. ) १ अपृथक; निराळा नव्हे. २ अनोखा; नवीन. ३ बहुत; पुष्कळ

**अन्यून**-वि. ( सं. ) पुष्कळ; भरपूर.

**अन्हवाना**-क्रि.स. ( सं. ) स्नान घालणें.

**अन्हाना**-क्रि.अ. (सं.) स्नान करणें; न्हाणें.

**अपकरण**-वि. (सं.) दुर्वर्तन; दुराचार.

**अपकरुण**-वि. (सं.) निष्ठुर; निर्दय; कठोर.

**अपकाजी**-वि. ( सं. ) स्वार्थी; अप्पलपोट्या; स्वार्थसाधु; मतलबी.

**अपकृति**-स्त्री. ( सं. ) १ अपकार. २ अपमान; निंदा.

**अपकृष्ट**-वि. ( सं. ) १ पतित; भ्रष्ट. २ अधम; नीच. ३ घृणित; खराब.

**अपगा**-स्त्री. ( सं ) नदी.

**अपघन**-वि. ( सं. ) निरभ्र.

**अपघन**-पु. ( सं. ) शरीर; देह.

**अपघात**-पु. ( सं. ) १ हिंसा; हत्या. २ वंचना; विश्वासघात; धोका. ३ आत्मघात; आत्महत्या.

**अपघातक-अपघाती**-वि. ( सं. ) १ घातक; विनाशक. २ विश्वासघातकी.

**अपच**-पु. ( सं. ) अपचन; अजीर्ण.

**अपचय**-पु. १ ( सं ) हानि; क्षय. २ व्यय; नाश. ३ पूजा; सन्मान.

**अपचरित**-पु. ( सं. ) दुराचरण; वाईट कर्म.

**अपचार**-पु. (सं.) १ कुव्यवहार; वाईट आचरण. २ अहित. ३ अनादर; निंदा. ४ कुपथ्य. ५ भूल; भ्रम.

**अपचित**-वि. (सं.) पूजित; सन्मानित.

**अपची-अपच्छी**-पु. (सं.) विपक्षी; विरोधी.

**अपच्छी**-वि. (सं.) पंखरहित.

**अपछरा**-स्त्री. (सं.) अप्सरा.

**अपजस**-पु. (सं.) अपयश.

**अपज्ञान**-पु. (सं.) इन्कार.

**अपटी**-स्त्री. (सं.) १ पडदा. २ आवरण; आच्छादन.

**अपठ**-वि. (सं.) अशिक्षित; आडाणी.

**अपडर**-पु. (सं.) भय; भीति.

**अपड़ना**-क्रि स. (सं.) ओढाताण करणें.

**अपड़ाव**-पु. (सं.) झगडा; तकरार.

**अपढ**-वि; (सं.) अपठ पहा.

**अपण्य**-वि. (सं.) विकण्यास अयोग्य.

**अपत**-वि. (सं.) १ पर्णहीन; २ अनाच्छादित; नग्न. ३ निर्लज्ज. ४ अधम; नीच.

**अपत**-पु. (सं.) आपत्ति; विपत्ति.

**अपतई**-स्त्री. (सं.) १ बेशरमपणा; निर्लज्जता. २ चंचलता.

**अपति**-वि. स्त्री. (सं.) विधवा.

**अपति**-वि. (सं.) पापी; दुराचारी.

**अपति**-स्त्री. (सं.) दुर्गति; दुर्दशा.

**अपदांतर**-वि. (सं.) १ सरमिसळ. २ समीप; निकट. ३ समान.

**अपदांतर**-क्रिवि. (सं.) शीघ्र; जलद.

**अपदखा**-वि. (सं.) घमेंडखोर; आत्मश्लाघी.

**अपद्वार**-पु. (सं.) चोर दरवाजा.

**अपध्वंस**-पु. (सं) १ अधःपतन; २ अपमान. ३ नाश; क्षय.

**अपनपौ-अपनापो**-पु. (सं.) आपलेपणा; आत्मीयता; आपुलकी. २ अहंकार; गर्व. ३ स्वाभिमान; मान.

**अपनयन**-पु. (सं.) १ दूर करणें; हटविणें. २ स्थानांतरित करणें. ३ खंडन.

**अपना**-सर्व. (सं.) आपला.

**अपना**-पु. (सं.) स्वजन.

**अपनाना**-क्रि. स. (सं.) आपलासा करणें.

**अपनापन**-पु. (सं.) १ आपलेपणा; आत्मीयता. २ स्वाभिमान.

**अपनाम**-पु. (सं.) बदनामी; निंदा.

**अपनीत**-वि. (सं.) दूर केलेला; हटविलेला.

**अपनोदन**-पु. (सं) १ दूर करणें. २ खंडन.

**अपभय**-पु. १ ( सं. ) निर्भयता. २ अकारण भय; व्यर्थ भीति. ३ भय; भीति.

**अपभय**-वि. (सं.) निर्भय; धीट.

**अपयान**-पु. (सं.) पलायन.

**अपरंच**-अव्य. (सं.) १ आणखीहि. २ पुनः; पुनरपि. ३ आणि दुसरें.

**अपरपक्ष**-पु. (सं.) १ कृष्णपक्ष. २ प्रतिवादी; दुसरा पक्ष.

**अपरवश**-वि. (सं.) परवश; परतंत्र.

**अपरस**-वि. (सं.) अस्पृश्य.

**अपरा**-स्त्री. (सं.) १ पश्चिम दिशा; २ लौकिक विद्या.

**अपरा** वि. स्त्री. (सं.) दुसरी.

**अपरामृष्ट** वि. (सं.) कोरा; नवा.

**अपरिकलित**-वि. (सं.) अज्ञात; अश्रुत.

**अपरिच्छद**-वि. (सं.) १ अनाच्छादित; उघडा. २ दरिद्री.

**अपरिच्छन्न**-वि. (सं.) आवरणरहित; खुला. २ सर्वव्यापक.

**अपरिच्छिन्न**-वि. (सं.) १ अभय. २ एकत्रित; अलग न केलेला. ३ असीम; सीमारहित.

**अपरिष्कार**-पु. (सं.) १ संस्कार-अभाव: साफसफाई इ. चा अभाव. २ मलीनपणा; घामटपणा.

**अपरिहार्य्य**-वि. (सं.) १ अनिवार्य; अपरिहार्य. २ अत्याज्य; ३ आदरणीय.

**अपर्याप्त**-वि. (सं.) अपूर्ण; पुरेसा नाहीं असा; अपुरा.

**अपर्याप्ति**-स्त्री. (सं.) १ त्रुटि; कमतरता. २ असामर्थ्य; अक्षमता.

**अपवन**-पु. (सं.) उपवन; बाग.

**अपवर्तन**-पु. (सं.) परिवर्तन; उलटापालट.

**अपवाचा**-स्त्री. (सं.) निंदा.

**अपवाद**-पु. (सं.) १ अपवाद. २ विरोध. ३ निंदा. ४ दोष; पाप; कलंक. ५ अनुमति; संमति; विचार; ६ आज्ञा; आदेश.

**अपवादक**-पु. (सं.) १ निंदक. २ विरोधी; बाधक.

**अपसना**-क्रि. (सं.) सटकणें; निसटणें; पाय काढणें.

**अपसार**-पु. (सं.) १ पाण्याचे तुषार. २ वाफ.

**अपसोस**-पु. (फा.) १ दुःख; खेद; २ पश्चात्ताप.

**अपसौन**-पु. (सं.) अपशकुन.

**अपहास**-पु. (सं.) उपहास.

**अपहेला**-पु. (सं.) तिरस्कार.

**अपांशुला**-वि स्त्री. (सं.) पतिव्रता.

**अपा**-स्त्री. (सं.) अहंकार; गर्व.

**अप.क**-पु. (सं) १ अजीर्ण. २ कच्चेपणा; अपरिपक्वता.

**अपाकरण**-पु (सं.) १ पृथक्करण २ दूर करणें; ३ चुकतें करणें

**अपाटव**-पु. (सं.) १ अपटुता; अकुशलता. २ सुस्ती; मंदपणा. ३ कुरूपता. ४ रोग. ५ मद्य.

**अपाटव**-वि. (सं.) १ अपटु. २ रोगी; आजारी. ३ सुस्त. ४ कुरूप.

**अपार्थ**-वि. (सं.) १ अर्थहीन; निरर्थक; व्यर्थ; निष्प्रयोजन.

**अपाय, अपाव**-पु. (सं.) अन्याय; उपद्रव; अपाय.

**अपाहिज**-वि. १ (सं.) लंगडा; लुळा २ काम करण्यास निरुपयोगी. ३ आळशी.

**अपिधान**-पु. (सं.) आवरण; आच्छादन.

**अपिनद्ध**-वि. (सं.) बांधलेला; जखडलेला

**अपिहित**-वि. (सं.) झांकलेला; आच्छादित.

**अपीच**-वि. (सं.) चांगला; सुंदर.

**अपीच्य**-वि. (सं.) सुस्वरूप; चागला; सुंदर.

**अपूठना**-क्रि स. (सं.) १ विदारण करणें; विध्वंस करणें. २ उलटणें. पालटणें.

**अपूठा**-वि. (सं) १ अनभिज्ञ. २ अविकसित; अस्फुट.

**अपूत** वि. (सं.) १ अपवित्र; अशुद्ध. २ निपुत्रिक.

**अपूत**-पु. (सं.) कुपुत्र.

**अपूर**-वि. (सं.) भरपूर; पूर्ण.

**अपूरना**-क्रि.स. (सं.) १ भरणें. २ फुंकणें; वाजविणें.

**अपूरब**-वि. (सं.) अपूर्व.

**अपूरा**-पु. (सं.) भरलेला; व्याप्त; पसरलेला.

**अपेक्षा**-स्त्री. १ आकांक्षा; इच्छा. २ आवश्यकता; जरूरी. ३ आश्रय; भरंवसा ४ कार्यकारणसंबंध. ५ तुलना; मुकाबला.

**अपेत**-वि (सं.) दूर गेलेला; विगत.

**अपेठ**-वि. (सं.) अटल.

**अपेठ**-वि (सं.) दुर्गम.

**अपोगंड**-वि. (सं) प्रौढ; सोळा वर्षांवरील.

**अप्यय**-पु. (सं.) १ अपगमन. २ लय; नाश.

**अप्रकृत**-वि. (सं.) १ अस्वाभाविक; कृत्रिम. २ खोटा.

**अप्रगल्भ**-वि. ( वि. ) १ अप्रगल्भ: २ निरुत्साही; सुस्त ३ अपरिपक्व

**अप्रतिभ**-वि. ( सं. ) १ उदास २ सुस्त; मंद. ३ निर्बुद्ध; प्रतिभाहीन. ४ लाजाळू; लाजरा.

**अप्रतायमान**-वि. (सं.) अनिश्चित

**अप्रयुक्त**-वि ( सं. ) अव्यवहृत.

**अप्रहत**-वि. ( सं. ) १ न वापरलेलें; नवे ( वस्त्र ): कोरा कपडा. २ वहित न केलेला ( जमीन. )

**अप्रमाणिक**-वि. ( सं. ) १ अप्रामाणिक. २ अप्रमाणसिद्ध.

**अप्सरा**-स्त्री. ( सं. ) १ पाण्याचे थेंब; बाष्पकण. २ अप्सरा.

**अफ़ई**-पु. ( अ. ) १ विषारी साप. २ कृष्णसर्प.

**अफ़जाइश**-स्त्री. ( फा. ) वाढ; भर; आधिक्य.

**अफजूँ**-पु. ( फा. ) वृद्धि; आधिक्य.

**अफ़जूँ**-वि. ( फा. ) उरलेलें; शिल्लक राहिलेलें.

**अफ़ताब, अफ़ताबा, अफताबी**-पु. पु. स्त्री. आफताब इत्यादि पहा.

**अफ़यून**-स्त्री. अफ़ीम पहा.

**.अफ़रना**-क्रिअ. ( स. ) १ पोटभर खाणें. २ पोट फुगणें. ३ विटणें: कंटाळणें.

**अफरा**-पु. ( सं. ) फुगणें: पोट फुगणें.

**अफराना**-क्रिअ. ( सं. ) पोट भरल्याने संतुष्ट होणें.

**अफल**-वि. ( सं. ) १ फलहीन. २ व्यर्थ: निष्फळ. ३ वांझ.

**अफलातून**-पु. ( अ. ) १ प्लेटो. २ अभिमानी; घमेंडी.

**अफ़वा-अफवाह**-स्त्री (अ.)अफवा; गप्प

**अफशा**-पु. ( फा. ) प्रकट; जाहीर.

**अफ़साना**-पु. ( फा. ) आख्यायिका; गोष्ट; कहाणा.

**अफ़सुर्दा**-वि.( फा.) १ कोमेजलेला. २ खिन्न; उदास.

**अफसोस**-स्त्री. ( फा.) १ शोक; दुःख २ पश्चात्ताप.

**अफ़ीफ़**-वि. ( अ. ) सदाचारी.

**अफ़ीम**-स्त्री. ( सं. ) अफू.

**अफ़ीमची**-पु ( सं. ) अफूबाज.

**अफ़ीमी**-वि. ( सं. ) अफबाज.

**अबंध्य** वि. ( सं. ) सफल.

**अब**-क्रिवि. ( सं. ) आतां; यावेळीं.

**अबखरा**-पु ( अ. ) वाफ.

**अबखोरा**-पु. आबखोरा पहा.

**अबटन**-पु उबटन पहा.

**अबतर**-वि. ( अ. ) १ वाईट; बिघडलेला; खराब. २ दुर्दशाग्रस्त.

**अबतरी**-स्त्री. (अ.) १ अवनति; दुर्दशा. २ घट; क्षय. ३ खराबी.

**अबधू**-पु. (सं.) साधु; अवधूत; संन्यासी.

**अबधू**-वि अज्ञानी; मूर्ख.

**अबध्य**-पु. (सं.) अवध्य.

**अबरक**-पु. (पु.) अभ्रक.

**अबरख**-पु. (सं.) अभ्रक.

**अबरन**-वि. (सं.) अवर्णनीय.

**अबरन**-वि. (सं.) रंगरूपहीन.

**अबरा**-पु. (फा.) अभ्रा.

**अबलख**-वि. (अ.) कबरा.

**अबस**-वि. (अ.) व्यर्थ; फुकट.

**अबाद**-वि. (अ.) व्यर्थ; फुकट.

**अबादान**-वि. (अ.) १ वसलेलें. २ पूर्ण; भरलेलें.

**अबादानी**-स्त्री. (फा.) पूर्णता. २ वस्ती. ३ शुभचिंतन. ४ समृद्धता.

**अबाध**-वि. (सं.) १ निर्विघ्न. २ अपरिमित.

**अबान**-वि. निःशस्त्र; शस्त्ररहित.

**अंबाबील**-पु. (अ.) वटवाघूळ.

**अबार**-स्त्री. (सं.) विलंब; उशीर.

**अबाल**-वि. (सं.) १ मोठा; जवान. २ पूर्ण; पुरा.

**अबिंधन**-पु. (सं.) १ समुद्र. २ वडवानल.

**अबिरल**-वि. (सं.) अविरल पहा.

**अबुझ-अबूझ**-वि.(सं.) अज्ञ; अजाण.

**अबू**-पु (अ.) पिता; बाप.

**अबे**-अव्य. (सं.) अे; अरे.

**अबेर**-स्त्री. (सं.) विलंब; उशीर.

**अबेश**-वि. (फा.) अधिक; पुष्कळ.

**अब्बा**-पु. (फा.) बाबा (वडील).

**अब्बास**-पु. (अ.) सिंह.

**अब्बास**-पु. (अ.) गुलब्बाशीचें फूल व झाड.

**अब्बासी**-पु. (अ.) एक प्रकारचा लाल रंग; गुलब्बाशी रंग.

**अब्र**-पु. (अ.) अभ्र; मळभ; मेघ.

**अभंग**-वि. (सं.) अभंग; न मोडणारें.

**अभरन**-पु. (सं.) आभरण.

**अभरन**-वि. (सं.) १ अपमानित. २ दुर्दशाग्रस्त.

**अभल**-वि. (सं.) खराब.

**अभव्य**-वि. (सं.) १ न होण्याजोगें. २ विलक्षण; अद्‌भुत. ३ अशुभ. ४ अशिष्ट.

**अभाऊ**-वि. १ (सं.) नापसंत; नावडता. २ विशोभित.

**आभिक**-वि. (सं.) कामुक; विषयी.

**अभिक्रमण**-पु. (सं.) आक्रमण; चढाई.

**अभिख्या**-स्त्री. (सं.) १ नांव; कीर्ति. २ शोभा.

**अभिगमन**-पु. (सं.)१ जवळ जाणें. २ संभोग.

**अभिग्रह**-पु. (सं.) १ स्वीकार; ग्रहण. २ कलह; भांडण. ३ चोरी करणें; लुटणें. ४ चढाई.

**अभिघात**-पु. (सं.) प्रहार.

**अभिघार**-पु. (सं.) १ शिंपडणें. २ तूप ३ तुपाची आहुति.

**अभिचर**-पु. (सं.) गडी; नोकर.

**अभिचार**-पु. (सं.) जारणमारण, मंत्र, करणी; जादूटोणा.

**अभिजन**-पु. (सं.) १ कुल; वंश. २ परिवार. ३ जन्मभूमि. ४ घरांतील कर्ता पुरुष. ४ ख्याति; कीर्ति.

**अभिजात**-वि. (सं.) १ अभिजात. कुलीन. २ बुद्धिमान; हुशार. ३ योग्य; उपयुक्त. ४ पूज्य; माननीय. ५ सुंदर.

**अभिजित**-वि. (सं.) विजयी.

**अभिध्या**-स्त्री. (सं.) १ दुसऱ्याच्या वस्तूबद्दल अभिलाषा. २ अभिलाष; इच्छा.

**अभिभव**-पु. (सं.) १ पराजय. २ तिरस्कार; अनादर. ३ विलक्षण घटना; अद्भुत गोष्ट.

**अभिमत**-वि. (सं.) १ अभिमत; पसंत; सम्मत. २ इष्ट; वांच्छित.

**अभिमत**-पु. १ (सं.) मत; विचार. २ अभिलषित वस्तू.

**अभिमाति**-स्त्री. (सं.) १ अभिमान; अहंकार; गर्व. २ इच्छा.

**अभिमान**-पु. (सं.) घमेंड; गर्व; अहंकार.

**अभियुक्त**-वि. (सं.) १ प्रतिवादी; २ आरोपी.

**अभियोक्ता**-वि. (सं.) वादी; फिर्यादी.

**अभियोग**-पु. (सं.) १ फिर्याद; आरोप. २ आक्रमण; चढाई. ३ उद्योग.

**अभिरत**-वि. (सं,) १ लीन. २ युक्त; रहित.

**अभिरति**-स्त्री. (सं.) १ हर्ष; आनंद; संतोष. २ लीनता; अनुरक्ति.

**अभिराम**-वि. (सं.) आनंददायक; मनोहर; सुंदर; रम्य.

**अभिराम** पु. (सं.) सुख; आनंद.

**अभिलाख-अभिलाखा**-पु. (सं.) अभिलाषा.

**अभिसंधान**-पु. (सं.) १ प्रतारणा; वंचना. २ उद्दिष्ट; लक्ष्य.

**अभिसंधि**-पु. (सं.) कट.

**अभिसर**-पु. (सं.) १ सहचर; मित्र. २ मदतगार; सहाय्यक.

**अभिसरण**-पु. १ पुढें जाणें. २ समीप गमन. ३ प्रियाकडे जाणें.

**अभिस्रन**-पु. (सं.) सहाय्य; आश्रय.

**अभी**-क्रिवि. (सं.) आतांच; यावेळीं; या क्षणीं.

**अभीक**-वि. (सं.) १ निर्भय. २ निष्ठुर. ३ उत्सुक. ४ कामुक.

**अभीक**-पु. (सं.) १ स्वामी; मालक. २ कवि.

**अभीर**-पु. (सं.) गवळी.

**अभुआना**-क्रि. अ. (सं.) अंगांत येणें.

**अभेरा**-पु. (सं.) १ भांडण; झोंबाझोंबी; लढाई. २ टक्कर.

**अभोगी**-वि. (सं.) विरक्त.

**अभोज**-वि. (सं.) अभक्ष्य; अभोज्य.

**अभ्यंग**-पु. (सं.) १ लेपन; चोपडणें; माखणें. २ तैल मर्दन; स्नेहन.

**अभ्यतर**-पु. (सं.) १ मध्य. २ हृदय.

**अभ्यंतर**-क्रिवि. (सं.) आंत; मध्यें.

**अभ्यक्त**-वि. (सं.) १ चोपडलेला. २ तेल, उटणें इ. लावलेला.

**अभ्यागम**-पु. (सं.) १ उपस्थिति. २ समीपता. ३ युद्ध; ठोसाठोसी. ४ विरोध. ५ अभ्युत्थान.

**अभ्युक्षण**-पु. (सं.) सिंचन.

**अभ्युच्छय**-पु. (सं.) चढाव; उठाव.

**अभ्रंकष**-वि. (सं.) गगनचुंबी.

**अभ्र**-पु. (सं.) १ मेघ; ढग; अभ्र. २ आकाश. ३ अभ्रक. ४ सोनें.

**अमंद**-वि. (सं.) १ चपळ; चलाख. २ उत्तम; श्रेष्ठ. ३ सुंदर, स्वच्छ. ४ उद्योगी; कार्यकुशल.

**अमंद**-पु. (सं.) झाड; वृक्ष.

**अम**-पु. (सं.) १ रोगाचें कारण. २ रोग; आजार.

**अमचूर**-पु. (सं.) कैऱ्यांचें चूर्ण.

**अमजद**-वि. (सं.) पूज्य; माननीय.

**अमत**-पु. १ (सं.) असम्मति. २ रोग; ३ मृत्यु.

**अमदन**-क्रिवि. (अ.) जाणून बुजून.

**अमन**-पु. (अ.) १ शांति; आराम; सुख. २ रक्षण; बचाव.

**अमनस्क**-वि. (सं.) विमनस्क.

**अमनियत**-स्त्री. (फा.) आराम; शांति.

**अमनिया**-वि. (सं.) शुद्ध; पवित्र.

**अमनैक**-पु. (सं.) १ हक्कदार. २ अधिकार गाजविणारा; साहसी.

**अमरख**-पु. ( सं. ) क्रोध; कोप; राग.

**अमरस**-पु. ( सं. ) आंब्याचा सुखविलेला रस.

**अमरसी**-वि. (सं.) अमरसासारखें पिवळें.

**अमराई**-स्त्री.(सं.)आंबराई;आंब्याच्या झाडांची बाग.

**अमरालय**-पु. (सं.) स्वर्ग.

**अमराव**-पु. (सं.) आंबराई.

**अमरी**-स्त्री.(सं.)देवकन्या; देवपत्नी.

**अमरूत**-पु. (सं.) पेरू.

**अमरैया**-स्त्री. (सं.)आंबराई.

**अमर्ष**-पु. (सं.) क्रोध; संताप.

**अमल**-वि. (सं.) १ निर्मल; स्वच्छ. २ निर्दोष; पापशून्य.

**अमल**-पु. (सं.) अभ्रक.

**अमल**-पु. (अ.) १ व्यवहार; कार्य; २ हुकमत; अधिकार. ३ नशा. अंमल. ४ संचय; खोड. ५ व्यसन. ६ प्रभाव; परिणाम. ७ वेळ; समय.

**अमला**-पु. (सं) आंवळा.

**अमला**-पु. (अ) अधिकारी; कारभारी.

**अमली**-वि. (अ.) १ व्यवहारसंबंधी; व्यावहारिक. २ कार्य करणारा. ३ नशेबाज.

**अमली**-स्त्री. (सं.) चिंच.

**अमलुक**-वि. (सं.) पूरेपूर; सर्व; जसाच्या तसा.

**अमस**-पु. (सं.) १ काळ; वेळ; समय.

**अमस**-वि. (सं.) अज्ञानी; निर्बुद्ध.

**अमहूल**-पु. (दे.) कोकंब (झाड).

**अमहर**-स्त्री (सं.) आंबोशी.

**अमांस**-वि. (सं.) कृष; मांसहीन.

**अमा**-स्त्री. (सं.) १ अमावास्या; अवस. २ घर. ३ इहलोक.

**अमात्र**-वि. (सं.) अपरिमित; बेहद्द.

**अमान**-वि. (सं.) १ अपरिमित; अंदाजाबाहेर; खूप; पुष्कळ. २ अप्रतिष्ठित; तुच्छ.

**अमान**-पु. (अ.) रक्षण; संरक्षण; आश्रय.

**अमाना**-क्रि. अ. (सं.) सामावणें; पुरेपूर भरणें. २ गर्व इ. नी फुगणें.

**अमानी**-वि. (सं.) निगर्वी.

**अमामा**-पु. (अ.) मुसलमानी पागोटें.

**अमाय**-वि (सं.) अपरिमित; अगणित; पुष्कळ; खूप.

**अमारी**-स्त्री. (सं.) अंबारी.
**अमाल** पु. (अ.) अंमलदार; शासक.
**अमावट**-स्त्री.(सं.)अंबेपोळी; अंब्याचें साठ.
**अमावना**-क्रि.अ. (सं.) अमाना पहा.
**अमावस**-स्त्री. (सं.) अमावास्या.
**अमिट**-वि. (सं.) अवश्य होणारें; अटळ.
**अमिल**-वि. (सं.) १ अप्राप्य. २ विजोड; विसंगत. ३ उंच सखल; खडबडीत.
**अमिली**-स्त्री. (सं.) इमली पहा.
**अमिष**-पु (सं.) कपट, बतावणी इ. चा अभाव.
**अमिष**-वि. (सं.) निष्कपट; सरळ.
**अमीत**-पु. (सं.) शत्रू.
**अमीर**-पु. (अ.) १ सरदार. २ धनाढ्य; श्रीमंत. ३ उदार.
**अमीरज़ादा**-पु.(फा.) १ राजपुत्र. २ श्रीमंताचा मुलगा.
**अमीव**-पु. (अ.) १ पाप. २ दुःख. ३ रोग.
**अमुक**-वि. (सं.) अमुक अमुक; फलाणा; असाअसा.
**अमुग्ध**-वि. (सं.) १ विरक्त; जितेंद्रिय. २ चतुर.
**अमुत्र**-पु. (सं.) परलोक.
**अमुष्य**-वि. (सं.) प्रख्यात; मशहूर.
**अमूलक**-वि. (सं.) १ खोटें; मिथ्या. २ मूळ नसलेलें.
**अमृततरंगिणी**-स्त्री. चांदणें.
**अमृतदान**-पु. (सं.) भोजन पदार्थ ठेवण्याचा डबा.
**अमृतबान**-पु. (सं.) १ लाखलोटी. २ चिनी मातीची बरणी.
**अमृतसार**-पु. (सं.) लोणी; तूप.
**अमेजना**-क्रि. सं. (फा.) मिश्रण होणें; मिळणें.
**अमेठना**-क्रि. स. उमेठना पहा.
**अमेय-अमेव**-वि. (सं.) मोजतां न यण्याजोगें; अमाप.
**अमोरी**-स्त्री. (सं.) कैरी.
**अमोल-अमोलक**-वि. (सं.) अमोल; बहुमोल.
**अमोला**-पु. (सं.) आंब्याचें रोपटें.
**अमोआ**-पु. (सं.) आंबरसा सारखा रंग.
**अमोही**-वि. (सं.) १ विरक्त. २ निष्ठुर; मोहित न होणारा.
**अमौलिक**-वि. (सं.) १ बिन मुळाचा. २ ना शेंडा ना बुडखा असा. ३ मिथ्या; अयथार्थ.

**अम्मरस**-पु. ( सं. ) एक जातीचें कबूतर.

**अम्माँ**-स्त्री. ( सं. ) आई.

**अम्मामा**-पु. ( अ. ) अमामा पहा.

**अम्मारी**-स्त्री. ( अ. ) अंबारी.

**अम्र**-पु. ( अ. ) १ काम; कार्य. २ विषय. ३ घटना. ४ समस्या. ५ नियम; आज्ञा; विधि.

**अम्लान**-वि. ( सं. ) १ प्रसन्न; प्रफुल्लित. २ निर्मल; स्वच्छ.

**अम्लोद्गार**-पु. ( सं. )करपट ढेकर.

**अम्हौरी**-स्त्री. ( सं. ) घामोळें.

**अयक्ष्म**-वि (सं.) निरोगी.

**अयस**-पु. (सं.) लोखंड.

**अयस्कांत**-पु. (सं.) लोहचुंबक.

**अयस्कार**-पु. (सं.) लोहार.

**अयाँ**-वि. (अ.) १ प्रकट; जाहीर. २ स्पष्ट.

**अयातयाम**-वि. (सं.) १ ताजा. २ शुद्ध.

**अयान**-पु. (सं.) १ स्वभाव; निसर्ग. २ अचंचलता. ३ आडाणी; अज्ञानी.

**अयान**-वि. (सं.) पायीं (वहाना-शिवाय).

**अयानत**-स्त्री. (अ.) मदत; सहाय्य.

**अयाना**-वि. (सं.) अज्ञानी; अडाणी.

**अयाल**-पु. (तु.) १ आयाळ. २ मुलेंबाळें; बालबच्चे.

**अयास्य**-पु. (सं.) १ शत्रु; विरोधी. २ प्राणवायु.

**अयास्य**-वि. (सं.) निश्चल; अटळ.

**अय्याम**-पु. (अ.) १ दिवस, २ काल; समय.

**अय्यार**-पु. (अ.) धूर्त; कात्रेबाज.

**अरंग**-पु. (सं.) सुगंध; सुवास.

**अरंड**-पु. (दे.) एरंड.

**अरंभना**-क्रिस. (सं.) १ आवाज करणें. २ आरंभ करणें; सुरू करणें.

**अरंभना**-क्रिअ. (सं.) सुरू होणें; आरंभ होणें.

**अरइल**-वि. (सं.) अडेल.

**अरई**-स्त्री. (सं.) पऱ्हाणी; आरी.

**अरक**-पु. (सं.) शेवाळ.

**अरक**-पु. (अ.) १ अर्क. २ रस. ३ घाम.

**अरकना**-क्रिअ. (अनु.) अडखळून पडणें. २ फाटणें.

**अरगनी**-स्त्री. (सं.) धुणें वाळत घालण्याची दांडी किंवा दोरी.

**अरग़बानी**-वि. (फा.) १ लाल. २ बैंगणी.

**अरग़बानी**-पु. (फा.) लाल रंग; रक्त वर्ण. -वि. १ लाल रंगाचा. २ बैंगणी.

**अरगल**-पु. ( सं. ) अडसर; अर्गला.

**अरगाना**-क्रि.अ. (सं.) १ अलग होणें; पृथक् होणें. २ स्तब्ध होणें.

**अरघ**-पु. ( सं. ) अर्घ्य.

**अरघट्ट-अरघट्टक**-पु. (सं.) रहाट.

**अरचन**-पु. ( सं. ) पूजा; अर्चा.

**अरचना**-क्रि.स. ( सं. ) पूजा करणें.

**अरचि**-स्त्री. ( सं. ) दीप्ति; प्रकाश; आभा; तेज.

**अरज**-स्त्री. ( अ. ) अर्ज; विनंती.

**अरजल**-वि. ( अ. ) नीच.

**अरज़ी**-स्त्री. ( अ. ) अर्ज; निवेदन पत्र.

**अरजी**-वि. ( अ. ) अर्ज करणारा; प्रार्थना करणारा.

**अरझना**-क्रि. अ. अरुझना पहा.

**अरत**-वि. ( सं. ) १ विरत; विरक्त. २ अनासक्त.

**अराति**-स्त्री. ( सं. ) विरक्ति.

**अरत्नि**-पु. ( सं. ) १ हात; बाहु. २ कोपर. ३ मूठ.

**अरथ**-पु. (सं.) अर्थ.

**अरथना**-क्रि.स. (सं.) १ समजाविणें; विवरण करणें. २ व्याख्या करणें.

**अरथी**-स्त्री. (सं.) १ तिरडी २ २ विमान.

**अरदना**-क्रि. स. (सं. ) १ मळणें; कुचलणें. २ ठार मारणें.

**अरदली**-पु. ( इं.) ऑर्डरली; चपराशी.

**अरपना**-क्रि. स. (सं. ) अर्पिणें.

**अरबर**-वि. ( अनु. ) असंबद्ध.

**अरबराना**-क्रि.अ. (सं.) १ घाबरणें; व्याकूळ होणें. २ लटपटणें.

**अरबरी**-स्त्री. (सं.) घाबरगुंडी.

**अरमान**-पु. (फा. ) इच्छा; लालसा.

**अरर**-पु.(सं.) १ दार [Shutter] २ झाकण.

**अररना दररना**-क्रि. स. (अनु.) दळणें.

**अररना**-क्रि. स. ( अनु.) १ करकरणें. २ करकर आवाज होऊन पडणें ३ एकदम कोलमडणें.

**अरवा**-पु. ( सं.) सामान ठेवावयाची फळी.

**अरवाती**-स्त्री. छपराची पागोळी.

**अरवी**-पु. (सं.) अळकुडी; अळवाचा गड्डा.

**अरस**-वि. ( सं. ) १ नीरस; फिका. २ गांवंढळ; आडाणी.

**अरस**-पु. (अ.) १ छत. २ मनोरा. ३ महाल.

**अरसथ**-पु. (दे.) मासिक हिशोबाची वही.

**अरसना**-क्रि. अ. (सं.) आळसणें; शिथिल पडणें.

**अरसना परसना**-क्रि. स. (सं.) १ शिवणें; स्पर्शणें. २ आलिंगिणें; भेटणें.

**अरसपरस**-पु. (सं.) १ लपंडाव. २ पाहणें.

**अरसा**-पु. (अ.) १ समय; वेळ. २ विलंब; उशीर.

**अरसाना**-क्रि. अ.(सं) आळपावणें; झोपेस येणें.

**अरसीला**-वि. (सं.) आळशी.

**अरसौहां**-वि. (सं.) आळशी.

**अरहट** पु. (सं.) रहाट.

**अरहना**-स्त्री. (सं.) पूजा.

**अरहर**-स्त्री. (सं.) १ तुरीची डाळ. २ तूर.

**अराज़ी**-स्त्री. (अ.) १ जमीन. २ पृथ्वी भूमि ३ शेत.

**अराबची**-पु. (फा.) गाडीवान.

**अराबा**-पु. (अ.) गाडी; रथ.

**अराल**-वि. (सं.) १ तिरपा; वांकडा. २ कुटिल.

**अरिंद**-पु. (सं.) शत्रु.

**अरित्र**-पु. (सं.) १ वल्हें. २ पाण्याची खोली मोजण्याची दोरी. ३ लंगर; नांगर.

**अरियाना**-क्रि. स. (सं.) अरेतुरे करणें.

**अरीठा**-पु. (सं.) रिठें

**अरु**-अव्य. (सं.) आणि; व.

**अरुज**-वि. (सं) निरोगी.

**अरुझना**-क्रि. अ. (सं.) १ गुंतणें; अडकणें २ अडणें; थांबणें.

**अरुण ई**-स्त्री. (सं.) लाली.

**अरुनारा**-वि. (सं.) लाल; तांबडा.

**अरुरना**-क्रि अ (सं.) दु:खित होणें.

**अरुवा**-पु. घुबड.

**अर्क**-पु. (अ) अर्क.

**अर्क** पु. (सं.) १ सूर्य. २ आदितवार. ३ बारा. ४ रुइः मांदार.

**अर्क**-वि. (सं.) पूजनीय.

**अर्चक**-वि. (सं.) पूजक.

**अर्चिमान**-वि. (सं.) प्रकाशमान; चकाकित.

**अर्ज**-पु. (अ.) १ विनंति. २ रुंदी.

**अर्ज़दाश्त**-स्त्री. (फा.) प्रार्थनापत्र; विनतीपत्र.

**अर्ज़ी**-स्त्री. (अ.) अर्ज, विनंतीपत्र.

**अर्थी**-वि. (सं) १ गरजू. २ धनवान ३ इच्छा करणारा. अर्थी पहा.

**अर्दन**-पु. ( सं. ) १ पीडणें; त्रास देणें. २ याचणें. ३ जाणें.

**अर्बदर्ब** -पु. ( सं. ) धनदौलत; पैसा-अडका.

**अर्बुद**-पु. ( सं. ) दहाकोटी. २ मेघ. ३ अरवली पर्वत.

**अर्भ**-पु. (सं.) १ मूल; बालक. २ शिष्य. ३ शिशिरऋतु

**अर्भ**-वि. ( सं. ) मलिन; धुरकट.

**अर्भक**-वि. ( सं. ) १ थोडें; अल्प. २ मूर्ख. ३ कृश; सडपातळ.

**अर्भक**-पु (सं.) बालक.

**अर्म**-पु. ( सं. ) १ एक नेत्ररोग. २ जुनें गांव, शहर.

**अर्श**-पु. ( सं. ) मूळव्याध.

**अर्श**-पु. ( अ. ) १आकाश. २ स्वर्ग.

**अर्शोहर**-पु. (सं. ) सुरण.

**अर्शोघ्न**-पु. ( सं. ) सुरण.

**अर्ह्य**-वि. ( सं. ) पूज्य; माननीय.

**अलंग**-पु. (सं.)दिशा; बाजू.

**अलंब**-पु. आलंब पहा.

**अल**-पु. ( सं. ) १ विंचवाची नांगी. २ विष.

**अलक**-पु. ( सं. ) कपाळावर भुरभुरणारे केंस.

**अलकतरा**-पु. ( अ. ) डांबर.

**अलकलडैता**-वि. (सं.) लाडका.

**अलकसलोरा**-वि. लाडका.

**अलका**-स्त्री. (सं.) आठदहा वर्षांची बालिका.

**अलकावली**-स्त्री. ( सं. ) केसांच्या बटा.

**अलक्त-अलक्तक**-पु. १ लाख. २ लाखेचा रंग; अळिता.

**अलक्ष्य**-वि ( सं. ) १ अदृश्य. २ इंद्रियातीत. ३ ईश्वर.

**अलगनी**-स्त्री. ( सं.) धुणें वाळत घालण्याची दांडी अथवा दोरी.

**अलगरज**-क्रिवि. (अ. ) तात्पर्य कीं; सारांश कीं.

**अरगरज़-अलगरजी**-वि. ( अ. ) बेपरवा.

**अलगरजी**-स्त्री. बेपरवाई.

**अलगोजा**-पु. ( अ. ) अलगुज.

**अलज्ज**-वि. (सं. ) निर्लज्ज.

**अलबत्ता**-अव्य. ( अ. ) १ अलबत; निःसंदेह. २ खरोखर. ३ परंतु.

**अलबेला**-वि. १ छानछोकीचा. २ सुंदर; अनुपम. ३ अल्लड.

**अलम्**-अव्य. ( सं. ) यथेष्ट; भरपूर;

**अलम**-पु. (अ. ) १ दुःख. २ झेंडा.

**अलमस्त**-वि. ( फा ) १ बेशुद्ध. २ निश्चित; बेफिकीर. ३ मस्तीचा कैफ चढलेला.

**अलमारी**-स्त्री. ( पोर्तु. ) कपाट.

**अलमास**-पु. ( फा. ) हिरा.

**अलल टप्पू**-वि. ( दे. ) १ अनुमान-धपक्या. २ अव्यवस्थित. ३ भलता-सलता.

**अलवाँती**-वि.स्त्री. ( सं. ) बाळंतीण.

**अलवाई**-वि. स्त्री. (सं.) एक दोन महिन्यांची व्यालेली गाय वा म्हैस.

**अलस**-वि. ( सं. ) आळशी.

**अलसा**-स्त्री. ( सं. ) लाजाळूची वेल.

**अलसी**-स्त्री. ( सं. ) अळशी: जवस.

**अलसट**-पु. ( सं. ) १ टाळाटाळ; दिरंगाई. २ अडचण.

**अलसेटिया**-वि. ( सं. ) १ दिरंगाई करणारा. २ भांडणखोर.

**अलसौंहाँ**-वि. ( सं. ) आळशी.

**अल-हक़**-क्रिवि. ( अ. ) वस्तुतः; वास्तविक.

**अलहदा**-वि. ( अ. ) अलग; पृथक; अलाहदा.

**अलाई**-वि. ( सं. ) आळशी.

**अलात**-पु. ( सं. ) १ निखारा. २ जळतें कोलीत.

**अलान**-पु. ( सं. ) १ हत्ती बांधण्याचा खांब. २ बंधन; बेडी. ३ वेल चढण्याकरितां पुरलेली काठी.

**अलाबू**-स्त्री. ( सं. ) १ भोपळा. २ तुंबा.

**अलाम**-वि. ( अ. ) व्यर्थ बडबडणारा; मिथ्यावादी.

**अलामत**-स्त्री. (अ.) खूण; चिन्ह.

**अलार**-पु. (सं.) १ दार; झडप. २ आगटी; भट्टी.

**अलाल**-वि. (सं.) १ आळशी; सुस्त. २ निरुद्योगी; रिकामटेकडा.

**अलालत**-स्त्री. (अ.) आजार; आजारीपण.

**अलाव**-पु. ( सं. ) शेकोटी.

**अलावा**-क्रिवि. (अ.) व्यतिरिक्त; शिवाय.

**अलि**-पु. ( सं. ) भ्रमर; भृंग.

**अलिंजर**-पु. ( सं ) मातीचा घडा.

**अलिंद**-पु. ( सं. ) १ ओटा; सज्जा. २ भ्रमर; भुंगा.

**अलिक**-पु. ( सं. ) १ कपाळ; ललाट. २ भुंगा; अलि.

**अली**-स्त्री. ( सं. ) १ सहचरी; मैत्रीण. २ पंक्ती; श्रेणी; ओळ.

**अली**-पु. ( सं. ) भुंगा.

**अलीक**-वि. (सं.) ना शेंडा ना बुडखा असा; मिथ्या; खोटा.

**अलीक**-पु. (सं ) अप्रतिष्ठा: अमर्यादा.

**अलीक**-वि. ( सं. ) अप्रतिष्ठित.

**अलीजा**-वि. (अ.) अधिक; पुष्कळ.

**अलीन**-वि. ( सं ) १ अनुपयुक्त. २ अनुचित.

**अलील**-वि. (अ.) आजारी; रुग्ण.

**अलीह**-वि. (अ.) खोटें: मिथ्या.

**अलेख**-वि. (सं.) १ दुर्बोध: कठिण. २ अगणित; बेहिशोबी. ३ अदृश्य.

**अलेखी**-वि. (सं.) अन्यायी.

**अलोक**-वि. (सं.) १ जो दिसत नाहीं असा: अदृश्य. २ निर्जन; एकांत. ३ पुण्यहीन.

**अलोकना** क्रिस. (सं.) पाहणें.

**अलोना**-वि. (सं.) अळणी; ज्यांत मीठ नाहीं असा.

**अलोल**-वि (सं.) स्थिर.

**अलोलिक**-पु. (सं.) अचंचलता; स्थिरता.

**अल्ताफ़**-पु. (अ.) कृपा: मेहेरबानी.

**अल्लम-गल्लम**-पु. (अनु.) वायफळ बडबड; प्रलाप.

**अल्लामा**-विस्त्री. (अ.) कर्कशा; भांडकुदळ.

**अल्हड**-वि. (सं.) १ खुशालचेंडू २ अल्लड; अननुभवी. ३ उद्धट ४ अडाणी: गांवढळ.

**अवकलन**-पु. (सं.) १ एकत्रित करणें; संकलन. २ पाहणें. ३ ज्ञान. ४ ग्रहण.

**अवकिरण**-पु. (सं.) विखुरणें; पसरणें.

**अवक्रय**-पु. (सं.) १ बदला. २ मूल्य; किंमत. ३ भाडें. ४ कर.

**अवक्रोश**-पु. (सं.) १ कर्कश बोलणें. २ निंदा.

**अवक्लिन्न**-वि. (सं.) आर्द्र; ओला.

**अवखात**-पु. (सं.) खोल खड्डा.

**अवघट**-वि. (सं.) कठिण; अवघड.

**अवघात**-पु. (सं.) प्रहार.

**अवचट**-पु. (सं.) अज्ञानी.

**अवचट**-पु. (सं.) कठिणता.

**अवचनीय**-वि. (सं.) अश्लील.

**अवचय**-पु. (सं.) वेचून एकत्र करणें; फुलें, फळें वेंचणें.

**अवचूरी**-स्त्री. (सं.) टिप्पणी; टीका.

**अवच्छेद**-पु. (सं.) १ भेद; अंतर. २ सीमा; हद्द. ३ इयत्ता. ४ निश्चय. ५ परिच्छेद; विभाग.

**अवट**-पु. (सं.) १ खड्डा; कुंड. २ हत्ती पकडण्याकरितां केलेला खड्डा. ३ नरक.

**अवटना**-क्रि.स. (सं.) १ दूध इ. चुलीवर ठेऊन आटविणें. २ घुसळणें; ढवळणें.

**अवडेर**-पु. (दे.) भानगड; बखेडा.

**अवतंस**-पु. (सं.) १ भूषण; अलंकार. २ शिरोभूषण. ३ श्रेष्ठ.

४ माला; हार. ५ कर्णफूल. ६ पुतण्या. ७ नवरा मुलगा.

**अवतरणिका**-स्त्री. (सं.) १ प्रस्तावना; उपोद्‌घात. २ परिपाठी; रीत.

**अवतरणी**-स्त्री. अवतरणिका पहा.

**अवदात**-वि. (सं.) १ शुभ्र; श्वेत. २ शुद्ध; स्वच्छ; निर्मल. ३ पीत वर्ण.

**अवदान**-पु. (सं.) १ सत्कर्म. २ खंडन; तोडणें ३ बल; शक्ति; पराक्रम. ४ शुद्ध करणें; पवित्र करणें. ५ वाळा; खस.

**अवदान्य**-वि. (सं.) १ पराक्रमी. २ अतिक्रमण करणारा. ३ कृपण; कंजूष.

**अवदारक**-वि. (सं.) विदारक.

**अवदारक**-पु. (सं.) पहार.

**अवदारण**-पु. १ विदारण करणें. तोडणें. २ पहार.

**अवदोह**-पु. (सं.) १ दूध. २ धार काढणें; दोहन.

**अवद्य**-वि. (सं.) १ अधम; पापी. २ निंद्य.

**अवधीरणा**-स्त्री. (सं.) तिरस्कार.

**अवध्वंस**-पु. (सं.) १ त्याग. २ निंदा. ३ कलंक. ४ चूर चूर करणें.

**अवन**-पु. (सं.) १ प्रसन्न करणें. २ रक्षण. ३ प्रीति. ४ अवनि; जमीन. ५ रस्ता; सडक.

**अवनत**-वि. (सं.) १ अवनत. २ पतित; अधोगत. ३ कमी.

**अवनति**-स्त्री. (सं.) घटती; न्यूनता. २ अधोगति. ३ झुकाव. ४ नम्रता.

**अवनेजन**-पु. (सं) १ धुणें. २ आंचवणें.

**अवबोध**-पु; (सं.) १ जागणें. २ बोध; ज्ञान.

**अवबोधक**-पु. (सं.) १ भाट. २ गस्तवाला. ३ सूर्य.

**अवबोधक**-पु. (सं.) बोध करणारा.

**अवबोधन**-पु. (सं.) सूचना.

**अवभासिनी**-स्त्री. (सं.) बाह्य त्वचा.

**अवम**-वि. (सं.) १ अंतिम. २ नीच; अधम. ३ रक्षक; रखवालदार.

**अवम**-पु. (सं.) अधिक महिना.

**अवमत**-वि. (सं.) अवमानित; निंदित.

**अवमति**-स्त्री. (सं.) अवज्ञा; अपमान; निंदा.

**अवमर्दन**-पु (सं.) त्रास देणें; पीडा देणें.

**अवयवी**-वि. (सं.) १ पुष्कळ अवयव युक्त; २ संपूर्ण; समग्र.

**अवयवी**-पु. (सं.) शरीर; देह.

**अवर**-वि. (सं.) १ अन्य; दुसरा. २ अधम; नीच. ३ निर्बल.

**अवरज**-पु १ (सं.) धाकटा भाऊ. २ नीच कुलोत्पन्न.

**अवरत**-वि. (सं.) १ विरक्त. २ स्थिर. ३ पृथक; अलग.

**अवरत**-पु. (सं.) आवर्त.

**अवराति**-स्त्री. (सं.) १ विराम. २ २ सुटका; निवृत्ति.

**अवराधन**-पु. (सं.) पूजा; आराधना; उपासना.

**अवराधी**-वि. (सं.) उपासक; पूजक.

**अवरूढ**-वि. (सं.) उतरलेला; आरूढच्या उलट.

**अवरेखना**-क्रि.स. (सं.) १ रेखाटणें. चित्रित करणें; लिहिणें. २ पाहणें. ३ विचार करणे; अनुमान करणें. ४ समजणें; मानणें.

**अवरेब**-पु. (सं.) १ वक्रगति. २ पेंच. ३ बिघाड; खराबी. ४ झगडा; वादविवाद. ५ वक्रोक्ति.

**अवरोपण**-पु. (सं.) उखडणें; उपटणें.

**अवर्त्त**-वि. (सं.) अपारदर्शक.

**अवलंघना**-क्रिस. (सं.) ओलांडणें.

**अवलग्न**-पु. (सं.) संलग्न.

**अवलग्न**-पु. (सं.) धड.

**अवलिप्त**-वि. (सं.) १ लागलेला. २ आसक्त. ३ घमेंडखोर; गर्विष्ठ.

**अवलीक**-वि. (सं.) निष्पाप; निर्दोष; निष्कलंक; शुद्ध.

**अवलेखना**-क्रि.स. खोदणें; ओरखाडणें; कोरणें.

**अवलेप**-पु. (सं.) १ उटणें. २ घमेंड; गर्व.

**अवलेपन**-पु. १ (सं.) चोपडणें; लिंपणें २ लेप; उटणें. ३ घमेंड; अहंकार. ४ दूषण.

**अवलेहन**-पु. (सं.) १ चाटणें. २ चटणी.

**अववाद**-पु. (सं.) अपवाद पहा.

**अवश**-वि. (सं.) लाचार; परवश.

**अवस**-क्रिवि. (सं.) अवश्य.

**अवसक्त**-वि. (सं.) संलग्न.

**अवसथ**-पु. (सं.) १ वासस्थान; गांव. २ घर. ३ विद्यार्थीवसतिगृह.

**अवसथ्य**-अवसथ पहा.

**अवसन्न**-वि. १ विषण्ण. २ आपद्ग्रस्त; विनाशोन्मुख. ३ सुस्त; आळशी.

**अवसर्पण**-पु. (सं.) अधःपतन.

**अवसाद**-पु. (सं.) १ नाश; क्षय. २ विषाद. ३ दीनता. ४ थकवा. ५ अशक्तता.

**अवसान**-पु. १ विराम; तहकुबी. २ अंत; समाप्ति. ३ सीमा. ४ सायंकाळ. ५ मृत्यु.

**अवसित**-वि. १ समाप्त. २ ऋद्धि पावलेला; वाढलेला. ३ परिपक्व. ४ निश्चित. ५ संबद्ध

**अवसृष्ट**-वि. (सं.) १ त्यक्त; टाकलेला. २ दत्त; दिलेला. ३ काढलेला.

**अवसेख**-वि. (सं.) अवशेष.

**अवसेर**-पु. (सं.) १ विलंब; उशीर. २ अडथळा; अटकाव. ३ चिंता; व्यग्रता; बेचैनी.

**अवसेरना**-क्रि.स. (सं.) दुःख देणें.

**अवस्कंद**-पु. (सं.) शिबिर; देश.

**अवस्कर** पु. (सं.) मलमूत्र.

**अवस्थित**-वि. (सं.) उपस्थित; हजर; विद्यमान.

**अवस्यंदन**-पु. (सं.) टपकणें; ठिबकणें.

**अवहस्त**-पु. (सं.) तळ हाताची मागील बाजू.

**अवहित**-वि. (सं.) एकाग्र चित्त; सावध.

**अवाँ**-पु. (सं.) भट्टी.

**अवांतर**-वि (सं) मध्यवर्ती; मधला.

**अवांतर**-पु. (सं.) मध्य.

**अवाई**-स्त्री. (सं.) १ आगमन. २ खोल नांगरणी.

**अवाक्**-वि. (सं.) १ चुप; मौन; मूक. २ विस्मित; चकित.

**अवाचीन**-वि. (सं.) अधोमुख. २ लज्जित.

**अवात**-वि. (सं.) निर्वात.

**अवार**-पु. (सं.) ऐलतीर; पैल तीराच्या उलट.

**अवारजा**-पु, (फा.) १ जमाखर्चाची वही. २ गोशवारा.

**अवारण**-वि. (सं.) अनिवार्य.

**अवारपार**-पु. (सं.) समुद्र.

**अवारिजा**-पु. आवरजा पहा.

**अवारी**-स्त्री. (सं.) १ किनारा; कड २ लगाम. ३ तोंडाची फट.

**अवास**-पु. (सं.) निवास; घर.

**अविकाशी**-वि. (सं.) निष्क्रिय; निकामी.

**अविक्रांत**-वि. (सं.) १ अनुपम; बेजोड. २ दुर्बल; कमजोर.

**अविक्रिय**-वि. (सं.) ज्यांत बिघाड झाला नाहीं असा.

**अविचार**-पु. (सं.) १ विचाराभाव; अविवेक. २ अन्याय; अत्याचार.

**अविजन**-पु. (सं.) कुल; वंश.

**अविज्ञता**–स्त्री. ( सं. ) अज्ञानता; अनभिज्ञता.

**अवितत**-वि. (सं.) विरुद्ध; उलट.

**अवितत्थ**-वि. (सं.) असत्य; खोटें.

**अवित्त**–वि. (सं.) १ धनहीन. २ अविख्यात; अप्रसिद्ध.

**अवित्यज**–पु. (सं.) पारा.

**अविद्**-वि. ( सं. ) अज्ञानी.

**अविदग्ध**-वि. (सं.) कच्चा ( अर्धवट शिजलेला )

**अविद्य**–वि. (सं.) नष्ट; नेस्तनाबूद.

**अविद्यमान**-वि. ( सं. ) १ अविद्यमान; अनुपस्थित. २ मिथ्या; असत्य.

**अविद्या**–स्त्री. ( सं. ) १ मिथ्याज्ञान. २ मोह; माया.

**अविपन्न**-वि. (सं.) निरोगी.

**अविराम**–वि. (सं.) अविश्रांत.

**अवी**–स्त्री. (सं.) ऋतुमती; विटाळशी.

**अवीजा**–स्त्री. (सं) किसमिस.

**अवीरा**–वि.स्त्री. ( सं. ) १ अपत्यहीन विधवा. २ स्वतंत्र स्त्री.

**अवृध्दिक**–पु. (सं.) मुद्दल.

**अवेद्य**-वि. ( सं) १ अज्ञेय. २ अलभ्य.

**अवेद्या**-विस्त्री. ( सं. ) अविवाह्य स्त्री.

**अवेश**-पु. ( सं. ) आवेश.

**अवैतनिक**-वि. ( सं. ) विना वेतन.

**अवैद्य**-वि. ( सं. ) अज्ञानी.

**अवैमत्य**–पु. ( सं. ) एक मत; एकवाक्यता.

**अवैमत्य**-वि. ( सं. ) सर्व सम्मत.

**अवोक्षण**–पु. ( सं. ) औक्षण.

**अव्वल**-वि. ( अ. ) १ पहिला; प्रथम. २ श्रेष्ठ; उत्तम.

**अव्वल**–पु. ( अ. ) आरंभ.

**अव्वलन्**-क्रिवि. ( अ. ) प्रथमतः.

**अशंभु**–पु. (सं.) अकल्याण; अमंगल; अशुभ.

**अशरण**–वि. ( सं. ) अनाथ; निराधार.

**अशरफ़ी**–स्त्री. ( फा. ) मोहोर.

**अशराफ़**-वि. ( अ. ) सज्जन; भला.

**अशर्म्म**–पु. ( सं. ) दुःख; कष्ट.

**अशर्म्म**-वि. ( सं. ) १ दुःखी; कष्टी. २ घरदार नाही असा.

**अशित्र**–पु. ( सं. ) चोर.

**अशिर**–पु. ( सं. ) १ हिरा. २ अग्नि. ३ राक्षस. ४ सूर्य.

**अश्मर**–वि. ( सं. ) दगडाचा.

**अश्रि**–स्त्री. ( सं. ) १ घराचा कोपरा. २ शस्त्राचें टोंक.

**असंभार**–वि. (सं ) १ सांभाळण्यास कठीण असा; अवजड. २ अपार; खूप मोठा.

**असंभावना**–स्त्री. (सं.) असंभाव्यता; अशक्यता.

**असंभाष्य**–वि. ( सं. ) १ अनुच्चारणीय; न बोलण्या योग्य. २ ज्याच्या जवळ बोलणें योग्य नाहीं असा; वाईट.

**असंभाष्य**–पु. ( सं. ) दुर्वचन.

**असकताना**–क्रिअ. ( सं. ) आळसावणें; कंटाळणें.

**असगुन**–पु. ( सं. ) अपशकुन.

**असढिया**–पु. (सं.) एक विषारी साप.

**असत्कृत**–वि. ( सं. ) अपमानित.

**असन्नध्द**–वि. ( सं. ) १ अतत्पर; तयार नसलेला; सिद्ध नसलेला. २ घमेंडखोर.

**असबाब**–पु. ( अ. ) सामान; चीजवस्तु.

**असमंजस**–पु. ( सं. ) १ दुबधा; मनाचा गोंधळ. २ अडचण.

**असयाना**–वि. (सं.) १ भोळाभाबडा. २ मूर्ख; अडाणी.

**असर**–पु. ( अ. ) परिणाम; प्रभाव.

**असरार**–क्रिवि. ( सं. ) निरंतर; एकसारखा.

**असल**–वि. ( अ. ) १ अस्सल; खरा. २ उच्च; श्रेष्ठ. ३ निर्भेळ.

**असल**–पु. ( अ. ) १ मूळ. २ भांडवल; मुद्दल.

**असली**–नि. ( अ. ) अस्सल.

**असवार**–पु. सवार पहा.

**असह**–वि. ( सं. ) असह्य.

**असहन**–वि. ( सं. ) असहिष्णु.

**असहन**–पु. ( सं. ) शत्रु; वैरी.

**असही**–वि. ( सं. ) द्वेष्टा; मत्सरी.

**असाँच**–वि. ( सं. ) खोटें; असत्य.

**असा**–पु. (अ) सोटा.

**असाढ**–पु- ( सं. ) आषाढ.

**असाढ़**–पु. (दे. ) कातळ; खडक.

**असामी**–पु. ( अ. ) १ असामी; व्यक्ति. २ खंडकरी; शेतकरी. ३ कर्जदार. ४ अपराधी; आरोपी. ५ मित्र.

**असामी**–स्त्री. (अ.) १ वेश्या; रखेली. २ नौकरी.

**असालत**–स्त्री. (अ) १ अस्सलपणा. २ कुलीनपणा.

**असालतन**–क्रि.वि. ( अ. ) स्वतः; खुद्द.

**असासा**–पु. (अ.) १ माल; सामान. २ संपत्ति; धन; दौलत.

**असित**–वि. (सं.) १ शुभ नव्हे असा; काळा. २ कुटिल. ३ दुष्ट.

**असिधावक**-पु. (सं.) धार लावणारा.

**असीर**-पु. (फा.) कैदी.

**असीरी**-स्त्री. (फा.) कैद.

**असीस**-स्त्री (सं.) आशीष; आशीर्वाद.

**असीसना**-क्रि.स. (सं.) आशीर्वाद देणें.

**असुविधा**-स्त्री. (सं.) १ अडचण; २ गैरसोय; त्रास.

**असूझ**-वि. (सं.) १ अंधकारमय. २ अपार; विस्तृत. ३ कठिण; बिकट.

**असूल**-पु. १ उसूल पहा. २ वसूल पहा.

**असेग**-वि. (सं.) असह्य.

**असोच**-वि. (सं.) निश्चित; बेफिकिर.

**असौध**-पु. (सं.) दुर्गंधि.

**अस्तकारी**-स्त्री. (सं.) १ चुन्याची रंग सफेती. २ प्लॅस्टर.

**अस्तन**-पु. (सं.) स्तन.

**अस्तबल** पु. (अ.) तबेला.

**अस्तमन**-पु. (सं.) अस्त होणें.

**अस्तमन वेला**-स्त्री. (सं.) सायंकाळ.

**अस्तर**-पु. (फा.) १अस्तर. २ खेचर.

**अस्तुरा**-पु. (फा.) वस्तरा.

**अस्त्री**-पु. (सं.) शस्त्रधारी.

**अस्थिति**-स्त्री. (सं.) चंचलता; अनिश्चितता; डळमळितपणा.

**अस्ल**-वि. असल पहा.

**अस्ली**-वि. असली पहा.

**अस्वप्न**-पु. देवता.

**अस्वस्थ**-वि. (सं.) १ अस्वस्थ; बेचैन. २ रोगी.

**अस्सी**-वि. (सं.) ऐंशीं.

**अहक**-पु. (सं.) इच्छा; आकांक्षा.

**अहकाम**-पु. अने (अ.) १ नियम; कायदे. २ हुकूम; आज्ञा.

**अहद**-पु. १ प्रतिज्ञा; करार. २ संकल्प; इरादा. ३ राजवट; कारकीर्द; काल.

**अहदनामा**-पु. (फा.) प्रतिज्ञापत्र; करारनामा.

**अहदी**-वि. (अ.) एदी; आळशी.

**अहमक**-वि. (अ.) मूर्ख; बेअक्कल.

**अहमव**-पु. (सं.) अहंकार; अहंपणा.

**अहम्मति**-स्त्री. (सं.) अहंकार.

**अहरन**-स्त्री. (सं.) ऐरण.

**अहरना**-क्रि.स. (सं.) लांकूड तासून सपाट करणें.

**अहरनि**-स्त्री. अहरन पहा.

**अहरा**-पु. (सं.) १ जाळण्याकरितां रचलेला गोवऱ्यांचा ढीग. २ गोवऱ्यांना लागलेली आग.

**अहरी**-स्त्री. ( सं. ) १ पाणपोई. २ हौद

**अहलकार**-पु. ( फा. ) १ कारभारी; गुमास्ता.

**अहलना**-क्रिअ. (सं.) कांपणें; थरथरणें; झलणें.

**अहलाद**-पु. आल्हाद पहा.

**अहल्या**-वि. (सं.) नांगरली न जाणारी ( जमीन ).

**अहवान**-पु. ( सं. ) आवाहन.

**अहसान**-पु. ( अ. ) १ उपकार; भलाई. २ कृपा; अनुग्रह. ३ कृतज्ञता.

**अहाता**-पु. ( अ. ) १ आवार. २ घेरा.

**अहान**-पु. (सं.) गलका; पुकार.

**अहार्य्य**-वि ( सं. ) १ लांच वगैरे न घेणारा. २ हरण केला न जाणारा.

**अहित**-पु. ( सं. ) १ शत्रु; वैरी. २ हानिकारक; अहित.

**अहित**-पु. (सं.) अहित; अकल्याण.

**आहिफेन**-पु. ( सं. ) १ सापाची गरळ. २ अफू.

**अहिला**-पु. (सं.) १ गडबड. २ पूर.

**अहिवल्ली**-स्त्री. ( सं. ) नागवेल.

**अहिवात**-पु. ( सं. ) सौभाग्य.

**अहिवातिन**-वि.स्त्री. (सं.) सौभाग्यवती.

**अहिवातीन**-वि.स्त्री. अहिवातिन पहा.

**अहीर**-पु. ( सं. ) गवळी.

**अहुटना**-क्रि. अ. ( सं. ) हटणें; दूर होणें.

**अहुट**-वि. ( सं. ) औट; साडेतीन.

**अहेर**-पु. ( सं. ) शिकारी.

**अहोराबहोरा**-क्रिवि. ( दे. ) वारंवार; पुन्हा पुन्हा.

---

## आ

**आँक**-पु. ( सं. ) १ चिन्ह; निशाणी. २ अंक; आंकडा; संख्या. ३ दृढनिश्चय. ४ अंश; हिस्सा. ५ कूस. ६ मांडी. ७ अक्षर.

**आँकडा**-पु. ( सं. ) १ आंकडा; अंक. २ पेंच; बिकट प्रश्न.

**आँकना**-क्रि.स. ( सं. ) १ खूण करणें; चिन्ह करणें. २ अंदाज करणें; अनुमान करणें.

**आँकर**-वि. ( सं. ) १ खोल. २ खूप; पुष्कळ. ३ महाग.

**आँकुड़ा**-पु. ( सं. ) अँकुडा पहा.

**आँकू**-पु. ( सं. ) अंदाज करणारा.

**आँख**-स्त्री. ( सं. ) १ डोळा. २ दृष्टि; नजर.

**आँखड़ी**-पु. ( सं. ) आँख पहा.

**आँखफोड़टिड्डा**-पु.( सं.) १ हिरव्या रंगाचा किडा अथवा फुलपांखरूं. २ कृतघ्न.

**आँखमिचौली**-स्त्री. ( सं. ) **आँखमीचली**-लपंडाव.

**आँखमुचाई - आँखमुँदाई** - स्त्री. आँखमिचौली पहा.

**आँग**-पु. ( सं. ) १ अंग. २ स्तन.

**आँगन**-पु. ( सं. ) अंगण; चौक.

**आँगिक**-वि. (सं. ) अंगसंबंधी.

**आँगिक**-पु. ( सं. ) हावभाव.

**आँगी**-स्त्री. (सं.) १ चोळी. २ आँघी पहा.

**आँगुर**-पु. (सं.) अंगुल पहा.

**आँगुरी**-स्त्री. (सं.) बोट; अंगुली.

**आँगुल**-पु. (सं.) अंगुल पहा.

**आँघी**-स्त्री. (सं.) पातळ कापडाची चाळणी.

**आँच**-स्त्री. (सं.) १ आंच; उष्णता; झळ. २ आग; अग्नि. ३ प्रताप. ४ जखम. ५ हानि; अहित. ६ विपत्ति; संकट ७ प्रेम; ममता.

**आँचना**-क्रि स. (सं.) ऊन करणें.

**आँचल**-पु. (सं.) पदर.

**आँजन**-पु. (सं.) अंजन

**आँजना**-क्रि.स. (सं) अंजन लावणें.

**आँजनेय**-पु. (सं.) हनुमान.

**आँट**-स्त्री. (सं.) १ टीच. २ गांठ. ३ वैर. ४ गड्डी; गठ्ठा.

**आँटना**-क्रि.अ. (सं.) १ सामावणें; मावणें. २ पुरेसें होणें; पुरें पडणें. ३ पोंचणें. ४ येणें; मिळणें.

**आँटी**-स्त्री. (सं.) १ गवताची पेंढी. २ विटी. ३ सुताचा गुंडा. ४ धोतराची गांठ.

**आँटसॉट**-स्त्री. (सं.) १ गुप्तकट. २ सादृश्य.

**आँठी**-स्त्री. (सं.) १ दही, साय इ. चा गोळा. २ गांठ ३ अठीळ; बी.

**आँड**-पु. (सं.) अंडकोश.

**आँडा**-स्त्री. (सं.) १ कंद. २ वसवी.

**आँत**-स्त्री. (सं.) आंतडें.

**आँध**-स्त्री. (सं.) १ अंधकार. २ रातांधळेपणा. ३ कष्ट; त्रास.

**आँधना**-क्रि.अ. (सं.) जोरानें पुढें सरसावणें-धांवणें-तुटून पडणें.

**आँधर-आँधरा**-वि. (सं.) आंधळा.

**आँधारंभ**-पु. (सं.) सावळागोंधळ.

**आँधी**-स्त्री. (सं.) झंझावात; तुफान.

**आँब**-पु. (सं) आम पहा.

**आँयबॉय**-पु. १ व्यर्थ वटवट. २ अवाच्यासवा.

**आँवठ** पु. (सं.) कांठ; किनारा.

**आँवड़ना**-क्रि. अ. (सं.) उमडना पहा.

**आँवड़ा**-वि. (सं.) खोल; गहन.

**आँवन**-पु. (सं.) वसवी.

**आँवरा**-पु. (सं.) आवळा.

**आँवल**-पु. (सं.) गर्भ वेष्टण; वार.

**आँवलगट्टा**-पु. (सं.) आवळकटी.

**आँवला**-पु. (सं.) आवळा.

**आँवा**-पु. (सं.) कुंभाराची भट्टी.

**आँस**-स्त्री. (सं) १ वेदना; दुःख. २ दोरी; सुतळी. ३ रेषा.

**आँसी**-स्त्री. (सं.) आनंदाप्रीत्यर्थ वांटण्याची मिठाई.

**आँसू**-पु. (सं.) अश्रू.

**आँहड़**-पु. (सं.) भांडें.

**आँहाँ**-(अव्य.) अं हं; नाहीं.

**आइंदा**-वि. (फा.) भविष्य कालीन; येणारा; येता.

**आइंदा**-पु. (फा.) भविष्यकाल.

**आइंदा**-क्रिवि. (फा.). भविष्यकाळीं; पुढें.

**आइ**-स्त्री. (सं.) आयु; जीवन; आयुष्य.

**आइस-आइसु**-पु. (सं.) आज्ञा; आदेश.

**आई**-स्त्री. (सं.) मृत्यु; मरण.

**आईन**-पु. (फा.) १ कायदा; नियम. २ आरास; सजावट.

**आईना**-पु. (फा.) आरसा.

**आईनादार**-पु. (फा.) न्हावी.

**आईनासाज**-पु. (फा.) आरसे बनविणारा.

**आईनी**-वि. (फा.) कायदेशीर.

**आउ**-स्त्री. (सं.) आयुष्य.

**आउज**-पु. (सं.) ताशा.

**आउबाउ**-पु. (सं.) निरर्थक बडबड, वटवट.

**आक़बत**-स्त्री. (अ.) १ मृत्युनंतरची अवस्था. २ परलोक.

**आकबतअंदेश**-वि. (फा.) दूरदर्शी.

**आकबाक**-पु. (सं.) वटवट.

**आकर**-पु. (सं.) १ खाण; उत्पत्ति-स्थान २ खजिना; भांडार.

**आकरकढा**-पु. (अ.) आकर करहा पहा.

**आकरकरहा**-पु. (अ.) अक्कल काढा.

**आकर्ष**-पु. (सं.) १ आकर्षण. २ फाशांचा खेळ. ३ सोंगट्यांचा पट. ४ इंद्रिय. ५ कसोटी. ६ लोहचुंबक.

**आकली**-स्त्री. (सं.) आकुलता.

**आकष**-पु. (सं.) कसोटी.

**आका**-पु. (सं.) आगटी; भट्टी.

**आक़ा**-पु. (अ.) १ स्वामी; मालक. २ ईश्वर.

**आकारण**-पु. (सं.) बोलावणें.

**आकारी**-वि. (सं.) बोलाविणारा.

**आकाशवृत्ति**-स्त्री. (सं.) अनिश्चित उपजीविका.

**आक़िल**-वि. (फा.) हुषार; बुद्धिमान.

**आकूत**-पु. (सं.) अभिप्राय; आशय.

**आकूति**-स्त्री. (सं.) १ अभिप्राय; मतलब. २ उत्साह. ३ सदाचार.

**आक्रोश**-पु. (सं.) रागावणें; शिव्याशाप देणें.

**आक्लिन्न**-वि. (सं.) १ ओला; भिजलेला; २ नरम.

**आखत**-पु. (सं.) अक्षत.

**आखन**-क्रिवि. (सं.) हरघडी; प्रतिक्षण.

**आखना**-क्रि सं. (सं) १ बोलणें. २ इच्छिणें. ३ पाहणें; न्याहाळणें.

**आखर**-पु. (सं.) अक्षर.

**आखा**-पु. (सं.) १ कापडाची चाळणी. २ थैली.

**आखा**-वि. (सं.) अख्खा; संपूर्ण.

**आख़िर**-वि. (फा.) १ अंतिम; अखेरचा. २ समाप्त.

**आख़िर** पु. (फा.) १ अंत; शेवट; अखेर. २ परिणाम; फळ.

**आख़िर**-क्रिवि. (फा.) १ अखेरीस; २ अवश्य; जरूर.

**आख़िरकार**-क्रि.वि. (फा.) अखेरीस; शेवटीं.

**आख़िरत**-स्त्री. (अ.) १ प्रलयदिन. २ परलोक. ३ मृत्युदिन.

**आख़िरी**-वि. (फा.) अंतिम.

**आखु**-पु. (सं.) उंदीर.

**आखेट**-पु. (सं.) शिकार.

**आखेटक**-पु. (सं.) शिकारी.

**आखोर**-पु. (फा.) १ जनावरांच्या खाण्यानंतर उरलेला चारा. २ केरकचरा. ३ सडलेली, कुजलेली वस्तु.

**आखोर**-वि. (फा.) १ कुचकामाचा; रद्दी. २ निकामी.

**आगण**-पु. (सं.) मार्गशीर्ष.

**आगत**-वि. (सं) आलेला.

**आगत**-पु. (सं.) पाहुणा; अतिथि.

**आगति**-स्त्री. (सं.) आगमन.

**आगमजानी**-वि. (सं.) दूरदर्शी.

**आगमशोची**-वि. (सं.) धोरणी; दूरदर्शी.

**आगमी**-पु. (सं.) ज्योतिषी.

**आगल**-क्रिवि. (सं.) समोर; पुढें.

**आगस**-पु. (सं.) पाप; अपराध.

**आगा**-पु. (सं.) कोणत्याही वस्तूचा समोरचा भाग.

**आगा**-पु. (तु.) १ सरदार. २ अफगाण. ३ सद्गृहस्थ.

**आग़ाज़ा**-पु. (फा.) सुरवात; आरंभ.

**आगान**-पु. (सं.) वृत्तान्त; आख्यान.

**आगार**-पु. (सं.) १ घर. २ स्थान; जागा. ३ खजिना; खाण.

**आगाह**-वि. (फा.) माहितगार; वाकबगार.

**आगाह**-पु. (फा.) आगामी; होणारी गोष्ट.

**आगाही**-स्त्री. (फा.) १ माहिती. २ पूर्वसूचना.

**आगू**-क्रिवि. (सं.) आगे पहा.

**आगे**-क्रिवि. (सं.) १ पुढें. २ भविष्यकाळीं. ३ समोर; सम्मुख. ४ नंतर. ५ पूर्वीं.

**आगौन**-पु. (सं.) आगमन.

**आघ**-पु. (सं.) मूल्य; किंमत.

**आघात**-पु. (सं.) १ आघात. २ कसाईखाना.

**आचरज**-पु. (सं.) आश्चर्य.

**आचार**-पु. (सं.) १ आचार; व्यवहार. २ शुद्धि; सफाई.

**आचारज**-पु. (सं.) आचार्य.

**आचारी**-वि. (सं.) चारित्र्यवान; सदाचारी.

**आच्छान्न**-वि. (सं.) झांकलेला; आवृत्त.

**आच्छोटन**-पु. (सं.) चुटकी वाजविणें.

**आछा**-वि. अच्छा पहा.

**आछो**-वि. अच्छी पहा.

**आछी**-वि. (सं.) खाणारा.

**आछेप**-पु. (सं.) आक्षेप.

**आज़माइश**-स्त्री. (फा.) परीक्षा; पारख.

**आज़मूदा**-वि. (फा.) परीक्षा केलेला.

**आज़ाद**-वि. (फा.) १ मुक्त; स्वतंत्र. २ निडर; निर्भय. ३ उद्धट. ४ अकिंचन.

**आज़ादगी**-स्त्री. (फा.) स्वतंत्रता.

**आज़ादाना**-वि. (फा.) स्वतंत्र; स्वच्छंद.

**आजि**-पु. (सं.) युद्ध; लडाई.

**आजिज़**-वि. (अ.) १ हैराण; त्रासलेला. २ विनीत; नम्र; दीन.

**आजिज़ी**-स्त्री. (अ.) नम्रता.

**आजीविका**-स्त्री. (सं.) धंदा; वृत्ति.

**आजु**-क्रिवि. (सं.) आज.

**आजुर्दगी**-स्त्री. (फा.) खेद; दुःख.

**आजुर्दा**-वि. (फा.) दुःखी.

**आटना**-क्रिस. (सं.) दाबणें; दडपणें.

**आटा**-पु. (सं.) १ पीठ. २ कणीक.

**आडंबर**-पु. (सं.) १ ढोंग; देखावा; अवडंबर. २ आच्छादन. ३ तंबू. ४ मोठा ढोल.

**आड़**-स्त्री. (सं.) १ पडदा; अडोसा. आश्रय; संरक्षण. ३ आडकाठी; प्रतिबंध. ४ उडी. ५ टेकण. ६ नांगी.

**आड़न**-स्त्री. (सं.) ढाल.

**आडना**-क्रिस. (सं.) १ अडविणें. २ बांधणें. ३ गहाण ठेवणें.

**आडबंद**-पु. (सं.+फा.) पहिलवानांचा लंगोट.

**आड़ा**-वि. (सं.) आडवा.

**आड़ालोट**-पु (सं.) डळमळितपणा

**आड़ी**-स्त्री. (सं.) १ बाजू; दिशा. २ एका पक्षाचा; एका गटांतला.

**आढ़-आढक**-पु. (सं.) १ पायली; चार शेर. २ तूर (धान्य)

**आढ़**-स्त्री. (सं.) १ आश्रय; सहारा. २ पडदा. ३ आड (उदा. एक दिवसाआड इ.)

**आढ़**-वि. (सं.) कुशल; दक्ष.

**आढ़की**-स्त्री. (सं.) तुरी.

**आढ़त**-स्त्री. (सं) अडत.

**आढ़ातया**-पु. (सं.) अडत्या.

**आतंक**-पु. (सं.) १ आतंक; भय; धाक; दहशत. २ रोग.

**आततायी**-पु. (सं.) १ आगलाव्या. २ जिवावर उठलेला. ३ जमीन स्त्री इ. अपहरण करणारा.

**आतप**-पु. (सं.) १ ऊन. २ उष्णता; गरमी. ३ सूर्यप्रकाश. ४ ज्वर; ताप.

**आतपत्र**-पु. (सं.) छत्री.

**आतपी** पु. (सं.) सूर्य

**आतम**-वि. (सं) आपला.

**आतमा**-स्त्री. (सं.) आत्मा.

**आतर**-पु. (सं.) नदीपार करण्याचें भाडें.

**आतश**-स्त्री. (फा.) अग्नि.

**आतशक**-पु. (फा.) गरमी; उपदंश

**आतशखाना**-पु. (फा.) १ भिंतींतील शेगडी. २ पारशांचें अग्निकुंड.

**आतशगाह**-पु. आतशखाना पहा.

**आतशजनी**-स्त्री. (फा.) आग लावण्याचें काम.

**आतशदान**-पु. (फा.) शेगडी.

**आतशपरस्त**-पु. (फा.) अग्निपूजक; पारशी.

**आतशी**-वि. (फा) अग्निसंबंधी.

**आतिश**-स्त्री. (फा.) आतश पहा.

**आतिशय्य**-पु. (सं.) आधिक्य.

**आतीपाती**-स्त्री. (दे.) चोर शिपाई खेळ.

**आत्मोत्सर्ग**-पु. (सं.) स्वार्थत्याग.

**आदत**-स्त्री. (अ.) १ संवय. २ स्वभाव.

**आदम**-पु. (अ.) मानव जातीचा आदि पुरुष.

**आदमियत**-स्त्री. (अ.) माणुसकी.

**आदमी**-पु. (अ.) १ मानव; मनुष्य. २ नोकर.

**आदहन**-पु (सं.) १ ईर्षा; दाह. २ स्मशान; दहनभूमि.

**आदा**-पु. (सं.) आलें.

**अदानप्रदान**-पु. (सं.) देवाण घेवाण; देवघेव.

**अदाब**-पु. (अ.) १ नियम; कायदे. २ लज्जा; अदब. ३ नमस्कार; प्रणाम.

**आदिम**-वि. (सं) पहिला.

**आदिल**-वि. (फा.) न्यायी.

**आदी**-वि. (अ.) अभ्यस्त.

**आदी**-स्त्री. (सं.) आलें.

**आदीनव**-पु, (सं.) १ दोष. २ क्लेश.

**आदृत**-वि. (सं.) सम्मानित; आदर केला गेलेला.

**आध**-वि. (सं.) अर्धा.

**आधा**-वि. (सं) अर्धा.

**आधासीसी**-स्त्री. (सं.) अर्धशिशी.

**आधूत**-वि. (सं.) १ कंपित. २ वेडा. ३ व्याकुळ.

**आधारण**-पु. (सं.) माहुत.

**आनंदबधाई**-स्त्री. (सं-) १ मंगल उत्सव. २ मंगल वेळ.

**आन**-स्त्री. १ मर्यादा; लज्जा. २ शपथ. ३ ऐट; तोरा. ४ प्रकार; तऱ्हा. ५ क्षण.

**आन**-वि. (सं.) अन्य; दुसरा.

**आनतान**-स्त्री. (सं.) वायफळ बडबड.

**आनतान**-स्त्री. (सं.) १ गप्प; बात; शेंडा बुडखा नसलेली गोष्ट. २ मर्यादा. ३ टेकू.

**आननफानन**-क्रिवि. (अ.) अतिशीघ्र; झटपट.

**आनना**-क्रि.स. (सं.) आणणें.

**आनबान**-स्त्री. १ थाटमाट. २ ऐट; मिजास; तोरा.

**आना**-क्रि.अ. (सं.) येणें; आगमन करणें.

**आना**-पु. (सं.) आणेली; आणा.

**आनाकानी**-स्त्री. (सं.) १ दुर्लक्ष; टाळाटाळ. २ ऐकले न ऐकलेसे करणें; ३ कानगोष्ट.

**आनि**-स्त्री. (सं.) शपथ.

**आनीजानी**-वि. (सं.) क्षणभंगुर.

**आनुपूर्वी**-वि. (सं.) क्रमवार.

**आप**-सर्व. (सं.) १ आपण. २ स्वतः; खुद्द.

**आपगा**-स्त्री. (सं) नदी.

**आपण**-पु. (सं.) बाजार.

**आपत्ति**-स्त्री. (सं.) १ दुःख. २ संकट; विपत्ति. ३ आक्षेप; विरोध; हरकत. ४ दोषारोप.

**आपन**-सर्व. आपला.

**आपरूप**-वि' (सं.) साक्षात्; मूर्तिमान.

**आपस**-स्त्री. (सं.) नातें; संबंध.

**आपा**-पु. (सं.) १ गर्व; घमेंड. २ वडीलभाऊ ३ स्वत्व. ४ शुद्धि; भान.

**आंपा**-स्त्री. वडील बहीण (मुसलमानांत).

**आपा**-पु. मोठा भाऊ.

**आपात**-पु. (सं.) १ पतन; अधःपात २ अनपेक्षित घडलेली गोष्ट. ३ आरंभ. ४ अंत.

**आपाततः**-क्रिवि. (सं.) १ अचानक; अकस्मात्. २ शेवटीं; अंतीं.

**आपाधापी**-वि. (सं.) १ आप आपल्या कामाची विवंचना. २ ओढाताण; ओढ घस्त.

**आपान**-पु. (सं.) गुत्ता.

**आपानक**-पु. (सं.) मदिरापान.

**आपपंथी**-वि. (सं.) मनमानेल तसें वागणारा; स्वैराचारी.

**आपीड**-पु. (सं.) शिरोभूषण.

**आपीत**-पु. (सं.) सोनामुखी.

**आपुन-नो**-सर्व. (सं.) आपला.

**आपुस**-पु. (सं.) आपस पहा.

**आपूष**-पु. (सं.) १ शिसें. २ कथील.

**आपेक्षिक**-वि. (सं.) अपेक्षा ठेवणारा; अवलंबून राहणारा.

**आप्त**-वि. (सं.) १ प्राप्त; लब्ध. २ कुशल; दक्ष. ३ प्रारब्ध.

**आप्त**-पु. (सं.) ऋषि.

**आप्ति**-स्त्री. (सं.) लाभ; प्राप्ति.

**आफ़त**-स्त्री. (अ.) १ आपत्ति; संकट. २ कष्ट; दुःख.

**आफताब**-पु. (फा.) १ सूर्य. २ ऊन.

**आफताबा**-पु. (फा.) पाण्याची झारी.

**आफतावी**-वि. (फा.) १ अबदागीर. २ चंद्रज्योत.

**आफताबी**-वि. (फा.) १ सूर्यसंबंधी. २ गोल; वाटोळा.

**आफरीन**-अव्य. (फा.) वाहवा; शाबास.

**आफात**-स्त्री. (अ.) संकटें; विपत्ति. (आफत बहु०)

**आफियत**-स्त्री. (अ.) कुशल; क्षेम.

**आफू**-स्त्री. (सं.) अफू.

**आब**-स्त्री. (फा.) १ तेज; कांति. २ शोभा; सौंदर्य. ३ प्रतिष्ठा; महिमा.

**आब**-पु. (फा.) पाणी

**आबकार**-पु. (फा.) कलाल.

**आबकारी**-स्त्री. (फा.) दारू गाळण्याचें स्थान.

**आबखोरा**-पु. (फा.) पाणी पिण्याचें भांडें; पेला.

**आबगीना**-पु. (फा.) १ काचेचा पेला. २ आरसा. ३ हिरा.

**आबताब**-स्त्री. (फा.) १ चमक; कांति. २ वैभव; भपका.

**आबदस्त**-पु (फा.) १ ढुंगण धुणें. २ ढुंगण धुण्याचें पाणी.

**आबदाना**-पु. (फा.) १ अन्नपाणी; दाणापाणी; २ उपजीविका.

**आबदार**-वि. (फा.) पाणीदार; चमकदार.

**आबदारी**-स्त्री. (फा.) चमक; कांति; तजेला; पाणी.

**आबनजूल**-पु. (फा.) अंडवृद्धि.

**आबनूस**-पु. (फा.) जंगली काळें झाड.

**आबनूसकुंदा**-(मुहा.) काळाकुळकुळीत; काळाकुट्ट.

**आबनूसी**-वि. (फा.) काळाठिक्कर; काळाकुट्ट.

**आबपाशी**-स्त्री. (फा.) शिंपणें; झाडांना पाणी देणें.

**आबरवाँ**-स्त्री. (फा.) एक प्रकारची पातळ मलमल.

**आबरू**-स्त्री. (फा.) इज्जत; प्रतिष्ठा; अब्रू.

**आबला**-पु. (फा.) भाजल्यामुळें येणारा फोड.

**आबहवा**-स्त्री. (फा.) हवापाणी.

**आबाद**-वि. (फा.) १ वसलेलें. २ प्रसन्न; सुखी. ३ सुपीक (जमीन).

**आबादी**-स्त्री. (फा) वस्ती; वसाहत. २ लोकसंख्या. ३ लागवडीस उपयोगी जमीन.

**आबी**-वि. (फा.) १ पाण्यासारखा; पाण्यासंबंधी. २ पाण्यांत राहणारा. ३ फिकट रंगाचा. ४ अस्मानी रंगाचा.

**आब्दिक**-वि. (सं.) वार्षिक.

**आभीर**-पु. (सं) गवळी.

**आभील**-पु. दुःख; कष्ट.

**आम्**-अव्य. (सं.) हूं; हाँ (संमति सूचक शब्द).

**आम**-पु. (सं.) १ आंबा. २ आंव.

**आम**-वि. (अ.) १ साधारण; सर्व-सामान्य; मामूली. २ प्रसिद्ध; विख्यात.

**आम**-वि. (सं.) अपक्व; कच्चा.

**आमद्**-स्त्री. (फा.) १ आगमन; येणें. २ आय; उत्पन्न; मिळकत.

**आमद्नी**-स्त्री. (फा.) १ प्राप्ति; उत्पन्न. २ आयात माल.

**आमनस्य**-पु. (सं.) विमनस्कता.

**आमनासामना**-पु. (सं.) भेट; गांठ.

**आमनेसामने**-क्रिवि. (सं.) समोरा-समोर.

**आमय**-पु. (सं.) रोग; व्याधि.

**आमलक**-पु. (सं.) आवळा.

**आमला**-पु. (सं.) आवळा.

**आमादगी**-स्त्री. (फा.) तयारी; तत्परता.

**आमादा**-वि. (फा.) तयार; तत्पर; उद्यत.

**आमाल**-पु. (अ.) कर्म; वर्तणूक; करणी.

**आमालक**-पु. (दे.) पर्वताच्या आसपासची जमीन.

**आमिक्षा**-स्त्री. (सं.) नासलेलें दूध; फाटलेलें दूध.

**आमिख**-पु. (सं.) आमिष पहा.

**आमिल**-पु. (अ.) १ काम करणारा २ कर्तव्य परायण. ३ अंमलदार; अधिकारी. ४ जादू टोणा करणारा.

**आमिष**-पु. (सं.) १ मांस; २ लालूच; अमीष ३ भोग्य वस्तु.

**आमिषी**-स्त्री. (सं.) जटा.

**आमी**-अव्य. एवमस्तु.

**आमी**-स्त्री. (सं.) कैरी

**आमेज़**-वि. (फा.) मिश्रित.

**आमेजना**-क्रि.स. (फा.) मिसळणें; मिळवणें.

**आमेजिस**-स्त्री. (फा.) मिश्रण.

**आम्नाय**-पु. (सं.) १ अभ्यास. २ वेद. ३ वेदाभ्यास.

**आयँती-पायँती**-स्त्री. (सं+फा.) उसें पायथें.

**आयत**-वि. (सं.) आयन; विस्तृत.

**आयत**-स्त्री. (सं.) कुराणांतील वाक्य.

**आयत्त**-वि. (सं.) अधीन.

**आयात्ति**-स्त्री. (सं.) अधीनता.

**आयद्**-वि. (अ.) आरोपित.

**आयस**-पु. (सं.) १ लोखंडी. २ लोखंडी कवच.

**आयसी**-वि. (सं.) लोखंडी.

**आयसु**-स्त्री. (सं.) आज्ञा; हुकूम.

**आया**-अ०प. (फा.) काय ? किंवा नाहीं. [उदा० काय? तूं असें केलेंस कां नाहीं? इ.]

**आया**-स्त्री. (पोर्तु) आया; दाई.

**आर**-पु. (स.) १ अशुद्ध लोखंड. २ कांठ; किनारा. ३ घर; खाना. ४ पितळ. ५ चाकाचा आरा. ६ कोपरा.

**आर**-स्त्री. (सं.) १ अणकुचीदार खीळ. २ कोंबड्याचा पंजावरील कांटा ३ डंख; नांगी. ४ आरी.

**आर**-पु. (दे.) हट्ट; जिद्द.

**आर**-स्त्री. (अ.) १ तिरस्कार; घृणा. २ वैर; शत्रुत्व. ३ लाज; शरम.

**आरजा**-पु. (अ.) रोग.

**आरजू**-स्त्री. (फा.) १ इच्छा; अभिलाषा. २ विनंति; अनुनय.

**आरति**-स्त्री. (सं.) विरक्ति.

**आरती**-स्त्री. (सं.) १ आरती. २ आरतीचें तवक.

**आरसा**-पु. दोरखंड.

**आरसी**-स्त्री. (सं.) १ आरसा. २ खड्याची आंगठी.

**आरा**-पु. (सं.) करवत.

**आराइश**-स्त्री. (फा.) आरास; सजावट.

**आराकश**-पु. (फा.) अरकस.

**आराज़ी**-स्त्री. (अ.) १ जमीन. २ भूमि. ३ शेत.

**आराति**-पु. (सं.) शत्रु; वैरी.

**आराम**-पु. (सं.) बाग; उपवन.

**आराम**-पु. (फा.) १ आराम; चैन; सुख. २ स्वास्थ्य. ३ विसावा; विश्रांति.

**आराम**-वि. (फा.) तंदुरस्त.

**आरामगाह**-स्त्री. (फा.) शयनागार.

**आरामतलब**-वि. (फा.) १ सुखलोलुप; विलासी. २ आळशी; खुशालचेंडू.

**आरास्ता**-वि. (फा.) सजविलेला; सुशोभित.

**आरि**-स्त्री. (सं.) हेका; हट्ट.

**आरी**-स्त्री. (सं.) १ करवत. २ पऱ्हाणी. ३ आरी. ४ किनारा; बाजू.

**आरी**-वि. (अ.) हैराण.

**आरेस**-पु. (सं.) द्वेष; ईर्षा.

**आरोधना**-क्रि.स. (सं) अडविणें; रोखणें.

**आर्जव**-पु. (सं.) सरलता; साळसता.

**आर्त्तव**-वि. (सं.) १ मोसमी. २ ऋतुसंबंधी.

**आर्त्तव**-पु. (सं.) आर्त्तव,

**आलंग**-पु. (दे.) घोड्यांची मस्ती.

**आलंब**-पु. (सं.) १ अवलंब; आश्रय. २ गति; गत.

**आलंभ**-पु. (सं.) १ शिवणें; स्पर्श करणें. २ वध; हिंसा.

**आल**-पु. (सं.) हरताळ.

**आल**-स्त्री. (सं.) १ भोपळा (दुध्या). २ कांद्याच्या पात्या. ३ एक वृक्ष विशेष.

**आल**-स्त्री. (सं.) १ भांडण; तंटा-बखेडा. २ आर्द्रता. ३ अश्रु.

**आल**-स्त्री. (अ.) १ मुलींची संतति. २ वंश; कुल.

**आलना**-पु. (सं.) घरटें.

**आलपीन**-स्त्री. (पोर्तु.) टांचणी

**आलम**-पु. (अ.) १ जग; दुनिया. २ जनसमूह. ३ दशा; अवस्था.

**आलमनक**-पु. (तुर्क.) पंचांग.

**आलमारी**-स्त्री. (पोर्तु.) कपाट.

**आलस**-वि. (सं.) आळशी; सुस्त.

**आलस**-वि (सं.) आळस; सुस्ती.

**आला**-पु. (सं.) १ कोनाडा. २ कुंभाराची भट्टी.

**आला**-वि. (अ.) श्रेष्ठ; अव्वल दर्जाचा.

**आला**-वि. (सं.) १ ओला; भिज-लेला. २ ताजा.

**आला**-पु. (अ.) हत्यार.

**आलाइश**-स्त्री. (फा.) १ घाण; मळ २ प, अशुद्ध रक्त इ. ३ पोटां-तील आंतडीं इ.

**आलात**-पु. (सं.) १ कोलीत. २ जळती बोथाटी.

**आलात**-पु. (अ) हत्यार.

**आलात**-पु. (दे.) जहाजाचा मार्ग.

**आलात**-पु. (दे.) जहाजाचा दोर.

**आलान**-पु. (सं.) १ हत्ती बांध-ण्याचा खांब, खुंटा किंवा सांखळी.

**आलाप**-पु. (सं.) १ संभाषण. २ तान; आलाप.

**आलापिनी**-स्त्री. (सं.) बांसरी.

**आलारासी**-वि. (सं.) बेपर्वा; बेछूट.

**आलावर्त्त**-पु. (सं.) कापडाचा पंखा.

**आलि**-स्त्री. (सं.) १ सहचरी; मैत्रीण. २ विंचू. ३ भ्रमरी. ४ पंक्ति; ओळ. ५ रेषा; रेघ.

**आलिम**-वि. (अ.) पंडित; विद्वान.

**आली**-स्त्री. (सं.) सहचरी; सखी.

**आली**-वि. (अ.) उच्च; श्रेष्ठ; मान-नीय.

**कलौंजी**-स्त्री. ( सं. ) १ काळें जिरें. २ भेंडी, पडवळ, कारली इ. ची मसालेदार भाजी.

**कलौंस**-वि. (सं.) काळसर.

**कलौंस**-पु. (सं.) १ काळेपणा. २ कलंक.

**कल्पक**-पु. ( सं. ) न्हावी.

**कल्पक**-वि. (सं.) १ कल्पक. २ कापणारा.

**कल्पनी**-स्त्री. ( सं. ) कात्री.

**कल्लाँच**-वि. (तु.) १ लुच्चा; गुंड; लबाड. २ दरिद्री; कंगाल.

**कल्ला**-पु. (सं.) १ अंकुर; मोड. २ दिव्याचा बर्नर.

**कल्ला**-पु. (फा.) १ जबडा. २ गालफड.

**कल्ला**-पू. (सं.) कलह; झगडा; भांडण.

**कल्लातोड**-वि. (फा.+सं.) १ सडेतोड (जबाब); समर्पक. २ बरोबरीचा.

**कल्लादराज**-वि. ( फा. ) तोंडाळ; फटकळ.

**कल्लाना**-क्रि.अ. (सं.) १ चुणचुणणें; ठुसठुसणें; ठगकणें. २ असह्य होणें; दुःसह होणें.

**कल्लू**-वि. (सं.) काळाकुट्ट.

**कल्लेदराज**-वि कल्लादराज पहा.

**कल्लोल**-पु. ( सं. ) १ पाण्याची लाट; लहर; तरंग. २ मौज; आनंद; हंसणें खिदळणें.

**कल्ह**-क्रिवि. ( सं. ) काल.

**कल्हरना**-क्रि.अ. ( सं. ) कढईत तळलें जाणें.

**कल्हरना**-क्रि स. (सं.) १ तळणें; परतणें. २ विव्हळणें.

**कवन**-सर्व. (सं.) कोण.

**कवर**-पु. (सं.) १ घास; ग्रास; कवळ. २ केशपाश. ३ गुच्छ. ४ ४ मीठ.

**कवर**-वि. (सं.) गुंफलेला.

**कवर**-पु. (इं.) कव्हर (Cover).

**कवरी**-स्त्री. (सं.) १ वेणी. २ रानतुळस.

**कवलित**-वि. (सं ) खाल्लेला; भक्षिलेला.

**कवष**-पु. (सं.) ढाल.

**कवाट**-पु. (सं.) दार; झडप.

**क़वाम**-पु. (अ.) पाक.

**क़वायद**-स्त्री. ( अ. ) १ नियम; व्यवस्था. २ व्याकरण. ३ सैन्याचे युद्धविषयक नियम. ४ कवायत.

**कविक**-पु. (सं.) लगाम.

**कविका**-स्त्री. (सं.) १ लगाम. २ केवडा. ३ एक प्रकारची मासळी.

**कविताई**-स्त्री. (सं.) काव्य.

**कवित्त**-पु. (सं.) काव्य.

**कविलास**-पु. (सं.) १ स्वर्ग. २ कैलास;

**कविलासिका**-स्त्री. (सं.) एक प्रकारची वीणा.

**कवीठ**-पु. (सं.) कवठ.

**कवेरा**-पु. १ खेडवळ. २ गावंढळ चालीचा

**कशा**-पु. (सं.) चाबूक.

**कशा**-पु. (फा.) १ ताण; तणाव. २ हुक्का किंवा चिलमीचा दम.

**कशमकश**-स्त्री. (फा.) १ ओढाताण; खेंचाखेंची. २ धक्काबुक्की. ३ दुबधा; बुचकळा.

**कशा**-स्त्री. (सं.) १ दोरी; रश्शी. २ २ चाबूक.

**कशिपु**-पुं. (सं.) १ तक्या. २ आसन; अंगरी. ३ कपडा; वस्त्र. ४ अन्न; भात.

**कशिश**-पु. (फा.) १ ताण; तणाव; आकर्षण. २ वैमनस्य.

**कश्ती**-स्त्री. (फा.) १ नाव; नौका; होडी. २ तबक.

**कश्मल**-पु. (सं.) १ मूर्च्छा. २ पाप.

**कश्मल**-वि. (सं.) पापी. २ मलिन.

**कष**-पु. (सं.) १ धारेचा दगड. २ कसोटीचा दगड. ३ परीक्षा, कसोटी.

**कस**-पु. (सं.) १ कसोटी; परीक्षा. २ तलवारीचा लवचिकपणा.

**कस**-स्त्री. दोरी; रश्शी.

**कस**-पु. (सं.) १ बल;जोर. २ ताबा; अधिकार. ३ अवरोध. ४ अर्क; सत्व. ५ सार; तत्व.

**कस**-क्रिवि. (सं.) १ कसें. २ कां.

**कसक**-स्त्री. (सं.) १ ठणका; वेदना; कळ. २ अढी; द्वेष. ३ अभिलाषा; आकांक्षा; इच्छा. ४ सहानुभूति.

**कसकना**-क्रि.अ. (सं.) ठणकणें; ठुसठुसणें; सलणें.

**कसकुट**-पु. (सं.) कासें.

**कसगर**-पु. (फा.) मुसलमानी कुंभारांची जात.

**कसना**-क्रि.स. (सं.) १ बांधणें. २ कसणें; आवळणें. ३ करकचून बांधणें. ४ पारख करणें; अजमावणें. ६ ठांसून भरणें. ६ तळणें. ७ त्रास देणें. दूध आटवून खवा तयार करणें.

**कसना**-क्रि.अ. (सं.) १ आवळलें जाणें. २ संकुचित होणें; घट्ट होणें. ३ ठांसून भरलें जाणें.

**कसनी**-स्त्री. (सं. ) बांधण्याची दोरी २ वेष्टण. ३ चोळी. ४ कसोटी. ५ परीक्षा; पारख.

**कसब**-पु. (अ.) १ परिश्रम; मेह-नत. २ पेशा; व्यवसाय. ३ उपार्जन. ४ कला; हुन्नर. ५ व्यभिचार; वेश्या-वृत्ति.

**क़सबा**-पु. (अ.) मध्यम वस्तीचें शहर; मोठें गांव.

**कसबिन**-स्त्री. कसबी पहा.

**कसबी**-स्त्री. (अ.) वेश्या; कसबीण.

**क़सम**-स्त्री. (अ.) शपथ; कसम.

**कसमसाना**-क्रि.अ. ( अनु. ) १ खेंचाखेंच होणें; गर्दीत ढकलाढकली होणें. २ बेचैन होणें. ३ मागें पुढें करणें. ४ चुळबुळ करणें.

**कसमसाहट**-स्त्री. (अनु.) १ चुळ-बुळ; अस्थिरता. २ बेचैनी; व्याकु-लता.

**कसमसी**-स्त्री. कसमसाहट पहा.

**कसर**-स्त्री. (अ.) १ न्यूनता; कसर. २ वैर; द्वेष. ३ तोटा; नुकसान. ४ दोष; विकार.

**कसरत**-स्त्री. ( अ. ) १ कसरत; व्यायाम. २ विपुलता; आधिक्य.

**कसरहट्टा**-पु. तांब्या पितळेच्या भांड्यांचा बाजार.

**कसहँड**-पु. तांब्या पितळेचीं मोडकीं तोडकीं भांडीं वगैरेंचे तुकडे.

**कसहँडा**-पु. **कसहँडी**-स्त्री. तपेलें.

**कसाना**-क्रि.अ. (सं.) १ कळकणें. २ कळकल्याप्रमाणें लागणें; तुरट लागणें. ३ आंबुसणें.

**कसाना**-क्रि.स. ( सं. ) आंवळून बांधविणें.

**कसार**-पु. (सं.) तुपांत भाजलेली व साखर घातलेली कणीक अथवा रवा.

**कसाला**-पु. (सं.) १ त्रास; कष्ट; तकलीफ. २ मेहनत; परिश्रम.

**कसाव**-पु. (सं.) तुरटपणा.

**कसियाना**-क्रि.अ. (सं.) कळकणें.

**कसीदा**-पु. (अ.) कशीदा.

**क़सीदा**-पु. (अ.) एक उर्दू काव्य प्रकार.

**क़सूर**-पु. (अ.) अपराध कसूर.

**क़सूरमंद**-वि. ( फा. ) दोषी; अप-राधी.

**कसूरवार**-वि. (फा.) दोषी; अप-राधी.

**कसेरा**-पु. (सं.) तांब्या पितळेचीं भांडीं बनविणारा; कासार.

**कसैया**-पु. (सं.) १ करकचून बांध-णारा. २ कस लावणारा; पारख कर-णारा.

**कसैला**-वि. (सं.) तुरट.

**कसैली**-स्त्री. (सं.) सुपारी.

**कसोरा**-पु. (सं.) मातीचें परळ; मातीचा कटोरा.

**कसौटी**-स्त्री. (सं.) कसोटी.

**कस्तरी**-स्त्री. (फा.) दूध तापविण्याचें मडकें; दुधाणी.

**कस्तूर**-पु. (सं.) १ कस्तुरी मृग. २ कस्तुरी.

**कस्तूरा**-पु. (सं.) कस्तुरी मृग.

**कस्तूरी**-स्त्री. (सं.) कस्तुरी.

**क़स्द**-पु. (अ.) संकल्प; विचार; इरादा.

**कस्सा**-पु. (सं.) १ बाभळीची साल. २ बाभळीच्या सालीपासून तयार केलेलें मद्य.

**कस्साब**-पु. (अ.) कसाब; कसाई.

**कहँ**-प्रत्य. (सं.) ला, करितां (चतुर्थीचा प्रत्यय).

**कहँ**-क्रि. वि. कहाँ पहा.

**क़ह क़हा**-पु. (फा.) खदखदून हंसणें.

**कहगिल**-स्त्री. (फा.) गिलावा.

**क़हत**-पु. (अ.) दुर्भिक्ष; दुष्काळ.

**कहन**-स्त्री. (सं.) १ कथन. २ म्हण; उक्ति. ४ कविता.

**कहना**-क्रि.स. (सं.) म्हणणें; बोलणें; सांगणें.

**कहना**-पु. (सं.) म्हणणें; बोलणें; सांगणें.

**कहनाउत-कहनावत**-स्त्री. (सं.) १ कथन. २ म्हण.

**कहनि**-स्त्री. कहन पहा.

**कहनी**-स्त्री. (सं.) १ कथा; गोष्ट; कहाणी. २ कथन; बोलणें.

**कहनूत**-स्त्री. (सं.) म्हण.

**कहर**-पु. (अ.) संकट; आपत्ति.

**कहर**-वि. (अ.) १ अगम; अपार. २ घोर; भयंकर.

**कहरना**-क्रि.अ. (ध्व.) कण्हणें.

**कहल**-पु. (दे.) १ उकाडा; अंगाची तगमग करणारा उकाडा. २ त्रास.

**कहलना**-क्रि.अ. (दे.) कासावीस होणें.

**कहलवाना-कहलाना**-क्रि.स (सं.) १ सांगविणें; २ निरोप धाडणें. ३ म्हणविणें.

**कहवाँ**-क्रिवि. (सं.) कोठें.

**क़हवा**-पु. (अ.) कॉफी.

**कहवाना**-क्रि.स. कहलवाना पहा.

**कहाँ**-क्रिवि. (सं.) कोठें.

**कहा**-पु.(सं.) कथन; उपदेश.

**कहा**-क्रिवि. (सं.) कसें; कशा प्रकारें.

**कहा**-सर्व. (सं.) काय.

**कहाना**-क्रि.स. (सं.) कहलाना पहा.

**कहार**-पु. (सं.) १ भोई. २ पाणी भरण्याचें काम करणारा; पाणक्या.

**कहारा**-पु. (सं.) मोठी टोपली; हारा.

**कहावत**-स्त्री. (सं.) म्हण; उक्ति.

**कहासुना**-पु. (सं.) अयोग्य कथन; अयोग्य व्यवहार; चूकभूल.

**कहासुनी**-स्त्री. (सं.) बोलाचाली; भांडण.

**कहिया**-क्रिवि. (सं.) केव्हां.

**कहीं**-क्रिवि. (सं.) १ कोठेंतरी; कोठेंहि. २ कदाचित; जर. ३ थोडें-बहुत.

**कहूँ**-क्रिवि. (सं.) कोठें.

**कॉंइयाँ**-वि. (अनु.) धूर्त.

**कॉंई**-अव्य. (सं.) कां.

**कॉंकड़ा**-पु. सरकी.

**कॉंकर**-पु. (सं.) खडा.

**कॉंकरी**-स्त्री. (सं.) खडी.

**कॉंकुनी**-स्त्री. कँगनी पहा.

**कॉंख**-स्त्री. (सं.) काख; बगल.

**कॉंखना**-क्रि.अ. (अनु.) हाश्शहुश्श करणें.

**कॉंखी**-वि. (सं.) अभिलाषी.

**कॉंगडी**-स्त्री. (दे.) गळयांत अडकविण्याची काश्मीरी शेगडी.

**कॉंच**-स्त्री. (सं.) काचा.

**कॉंच**-पु. (सं.) कांच.

**कॉंचरी-कॉंचली**-स्त्री. (सं.) सापाची कांत.

**कॉंचा**-वि. (सं.) कच्चा; अपक्व.

**कॉंछा**-स्त्री. (सं.) इच्छा; आकांक्षा.

**कॉंजिक**-पु. (सं.) कांजी.

**कॉंजी**-स्त्री. (सं.) कांजी.

**कॉंटा**-पु. (सं.) १ कांटा. २ गणिताचा ताळा.

**कॉंटी**-स्त्री. (सं.) १ लहान कांटा. २ लहान तराजू. ३ बेडी.

**कॉंठा**-पु. (सं.) १ कंठ; गळा. २ किनारा; तट. ३ पोपटाच्या गळया भोंवतींचा पट्टा.

**कांड**-पु. (सं.) १ कांड; पेर. २ विभाग; प्रकरण. ३ फांदी; शाखा ४ खुशामत. ५ सोटा. ६ निर्जनस्थान.

**कांड**-वि. (सं.) वाईट; कुत्सित.

**कॉंडना**-क्रि.स. (सं.) कांडणें.

**कॉंडी**-स्त्री. (सं.) १ उखळ. २ लांकडाचा दांडा. ३ बांबूची काठी.

**कॉंडीकफन**-पु. (सं.+फा.) अंत्यविधीचें सामान.

**कॉंथरि**-स्त्री. (सं.) गोधडी.

**कॉंदना**-क्रि.अ. (सं.) शोक करणें; रडणें.

**काँदा**-पु. (सं.) कांदा.

**काँदो**-पु. (सं.) चिखल.

**काँध**-पु. (सं.) खांदा.

**काँधना**-क्रि.स. (सं.) १ उचलणें; डोक्यावर घेणें. २ स्वीकार करणें; अंगीकारणें. ३ साहणें.

**काँधर**-पु. (सं.) श्रीकृष्ण.

**काँधा**-पु. (सं.) कंधा पहा.

**काँधी**-स्त्री. (सं.) कंधा पहा.

**काँप**-स्त्री. (सं.) १ बांबूची लवचिक कामटी. २ हत्तीचा दांत. २ डुकराचें सुळे. ४ कानांतील दागिना (काप).

**काँपना**-क्रि.स. (सं.) १ कांपणें; थरारणें. २ हलणें. ३ भयभीत होणें.

**काँयकाँय**-पु. (अनु.) कावकाव.

**काँवर**-स्त्री. (सं.) कावड.

**काँवरा**-वि. (सं.) कावराबावरा.

**काँवरी**-स्त्री. (सं.) कावड.

**काँवरिया**-पुं. (सं.) कावडवाला.

**काँस**-पु. (सं.) एक प्रकारचें गवत.

**काँसा**-पु. (सं.) कासें (धातू)

**काँसा**-पु. (फा.) भिक्षापात्र.

**काँसागर**-पु. (सं.+फा.) काशाचें काम करणारा; कासार (भांडीं घडविणारा).

**काँसी**-स्त्री.(सं) १ धान्याचा एक रोग. २ कासें (धातू). ३ सर्वांत लहान स्त्री; कनिष्ठा.

**का**-प्रत्य. (सं.) षष्ठीचा पुल्लिंगी प्रत्यय; चा.

**काई**-स्त्री. (सं.) शेवाळ. २ तांबें पितळ इ. वर चढणारा हिरवा गंज. ३ मळ.

**काऊ**-क्रिवि. (सं.) केव्हां.

**काऊ**-सर्व. (सं.) १ कोणी एक. २ जरा; थोडें बहुत; काहींसें.

**काक**-पु. (सं.) कावळा.

**काकदंत**-पु.(सं.) असंभाव्य बोलणें.

**काकपक्ष**-पु. (सं.) कल्ले.

**काकरी**-स्त्री. (सं.) काकडी.

**काकुल**-पु. (फा.) कल्ले.

**काग**-पु. (सं.) कावळा.

**काग**-पु. (इ.) बूच (Cork).

**काग़ज़**-पु. (फा.) कागद.

**काग़ज़ात**-पु. (फा.) कागदपत्र.

**कागरी**-वि. (फा.) तुच्छ; हीन.

**कागरोल**-पु. (सं.) गलका; हुल्लड.

**काछ**-पु. (सं.) कासोटा; काचा.

**काछनी**-स्त्री. (सं.) गुढघ्याच्यावर नेसलेलें धोतर.

**काछा**-पु. (सं.) काछनी पहा.

**काछी**-पु. (सं.) काची; भाजीपाला विकणारा.

**काछे**-क्रिवि. (सं.) जवळ; निकट.

**काज**-पु. (सं.) १ काज; कार्य. २ हेतु; उद्देश. ३ व्यवसाय; पेशा.

**काज़**-पु. (अ.) काज (गुंडीचें).

**काजर**-पु. (सं.) काजळ.

**काजूभोजू**-पु. (सं.) विशेष उपयोगी न पडणारी गोष्ट; दिखाऊ वस्तु.

**काट**-स्त्री. (सं.) १ कापण्याची क्रिया. २ घाव; जखम. ३ कपट; विश्वासघात. ४ तेलाचा चिकटा.

**काटन**-पु. (सं.) कतरण.

**काटना**-क्रिस. (सं.) १ कापणें. २ चूर्ण करणें; छाटणें.

**काटू**-वि. (सं.) १ कापणारा. २ भीतिदायक; भयानक.

**काठ**-पु. (सं.) लाकूड; काष्ठ.

**काठड़ा**-पु. (सं.) काथवट; लाकडाचें भांडें.

**काठी**-स्त्री. (सं.) १ अंगकाठी; ठेवण. २ तलवारीचें लाकडी म्यान. ३ उंट वा घोड्याचे पाठीवर घालण्याचें माकण.

**काढना**-क्रि.स. (सं) काढणें.

**काण**-वि. (सं.) काणा.

**कात**-पु. (सं.) एक प्रकारची कातरी.

**कातना**-क्रि.स. (सं.) कातणें (सूत).

**कातर**-वि. (सं.) १ व्याकुळ; भयभीत. २ अधीर; चंचल. ३ भित्रा.

**कातरता**-स्त्री. (सं.) १ अधीरता; चंचलता. २ भित्रेपणा.

**काता**-पु. (सं.) १ कातलेलें सूत; दोरा; धागा. २ बांबू तासण्याची सुरी.

**कातिक**-पु. (सं.) कार्तिक.

**क़ातिब**-पु (अ.) लेखक.

**काती**-स्त्री. (सं.) १ कात्री. २ सुरी; चाकू. ३ लहान तलवार; कट्यार.

**कादंबर**-पु. (सं.) १ दह्यावरची मलई. २ गूळ. ३ मदिरा; दारू. ४ हत्तीचा मद.

**कादर**-वि. (सं.) १ भीरु; भित्रा २ व्याकुळ; अधीर.

**क़ादिर**-वि. (अ.) सर्व शक्तिमान.

**कादिरी**-स्त्री. (अ.) एक प्रकारची चोळी.

**काना**-वि. (सं.) १ काणा. २ ज्याचा कांहीं भाग किड्यांनी खाल्ला आहे असें फळ; किडकें फळ.

**काना**-पु. (सं.) काना.

**काना**-वि. (सं.) तिरपा; तिरका.

**कानाकानी**-स्त्री. (सं.) कुजबुज; चर्चा.

**कानाफुसकी - कानाफूसी**-स्त्री. ( सं. ) कानगोष्ट.

**कानाबाती** स्त्री. (सं.) कानफुसकी पहा.

**कानी**-स्त्री. संकोच; लोकलज्जा; भीड.

**कानी**-वि.स्त्री. (सं.) १ एकाक्ष (स्त्री. ). २ सर्वांत लहान (बोट).

**कानीन**-वि. ( सं. ) १ कुमारिकेस झालेला मुलगा. २ एक शिवी.

**क़ानून**-पु. (अ.) कायदा.

**क़ानूनदाँ**-पु. (अ.) कायदेपंडीत.

**क़ानूनिया**-वि. (अ.) १ कायदा जाणणारा. २ हुज्जतखोर; भांडखोर.

**क़ानूनी**-बि. ( अ. ) १ कायदा जाणणारा. २ कायद्यासंबंधी. ३ कायदेशीर; नियमानुसार. ४ हुज्जतखोर.

**कापर**-पु. ( सं. ) कापड.

**कापुरुष**-पु. (सं.) भित्रा.

**क़ाफ़िया**-पु. (अ.) अंत्यानुप्रास.

**काफ़िर**-पु. (अ.) १ इस्लाम न मानणारा. २ इस्लाम विरोधी. ३ नास्तिक. ४ निर्दय; निष्ठुर. ५ वाईट; खराब.

**काफी**-वि (अ.) पुरेसें; भरपूर.

**काफी**-स्त्री. (इ.) कॉफी.

**काफूर**-पु. ( सं. ) कापूर.

**क़ाब**-स्त्री. (अ.) मोठें तबक.

**काबर**-वि. (सं.) कबरा.

**काबर**-पु. रेती असलेली जमीन.

**काबिल**-वि. ( अ. ) १ योग्य; लायक. २ विद्वान; पंडित.

**क़ाबिलीयत**-वि. (अ.) १ योग्यता; लायकी. २ पांडित्य; विद्वत्ता.

**काबिस**-पु. (सं.) काव.

**काबुक**-स्त्री. (फा.) कबुतरांचें खुराडें.

**काबू**-पु. (अ.) १ ताबा; अधिकार. २ वर्चस्व.

**काम**-पु. (सं.) १ कार्य. २ इच्छा; कामना.

**कामचोर**-वि. ( सं. ) अंगचोर; आळशी.

**कामदानी**-स्त्री. (सं.) १ वेलबुट्टीचें काम. २ वेलबुट्टी काढलेलें कापड.

**कामदार**-पु. (सं.+फा.) व्यवस्थापक.

**कामदार**-वि. (सं.+फा.) कलाबतूचें काम केलेलें आहे अशी वस्तु.

**कामयाब**-वि. ( फा. ) यशस्वी; सफल.

**कामयाबी**-स्त्री. (फा.) सफलता; यश.

**कामरी-लीं**-स्त्री. ( सं. ) कांबळें; घोंगडी.

**कामल**–पु. (सं.) १ काविळ. २ वसंतकाल.

**कामल**–वि. (सं.) कामी.

**कामला**–पु. कामल पहा.

**कामिल**–वि. (अ.) १ पुरा; पूर्ण; सर्व. २ योग्य.

**कायर**–वि. (सं.) भित्रा; भेकड.

**कायरता**–स्त्री. (सं.) भित्रेपणा; भ्याडपणा.

**क़ायल**–वि. (अ.) समजूत पटल्यावर कबूल किंवा मान्य करणारा.

**कायली**–स्त्री. (सं.) लज्जा.

**कार**–पु. (सं.) कार्य.

**कारकरदा**–वि. (फा.) अनुभविक.

**कारगर**–वि. (फा.) १ परिणामकारी; प्रभावी. २ उपयोगी; लाभदायक.

**कारगुज़ार**–वि. (फा.) कार्यक्षम; कर्तव्यदक्ष; तरबेज.

**कारगुज़ारी**–स्त्री. (फा.) १ कर्तव्यपालन. हुशारी; कार्यपटुता.

**कारज**–पु. (सं.) कार्य.

**कारटा**–पु. (सं.) कावळा.

**कारन**–पु. (सं.) कारण.

**कारन**–स्त्री. (सं.) रडण्याचा करुण स्वर.

**कारनी**–पु. (सं.) १ बुद्धिभेद करणारा. २ प्रेरक.

**कारपरदाज़**–वि. (फा.) प्रबंध कर्ता; काम करणारा.

**कारपरदाज़ी**–स्त्री. (फा.) दुसऱ्याचें काम करण्याची तत्परता; कार्यपद्धता.

**कारबार**–पु. (फा.) १ कामकाज. २ व्यापार; पेशा; व्यवसाय.

**काररवाई**–स्त्री. (फा.) १ काम; कृत्य. २ कार्यतत्परता; कर्मण्यता. ३ कारवाई; कपट.

**कारवाँ**–पु. (फा.) यात्रेकरूंचा जथा.

**कारवाँसराय**–स्त्री. (फा.) यात्रेकरूंची उतरण्याची जागा; धर्मशाळा.

**कारसाज**–वि. (फा.) काम करणारा; बिघडलेले काम सावरून घेणारा.

**कारसाजी**–स्त्री. (फा.) १ काम सफल करण्याची हातोटी. २ गुप्त कारवाई.

**कारिंदा**–पु. (फा.) गुमास्ता; कारकुन.

**कारिख**–स्त्री. (सं.) १ काजळ. २ कलंक; काळिमा.

**कारीगर**–पु. (फा.) कारागीर.

**कारीगर**–वि. (फा.) कुशल; निपुण

**कारु**–पु. (सं.) कारागीर.

**क़ारूँ**–पु. (अ.) कंजूष.

**क़ारूरा**–पु. (अ.) १ मूत्र. २ मूत्र-परिक्षा करण्याकरितां मूत्र ठेवण्याची कांचेची नळी. ३ दारूची कुपी, ही पेटवून शत्रूचें अंगावर टाकण्यांत येते.

**कारोबार**–पु. (फा.) कारबार पहा.

**कार्मिक**–वि. (सं.) कामगार.

**कार्रवाई**–स्त्री. काररवाई पहा.

**कालकोठरी**–स्त्री. (सं.) अंधार कोठडी.

**काला**–वि. (सं.) काळा.

**कालाकलूटा**–वि. (सं.) काळाकुट्ट.

**कालाक्षरी**–वि. (सं.) अत्यंत विद्वान.

**कालानमक**–पु. (सं.+फा.) पादे-लोण.

**कालापहाड**–पु. (सं.+फा.) भयंकर वस्तु.

**कालि**–क्रिवि. (सं.) १ काल. २ लवकरच; थोडयांच दिवसांत.

**कालिख**–स्त्री. (सं.) काजळी.

**कालिब**–पु. (अ.) १ शरीर; देह. २ टोपी करतांना टोपीमध्यें ठेवण्याचा ठोकळा.

**कालीघटा**–स्त्री. (सं.) काळें ढग; काळया ढगांची मालिका.

**क़ालीन**–पु. (अ.) गालिचा;

**कालीमिर्च**–(सं.) काळीं मिरीं.

**कालीशीतला**–स्त्री. (सं.) कांजण्या

**कालौंछ**–स्त्री. (सं.) १ काळेपणा. २ काजळी.

**काल्ह**–क्रि.वि. काल.

**कावा**–पु. (फा.) घोडयाला गोल फिरविण्याची क्रिया.

**काश**–पु. (सं.) १ एक प्रकारचें गवत. २ खोकला.

**काशाना**–पु. (फा.) १ झोपडी. २ घर.

**काशू**–स्त्री. (सं.) भाला.

**काश्त**–स्त्री. (फा.) १ शेती. २ खंडानें जमीन घेऊन केली जाणारी शेती.

**काश्तकार**–पु. (फा.) शेतकरी.

**काष**–पु. (सं.) सहाणचा दगड.

**कासर**–पु. (सं.) रेडा.

**कासरी**–स्त्री. (सं.) म्हैस.

**कासा**–पु. (फा.) १ पेला; कटोरा. २ आहार; भोजन.

**क़ासिद**–पु. (अ.) दूत; संदेशवाहक.

**काहँ**–क्रिवि. (सं.) कुठें.

**काहँ**–प्रत्य. (सं.) ला, चतुर्थीचा प्रत्यय.

**काह**–क्रिवि. (सं.) १ काय. २ कोणता.

**काहिल**–वि. (फा.) आळशी; सुस्त.

**काहिली**-स्त्री. (अ.) सुस्ती; आळस.

**काही**-वि. (फा.) काळसर हिरव्या रंगाची.

**काहु-काहू**-सं. (सर्व.) १ कोणीहि. २ कोणाचा.

**काहे**-क्रिवि. (सं.) कां? कोणत्या कारणानें; काय म्हणून.

**किंगिरी**-स्त्री. (सं.) लहान सारंगी.

**किकियाना**-क्रि.अ. (सं.) १ चीं चीं असा आवाज काढणें. २ रडणें.

**किचकिचाना**-क्रि. अ. दांत चावणें; दांत ओठ खाणें.

**किचपिच**-वि. गिचपिच पहा.

**किचडाना**-क्रि.अ. (सं.) डोळे चिपडांनीं भरणें.

**किटकिना**-पु. (सं.) १ पोट मक्त्याचा कागद. २ सोनाराचा ठसा. ३ धूर्तपणा; कावेबाजी.

**किटिभ**-पु. (सं.) ऊ.

**किट्ट**-पु. (सं.) कीट; किट्टण.

**किडकना**-क्रि.अ. (अनु.) गुपचुप पणें निसटून जाणें.

**कित**-क्रिवि. (सं.) कोठें; कोणीकडे.

**कितक-कितिक**-क्रिवि. कितना पहा.

**कितना**-वि. (सं.) किती.

**कितव**-पु. (सं.) १ जुगारी. २ दुष्ट; कपटी. ३ उन्मत्त. ४ धोतऱ्याचें फूल.

**किताब**-स्त्री. (अ.) १ पुस्तक. २ वही.

**कितेक**-वि. (सं.) १ कित्येक; पुष्कळ. २ किती.

**किती-कित्ता**-वि. (सं.) किती.

**कित्ति**-स्त्री. (सं.) कीर्ति.

**किधर**-क्रिवि. (सं.) कोठें; कोणीकडे.

**किधों**-अव्य. (सं.) नाहींतर; अथवा; किंवा.

**किन**-सर्व. (सं.) किसचें बहुवचन; कोण.

**किन**-पु. (सं.) वण; डाग; चिन्ह.

**किनका**-पु. (सं.) १ धान्याचा कण. २ तांदुळाची कणी.

**किनहा**-वि. (सं.) किडकें (फळ इ.).

**किनार**-पु. (फा.) किनार; कांठ; किनारा.

**किनारा**-पु. (फा.) किनारा; कांठ.

**किनारी**-स्त्री. (फा.) जरीचा कांठ; गोट.

**किन्नर**-पु. (दे.) वादविवाद; झगडा.

**किन्नरी**-स्त्री. (सं.) १ एक प्रकारचा तंबोरा. २ सारंगी.

**किफायत**-स्त्री. (अ.) १ बचत; काटकसर. २ स्वस्त भाव; कमी मूल्य.

**किफ़ायती**-क्रि. (अ.) कमी खर्च करणारा; काटकसरी.

**क़िबलई**-स्त्री. (अ.) पश्चिम दिशा.

**क़िबला**-पु. (अ.) १ पश्चिम दिशा. २ मक्का. ३ पूज्य व्यक्ति. ४ पिता; बाप.

**क़िबलानुमा**-पु. (अ.+फा.) पश्चिम दिशा दाखविणारें यंत्र.

**क़िमार**-पु. (अ.) जुगार; द्यूत.

**क़िमाश**-पु. (तु.) तऱ्हा; ढब.

**किमि**-क्रिवि. (सं.) कशा प्रकारें.

**कियत**-वि. (सं.) किती.

**कियारी**-स्त्री. (सं.) १ अळें; वाफा. २ शेताचा एक विभाग. ३ घडवंची. ४ मीठ तयार करण्याकरितां केलेली मोठी काहील.

**किरका**-पु. (सं.) लहान तुकडा; खडा.

**किरकिटी**-स्त्री. (सं.) धुळीचा कण.

**किरकिरा**-स्त्री. (सं.) खडबडीत; रवाळ; खरखरीत.

**किरकिरी**-स्त्री. (सं.) १ धुळीचा कण. २ अपमान.

**किरच**-स्त्री. (सं.) १ लहान तरवार; संगीन. २ टोंकदार तुकडा.

**किरची**-पु. (दे.) १ एक प्रकारचें बंगाली रेशीम. २ रेशमाची लडी.

**किरन**-पु. (सं.) किरण.

**किरपा**-स्त्री. (सं.) कृपा.

**किरम**-पु. (सं.) कृमि.

**किरमिच**-पु. (इं.) कॅनव्हास.

**किरराना**-क्रि.अ. (अनु.) १ दांत ओठ खाणें. २ किर्र किर्र शब्द करणें.

**किरवार**-पु. (सं.) तलवार.

**किराँची**-स्त्री. (इं.) १ माल वाहण्याची गाडी. २ मालगाडीचा डबा.

**किराना**-पु. (सं.) केराना पहा.

**किराना**-क्रि.स. (सं.) केराना पहा.

**किराया**-पु. (अ.) भाडें.

**किरायेदार**-पु. (फा.) भाडेकरी.

**किरासन**-पु. (इं.) रॉकेल; घासलेट.

**किरिच**-स्त्री. (स.) धातूचा टोंकदार तुकडा.

**किरिम**-पु. (सं.) कृमि.

**किरिया**-स्त्री. (सं.) १ शपथ. २ काम; कर्तव्य. ३ क्रिया कर्म; मृतक कर्म.

**किरोर**-पु. करोड पहा.

**किरोलना**-क्रि.स. (सं.) खरवडणें; खरडणें.

**किरौना**–पु. (सं.) किडा.

**किर्मीर**–पु. (सं.) नारंगीचें झाड.

**किर्मीर**–वि. (सं.) कबरा.

**किलक**–स्त्री. (सं.) हर्ष ध्वनि.

**किलकना**–क्रि.अ. (सं.) हर्षध्वनि करणें; खदखदून हंसणें.

**किलकार-किलकारी**–स्त्री. (सं.) हर्षध्वनि.

**किलकिल**–स्त्री. (सं.) कटकट; वादविवाद; झगडा.

**किलकिला**–पु. (सं.) समुद्राच्या लाटांचा जेथें मोठा आवाज होतो असा समुद्र किनाऱ्याचा भाग.

**किलकिला**–स्त्री. (सं.) किलकार पहा.

**किलकिलाहट**–स्त्री. (सं.) किलकिलाट; किलबिलाट.

**किलटा**–पु. (दे.) एक प्रकारची वेळाची टोपली.

**किलना**–क्रि.अ. (सं.) १ वशीभूत होणें. २ गति खुंटणें.

**किलनी**–स्त्री. (सं.) गोचीड.

**किलवा**–पु. (दे.) मोठें फावडें किंवा मोठी कुदळ.

**किलवाना**–क्रि.स. (सं.) १ खिळा ठोकविणें; मेख ठोकविणें. २ भूत उतरविणें.

**किलवारी**–स्त्री. (सं.) सुकाणूं.

**किला**–पु. (अ.) किल्ला.

**किलाट**–पु. (सं.) नासविलेलें दूध; फाडलेलें दूध.

**किलाना**–क्रि.स. किलवाना पहा.

**किलोल**–पु. (सं.) आमोद प्रमोद; हसणें खिदळणें; मौज.

**किलौनी**–स्त्री किलनी पहा.

**किल्लत**–स्त्री. (अ.) त्रुटि; कमतरता; न्यूनता.

**किल्ला**–पु. (सं.) १ मोठा खिळा; मेख. २ जात्याचा खुंटा.

**किल्ली**–स्त्री. (सं.) १ मेख; खुंटी. २ बोल्ट. ३ यंत्राची कळ; किल्ली.

**किवाड़**–पु. (सं.) दाराची फळी; दार.

**किवार**–पु. किवाड पहा.

**किशमिश**–स्त्री. (फा.) बेदाणा; किसमिस.

**किश्त**–स्त्री. (फा.) शह.

**किश्ती**–स्त्री. (फा) १ नाव. २ तबक. ३ बुद्धिबळांतील हत्ती.

**किश्तीनुमा**–वि. (फा.) होडीच्या आकाराचा.

**किसनई**–स्त्री. (सं.) शेती.

**किसबत**–स्त्री. (अ.) न्हाव्याची धोकटी.

**किसमत**-स्त्री. क़िस्मत पहा.
**किसमी**-पु. (अ.) श्रमजीवी; मजूर.
**किसान**-पु. (सं.) शेतकरी.
**किसानी**-स्त्री. (सं.) शेती.
**किस्त**-स्त्री. (अ.) हप्ता.
**किस्तबंदी**-स्त्री. (फा.) हप्तेबंदी.
**क़िस्म**-पु. (फा.) तऱ्हा; रीत. २ प्रकार; भेद.
**क़िस्मत**-स्त्री. (अ.) १ भाग्य; नशीब; प्रारब्ध; कर्म. २ अनेक जिल्हे मिळून झालेला प्रांत.
**क़िस्मतवर**-वि. (फा.) भाग्यवान्.
**क़िस्सा**-पु. (अ.) १ गोष्ट; कहाणी २ वृत्तान्त; समाचार. ३ झगडा; तकरार.
**किहुनी**-स्त्री. कुहनी पहा.
**की**-प्रत्य. (सं.) षष्ठीचा स्त्रीलिंगी प्रत्यय; ची.
**कीक**-पु. (अनु.) चीत्कार; किंकाळी.
**कीकट**-पु. (सं.) घोडा.
**कीसट**-वि. १ निर्धन; गरीब. २ लोभी; कंजूष.
**कीकना**-क्रि.अ. (अनु.) चीत्कारणें; किंकाळणें.
**कीकर**-पु. (सं.) बाभळीचें झाड.
**कीच-कीचड**-पु (सं.) १ चिखल; गाळ. २ चिपडें.
**कीट**-पु. (सं.) कीटक, किडा.
**कीटमणि**-स्त्री. (सं.) काजवा.
**कीडा**-पु. (सं.) किडा.
**कीडी**-स्त्री. (सं.) १ लहान किडा; कीड. २ मुंगी.
**कीनना**-क्रि.स. (सं.) खरीदणें; विकत घेणें.
**कीना**-पु. (फा.) शत्रुत्व; वैर; द्वेष.
**कीनिया**-पु. (फा.) वैर ठेवणारा; द्वेष बाळगणारा.
**कीनास**-पु. (सं.) १ यम २ एक वानराची जात. २ शेतकरी.
**कीप**-स्त्री. (अ.) नसराळें; फनेल.
**क़ीमत**-पु. (अ) किंमत; मूल्य.
**कीमती**-वि. (अ.) किंमती; बहु-मूल्य.
**क़ीमा**-पु. (अ.) खिमा.
**कीमिया**-स्त्री. (अ.) किमया.
**कीर**-पु. (सं.) १ पोपट. २ व्याध; पारधी. ३ काश्मीर प्रदेश.
**कीरी**-स्त्री. (सं.) १ कीड. २ मुंगी. ३ पारध्याची स्त्री.
**कीर्त्तन**-पु. (सं.) कीर्तन.
**कील**-स्त्री. (सं.) १ खिळा; मेख; खुंटी. २ चमकी. ३ अग्निज्वाला.
**कीलक**-पु. (सं.) बंधन; अडचण.

**कीलना**-क्रि.स. ( सं. ) १ खिळा ठोकणें. २ सापाला मंत्र मोहित करणें; वश करणें.

**कीलन**-पु. (सं.) बंधन; अडचण.

**कीला**-पु. (सं.) खिळा.

**कीलित**-वि. (सं.) १ मंत्रमुग्ध. २ खिळा ठोकलेला.

**कीलिना**-पु. (सं.) मोट हांकणारा.

**कीली**-स्त्री. ( सं. ) १ आंस. २ खिळा; मेख.

**कीश**-पु. (सं,) १ वानर. १ पक्षी. ३ सूर्य.

**कीस**-पु. (फा.) गर्भाची पिशवी.

**कीसा**-पु. (फा.) १ खिसा. २ थैली.

**कुँअर**-पु. (सं.) पुत्र; कुमार.

**कुँअरेटा**-पु. (सं.) पुत्र; मुलगा.

**कुँआ**-पु. (सं.) विहीर.

**कुँआरा**-वि. ( सं. ) अविवाहित; कुमार.

**कुँइआँ**-स्त्री. (सं.) लहान विहीर.

**कुंकुम**-पु, (सं.) १ केशर. २ कुंकू; पिंजर.

**कुंचन**-पु. (सं.) आकुंचन.

**कुंचिका**-स्त्री. (सं.) १ गुंज. २ बांबूची टहाळी. ३ किल्ली.

**कुंचित**-वि. (सं.) १ वांकलेला; वक्र. २ कुरळे (केंस).

**कुंची**-स्त्री. (सं.) किल्ली; चावी.

**कुंजक**-पु. (सं.) अंतःपुररक्षक.

**कुंजड़ा**-पु. (सं.) भाजीपाला पेरणारी व विकणारी एक जात; माळी; काची.

**कुंजी**-स्त्री. (सं.) १ चावी; किल्ली. २ टिप्पणी (Notes).

**कुंठ**-वि. (सं.) १ बोथट. २ मूर्ख.

**कुंठित**-वि. (सं.) १ बोथट. २ मंदबुद्धि.

**कुंडरा**-पु. (सं.) १ चुंबळ. २ वर्तुळाकार रेषा; मंडल. ३ मोठें मडकें; रांजण.

**कुंडा**-पु. (सं.) १ माठ; रांजण. २ कोयंडा.

**कुंडी**-स्त्री. (सं.) १ मातीचा अथवा दगडाचा वाडगा. २ सांखळीचा दुवा. ३ सांखळीची कडी.

**कुंढवा**-पु. (सं.) पुरवा पहा.

**कुंद**-वि. (फा.) १ कुंठित. २ स्तब्ध; सुन्न.

**कुंदन**-पु. (सं.) १ सोन्याचा अतिशय पातळ पत्रा. २ शुद्ध सोनें; उत्तम सोनें.

**कुंदन**-वि. (सं.) १ शुद्ध; स्वच्छ. २ नीरोग.

**कुंदा**-पु. (फा.) १ लांकडाचा ओंडका. २ खोडा. ३ बंदुकीचा दस्ता. ४ दस्ता; मूठ.

**कुंदा**-पु. (सं.) १ पंख. २ खवा; मावा.

**कुंदी**-स्त्री. १ कपडयाच्या सुरकुत्या मोडण्याकरितां कपडयाची सारखी घडी करून त्यावर लाकडाच्या दंडुक्यानें ठोकण्याची क्रिया. २ मारणें; ठोकणें; पिटणें.

**कुँदरना**-क्रि.स. (सं.) खरवडणें; छिलणें; तासणें.

**कुँवाँ**-पु. (सं.) विहीर.

**कुँवारा**-वि. (सं.) अविवाहित.

**कुँहडा**-पु. (सं.) कोहाळा.

**कुआँ**-पु. (सं.) विहीर.

**कुआर**-पु. (सं.) आश्विन महिना.

**कुआरा**-वि. (सं.) आश्विनांतला.

**कुइयाँ**-स्त्री. (सं.) लहान विहीर.

**कुकड़ना**-क्रि.अ. (सं.) आकसणें; संकुचित होणें.

**कुकुर**-पु. (सं.) कुत्रा.

**कुकूरखाँसी**-स्त्री. (सं.) कोरडा खोकला.

**कुकुरढ़ाँसी**-स्त्री. (सं.) कोरडा खोकला.

**कुक्कुर**-पु. (सं.) कुत्रा.

**कुखेत**-पु. (सं.) वाईट जागा.

**कुख्यात**-वि. (सं.) बदनाम.

**कुगहनि**-स्त्री. (सं.) दुराग्रह.

**कुघात**-पु. (सं.) १ वाईट वेळ; कुसमय. २ कपट.

**कुच**-पु. (सं.) स्तन; छाती.

**कुच**-वि. (सं.) १ संकुचित. २ कंजूष; कृपण.

**कुचकुचवा**-पु. (अनु.) घुबड.

**कुचकुचाना**-क्रि.स. (अनु.) १ चोंचावणें. २ अधवट कुटणें.

**कुचना**-क्रि.अ. (सं.) संकुचित होणें.

**कुचक्र**-पु. (सं.) गुप्त कट.

**कुचर**-पु. (सं.) १ घाणेरडया जागीं हिंडणारा. २ नीच कर्म करणारा. ३ दुसऱ्याची निंदा करीत फिरणारा.

**कुचरा**-पु. (सं.) कुंचा; झाडू.

**कुचलना**-क्रि.स. (अनु.) १ चेंचणें; ठेंचणें. ६ तिंबणें; पायांनी तुडविणें; ३ मळणें; रगडणें.

**कुचली**-स्त्री. (अनु.) सुळे दांत.

**कुचाल**-स्त्री. (सं.) १ वाईट चलणूक; वाईट आचरण. २ पाजीपणा; खोटेपणा.

**कुचाली**-पु. (सं.) १ दुराचरणी. २ दुष्ट; पापी.

**कुचिया**-स्त्री. (सं.) लहान लहान वड्या; लहान गोळ्या.

**कुचियादाँत**-पु. दाढ.

**कुचिलना**-क्रि. (स.) कुचलना पहा.

**कुचील-कुचीला**-वि. (सं.) घाणेरडा; मलिन.

**कुचेल**-पु. (सं.) मलिन वस्त्र.

**कुचेल**-वि. (सं.) १ मलिन वस्त्र नेसणारा. २ घाणेरडा.

**कुचैला**-वि. (सं.) कुचेल पहा.

**कुच्छित**-वि. (सं.) कुत्सित.

**कुछ**-वि. (सं.) थोडा; कांहीं; जरा.

**कुजंत्र**-पु. (सं.) जादूटोणा; मंत्रतंत्र.

**कुजून**-स्त्री. १ वाईट समय; अवेळ. २ उशीर.

**कुजोग**-पु. (सं.) कुयोग.

**कुज्जा**-पु. (फा.) मडकें; मातीचा पेला.

**कुटका**-पु. (सं.) लहान तुकडा.

**कुटना**-पु. (सं.) १ वेश्यांचा दलाल; बदफैली करावयास लावणारा मध्यस्थ. २ चहाडखोर.

**कुटना**-पु. (सं.) १ कुटलें जाण्याची क्रिया. २ कुटण्याचें हत्यार.

**कुटना**-क्रि.अ. (सं.) कुटलें जाणें.

**कुटनाना**-क्रि.स. (सं.) स्त्रीला बदफैली करावयास लावणें; वाईट मार्गाला लावणें; बहकावणें.

**कुटनापन**-पु. (सं.) कुंटिणपण.

**कुटणी**-स्त्री. (सं.) कुंटीण.

**कुटाई**-स्त्री. (सं.) १ कुटण्याचें काम. २ कुटण्याचा मोबदला. ३ मार; चोप.

**कुटास**-स्त्री. (सं.) मारहाण; मारपीट.

**कुटिया**-स्त्री. (सं.) लहान झोपडी.

**कुटिहा**-वि. (सं.) चेष्टेखोर; विनोदी.

**कुटेक**-स्त्री. (सं.) दुराग्रह; हट्ट.

**कुटेव**-स्त्री. (सं.) वाईट खोड; वाईट संवय.

**कुटौनी**-स्त्री. (सं.) १ कांडण. २ कांडण्याची मजुरी.

**कुद्टनी**-स्त्री. (सं.) कुंटीण.

**कुट्टा**-पु. (सं.) १ पिसें कापलेलें कबूतर.

**कुट्टिम**-पु. (सं.) १ फरसबंदी जमीन. २ डाळिंब.

**कुट्टी**-स्त्री. (सं.) १ गवत वा चारा कापून बारीक बारीक करण्याची क्रिया. २ बारीक कापलेला चारा.

३ कागदाचा लगदा. ४ गट्टी फू; मैत्री भंग. ५ पिसें कापलेलें कबूतर.

**कुठला**–पु. (सं.) १ धान्याची कणगी. २ चुन्याची भट्टी.

**कुठाँउ-कुठाँय-कुठाँव**–स्त्री. (सं.) वाईट स्थान; अयोग्य ठिकाण; मर्मस्थान.

**कुठाकु**–पु. (सं.) कठ फोड्वा पहा.

**कुठाट**–पु. (सं.) अयोग्य थाट; वाईट व्यवस्था.

**कुठार**–पु. (सं.) १ कुऱ्हाड. २ परशु. ३ धान्य ठेवण्याचें मोठें भांडें; कोठी.

**कुठारी**–स्त्री. (सं..) कुऱ्हाड.

**कुठाहर-कुठौर**–पु. (सं.) १ वाईट स्थान. २ अवेळ; अयोग्य वेळ.

**कुठिया**–स्त्री. (सं.) धान्य ठेवण्याचा रांजण.

**कुडिला**–पु; कुठला पहा.

**कुठौर**–पु. (सं.) १ वाईट जागा; अशुभ जागा. २ वाईट समय; अनुपयुक्त समय; अवेळ.

**कुड़**–पु. (सं.) कुडा (औषधी वनस्पति).

**कुड़**–पु. (दे.) अन्नाची रास.

**कुड़कुड़ना-कुड़बुड़ना**–क्रि.अ.(सं.) (मनातल्या मनांत) जळफळणें; चडफडणें; फुटफुटणें.

**कुड़कुड़ी**–स्त्री. (अनु.) पोटांत गुरगुरणें.

**कुड़री**–स्त्री. (सं.) १ त्रिभुज प्रदेश. २ चुंबळ.

**कुड़ाली**–स्त्री. (सं.) कुऱ्हाड (लहान).

**कुडुक**–पु. (दे.) एक चामड्यानें मढविलेलें वाद्य.

**कुडुक**–स्त्री. (फा.) १ अंडें न देणारी कोंबडी. २ (वि.) व्यर्थ.

**कुढंग**–पु. (सं.) वाईट चाल; वाईट लक्षण.

**कुढंग-कुढंगा-कुढंगी**–वि. (सं.) वाईट चालीचा; अव्यवस्थित.

**कुढना**–क्रि.अ. (सं.) कुढणें.

**कुढब**–वि. (सं.) १ बेढब. २ कठिण; दुस्तर.

**कुढ़ाना**–क्रि. (सं.) खिजविणें; चिडविणें.

**कुणप**–पु. (सं.) १ मृत शरीर; शव. २ शिसें. ३ भाला.

**कुणपा**–पु. (सं.) भाला.

**कुणपाशी**–पु. (सं.) प्रेत खाणारे प्राणी उदा० गिधाड; कावळा इ.

**कुतक-कुतका**–पु. (सं.) १ गदगा २ सोटा. २ भांग घोटण्याचा लांकडी दंडुका.

**कुतरना**–क्रि.स. (सं) कुरतडणें.

**कुतर्क**-पु. (सं.) वितंडवाद; बकवाद.
**कुतला**-पु. (सं.) कोयता; विळा.
**कुतवार**-पु. १ कोतवाल. २ पिकाची वांटणी ठरविणारा.
**कुतवारी**-स्त्री. कोतवाली.
**कुतवाल**-पु. कोतवाल.
**कुतार**-पु. अडचण; गैरसोय.
**कुताही**-स्त्री. कोताही पहा.
**कुतिया**-स्त्री. (दे.) कुत्री.
**कुतुब**-पु. (अ.) ध्रुव तारा.
**कुतुबख़ाना**-पु. (फा.) पुस्तकालय.
**कुतुबनुमा**-पु. (फा.) होकायंत्र.
**कुतुबफ़रोश**-पु. (फा.) पुस्तकविक्रेता.
**कुतुबा**-पु. (फा.) पुस्तकांतील किडा (मनुष्य); पुस्तकांचा शौकी.
**कुतुली**-स्त्री. (दे.) १ कोंवळी चिंच. २ खीळ.
**कुत्ता**-पु. (दे.) कुत्रा.
**कुत्ती**-स्त्री. (दे.) कुत्री.
**कुदकना**-क्रि. अ. (सं.) उडी मारणें.
**कुदक्का**-पु. (सं.) धुडगूस.
**कुदरत**-स्त्री. (अ.) १ प्रभुत्व; सामर्थ्य; शक्ति. २ महिमा. ३ कारागिरी; रचना.
**कुदरती**-वि. (अ.) १ स्वाभाविक. २ दैवी; ईश्वरी.
**कुदाँव**-पु. (सं.) १ विश्वासघात. २ डाव. ३ मर्मस्थान.
**कुदाना**-क्रि.स. (सं.) उडी मारावयास लावणें.(उदा. घोडा उडविणें.)
**कुदार-कुदारी**-स्त्री. कुदाल पहा.
**कुदाल-कुदाली**-स्त्री. (सं.) कुदळ.
**कुदास**-पु. सुकाणूचा दांडा.
**कुदिष्टि**-स्त्री. (सं.) १ कुदृष्टि; वाईट नजर. २ दुष्ट.
**कुधर**-पु. (सं.) पर्वत.
**कुधी**-वि. (सं.) मंदबुद्धि; मूर्ख.
**कुनकुना**-वि. (सं.) कोमट.
**कुनना**-क्रि.स. (सं.) १ भांडें खरवडणें. २ खरवडणें.
**कुनबा**-पु. (सं.) कुटुंब; परिवार.
**कुनबी**-पु. (सं.) कुणबी.
**कुनवा**-पु. (सं.) कातारी.
**कुनह**-स्त्री. (फा.) १ द्वेष. २ आकस; वैर.
**कुनही**-वि. (फा.) द्वेष्टा.
**कुनाई**-स्त्री. (सं.) १ कीस; चूर; भुसा; भुगा. ३ तासण्याचें काम. ३ तासण्याची मजुरी.

**कुनित**-वि. (सं.) मधुर ध्वनियुक्त; रुमझुम अशा निनादाचा.

**कुनैन**-पु. (इं.) कोयनेल. (Quinine).

**कुपढ़**-वि. (सं.) अज्ञानी; आडाणी; मूर्ख.

**कुपाठ**-पु. (सं.) बदसल्ला.

**कुपाठी**-वि. (सं.) बदमाष; लुच्चा.

**कुपार**-पु. (सं.) समुद्र.

**कुप्पा**-पु. (सं.) तेलाचा कातडी बुधला.

**कुप्पी**-स्त्री. (सं.) तेल ठेवण्याची कातड्याची लहान बुधली.

**कुफ्र**-पु. (अ.) मुसलमानी धर्माविरुद्ध मत अथवा वाक्य.

**कुबंड**- पु. (सं.) धनुष्य.

**कुबंड**-वि. (सं.) लुळापांगळा; विकृतांग.

**कुबरी**-स्त्री. (सं.) १ कुबडी. २ कुब्जा दासी.

**कुबाक**-पु. (सं.) १ कुवाक्य; दुर्वचन; शिवी. २ शाप.

**कुबानि**-स्त्री. (सं.) खोडी; वाईट संवय.

**कुबेला**-स्त्री. (सं.) कुवेळ; अवेळ; वाईट समय.

**कुब्बा**-पु. (सं.) कुबड.

**कुमंठी**-स्त्री. (सं.) लवचिक टहाळी.

**कुमंत्रणा**-स्त्री. (सं.) बदसल्ला.

**कुमक**-स्त्री. (तु.) कुमक; मदत.

**कुमकुम**-पु. (सं.) केशर.

**कुमकुमा**-पु. (तु.) १ लाखेचा एक पोकळ चेंडू. यांत अबीर गुलाल वगैरे भरलेला असतो हा होळीच्या दिवसांत एकमेकांच्या अंगावर टाकतात. २ आंवळ तोंडाचा चंबू. ३ काचेचा रंगीत पोकळ गोळा, हा झुंबरांना लावतात किंवा लहान गोळे स्त्रिया दागिन्यांप्रमाणें निरनिराळ्या तऱ्हेनें गुंफुन वापरतात.

**कुमाच**-पु. (अ.) एक प्रकारचें रेशमी कापड.

**कुमाच**-पु. (दे.) कांहीं ठिकाणीं जाड कांहीं ठिकाणीं पातळ अशी भाकरी.

**कुमारग**-पु. (सं.) कुमार्ग..

**कुमुद**-पु. १ कंजूष; कृपण. २ लोभी. ३ कुमुद; लालकमळ.

**कुमुद**-वि. १ निर्दय. २ कंजूष.

**कुमैड़**-पु. (दे.) कपट; दगा.

**कुमैड़िया**-पु. (दे.) कपटी दगाबाज.

**कुमेरु**-पु. (सं.) दक्षिणध्रुव.

**कुम्मैत-कुमैद**-वि. (तु.) काळसर लाल रंगाचा घोडा. २ काळसर लाल रंग.

**कुम्हडा-कुम्हाड़ा**-पु. (सं.) कोहळा.

**कुम्हडौरी**-स्त्री. (सं.) कोहळयाचा सांडगा.

**कुम्हलाना**-क्रिअ. (सं.) कोमेजणें.

**कुम्हार**-पु. (सं.) कुंभार.

**कुम्ही**-स्त्री. (सं.) १ लहान मडकें. २ एक प्रकारचें शेवाळ.

**कुम्ही**-पु. (सं.) १ हत्ती. २ मगर.

**कुरंग**-पु. (सं.) १ बदामी रंगाचें हरीण. २ हरिण; मृग.

**कुरंग**-पु. (सं.) १ निंद्य आचरण; २ बदामी लालरंग; लाखी रंग. ३ बदामी रंगाचा घोडा.

**कुरंगलांछन**-पु. (सं.) चंद्रमा.

**कुरंगिन**-स्त्री. (सं.) हरिणी.

**कुरंगसागर**-पु. (सं.) कस्तूरी.

**कुरकी-कुर्की**-स्त्री. (अ.) जप्तीनंतर स्थावर वा जंगम मालाचा लिलाव.

**कुरकुट**-पु. कुसकुर; चूर.

**कुरकुटा**-वि. (सं.) लहान तुकडा; रवा. २ भाकरीचा तुकडा.

**कुरकुर**-पु. (अनु.) कुरकुर आवाज.

**कुरकुरा**-वि. (अनु.) कुरकुरीत.

**कुरकुरी**-स्त्री. (दे.) लवचिक पातळ हाड (उदा. कानाचें).

**कुरचिल्ल**-पु. (सं.) खेकडा.

**कुरता**-पु (तु.) १ स्त्रियांचा एक प्रकारचा कुडता. २ स्त्री (सोनारांची बोली).

**कुरता**-पु. (तु.) कुडता; सदरा.

**कुरबान**-वि. (अ.) समर्पित केलेला; अर्पित.

**कुरबानी**-स्त्री. (अ.) आत्मबलिदान; आत्मार्पण.

**कुरमा**-पु. (फा.) कुटुंब; परिवार.

**कुररा**-पु. **कुररी**-स्त्री. (सं.) १ क्रौंच पक्षी. २ टिटवी.

**कुरला**-पु. (सं.) १ एक वृक्ष विशेष. २ कोल्हा. ३ कर्कश आवाजाचा; कर्कश स्वरवाला.

**कुरव**-वि. (सं.) अशुभ बोलणारा.

**कुरवना**-क्रि.स. (सं.) ढीग लावणें; रास रचणें.

**कुरवा**-पु. एक शेराचें लांकडी माप.

**कुरवारना**-क्रि.स. (सं.) खोदणें; खुरपणें.

**कुरसी**-स्त्री. (अ.) १ खुर्ची. २ जोतें. ३ पिढी.

**कुरसीनामा**-पु. (अ.+फा.) वंश-वृक्ष.

**कुरा**-पु. ( अ. ) जखमेंत पू होऊन झालेली गांठ.

**कुराई**-स्त्री. ( सं.+फा. ) खांचखळगे असलेला व अरुंद रस्ता.

**कुराय**-स्त्री. (सं.+फा.) १ रस्त्यांतील खांच खळग्यांचा भाग. २ खड्डा.

**कुराह**-पु. ( सं.+फा. ) कुमार्गी.

**कुराहर**-पु. (सं.) कोलाहल.

**कुराही**-वि. ( सं.+फा. ) कुमार्गी.

**कुराही**-स्त्री. ( सं.+फा. ) बदचलन; बदफैली; व्यभिचार.

**कुरिंद**-पु. ( सं. ) दारिद्र्य.

**कुरिया**-स्त्री. ( सं. ) १ गवताची झोंपडी. २ अगदीं लहान गांव.

**कुरिया**-स्त्री. ( हिं. ) ढेर; गंज.

**कुरियाल**-स्त्री.( सं. ) पक्ष्यांचें आनंदानें पंख फडफडविणें.

**कुरिल**-पु. (सं.) चांभार.

**कुरी**-पु ( सं. ) १ धान्य विशेष. २ तुरीच्या शेंगा.

**कुरी**-स्त्री. ( सं. ) वंश; कुल.

**कुरी**-स्त्री. ( दे. ) कोल्हू.

**कुरी**-स्त्री. ( हिं. )विभाग; खंड;तुकडा.

**कुरुआ**-पु. ( सं. ) धान्य मोजण्याचें एक माप.

**कुरुई**-स्त्री. ( सं. ) लहान टोपली.

**कुरुख**-वि. ( सं.+फा. ) दुर्मुखलेला.

**कुरुप**-वि. ( सं. ) कुरुप.

**कुरेदना**-क्रि.स. ( सं. ) खरवडणें; कोरणें; उकरणें.

**कुरर**-पु. (सं.) हास्यकल्लोळ.

**कुरेलना**-क्रि.स. उकरणे; खरवडणें.

**कुरैत**-पु. ( सं. ) हिस्सेदार; भागीदार.

**कुरैना**-पु. ( सं. ) रास; ढीग.

**कुरौना**-क्रि.स. ( सं. ) रास लावणें; ढीग रचणें.

**कुरौनी**-स्त्री. ( सं. ) कुरैना पहा.

**कुर्क**-वि. ( तु. ) जप्त.

**कुर्की**-स्त्री. ( तु ) जप्ति.

**कुर्ता**-पु. कुरता पहा.

**कुर्पासक**-पु. ( सं. ) चोळी.

**कुर्बानी**-स्त्री. कुरबानी पहा.

**कुर्मी**-पु. ( सं. ) कुणबी

**कुर्मुक**-पु. ( सं. ) सुपारी.

**कुर्स**-पु. (अ.) गोलटिकली.

**कुर्सी**-स्त्री. कुरसी पहा.

**कुलंग**-पु. ( फा. ) १ कोंबडा. २ लांबटांग्या मनुष्य.

**कुल**-पु. ( सं. ) कुल.

**कुल**-वि. ( अ. ) एकूण; सर्व; समस्त; संपूर्ण.

**कुलकना**-क्रि.अ. ( सं. ) खुलणें; आनंदित होणें; आनंदानें नाचणें.

**कुलकानि**–स्त्री. (सं.) कुलाची मर्यादा; कुलाची प्रतिष्ठा.

**कुलकुलाना**–क्रि.अ. (अनु.) कुल-कुल शब्द करणें.

**कुलच्छन**–पु. (सं.) कुलक्षण.

**कुलज**–पु. (सं.) कुलीन घराण्यांतला.

**कुलट**–वि.पु. (सं.) व्यभिचारी; बद-फैली.

**कुलथ-कुलथी**–स्त्री. (सं.) कुळीथ,

**कुलन**–स्त्री. (हिं.) ठुसठुस; ठणका.

**कुलपति**–पु. (सं.) १ घरचा कर्ता पुरुष. २ विश्वविद्यालयाचा (उप) कुलगुरु.

**कुलफ**–पु. (अ.) कुलूप.

**कुलफ़त**–स्त्री. १ (अ.) कष्ट; विपत्ति. २ चिंता; फिकीर.

**कुलफ़ा**–पु. (फा.) घोळ (भाजी).

**कुलफ़ी**–स्त्री. १ पेंच. २ पत्र्याचें आइ-सक्रीम करण्याचें नळकांडें. ३ कुलपी मलाई.

**कुलबुल**–पु. (अनु.) चुळबुळ करणें.

**कुलबुलाना**–क्रि अ. (अनु.) वळ-वळणें; चळवळ करणें; चुळबुळ करणें.

**कुलबोरन**–वि. १ कुल कलंक; कुळ-बुडव्या. २ नालायक.

**कुलह**–स्त्री. (फा.) १ टोपी. २ शिकारी. ३ झांपड; अंधारी (पक्ष्यांच्या डोळ्यास बांधण्याची).

**कुलहवगा**–पु. (फा.) कुंची.

**कुलही**–स्त्री. (फा.) टोपडें.

**कुलाँच-कुलाँट**–स्त्री. (तु.) १ झेंप; उडी; उड्डाण. २ कोलांटी उडी.

**कुलाघ**–स्त्री. (सं.) पाप; दोष.

**कुलाबा**–पु. (फा.) १ बिजागरी. २ गळ. ३ मोरी; गटार.

**कुलाय**–पु. (सं.) १ शरीर. २ घरटें. ३ स्थान; जागा.

**कुलाल**–पु. (सं.) १ कुंभार. २ जंगली कोंबडा. ३ घुबड.

**कुलिक**–पु. (सं.) शिल्पकार; कारा-गीर. २ कुलवान. ३ तालीमखाना. ४ खेंकडा. ५ गुंजेचें झाड.

**कुलिश**–पु. १ हिरा. २ कुऱ्हाड. ३ वज्र.

**कुली**–पु. (तु.) कुली; हमाल.

**कुलुफ**–पु. (अ.) कुलूप.

**कुलेल**–स्त्री. (सं) क्रीडा; खेळ.

**कुल्फ**–पु. कुलुप.

**कुल्या**–स्त्री. (सं.) १ नाला. २ लहान नदी. ३ कुलीन स्त्री. ४ पन्हाळ.

**कुल्ला**–पु. (सं.) चूळ; चुळका.

**कुल्ली**–स्त्री. (सं.) १ तोंड धुवून चूळ भरण्याची क्रिया. २ चुळका.

**कुल्ली**–स्त्री. (फा.) बट; जटा.

**कुल्हड़**–पु. (सं.) गाडगें; मडकें.

**कुल्हाड़ा**-पु. (सं. ) मोठी कुऱ्हाड.
**कुल्हाड़ी**- स्त्री. (सं.) लहान कुऱ्हाड.
**कुल्हिया**-स्त्री. (सं.) लहान मडकें.
**कुवंग**-पु. (सं.) शिसें.
**कुव**-पु. (सं.) १ कमल. २ फूल.
**कुवाँ**-पु. कुआँ पहा.
**कुवार**-पु. (सं.) अश्विन महिना.
**कुशलाई**-स्त्री. (सं.) क्षेम कुशल.
**कुशलात**-स्त्री. (सं.) कुशल समाचार; क्षेम कुशल.
**कुशादगी**-स्त्री.(फा.) फैलाव; विस्तार.
**कुशादा**-वि. (फा.) १ खुला; मोकळा; आवरण रहित. २ विस्तृत; लांबरुंद.
**कुशीलव**-पु. (सं.) १ भाट; कवि. २ नट. ३ गवई.
**कुश्ता**-पु. (फा.) भस्म (धातूवर रासायनिक क्रिया करून केलेलें).
**कुश्ती**-स्त्री. (फा.) कुस्ती.
**कुसगुन**-पु. (सं.) अपशकुन.
**कुसल**-वि. (सं.) कुशल.
**कुसलई**-स्त्री. (सं.) कुशलता.
**कुसली**-स्त्री. (सं.) आंब्याची कोय. २ एक पक्वान्न.
**कुसली**-वि. (सं.) सकुशल.
**कुसवारी**-पु. (सं.) १ रेशमाचा किडा. २ रेशमी किडयाचा कोश.
**कुसाइत**-स्त्री. (सं.+अ.) कुसमय; अशुभ वेळ.
**कुसारी**-स्त्री. कुसवारी पहा.
**कुसिया-सा**ँ-स्त्री. (सं.) नांगराचा फाल.
**कुसीद**-पु. (सं.) १ सावकारी; व्याजबट्टा. २ कर्जाऊ रक्कम. ३ रक्तचंदन.
**कुसूर**-पु कसूर पहा.
**कुस्सा**-पु. (दे.) कुदळ.
**कुहक**-पु. (सं.) १ मायाजाल; फसवणूक. २ कोंबडयाचें आरवणें. ३ लबाड; फसव्या. ४ जादूगार. ५ पक्षांचें कूजन.
**कहकुह**-पु. (सं.) केशर.
**कुहन**-वि. (सं.) १ मत्सरी. २ दगाबाज.
**कुहन**-पु. (सं.) १ उंदीर. २ मातीचें भांडें. ३ शिशाचें भांडें. ४ साप.
**कुहना**-क्रि.स. वाईट रीतीनें मारणें; निर्दयपणें मारणें.
**कुहनी**-स्त्री. (सं.) १ कोपर. २ हुक्याच्या नळीला जोडलेली तांब्याची वा पितळेची वांकडी नळी.
**कुहप**-पु. (सं.) राक्षस.
**कुहर**-पु. (सं.) खड्डा; बीळ.
**कुहरा**-पु. (सं.) धुकें.

**कुहराम**-पु. ( अ. ) १ शोक; विलाप. २ खळबळ; हालचाल.

**कुहाँर**-पु. ( सं. ) कुंभार.

**कुहाना**-क्रि.स. (सं. ) रागावणें. रुसणें.

**कुहारा**-पु. ( सं. ) कुऱ्हाड.

**कुहासा**-पु. धुकें.

**कुही**-स्त्री. ( सं. ) एक शिकारी पक्षी.

**कुहुक**-पु. ( अनु. ) पक्षाचा मधुर ध्वनि.

**कुहू**-स्त्री. (सं. ) १ अमावास्या. २ मोर अथवा कोकिळेचें ओरडणें.

**कूँखना**-क्रि.अ. ( अनु. ) कण्हणें.

**कूँच**-स्त्री. ( दे. ) १ विणकराचा मोठा ब्रश. २ लोहाराची सांडशी.

**कूँच**-स्त्री. ( सं. ) घोडनस.

**कूँचना**-क्रि.स. ( अनु. ) कुटणें.

**कूँचा**-पु. ( सं. ) कुंचा; झाडू.

**कूँची**-स्त्री. ( सं. ) १ लहान कुंचा; लहान झाडू. २ रंगाची कुंचली; ब्रश.

**कूँज**-पु. ( सं. ) क्रौंच पक्षी.

**कूँजड़ी-कूँजरी**-स्त्री.(सं. )१माळीण. २ भाजी विकणारी स्त्री; भाजीवाली.

**कूँजना**-क्रि अ. कूजना पहा.

**कूँड**-पु. ( सं. ) जिरटोप. २ पोहरा; कुंड. ३ नांगराचें तास; घळ.

**कूँडा**-पु. ( सं. ) १ कुंड; रांजण. २ कुंडी ( झाडें लावण्याची पसरट आकाराची ). ३ काथोट.

**कूँडी**-स्त्री. ( सं. ) १दगडी. २ डोणी.

**कूथना**-पु. पु. ( सं. ) कुंथणें.

**कूई**-स्त्री. ( सं. ) चंद्रविकासी कमळ.

**कूक**-स्त्री. ( सं. ) कूजन.

**कूक**-स्त्री. घड्याळ फोनो इ.ना किल्ली देण्याची क्रिया.

**कूकना**-क्रि अ. ( सं. ) कोकिळेचें कूजन करणें.

**कूकना**-क्रि.स. घड्याळ अथवा फोनोला किल्ली देणें.

**कूकर**-पु. ( सं. ) कुत्रा.

**कूकरकौर**-पु. (सं. )कुत्र्याला घालावयाचें उष्टें अन्न; तुच्छ वस्तु.

**कूकरनिंदिया**-स्त्री. ( सं. ) सावध झोंप.

**कूकरबसेरा**-पु. थोडी विश्रांती.

**कूख**-स्त्री. कोख पहा.

**कूच**-पु. ( तु. ) प्रस्थान.

**कूचा**-पु. ( फा. ) १ आळी; गल्ली; बोळ. २ कूँचा पहा.

**कूची**-स्त्री. कूँची पहा.

**कूज-कूजन**-स्त्री. ( सं. ) कूजन.

**कूजा**-पु.(फा. ) १ खुजा; मडकें. २ २ मडक्यांत तयार केलेली खडीसाखर. ३ मोतियाचें फूल.

**कूट**-पु. १ पर्वताचें उंच शिखर. २ शिंग. ३ धान्याची उंच रास. ४

हातोडा. ५ हरिण पकडण्याचें जाळें. ६ तलवार; गुप्ती इ. ७ कपटजाल. ८ मिथ्या; असत्य. ९ घागर. १० गुप्त-रहस्य; कूट. ११ छद्मी हास्य. १२ मुंडा बैल. १३ आवरण.

**कूट**-वि. (सं.) १ मिथ्यावादी. २ दगाबाज. ३ कृत्रिम; नकली. ४ श्रेष्ठ प्रधान. ५ निश्चल. ६ धर्मभ्रष्ट.

**कूट**-स्त्री. (सं.) १ मारकूट. २ कांडण्याची क्रिया. ३ झोंपडी.

**कूटता**-स्त्री. (सं.) १ कठिणपणा. २ कपट; खोटेपणा.

**कूटतुला**-पु. (सं.) दीडदांडीचा तराजू.

**कूटना**-क्रि.स. (सं.) १ कुटणें. २ मारणें; पिटणें. ३ टांकी लावणें. ४ खच्ची करणें.

**कूटमान**-पु. (सं.) खोटें माप.

**कूटस्थ**-वि (सं.) १ अविनाशी. २ अटळ; अचल. ३ गुप्त.

**कूटा**-पु. (सं.) कुटना पहा.

**कूटी**-पु. (सं.) मस्कऱ्या; विनोदी. २ जादुगार.

**कूटी**-स्त्री. (सं.) कुंटीण.

**कूडा**-पु. (सं.) १ केरकचरा. २ रद्दी.

**कूडाखाना**-पु.(सं.+फा.) उकिरडा.

**कूढ़**-पु. (सं.) पाभरीची पेरणी.

**कूढ़**-वि. (सं.) अजाण; अज्ञानी.

**कूढ़मगज**-वि. (सं.+फा.) मंदबुद्धि; ठोंब्या.

**कूत**-पु. (सं.) अंदाज.

**कूतना**-क्रि.स. (सं.) अजमावणें; अंदाज करणें.

**कूद**-स्त्री. (सं.) उडी.

**कूदना**-क्रि.अ. (सं.) उडी मारणें; उल्लंघन करणें.

**कूप**-पु. (सं.) १ कूप; विहीर. २ भोंक; छिद्र. ३ खड्डा; कूप.

**कूबड़**-पु. (सं.) कुबड.

**कूर**-वि. (सं.) क्रूर.

**कूर**-पु. सारण.

**कूरा**-पु. (सं.) १ रास ढीग. २ अंश; भाग; हिस्सा.

**कूरी**-स्त्री. (सं.) लहान रास.

**कूर्च**-पु. (सं.) १ पुढा (दोन बाहू-मधील अंतर). २ अंगठा व तर्जनी यांचे मधील अंतर. ३ खोटें; असत्य. ४ दंभ. ५ मस्तक. ६ भांडार. ७ कुंचली.

**कूल**-पु. (सं.) १ किनारा; तट. २ २ पाण्याचा पाट. ३ तलाव. ४ समीप; जवळ. ५ सैन्याची पिछाडी.

**कूला**-पु. (सं.) पाण्याचा पाट. २ कटिरास्थि.

**कूवत**-स्त्री. (अ.) कुवत; ताकद.

**कूवर**-वि. (सं.) सुंदर; मनोहर.

**कृती**-वि. (सं.) १ निपुण; दक्ष २ साधु. ३ पुण्यात्मा.

**कृत्यका**-स्त्री. (सं.) कृत्या.

**कृपनाई**-स्त्री. (सं.) कृपणता; कंजूषपणा.

**कैंचली-कैंचुल**-स्त्री. (सं.) सापाची कात.

**कैंचुआ-कैंचुवा**-पु. (सं.) गांडूळ.

**कैंदुवाल**-पु. (सं.) वल्हें.

**केऊ**-सर्व. (सं.) कोणी.

**केकड़ा**-पु. (सं.) खेकडा.

**केकर**-पु. (सं.) तिरळा.

**केका**-स्त्री. (सं.) मोराचें ओरडणें.

**केकी**-पु. (सं.) मोर.

**केडवारी**-स्त्री. भाजीपाला व फळांची बाग.

**केड़ा**-पु. (सं.) १ नवांकुर. २ नवयुवक. ३ शेतांतून कापलेलें गवत किंवा पिकाची रास.

**केतक**-पु. (सं.) केवडा.

**केतक**-वि (सं.) १ किती व कशा प्रकारचा. २ विपुल; कित्येक.

**केतन**-पु. (सं.) १ निमंत्रण. २ ध्वज. ३ चिन्ह. ४ घर. ५ स्थान.

**केता**-वि. (सं.) किती.

**केतिक**-वि. (सं.) किती. २ कशाप्रकारचा.

**केती**-वि. (सं.) किती.

**केतुमान**-वि. (सं.) १ बुद्धिमान. २ तेजस्वी. ३ ज्याच्या जवळ निशाण (ध्वज) आहे असा.

**केदली**-पु. (सं.) केळीचें झाड.

**केना**-पु. (सं.) १ भाजीपाल्याच्या मोबदल्यांत येणारें थोडें धान्य. २ पाले भाजी.

**केनिपात-केनिपातव**-पु. (सं.) वल्हें.

**केर**-प्रत्य. (सं) संबंध सूचक प्रत्यय चा; ची; चें.

**केरा**-पु. (सं.) केळें.

**केराना**-क्रिवि. (सं.) पाखडणें.

**केराना**-पु. (सं.) किराणा माल.

**केरानी**-पु. (इं.) १ युरेशियन. २ कारकून.

**केराया**-पु. किराया पहा.

**केरि-केरी**-स्त्री. (दे.) कैरी.

**केला**-पु. (सं.) केळें.

**केलि**-स्त्री. (सं.) १ खेळ; क्रीडा. २ मैथुन; समागम. ३ हास्यविनोद; थट्टा मस्करी. ४ पृथ्वी.

**केवट**-पु (सं.) कोळी; नाविक.

**केवटीदाल**-स्त्री. दोन किंवा अधिक प्रकारच्या डाळींचें वरण.

**केवडई**-वि. (सं.) केतकी रंगाचा.

**केवरा**-पु. (सं.) केवडा.

**केवल**-वि. (सं.) १ एकटा; एकमात्र. २ शुद्ध; पवित्र. ३ उत्कृष्ट; उत्तम; श्रेष्ठ.

**केवल**-क्रिवि. (सं.) केवळ; मात्र.

**केवा**-पु. (सं.) १ कमळ. २ कमळकळी. ३ काणाडोळा; दुर्लक्ष.

**केवाड़-केवाड़ा**-पु. किवाड़ पहा.

**केसर**-पु. (सं.) केशर.

**केसरिया**-वि. (सं.) केशरी.

**केहरी**-पु. (सं.) १ केसरी; सिंह. २ २ घोडा.

**केहरी**-स्त्री. (फा.) सामान वगैरे ठेवण्याची एक प्रकारची थैली.

**केहा**-पु. (सं.) मोर.

**केहुनी**-स्त्री. (सं.) कोपर.

**केहूँ**-क्रिवि. (सं.) कोणत्या प्रकारें.

**कैंचा**-वि. (सं.) तिरळा.

**कैंचा**-पु. (तु.) मोठी कात्री.

**कैंची**-स्त्री. (तु.) १ कात्री. २ कैची.

**कैंप**-पु. (इं.) कँप.

**कै**-वि. (सं.) किती.

**कै**-अव्य. (सं.) अथवा; किंवा.

**कै**-स्त्री. (अ.) ओकारी.

**कैकस**-पु. (सं.) राक्षस.

**कैतव**-पु. (सं.) १ कपट; धोका. २ जुगार; द्यूत. ३ धोतरा.

**कैतव**-वि. (सं.) १ धोकेबाज; कपटी. २ लुच्चा. ३ जुगारी.

**कैथ-कैथा**-पु. (सं.) कवठ.

**क़ैद**-स्त्री. (अ.) १ बंधन; अटक. २ कारावास. ३ अट; शर्त.

**क़ैदखाना**-पु. (अ.+फा.) तुरुंग; बंदीगृह.

**क़ैदतनहाई**-स्त्री. (अ.+फा.) अंधारकोठडीची कैद.

**क़ैदमहज़**-स्त्री. (अ.) साधी कैद.

**कैदसख्त**-स्त्री. (अ.) सक्तमजूरी; सश्रमकैद.

**कैधौं**-अव्य. (सं.) किंवा; अथवा.

**कैन**-स्त्री. (सं.) १ कामटी. २ टहाळी.

**कैफ**-पु. (अ.) नशा; कैफ.

**कैफियत**-स्त्री. (अ.) १ खबर; बातमी. २ विवरण; तपशील. ३ आश्चर्यकारक किंवा आनंददायक घटना.

**कैफी**-वि. (अ.) १ मस्त; मदोन्मत. २ नशाबाज.

**कैरा**-पु. (सं.) १ धुरकट रंग. २ लालसर पांढरा रंग.

**कैरा**-वि. (सं.) १ भुऱ्या रंगाचा २ भुऱ्या डोळयांचा.

**कैसा**-वि. (सं.) कसा; कोणत्या प्रकारचा.

**कैसा**-क्रिवि. (सं.) कोणत्या तऱ्हेनें; कसें.

**कैसे**-क्रिवि. (सं.) १ कसें; कोणत्या प्रकारें. २ कां? कां बरें?

**कैसो**-वि. (सं.) कैसा (वि.) पहा.

**कोंई**-स्त्री. (सं.) चंद्रविकासी कमळ.

**कोंचना**-क्रि.स. (सं.) टोचणें; खुपसणें; खोंचणें.

**कोंछ**-पु. (सं.) लुगडयाच्या पदराचें एक टोंक.

**कोंछियाना**-क्रि.स. (सं.) १ निऱ्या करणें. २ कनवठीस लावणें.

**कोंछी**-स्त्री. (सं.) निरी.

**कोंढा**-पु. (सं.) कोयंडा.

**कोंढी**-स्त्री. (सं.) १ कोयंडा. २ मिटलेली कळी.

**कोंथना**-क्रि. अ. कूँथना पहा.

**कोंपना**-क्रि.अ. अंकुरणें.

**कोंपर**-पु. (सं.) पाडाचा आंबा.

**कोंपल**-पु. (सं.) अंकुर; नवपल्लव.

**कोंवर**-वि. (सं.) कोमल; नाजुक; मऊ.

**को**-सर्व. (सं.) कोण.

**को**-प्रत्य. (सं.) द्वितीया किंवा चतुर्थीचा प्रत्यय स; ला, तें.

**कोआ**-पु. (सं.) १ कोशा; रेशमाच्या किडयाचें घर. २ रेशमाचा किडा. ३ फणसाचा गरा. ४ मोहाचें फळ.

**कोइरी**-पु. (सं.) माळी; काची.

**कोइला**-पु. कोयला पहा.

**कोइलिया**-स्त्री. (सं.) कोकिळा.

**कोइली**-स्त्री. (सं.) १ कोय. २ कैरी (डागळलेली). ३ कोकिळा.

**कोई**-सर्व. (सं.) १ कोणी (अज्ञात व्यक्ति वा वस्तु). २ एक देखील; एक सुद्धां.

**कोई**-क्रिवि. (सं.) जवळ जवळ; अजमासें; कांहीं तरी.

**कोई**-वि. (सं.) कांहीं ही. (उदा. कोई चिंता नहीं).

**कोक**-पु. (सं.) १ चक्रवाक. २ बेडूक.

**कोकना**-क्रि.स. (फा.) धांवदोरा घालणें; कच्ची शिलाई करणें.

**कोकनी**-वि (दे.) १ लहान. २ निकृष्ट.

**कोका**-पु. (इं.) कोको.

**कोका**-पु. (तु.) दासीपुत्र वा कन्या.

**कोको**–पु. (अनु.) १ कावळा. २ मुलांना भेवडावण्याचा शब्द.

**कोख**–पु. (सं.) १ उदर; पोट. २ कूस. ३ गर्भाशय.

**कोखबंद**–वि. (सं.+फा.) वांझ.

**कोचना**–क्रि.स. (सं.) कोंचणा पहा.

**कोचनी**–स्त्री. (सं.) पऱ्हाणी.

**कोचा**–पु. (दे.) १ तलवारीची साधारण जखम. २ टोमणा.

**कोटपाल**–पु. (सं.) किल्लेदार.

**कोठा**–पु. (सं.) १ मोठा दिवाणखाना; मोठी खोली. २ कोठा; कोठार. ३ कोठा; पोट. ४ घर; खण.

**कोठारी**–स्त्री. (सं.) कोठडी.

**कोठी**–स्त्री. (सं.) १ मोठें घर; मोठा वाडा. २ वखार. ३ गुदाम; कोठी.

**कोड़ना**–क्रि.स. (सं.) १ वखरणें. २ खणणें; उकरणें.

**कोड़ा**–पु. (सं.) कोरडा; चाबूक.

**कोडी**–स्त्री. विसांचा समूह.

**कोढ़**–पु. (सं.) कोड; कुष्ट.

**कोण**–पु. (सं.) १ कोन; कोण. २ सारंगीचा गज. ३ तरवारीची धार. ४ सोटा.

**कोतल**–पु. (फा.) १ मिरवणुकीचा घोडा. २ खाशास्वारीचा घोडा.

**कोतल**–वि. (फा.) रिकामा; ज्याला कांहीं काम नाहीं असा.

**कोता-कोताह**–वि. (फा.) १ लहान. २ कमी; अल्प.

**कोताही**–स्त्री. (फा.) १ कमतरता; उणीव. २ कंजूषी.

**कोथला**–पु. (सं.) १ मोठी थैली. २ कोथळा; पोट.

**कोथली**–स्त्री. (सं.) कसा; पैसे ठेवण्याची कमरेला बांधण्याची पिशवी.

**कोद**–स्त्री. (सं.) १ दिशा; बाजू. २ कोन; कोपरा.

**कोदव-कोदों दो**–पु. (सं.) हरीक.

**कोना**–पु. (सं.) १ कोपरा; कोन. २ तीक्ष्ण कडा.

**कोनिया**–स्त्री. (सं.) १ कोनडा. २ भिंतीच्या कोपऱ्यांत बसविलेली फळी.

**कोपर**–पु. (सं.) परात.

**कोपर**–पु. (हिं.) पाडाचा आंबा.

**कोपल**–पु. (सं.) अंकुर; नवपल्लव.

**कोपली**–वि. (सं.) बैंगणी रंगाचा.

**कोपी**–वि. (सं.) तापट; रागीट.

**कोफ्ता**–पु. (फा.) खिमा.

**कोय**–सर्व. (सं.) कोण; कोणी.

**कोयल**–स्त्री. (सं.) कोकिळा.

**कोयला**–पु. (सं.) कोळसा.

**कोया**-पु. (सं.) १ डोळयाचा पांढरा भाग. २ डोळयाचा कोंपरा. ३ फणसाचा गरा. ४ रेशमी किडयाचा कोश.

**कोर**-स्त्री. (सं.) १ कड; किनार. २ अंतराळ. ३ द्वेष; वैर; वैमनस्य. ४ दोष; खोड. ५ हत्याराची धार. ६ पंक्ति; श्रेणी; ओळ. ७ कोपरा.

**कोरक**-पु. (सं.) कळी.

**कोरहा**-वि. अणकुचीदार.

**कोरा**-वि. (सं.) १ कोरा; न वापरलेला. २ मूर्ख; अशिक्षित. ३ केवळ; फक्त.

**कोरा**-पु. बिन काठांचें पांढरें रेशमी धोतर.

**कोरा**-पु. (सं.) मांडी; उत्संग.

**कोरी-कोली**-पु. (सं.) कोष्टी; विणकर.

**कोरी**-वि.स्त्री. (सं.) कोराचें स्त्रीलिंगी रूप.

**कोरी**-पु. (सं.) कोष्टी.

**कोल**-पु. (सं.) १ डुक्कर. २ मांडी; उत्संग. ३ कोली स्त्री. पहा. ४ बोर. ५ चणे फुटाणे इत्यादी.

**कोलिया**-स्त्री. (सं.) अरुंद बोळ; गल्ली.

**कोली**-स्त्री. (सं.) १ आलिंगन देतांना दोन हातांमधील अंतर. २ उत्संग; मांडी.

**कोली**-पु. (सं.) कोष्टी; विणकर.

**कोल्हू**-पु. (सं.) १ उंसाचा चरक. २ घाणा.

**कोशपाल**-पु. (सं.) खजिनदार.

**कोशलिक**-पु. (सं.) लांच.

**कोशिश**-पु. (फा.) प्रयत्न; कोशिश.

**कोष्ठी**-स्त्री. (सं.) जन्मकुंडली.

**कोष्ण**-वि. (सं.) कोमट.

**कोसना**-क्रि स. (सं.) निर्भर्त्सना करणें.

**कोसा**-पु. (सं.) १ कोश; रेशीम. २ एक प्रकारचा दिवा.

**कोहँडौरी**-स्त्री. (सं.) कोहाळयाचा सांडगा.

**कोह**-पु. (फा.) पर्वत.

**कोह**-पु. (सं.) क्रोध.

**कोहनी**-स्त्री. (सं.) कोपर.

**कोहवर**-पु. (सं.) विवाहप्रसंगी कुलदेवतेची स्थापना करितात ती जागा.

**कोहरी**-स्त्री. (दे.) तळलेले वा उकडलेले चणे; उसळ.

**कोहाँर**-पु. (सं.) कुंभार.

**कोहा**-पु. (सं.) रांजण.

**कोहान**-पु. (फा.) उंटाची मदार.

**कोहाना**-क्रि.अ. (सं.) रागावणें; रुसणें.

**कोहिस्थान**-पु. (फा.) पहाडी. प्रदेश.

**कोही**-वि. (सं.) क्रोधी; रागीट.

**कोही**-वि. (फा.) डोंगराळ.

**कौंकिर**-स्त्री. (सं.) १ हिरकणी; हिऱ्याचा कण. २ कांचेचा कण.

**कौंची**-स्त्री. (सं.) कामटी.

**कौंतिक**-पु. (सं.) भालाईत.

**कौंध**-स्त्री. विजेची चमक.

**कौंधनी**-स्त्री. (सं.) करगोटा.

**कौंधा**-स्त्री. कौंध पहा.

**कौंरी**-स्त्री. (सं.) विडयाच्या पन्नास पानांची जुडी.

**कौआ**-पु. (सं.) कावळा.

**कौआना**-क्रि.अ. चमकणें; दचकणें; विस्मित होणें.

**कौआर**-पु. (सं.) कावकाव.

**कौआल**-पु. (अ.) कवाली गाणारा.

**कौआली**-स्त्री. (अ.) कवाली.

**कौड़ा** पु. (सं.) मोठी कौडी.

**कौड़ा**-पु. (सं.) आगटी; शेकोटी.

**कौड़िया**-वि. (सं.) कवडीच्या रंगासारखा.

**कौड़ियाला**-वि. (सं.) कौडिया पहा.

**कौडियाला**-पु. (सं.) १ कौडीचुंबक; कंजूष. २ कवड्या साप.

**कौढ़ी**-स्त्री. (सं.) कवडी.

**कौन**-सर्व. (सं.) कोण.

**क़ौम**-स्त्री. (अ.) जाति; जात; वर्ण.

**कौमुदीचार**-पु. (सं.) कोजागिरी पौर्णिमा.

**कौर**-पु. (सं.) घास.

**कौरना**-क्रि. (सं.) शेकणें; परतणें.

**कौरा**-पु. (सं.) १ दाराजवळचा कोपरा. २ कोडा पहा. ३ भिकारी, कुत्रें इ. ना देण्याचें अन्न.

**कौल**-पु. (सं.) १ कुलीन; खानदानी. २ वाममार्गी. ३ कमळ. ४ घास.

**क़ौल**-पु. (अ.) १ कथन; उक्ति. २ करार; प्रतिज्ञा.

**कौवा**-पु. (सं.) कावळा.

**कौवाली**-स्त्री. (अ.) १ कवाली. २ गवई पेशा.

**कौशल**-पु. (सं.) १ कौशल्य. २ कुशल; क्षेम.

**क्या**-सर्व. (सं.) काय (प्रश्नार्थक).

**क्या**-क्रिवि. (सं.) कां ?; काय म्हणून.

**क्यारी**-स्त्री. (सं.) १ अळें; वाफा. २ खाचर.

**क्रिस्तान**-पु. (इं.) ख्रिस्ती.

**क्रोड**-स्त्री. (सं.) १ वक्षस्थल. २ मांडी; उत्संग.

**क्रोडपत्र**-पु. (सं.) परिशिष्ट.

**क्वार**-पु. (सं.) कुआर पहा.

**क्वारा**-वि. (सं.) अविवाहित; कुमार.

**क्वारपन-क्वारापन**-पु. कौमार्य; अविवाहित अवस्था.

**क्षमी**-वि. (सं.) १ क्षमाशील. २ योग्य; समर्थ.

**क्षांत**-वि. (सं.) सहनशील; क्षमाशील.

**क्षांति**-स्त्री. (सं.) १ क्षमा. २ सहिष्णुता.

**क्षाम**-वि. (सं.). १ कृष; क्षीण; दुबळा. २ अल्प; थोडा.

**क्षौम**-पु. (सं.) तागाचें कापड.

---

## ख

**खंक**-वि. (सं.) बलहीन; दुर्बल.

**खंख**-वि. (सं.) १ खाली; रिकामा. २ उजाड; ओसाड.

**खंखड**-वि. (सं.) १ शुष्क. २ जख्खड म्हातारा.

**खँखार**-पु. (अनु.) बेडका; खांकरा.

**खंग**-पु. (सं.) १ खड्ग; तलवार. २ गेंडा.

**खँगना**-क्रि.अ. (सं.) खंगणें.

**खंगर**-पु. (दे.) खंगर.

**खंगर**-वि. (दे.) शुष्क.

**खँगहा**-वि. (सं.) दांत पुढें आलेला.

**खँगहा**-पु. (सं.) गेंडा.

**खँगारना-खँगालना**-क्रि.स. (सं.) १ खळबळणें; विसळणें. २ सर्वस्व ढिरावून नेणें; सर्वस्व धुवून नेणें.

**खँगी**-स्त्री. (सं.) कमतरता; न्यूनता; त्रुटि.

**खँघारना**-क्रि.अ (सं.) खँगारना पहा.

**खँचना**-क्रि.अ. (सं.) चिन्हांकित होणें.

**खँचाना**-क्रि.स. (सं.) १ चिन्हांकित करणें. २ भराभर लिहिणें; खरडणें.

**खँचिया**-स्त्री. (सं.) टोपली.

**खंजक**-वि. (सं.) लंगडा.

**खँजडी**-स्त्री. (सं.) डफडी.

**खंजर**-पु. (फा.) खंजीर.

**खंजरी**-स्त्री. (सं.) खँजडी पहा.

**खंजरी**-स्त्री. (फा.) खंजीर.

**खंडना**-क्रि.स. (सं.) १ तुकडे तुकडे करणें. २ खंडन करणें; निराकरण करणें.

**खंडपाल**-पु. (सं.) हलवाई.

**खंडपूरी**-स्त्री. (सं.) १ साटोरी. २ गोडपुरी.

**खंडर**-पु. (सं.) पडक्या घराचे अवशिष्ट भाग.

**खंडरा**-पु. (सं.) डाळीच्या पिठाचा वडा.

**खँडला**-पु (सं.) तुकडा.

**खँडवानी**-स्त्री. (सं.) सरबत; साखरपाणी.

**खंडशीला**-स्त्री. (सं.) वेश्या; दुराचारी स्त्री.

**खंड़सार-खंड़साल**-स्त्री. (सं.) साखरेचा कारखाना.

**खँडहर**-पु. खंडर पहा.

**खंडाली**-स्त्री. (सं.) १ तेल मोजण्याचें एक माप. २ कामेच्छु स्त्री.

**खंडिक**-पु. (सं.) कांख.

**खंडिया**-पु. (सं.) गंडेरी करणारा; गंडेरीवाला.

**खंडिया**-स्त्री. (सं.) तुकडा; खंड.

**खंडी**-स्त्री. (सं.) १ गांवाच्या आवती भोंवतीची झाडी. २ भाड्याचा अथवा कर्जाचा हप्ता.

**खँडुआ**-पु. (सं.) खांडक्यांनी बांधलेली विहीर.

**खँडौरी**-स्त्री. (सं.) तांदुळाच्या कण्या.

**खंतरा**-पु. (सं.) १ भेग; फट; तडा. २ कोपरा.

**खंता**-पु. (सं.) १ कुदळ. २ कुंभाराचें माती आणण्याचें खाचर.

**खंदा**-पु. (सं.) खणणारा.

**खँधियाना**-क्रि.स (सं.) (भांड्यांतून) बाहेर काढणें; उकरणें.

**खंभ**-पु. (सं.) १ खांब. २ आधार.

**खँभा**-पु. (सं.) खांब.

**खँभार**-पु. (सं.) १ चिंता. २ व्याकुलता. ३ भय. ४ शोक.

**खँभिया**-स्त्री. (सं.) लहान खांब.

**खँवँ**-स्त्री. (सं.) धान्याचें पेंव.

**खँवँड़ा**-पु. (सं.) मोठें पेंव.

**खई**-स्त्री. (सं.) १ क्षय; विनाश; लय. २ युद्ध; लढाई. ३ भांडण; तंटा.

**खक्खा**-पु. (अ.) खदखदून हंसणें; मोकळें हास्य.

**खक्खा**-पु. (दे.) १ पंजाबी शिपाई. २ अनुभवी मनुष्य. ३ मोठा व उंच हत्ती.

**खखार**-पु. (दे.) खांकरा.

**खखारना**-क्रि. अ. (दे.) खांकरणें.

**खखेटना**-क्रि.स. (सं.) १ दाबणें. २ पाठलाग करणें. ३ घायाळ करणें.

**खखोंडर**-पु. (सं.) झाडाच्या ढोलींत तयार केलेलें पक्षाचें घरटें.

**खखोरना**-क्रि.स. (दे.) कसून शोधणें; बारकाईनें शोधणें.

**खगना**-क्रि.अ. (सं.) १ रुतणें; बोंचणें. २ मनांत ठसणें. ३ लागणें; अनुलिप्त होणें. ४ चिन्हांकित होणें. ५ अडून राहणें; निश्चल होणें.

**खचन**-पु. (सं.) १ जडण्याची क्रिया. २ चित्रित; चिन्हित होण्याची क्रिया.

**खचन**-क्रि.अ. (सं.) १ जडविलें जाणें; चित्रित होणें; चिन्हांकित होणें २ (मन) जडणें; रमणें. ३ खचणें; रुतणें.

**खचरा**-वि. (सं.) १ वर्णसंकर. २ दुष्ट; पाजी.

**खचाखच**-वि. (सं.) खच्चून; ठांसून

**खचित**-वि. (सं.) खचित; चित्रित.

**खचीना**-पु. (सं.) १ रेघ; लकेर. २ चिन्ह.

**खच्चर**-पु. (दे.) खेचर.

**खजहजा**-पु. (सं.) खाण्यायोग्य फळ वा मेवा.

**ख़ज़ानची**-पु. (फा.) खजिनदार; कोशाध्यक्ष.

**ख़ज़ाना**-पु. (अ.) खजिना.

**खजिल**-वि. (फा.) खजिल; शरमिंदा.

**खजुरा**-पु. (सं.) गोंडेदार आगवळ.

**खजुली**-स्त्री. (दे.) १ खरूज; खाज. २ खाज उत्पन्न करणारें एक गवत.

**खजुली**-स्त्री. (दे.) एक मिठाई.

**खजूरी**-वि. (सं.) खजुरासारखा.

**खट**-पु. (सं) १ कफ. २ बुक्का; ठोसा. ३ कुऱ्हाड.

**खटकना**-क्रि.अ. (अनु.) १ खटखट आवाज होणें. २ कांटा इ बोंचल्यामुळें ठुसठुसणें. ३ मनाला लागणें; मनांत सलणें. ४ विटणें; मन उडून जाणें. ५ परस्परांत भांडण होणें; विनसणें. ६ काळजी लागणें; हुरहूर लागणें. ७ साशंकता उत्पन्न होणें.

**खटका**-पु. (अनु.) १ आशंका; भीती; चिंता. २ खटखट आवाज. ३ खटका; खिटी; बोलट. ४ पक्ष्यांना भिवविण्यासाठीं बांधलेला बांबूचा तुकडा हा वाऱ्यानें हालून खटखट आवाज होतो.

**खटकीड़ा-खटकीरा**–पु. खटमल पहा.

**खटखट**–स्त्री. (अनु.) १ ठकठक. २ कटकट. ३ तंटा; बखेडा.

**खटखटा**–क्रि.स. (अनु.) खटका ४ पहा.

**खटखटाना**–क्रि.स. (अनु.) १ खटखट शब्द करणें; ठोठावणें. २ स्मरण देणें.

**खटपट**–स्त्री. (अनु.) १ भांडण; झगडा. २ खटखट आवाज.

**खटपटिया**–वि. (अनु.) भांडखोर.

**खटपाटी**–स्त्री. (सं.) बाजेचें लाकूड.

**खटबुना**–पु. (सं.) बाज विणणारा.

**खटमल**–पु. (सं.) ढेंकूण.

**खटमिट्ठा**–वि. (सं.) आंबट गोड.

**खटराग**–पु. (सं.) १ भांडण. २ षट्राग; संगीताचे सहा राग. ३ अनावश्यक गोष्टी; रद्दी सामान; अडगळ.

**खटला**–पु. (दे.) स्त्रियांच्या कानाचें भोंक.

**खटला**–पु. (सं.) बायको मुलें वगैरे परिवार.

**खटाई**–स्त्री. (सं.) १ आंबटपणा. २ आम्ल वस्तु. ३ बेबनाव; वैमनस्य.

**खटाखट**–क्रिवि. (सं.) १ झटपट; भराभर. २ जलद; ताबडतोब.

**खटाना**–क्रि.अ. (सं.) आंबट होणें.

**खटाना**–क्रि.अ. (सं.) १ निर्वाह होणें; निभणें. ३ परीक्षेंत पूर्ण उतरणें.

**खटापट-खटापटी**–स्त्री. खटपट पहा.

**खटाल**–पु. समुद्राची उंच लाट.

**खटाव**–पु. (सं.) निर्वाह; गुजराण.

**खटाव**–पु. (दे.) नाव बांधण्याचा खुंटा.

**खटास**–स्त्री. (सं.) आंबटपणा.

**खटिक**–पु. (सं.) १ फळें भाजी इ. विकणारी जात. २ काची; भाजी, फळें इ. विकणारा.

**खटिया**–स्त्री. (सं.) लहान खाट.

**खटीक**–पु. खटिक पहा.

**खटेटी**–वि. (सं.) बिछान्या विरहित (खाट).

**खटोलना-खटोला**–पु. (सं.) खाट.

**खट्टा**–वि. (सं.) आंबट.

**खट्टा**–पु. (सं.) खाट.

**खट्टाचूक**–वि. आंबटढाण.

**खट्टामीठा**–वि. आंबटगोड.

**खट्टू**–पु. (सं.) कमाविणारा; पैसे मिळविणारा.

**खट्वा**–स्त्री. खाट.

**खड़कना**-क्रि.अ. (अनु.) १ खड-खड आवाज होणें. २ खटकना पहा.

**खड़का**-पु. खटका पहा.

**खड़खड़िया**-स्त्री. (अनु.) पालखी.

**खड़बड़**-स्त्री. (अनु.) १ खुडबुड; खडबड. २ फेरबदल; उलटापालट. खळबळ.

**खड़बड़ाना**-क्रि.अ. (अनु.) १ बावरणें; गोंधळून जाणें; घाबरणें. २ अस्ताव्यस्त होणें.

**खड़बिडा खड़बीहड**-वि. (अनु.) उंचसखल; खडबडीत,

**खडमंडल**-पु. (सं.) गड़बड; घोटाळा.

**खड़ा**-वि. (सं.) १ उभा. २ सिद्ध; तयार; तत्पर. ३ स्थिर; स्थित. ४ आरंभ; सुरुवात. ५ कच्चा.

**खड़ाऊं**-स्त्री. (सं.) खडावा. पादुका.

**खडाका**-पु. (अनु.) खडखडाट.

**खडिया**-स्त्री. (सं.) फक्की.

**खडी**-स्त्री. (सं.) १ खडु; चुन्याची फक्की. २ पहाड; डोंगर.

**खडुआ**-पु. कडें.

**खड्गरीट**-पु. (सं.) चामडयाची ढाल.

**खड्ड**-पु. (सं.) खड्डा.

**खड़ढा**-पु. (सं.) १ खड्डा. २ घट्टा.

**ख़त**-पु. (अ.) १ पत्र; चिठ्ठी. २ हस्ताक्षर. ३ रेघ. ४ दाढीचे केंस. ५ हजामत.

**खतखोट** स्त्री. (सं.) खपली.

**ख़तना**-पु. (अ.) सुंता.

**ख़तम**-वि. (अ.) समाप्त; पूर्ण.

**ख़तर-ख़तरा**-पु. (अ.) १ भय; धोका. २ आशंका; काळजी.

**ख़ता**-स्त्री. (अ.) १ चूक. २ अपराध; दोष. ३ धोका.

**ख़तावार**-वि. (अ.+फा.) दोषी; अपराधी.

**खति**-स्त्री. (सं.) नुकसान; हानि; क्षय.

**खतियाना**-क्रि.स. (अ.) खतावणी करणें; खात्यांत लिहिणें.

**खतियौनी**-स्त्री. (अ.) खतावणी.

**खत्ता**-पु. (सं.) १ खड्डा. २ धान्याचें कोठार.

**ख़त्म**-वि. खतम पहा.

**खदखदाना·खदबदाना**-क्रि.(अ.) खदखदणें.

**खदरा**-वि. (सं.) निकामी; रद्दी.

**खदरा**-पु. (सं.) खड्डा.

**ख़दशा**-पु. (अ.) भय; आशंका.

**खदान**-स्त्री. (सं.) खाण.

**खदुका**-पु. (सं.) ऋणको; कर्ज घेणारा.

**खदुहा**-पु. (सं.) लहान व्यापारी.

**खदेरना**-क्रि. (सं.) दूर करणें; हांकून लावणें.

**खद्दड़-खद्दर**-पु. खादी.

**खन**-पु. (सं.) १ क्षण. २ खण (भाग). ३ मजला. ४ खण (चोळीचा).

**खनक**-पु. (सं.) १ उंदीर. २ जमीन खणणारा. २ घरफोडी करणारा चोर. ४ सोन्याची खाण. ५ भूस्तर शास्त्रज्ञ.

**खनकना**-क्रि.अ. (अनु.) खणखणणें.

**खनखना**-पु. (अनु.) खणखणीत.

**खनना**-क्रि.स. (सं.) खणणें.

**खनहन**-वि. (सं.) १ क्षीण; कमजोर; दुबळा. २ सुंदर; मोहक.

**खपची**-स्त्री. (तु.) बांबूची कामटी.

**खपड़ा**-पु. (सं.) १ खापर. २ कौल. ३ कासवाची पाठ.

**खपड़ी**-स्त्री. (सं.) १ खापरी. २ मातीचा मोठा परळ.

**खपड़ैल-खपरैल**-स्त्री. (सं.) १ कौलार. २ कौल.

**खपत-खपती**-स्त्री. (सं.) १ खप; विक्री. २ समावेश.

**खपणें**-क्रि.अ. (सं.) १ खपणें; व्यय होणें. २ चालणें; निभणें. ३ नष्ट होणें; खरणें.

**खपरा**-पु. खपडा पहा.

**खपरैल**-स्त्री. (सं.) कौलार.

**खपाना**-क्रि.स. (सं.) खपविणें.

**खपुआ**-वि. (सं.) भित्रा; पळपुटा.

**खप्पड-खप्पर**-पु. (सं.) १ खापर. २ परळ. ३ भिक्षापात्र. ४ कौल. ५ डोक्याची कवटी.

**ख़फ़गी**-स्त्री. (फा.) रोष; नाराजी; अप्रसन्नता.

**ख़फ़ा**-वि. (फा.) १ खप्पा; नाराज. २ अप्रसन्न.

**ख़फ़ीफ़**-वि. (अ.) १ अल्प; कमी; थोडा. २ हलका; तुच्छ. ३ लज्जित; शरमिंदा.

**ख़बर**-स्त्री. (अ.) १ खबर; बातमी. २ माहिती. ३ निरोप. ४ शुद्ध; सावधपणा. ५ शोध; माग.

**ख़बरदार**-वि. (फा.) १ सावध; जागरूक.

**ख़बरदारी**-स्त्री. (फा.) सावधगिरी

**ख़बरी**-पु. (फा.) दूत.

**ख़बीस**-पु. (अ.) खवीस.

**ख़ब्त**-पु. (अ.) पागलपणा; वेडाची लहर.

**ख़ब्ती**-वि. (अ.) विक्षिप्त; वेडा.

**खब्बा**-वि. १ डावरा. २ डावा.

**खब्बड़**-वि. (अ.) जख्ख म्हातारा.

**खमरना**-क्रि.स. (सं.) १ मिसळणें. २ गोंधळ माजविणें.

**खमरूआ**-वि. वेश्येचा मुलगा.

**ख़म**-पु. (अ.) १ वांकडेपणा; झुकाव. २ दंड; बाहू.

**ख़मदम**-पु. (फा.) पुरुषार्थ; पराक्रम.

**ख़मस्त**-पु. (अ.) पांच श्लोकांचें कडवें.

**ख़मीर**-पु. (अ.) १ आंबवलेली कणीक. २ गरे,अननस इ. आंबवून काढलेलें पाणी. ३ प्रकृति; स्वभाव.

**खमोश**-वि. खामोश पहा.

**खय**-पु. (सं.) क्षय.

**ख़यानत**-स्त्री. (अ.) १ दुसऱ्याच्या ठेवीची अफरातफर. २ अप्रामाणिकपणा; बेईमानी.

**ख़याल**-पु. (अ.) ख्याल पहा.

**खर**-वि. (सं.) १ कडवा; कडक २ तीक्ष्ण. ३ अमंगल; अशुभ. ४ आडवा.

**खरंजा**-पु. (दे.) खंगर; वीट.

**खरक**-पु. (सं.) १ रानांतील गोठा. २ कुरण. ३ बांबूच्या कामट्यांचें दार; कुडाचें दार.

**खरकना**-क्रि.अ. (अनु.) १ ठुसठुसणें; दुखणें. २ निसटणें; सटकणें; पाय काढणें.

**खरका**-पु. १ काडी. २ खरक पहा.

**खरखरा**-वि. खुरखुरा पहा.

**ख़रख़शा**-पु. (फा.) १ भांडण; बखेडा. २ आशंका; भीति.

**खरगोश**-पु. (फा.) ससा.

**खरचना**-क्रिस. (फा.) खर्चणें.

**खरचा**-पु. (फा.) खर्च.

**खरतल**-वि. १ स्पष्टवक्ता. २ साफ; स्पष्ट. ३ निर्भीड; निःसंकोची. ४ उग्र; प्रचंड.

**खरधार**-पु. (सं.) तीक्ष्ण धारेचें शस्त्र.

**खरब**-पु. (सं.) खर्व.

**ख़रबूजा**-पु. (फा.) खरबूज.

**ख़रभर**-पु. (अनु.) १ खळबळ. २ गलबला.

**खरमस्ती**-स्त्री. (फा.) पाजीपणा; दुष्टपणा.

**खरमिटाव**-पु. जलपान पहा.

**खरल**-पु. (सं.) औषधें कुटण्याचा खल.

**खरवाँस**-पु. (सं) चैत्र व पौष मास.

**खरसा**-पु. (सं.) एक पक्कान्न.

**खरसान**-स्त्री. (सं.) हत्यारांना धार लावण्याचा दगड.

**खरहरा**-पु.(अनु.)१खराटा. २खरारा.
**खरहा**-पु. (सं.) ससा.
**खरही**-स्त्री. रास; ढीग.
**खरा**-वि. (सं.) १ तीक्ष्ण; तीक्ष्ण धारेचा. २ शुद्ध. ३ उत्तम; चांगला. ४ खरपूस. ५ सत्य; वास्तविक. ६ रोख; नगद.
**खराई**-स्त्री. (सं.) खरेपणा.
**खराई**-स्त्री. (दे.) सकाळ पासून कांहींही खावयास न मिळाल्यानें होणारी कासाविशी.
**ख़राद**-पु (अ.) लेथ; कातण्याचें यंत्र.
**खरादी**-पु. (अ.) कातारी.
**खरापन**-पु. १ (सं.) खरेपणा. २ उन्मत्तता.
**ख़राब**-वि. (अ.) १ खराब; वाईट. २ निकृष्ट. ३ हलकट; पतित.
**खराबी**-स्त्री. (अ.) १ खराबी; नासाडी. २ दुर्दशा. ३ दोष; अवगुण.
**खरिया**-स्त्री. (सं.) १ बारीक दोरीचें जाळें. २ पिशवी. ३ खड्डु.
**खरिया**-स्त्री. (दे.) गोवरीची राख.
**खरिहान**-पु. (सं.) खळें.
**ख़रीता**-पु. (अ.) १ थैली; पैशाची पिशवी. २ खिसा. ३ खलिता; लखोटा.

**ख़रीद**-स्त्री. (फा.) खरेदी.
**ख़रीदना**-क्रि स. (फा.) खरीदणें.
**खरीददार**-पु. (फा.) गिऱ्हाईक.
**खरेरा**-पु. खरहरा पहा.
**खरोंच**-स्त्री. (सं.) १ ओरखडा. २ अळुवडी.
**खरोंचना**-क्रि.स. (सं.) ओरखडणें.
**खरोट**-पु खरोंच पहा.
**खरोंटना**-क्रि.स.(सं.)खरोंचना पहा
**खरौंट**-स्त्री. (सं.) ओरखडा.
**खरौंहा**-वि. (सं.) किंचित खारट.
**ख़र्च-खर्चा**-पु. (फा.) खर्च.
**खर्चीला**-वि. (फा.) खर्चिक; उधळया.
**खर्रा**-पु. (अनु.) खर्डा.
**खर्राटा**-पु. (अनु.) घोरणें.
**खलई**-स्त्री. (सं.) दुष्टावा; खलता.
**खलता**-स्त्री. (सं.) खलई पहा.
**खलता**-पु. (हिं.) (शिपायाची सामान ठेवण्याची) पिशवी; थैली; झोळी.
**खलना**-क्रि.अ. (सं.) मनाला लागणें; वाईट वाटणें.
**खलबल**-स्त्री. (अनु.) खळबळ; हालचाल.
**खलबलाना**-क्रि.अ. (अनु.) खळबळणें; उकळणें.

**खलबली**-स्त्री. (अनु.) खळबळ.

**ख़लल**-पु. (अ.) अडथळा; अडकाठी; बाधा.

**खलाई**-स्त्री. खलई पहा.

**खलाना**-क्रि.स. (अ.) १ उपसणें; रिकामें करणें. २ खड्डा करणें ३ आंत दाबणें.

**खलार**-वि. खोल.

**खलाल**-पु. (अ.) दांत कोरणें.

**ख़लास**-वि. (अ.) १ खलास; समाप्त. २ सुटलेला; मुक्त.

**खलासी**-स्त्री. (अ.) सुटका; मुक्तता.

**खलासी**-पु. (उर्दू.) खलाशी.

**खलित**-वि. (सं.) १ स्खलित. २ पडलेला; पतित.

**खलिन**-पु. (सं.) घोड्याचा लगाम.

**खलियान**-पु. (सं.) १ खळें. २ राशि; ढेर.

**खलियाना**-क्रि. (सं.) १ कातडें सोलणें. २ रिकामें करणें; खाली करणें.

**ख़लिश**-स्त्री. (फा.) १ ठुसठुस; ठणका. २ टोंचणी. ३ दुःख; क्लेश. ४ चिंता; भीति.

**खलिहान**-पु. खलियान पहा.

**खली**-स्त्री. (सं.) पेंड.

**ख़लीक़**-वि. (अ.) १ सुस्वभावी; सुशील. २ मनमिळाऊ.

**ख़लीज**-स्त्री. (अ.) अखात.

**ख़लीफ़ा**-पु. (अ.) १ खलीफा; वारस. २ अधिकारी. ३ न्हावी. ४ वयोवृद्ध व्यक्ति. ५ आचारी.

**खलड़**-पु. (सं.) १ चामड्याची थैली. २ औषधी कुटण्याचा खल. ३ चामडें. ४ कातडी सुरकुतलेला वृद्ध मनुष्य.

**खल्ला**-पु. (सं.) १ जोडा; पायतण. २ खळें.

**खल्ली**-पु. (सं.) आंकडीचा रोग.

**खल्वाट**-पु. (सं.) टक्कल.

**खल्वाट**-वि. (सं.) टकल्या.

**खवा**-पु. (सं.) खांदा.

**खवाना**-क्रि स. (सं) खावविणें; जेवावयास घालणें.

**ख़वास**-पु. (अ.) शागिर्द; हुजऱ्या.

**ख़वासी**-स्त्री. (अ.) चाकरी.

**खवैया**-पु. (सं.) १ खाणारा. २ खादाड.

**ख़स**-पु. (फा.) खस; वाळा.

**खसकना**-क्रि.अ. (अनु.) निसटणें; सटकणें.

**खसकाना**-क्रि.स. (अनु) १ हटविणें; हलविणें; सरकविणें. २ हळूच पळविणें; लांबविणें.

**खसखसा**-वि. (अनु.) भुरभुरीत.

**ख़सख़ाना**-पु. (फा.) वाळयाचे पडदे लावलेली खोली.

**खसखास**-स्त्री. (सं.) खसखस.

**ख़सम**-पु. (अ.) १ पति. २ स्वामी मालक.

**ख़सरा**-पु. (अ.) १ शेताचें नोंदणी बुक. २ कच्च्या जमाखर्चाची वही.

**खसलत**-स्त्री. (अ.) १ स्वभाव; प्रकृति. २ संवय.

**खसाना**-क्रि.स. (अनु.) खाली ओढणें किंवा ढकलणें.

**खसिया**-वि. (अ.) १ खच्ची केलेला. २ नपुंसक; हिजड़ा.

**खसियाना**-क्रि. (अ.) खच्ची करणें.

**खसीस** वि. (अ.) कंजूष.

**खसोट-खसोटी**-स्त्री. (सं.) १ ओढाताण; झोंबाझोंबी. २ उपटून काढणें. ३ ओरबाडणें.

**खसोटना**-क्रि.सं. (सं.) १ हिसकावणें; बुचाडणें. २ उपटणें; उखडणें.

**खस्ता**-वि. (फा.) भुरभुरीत.

**खस्सी**-पु. (अ.) बकरा.

**खस्सी**-वि खसिया पहा.

**खाँ**-पु. खान पहा.

**खाँई**-स्त्री. खाई पहा.

**खाँख**-स्त्री. (सं.) भोंक.

**खाँखर**-वि. (सं.) १ भोकाभोकांचें २ जाळीदार. ३ पोकळ.

**खाँग**-पु. (सं.) १ कांटा. २ सुळा; दांत. ३ न्यूनता; कमतरता.

**खाँगड़-खाँगड़ा**-वि. (सं.) १ अणकुचीदार; सुळेदार. २ शस्त्रधारी; सशस्त्र. ३ बलवान. ४ उद्धट.

**खाँगना**-क्रि.अ. (सं.) १ खंगणें; कमी होणें. २ लंगडणें

**खाँगी**-स्त्री. (सं.) कमतरता; त्रुटि.

**खाँच**-पु. (सं.) १ खांच; जोड; सांधा. २ रेघोटी. ३ जडण काम.

**खाँचना**-क्रि स. (सं.) १ चिन्हित करणें. २ खरडणें; भराभर लिहिणें. ४ कोरणें. ४ टोपली इ. विणणें.

**खाँचा**-पु. (सं.) १ हारा; मोठी टोपली. २ मोठा पिंजरा.

**खाँड़**-स्त्री. (सं.) स्वच्छ न केलेली साखर.

**खाँडविक**-पु. (सं.) मिठाई बनविणारा; हलवाई.

**खाँडा**-पु. (सं.) १ शस्त्र. २ भाग; तुकडा; अंश, विशेषतः चतुर्थांश.

**खांडिक**-पु. खांडविक पहा.

**खाँभ**-पु. (सं.) खांब.

**खाँभ**-पु. (हिं.) लिफाफा.

**खाँभना**-क्रि.स. (हिं.) लिफाफ्यांत बंद करणें.

**खाँभाँ**-पु. (सं.) रुंद मोठा खंदक.

**खाँसना**-क्रि.अ. (सं.) खोकणें.

**खाँसी**-स्त्री. (सं.) खोकला.

**खाई**-स्त्री. (सं.) खंदक.

**खाऊ**-वि. (सं.) खादाड.

**ख़ाक**-स्त्री. (फा.) १ धूळ; माती. २ राख; भस्म. ३ तुच्छ. ४ कांहीं नाहीं.

**ख़ाकतरोप**-पु. (फा.) रस्ते झाडणारा; झाडूवाला.

**खाका**-पु. (फा.) १ आराखडा; रूपरेषा; कच्चा नकाशा. २ कच्चा मसूदा. ३ खर्चाचें अंदाज पत्रक. ४ कच्ची यादी.

**खाकी**-वि. (फा.) १ फाकी; भुरा. २ पडीक जमीन.

**खाख** स्त्री. खाक पहा.

**खाग**-स्त्री. खाँग पहा.

**खागना**-क्रि. (अ.) चुभना पहा; खाँगना पहा.

**खाज**-स्त्री. (सं.) खरूज.

**खाजा**-पु. (सं.) १ खाद्य पदार्थ. २ एक मिठाई.

**खाड़ी**-स्त्री. आखात.

**खाता**-पु. (सं.) १ खोदाई. २ तलाव. ३ विहीर. ४ खड्डा. ५ खताचा खड्डा.

**खाता**-वि. (सं.) मलीन; घाणेरडा.

**ख़ातमा**-पु. (फा.) १ अंत; समाप्ति. २ मृत्यु.

**खाता**-पु. (सं.) धान्य ठेवण्याचा खड्डा; वखार.

**खाता**-पु. १ खाते वही. २ खातें.

**ख़ातिर**-स्त्री. (अर.) आदर; सन्मान.

**ख़ातिर**-अव्य. (अर.) साठीं; करितां; खातर.

**ख़ातिरख्वाह**-क्रिवि. (अ.) मनपसंत; मनाजोग।.

**ख़ातिरजमा**-स्त्री. (अर.) समाधान; खात्री.

**ख़ातिरदारी**-स्त्री. (फा.) आदरातिथ्य.

**खातिरी**-स्त्री. (अ.) १ आदरातिथ्य. २ सांत्वन.

**ख़ातून**-स्त्री. (पु.) १ विदुषी. २ सभ्य स्त्री.

**खाद**-स्त्री. (सं.) खत; राब.

**खादर**-पु. खाचर।

**ख़ादिम**-पु. (अ.) चाकर; सेवक.

**खादी**-वि. (सं.) १ खाणारा; भक्षक. २ रक्षक. ३ कांटेरी.

**खादी**-वि. १ छिद्रान्वेषी. २ सदोष.

**खादी**-स्त्री. (दे.) खादी.

**खादुक**-वि. (सं.) हिंसक.

**खान**-पु. (सं.) १ जेवणखाण. २ भोजनसामग्री. ३ जेवण्याची पद्धत.

**खान**-स्त्री. (सं.) खाण.

**खान**-पु. (मोंगल तार्तर) १ सरदार; उमराव. २ पठाणांची उपाधि.

**ख़ानक़नाह**-स्त्री. (फा.) मठ; विहार. (मुसलमानी).

**खानगी**-वि. (फा.) खाजगी; घरगुती.

**खानगी**-स्त्री. (फा.) वेश्या; नायकीण.

**खाना**-क्रि.स. (सं.) १ खाणें; जेवणें. २ गिळणें; गट्ट करणें. ३ सोसणें.

**खाना**-पु. (फा.) १ घर; स्थान. २ कप्पा; खण. ३ रकाना; कोष्टक. ४ घराचा भाग.

**खाना**-पु. (सं.) भोजन.

**खानाखराब**-वि. (फा.) १ घरबुडव्या. २ फटिंग; भटक्या.

**खानातलाशी**-स्त्री. (फा.) घराची झडती.

**खानाबदोश**-वि. (फा.) घरदार नसलेला.

**खानि**-स्त्री..(सं.) १ खाण. २ दिशा; बाजू. ३ तऱ्हा; प्रकार.

**खापट**-स्त्री. चिकणमाती.

**खापर**-स्त्री. १ खापट पहा. २ उंच सखल जमीन.

**खाम**-पु.स्त्री. (हिं.) १ लिफाफा. २ संधि; जोड.

**खाम**-पु. (रा.) खांब.

**खाम**-वि. (सं.) क्षीण होत चाललेला.

**ख़ाम**-वि. (सं.) १ कच्चा; अपरिपक्व. २ वाईट. ३ अननुभवी.

**ख़ामख़्याली**-स्त्री. (फा.) निरर्थक विचार.

**खामखाह खामखाही**-क्रि. (वि.) ख्वाहमख्वाह पहा.

**खामना**-क्रि स. (सं.) १ मातीनें अथवा कणकेनें एखाद्या भांड्याचें तोंड लिंपणें. २ लिफाफ्यांत पत्र बंद करणें.

**ख़ामी**-स्त्री. (फा.) १ कच्चेपणा. २ अननुभवीपणा. ३ अपूर्णता.

**ख़ामोश**-वि. (फा.) चूप; गप्प; शांत.

**ख़ामोशी**-स्त्री. (फा.) स्तब्धता; शांतता; मौन.

**खार**-पुं. (सं.) क्षार; खार.

**ख़ार**-पु. (फा.) १ कांटा. २ असूया; द्वेष.

**खारा**-वि. (सं.) १ खारट; खारा. २ कडसर; अरुचिकर.

**खारा**-पु. (सं.) एक प्रकारचें कापड.

**खारा**-स्त्री. (सं.) १ आंबे उतरण्याचें जाळें. २ मोठा हारा. ३ कळकाचा मोठा पिंजरा.

**ख़ारिज**-वि. (अ.) १ बहिष्कृत. २ २ भिन्न; अलग. ३ अश्रुतपूर्व.

**खारिश**-स्त्री. (फा.) खाज; कंड.

**खारूआँ-खारूवाँ**-पु. (फा.) १ तांबडा भडक रंग. २ तांबडया भडक रंगाचें कापड.

**खाल**-स्त्री. (सं.) १ कातडें; त्वचा; २ भाता. ३ मृतदेह. ४ खोलगट सखल जमीन. ५ आखात. ६ अंतर; अवकाश. ७ खोलपणा.

**खालसा**-वि. (अ.) १ ज्याच्यावर एकाचाच अधिकार आहे असा. २ सरकारी.

**खाला**-वि. (सं.) १ खोलगट; सखल. २ निम्न.

**खाला**-स्त्री. (अ.) मवशी.

**ख़ालिस**-वि. (अ.) विशुद्ध; निर्मळ; पवित्र.

**ख़ाली**-वि. (अ.) १ रिकामा; रिता; मोकळा; खाली. २ वृथा; वाया. ३ निरुपयोगी. ४ वापरांत नसलेली (वस्तु). ५ रहित; विहित; वांचून.

**खाली**-क्रिवि. (फा.) केवळ.

**खाविंद**-पु. (फा.) १ पति. २ स्वामी; मालक.

**ख़ास**-वि. (अ) १ विशेष. २ खाजगी; स्वतःचा. ३ स्वतः खुद्द. ४ विशुद्ध.

**ख़ासकलम**-पु. (अ.) प्रायव्हेट सेक्रेटरी.

**ख़ासगी**-वि. (अ.) खाजगी.

**ख़ासबरदार**-पु. (फा.) भालदार-चोपदार.

**ख़ासा**-वि. (अ.) १ उत्तम; चांगला. २ निकोप; निरोगी. ३ सुंदर; सुरेख; ४ भरपूर.

**खासा**-पु. (अ.) १ खाशा स्वारीचें भोजन. २ राजाच्या स्वारीचा घोडा वा हत्ती.

**खासियत**-स्त्री. (अ.) १ स्वभाव; प्रकृति. २ वैशिष्ट्य. ३ संवय ४ गुणधर्म.

**खासी**-वि. (स्त्री.) खासाचें स्त्रीलिंगी रूप.

**खास्सा**-पु. (अ.) स्वभाव; प्रकृति.

**खिंचना**-क्रि.अ. (सं.) ओढलें जाणें; ताणलें जाणें.

**खिंचवाना**-क्रि.स. (सं.) ओढविणें; ताणविणें.

**खिंचाई**-स्त्री. (सं.) १ ओढाताण; २ ओढण्याची मजूरी. ३ खेंचण्याची क्रिया.

**खिंचाव**-पु. (सं.) ताण.

**खिंडाना**-क्रि.स. (सं.) इतस्ततः विखुरणें.

**खिचडवार**-पु. (सं.) मकर संक्रांत.

**खिजमत**-स्त्री. खिदमत पहा.

**खिजलाना**-क्रि.अ. (सं.) चिडणें.

**खिजलाना**-क्रि स. (सं.) चिडविणें.

**खिजाँ**-स्त्री. (फा.) १ हेमंत ऋतु. २ पडता काळ.

**खिजाब**-पु. (अ.) कलप.

**खिझना**-क्रि.अ. (सं.) चिडणें.

**खिझाना**-क्रि.स (सं.) चिडविणें; खिजविणें.

**खिझुवर**-वि. (सं.) चिडका.

**खिड़कना**-क्रि. (अ.) सटकणें; निसटून जाणें.

**खिडकाना**-क्रि. (सं.) १ अलग करणें. २ विकून टाकणें.

**खि़ताब**-पु. (अ.) पदवी; किताब.

**खि़ताबी**-वि. (अ.) पदवीधर.

**खि़त्ता**-पु. (अ.) प्रांत; देश.

**खि़दमत**-स्त्री. (फा.) चाकरी; सेवा.

**खि़दमतगार**-पु. (फा.) चाकर; सेवक.

**खिदमती**-वि. (फा.) १ कष्टाळू; सेवक. २ चाकरीचा मोबदला.

**खिन**-पु. (सं.) क्षण.

**खिपना**-क्रि.अ. (सं.) १ खपणें. २ तल्लीन होणें.

**खियाना**-क्रि.अ. (सं.) झिजणें.

**खि़राज**-पु. (अ.) कर; खंडणी.

**खि़लअत**-स्त्री. (फा.) मानाचीं वस्त्रें.

**खिलक़त**-स्त्री. (अ.) १ सृष्टि; जग. २ जनसमूह; गर्दी.

**खिलखिलाना**-क्रि.अ. (अनु.) खिदळणें.

**खिलत-खिलात**-स्त्री. खिलअत पहा.

**खिलना**-क्रि.अ. (सं.) १ विकसणें; खुलणें; फुलणें. २ प्रमुदित होणें. ३ शोभित होणें. ४ फट पडणें. ५ फुटणें; वेगळें वेगळें होणें; अलग अलग होणें.

**खि़लवत**-स्त्री. (अ.) १ एकांत. २ निर्जन प्रदेश.

**खिलवतखाना**-पु. (फा.) गुप्त मसलतीचें एकांत स्थान.

**खिलवाड-खेलवाड**-पु. (सं.) खेळ; मौज.

**खिलवाना**-क्रि स. (सं.) खाऊ घालणें.

**खिलवाना**–क्रि.स. (सं.) खुलविणें.

**खिलाई**–स्त्री. (सं.) १ खाणें; खाण्याचें काम. २ पाजणारी दाई.

**खिलाड़–खिलाड़ी**–पु. (सं.) १ खेळाडू. २ डोंबारी; जादूगार; कसरत्या.

**खिलाना**–क्रि.स. (सं.) खेळणें.

**खिलाना**–क्रि.स. (सं.) खाऊ घालणें.

**खिलाफ़**–वि. (अ.) विरुद्ध; प्रतिकूल; उलट; विपरित.

**खिलौना**–पु. (सं.) खेळणें. (बाहुली वगैरे)

**खिल्त**–पु. (अ.) कफ.

**खिल्ली**–स्त्री. (सं.) १ थट्टाविनोद; हंशा. २ विडा; खिळा; कांटा.

**खिल्लो**–वि स्त्री. (सं.) हंसरी.

**खिसकना-खिसकाना**–क्रि. (अ.) खसकना पहा.

**खिसलाना**–क्रि. अ. फिसलना पहा.

**खिसलाव**–पु. १ घसरणें. २ घसरडें.

**खिसलाहट**–स्त्री. (सं.) घसरणें.

**खिसाना--खिसिआना**–क्रि. अ. (सं.) १ लाजणें; शरमणें. २ रागावणें.

**खिसारा**–पु. (फा.) तोटा; नुकसान.

**खिसिआहट**–स्त्री. (सं.) लज्जा; शरम.

**खिसी**–स्त्री. (सं.) १ लज्जा; शरम. २ धृष्टता.

**खींच**–स्त्री. (सं.) ओढाताण; तणाव.

**खींचतान**–स्त्री. (सं.) ओढाताण; खेंचाखेंची.

**खींचना**–क्रि स. (सं.) १ खेंचणें; ओढणें; ताणणें. २ शोषून घेणें. ३ (अर्क वगैरे) गाळणें. ४ चित्र वगैरे रेखाटणें.

**खींचाखींची--खींचतान-खींचतानी**–स्त्री. खींचतान पहा.

**खीखर**–पु. (दे) रान मांजर.

**खीज**–स्त्री. (सं.) १ चीड; त्रागा. २ चीड आणणारी गोष्ट.

**खीजना**–क्रि.अ. (सं.) चिडणें; रागावणें.

**खीझ**–स्त्री. खीज पहा.

**खीन**–वि. (सं.) क्षीण.

**खीमा**–पु. खेमा पहा.

**खीरा**–पु. (सं.) खिरे; काकडी.

**खीरी**–स्त्री. (सं.) दुभत्या जनावराची कास.

**खील**–स्त्री. (सं.) १ लाही. २ खीळ; कांटा; खिळा. ३ चामखीळ. ४ चमकी.

**खीला**-पु. (सं.) १ खिळा. २ कांटा. ३ मेख.

**खीली**-स्त्री. ( सं. ) विडा.

**खीवन-खीवनी**-स्त्री. ( सं. ) मस्ती; रग.

**खीवर**-पु. (सं.) शूर; वीर.

**खीस**-वि. (सं.) नष्ट; नाश पावलेलें.

**खीस**-स्त्री. (सं.) १ अप्रसन्नता २ क्रोध; राग. ३ लज्जा; शरम. ४ ओठाबाहेर आलेले दांत.

**खीस**-स्त्री. (फा.) नुकसान; तोटा.

**खीस**-स्त्री. (दे.) चीक (खरवसाचा).

**खीसा**-पु. (फा.) १ खिसा २ पिशवी; थैली.

**खुँटकढ़वा**-पु. (सं.) कानांतील मळ काढणारा.

**खुँटफारी**-वि. दुष्ट व उनाड मूल.

**खुँटीहई**-स्त्री. (?) गुढग्यापर्यंत धोतर नेसण्याची पद्धति.

**खुँडला**-पु. (सं.) मोडकें तोडकें घर; लहान झोंपडी.

**खुआर**-वि. (फा.) १ दुर्दशा ग्रस्त; आपन्न. २ अप्रतिष्ठित; बेइज्जती. ३ अपमानित.

**खुआरी**-स्त्री. (फा.) १ नाश. २ अनादर; अप्रतिष्ठा.

**खुक्ख**-वि. (फा.) १ कफल्लक. २ मोकळा; रिकामा.

**खुखड़ी-खुखुड़ी**-स्त्री. (सं.) १ चातीवरील सुताचा गुंडा. २ नेपाळी सुरी.

**खुगीर**-पु. (फा.) खोगीर.

**खुचर-खुचुर**-स्त्री. (सं.) खुसपट काढणें; व्यर्थ दोष काढणें.

**खुजलाना**-क्रि. स. (सं.) खाजविणें.

**खुजलाहट**-स्त्री. कंड; खाज.

**खुजली**-स्त्री. (सं.) १ खाज. २ खरूज.

**खुजवाना**-क्रि. ( स. ) खोजवाना पहा.

**खुजाना**-क्रि. (सं.) खुजलाना पहा.

**खुटक**-स्त्री. (अनु.) १ संदेह; शंका; चिंता; काळजी; खटका.

**खुटकना**-क्रि.स. ( सं. ) खुडणें; तोडणें.

**खुटका**-पु. (अनु.) १ बोल्ट. २ भीति; आशंका; खटका.

**खुटना**-क्रि अ. (सं.) १ खुलणें; विकसणें. २ वेगळें होणें; अलग होणें ३ समाप्त होणें.

**खुटपन-खुटपना**-पु. ( सं. ) १ खोटेपणा. २ दोष; अवगूण.

**खुटाई**-स्त्री. (सं.) खोटेपणा.

**खुटाना**-क्रि.अ. (सं.) संपणें; खलास होणें.

**खुट्टी**-स्त्री. (अनु.) रेवडी.

**खुट्ठी**-स्त्री. (?) जखमेवरील खपली.

**खुड्डी-खुड्डी**-स्त्री. (सं.) १ शौचकूपांतील पाय ठेवण्याचे दगड. २ शौचविधीकरितां केलेला खड्डा.

**खुतका**-पु. कुतका पहा.

**खुतबा**-पु. (फा.) १ प्रशंसा; तारीफ. २ प्रवचन. ३ राजाची स्तुति करून गादीवर आल्याची घोषणा.

**खुत्थी, खुथी**-पु. (फा.) १ पिकें कापल्यानंतर जमीनींत राहिलेले खुंट. २ अमानत. ३ कसा. ४ धनदौलत; संपत्ति.

**खुद**-अव्य. (फा.) खुद; स्वतः.

**खुदका**-पु. कुतका पहा.

**खुदकुशी**-स्त्री. (फा.) आत्महत्या.

**खुदगरज**-वि. (फा.) आपमतलबी; स्वार्थी.

**खुदगरजी**-स्त्री. (फा) आपमतलबीपणा.

**खुदमुखतार**-वि. (फा.) स्वतंत्र; स्वमताप्रमाणें वागण्यास मोकळा.

**खुदमुखतारी**-स्त्री. (फा.) स्वतंत्रता.

**खुदरा**-पु. (सं.) किरकोळ वस्तु; फुटकळ वस्तू.

**खुदराई**-स्त्री. (फा.) स्वेच्छाचार.

**खुदवाई**-स्त्री. (सं.) खणण्याचें काम.

**खुदवाना**-क्रि.स. (सं.) खणविणें.

**खुदा**-पु. (फा.) स्वयंभू; ईश्वर.

**खुदाई**-स्त्री. (फा.) ईश्वरता.

**खुदाई**-स्त्री. (सं.) खोदाई.

**खुदाई**-वि. (फ़ा.) ईश्वरी; दैवी.

**खुदाताला**-पु. (फा.) परमात्मा; ईश्वर.

**खुदादाद**-वि. (फा.) ईश्वरदत्त.

**खुदावंद**-पु. (फा.) १ अन्नदाता; मालक. २ श्रीमान्; साहेब (सन्मान सूचक शब्द.).

**खुदी**-स्त्री. (फा.) अहंकार; घमेंड; मीपणा.

**खुदूदी**-स्त्री. (सं.) तांदूळ, डाळ इ.च्या कण्या. २ उसाच्या रसांतील गाळ.

**खुनकी**-स्त्री. (फा.) १ सर्दी. २ गारठा.

**खुनखुना**-पु. (अनु.) लहान मुलांचें एक खेळणें. (खुळखुळा).

**खुनस**-स्त्री. (सं.) क्रोध; राग.

**खुनसी**-वि. (सं.) खुनशी; रागीट.

**खुफिया**-वि. (फा.) गुप्त.

**खुंभना**-क्रि.स. (अनु.) घुसणें; रुतणें.

**खुभी**-स्त्री. (अनु.) कानांत घालावयाची लवंग.

**खुमरा**-पु. (अ.) भीक मागणारा फकीर.

**खुमार-खुमारी**-स्त्री. (अ.) १ कैफ; नशा; मद. २ नशेमुळें आलेला थकवा. ३ जागरणानें आलेला थकवा.

**खुरंट-खुरंड**-पु. (सं.) जखमेवरील खपली.

**खुरक**-स्त्री. (ध्व.) खटका; काळजी.

**खुरखुर**-स्त्री. (अनु.) कफामुळें लागलेली घरघर.

**खुरखुरा**-वि. (अनु.) १ खरखरीत. २ खडबडीत.

**खुरखुराहट**-स्त्री. (अनु.) १ घशांतील घरघर. २ खरबरीतपणा.

**खुरचन**-स्त्री. (सं.) १ खरवड. २ खरवडून काढलेली गोष्ट.

**खुरचना**-क्रि.अ. (सं.) खरवडणें; खरडणें.

**खुरचाल**-स्त्री. पाजीपणा; हलकटपणा

**खुरचाली**-वि. पाजी; बदमाष.

**खुरजी**-स्त्री. (फा.) मोठी थैली; पडशी.

**खुरदाँय**-पुं. (सं.+फा.) मळणी.

**खुरपा**-पु. (सं.) खुरपें.

**खुरमा-खुर्मा**-पु. (अ.) १ खारीक. २ एक पक्वान्न.

**खुरहर**-स्त्री. (सं.) पाऊल वाट.

**खराक**-स्त्री. (सं.) १ भोजन; खाणें. २ खाण्याचें प्रमाण. ३ चंदी.

**खुराकी**-स्त्री. (फा.) जेवणखाणासाठीं दिलेला पैसा.

**खुराकी**-वि. (फा.) खादाड.

**खुराफ़ात**-स्त्री. (अ.) १ वायफळ वडवड. २ शिवीगाळ. ३ झगडा; तंटाबखेडा. ४ कुचाली; कुरापत.

**खुर्द**-वि. (फा.) लहान.

**खुर्दबीन**-स्त्री. (फा.) सूक्ष्मदर्शक यंत्र.

**खुर्दबुर्द**-क्रिवि. (फा.) १ नष्ट; भ्रष्ट. २ समाप्त.

**खुर्दा**-पु. (फा.) लहान मोठ्या वस्तू.

**खुर्दाफ़रोश**-पु. (फा.) लहान मोठ्या फुटकळ वस्तू विकणारा.

**खुर्राट**-वि. (दे.) १ वृद्ध. २ अनुभविक. ३ धूर्त.

**खुरांटा**-पु. खर्राटा पहा.

**खुलना**-क्रि.अ. (सं.) १ उघडणें; खुलणें. २ सुटणें. ३ उघडकीस येणें. सुरुवात होणें. ५ उकलणें; फाटणें.

**खुलवाना**-क्रि.स. (सं.) उघडविणें.

**खुलासा**-पु. (अ.) सारांश; संक्षेप.

**खुलासा**-वि. १ मोकळा. २ स्पष्ट. ३ सारांश रूप.

**खुलूस**-पु. (अ.) १ पावित्र्य. २ सरळपणा. ३ निष्ठा.

**खुल्क**-पु (अ.) सौजन्य.

**खुल्लमखुल्ला**-क्रिवि. (सं.) उघड-उघड.

**खुश**-वि. (फा.) १ खूष; प्रसन्न. २ उत्तम; चांगला.

**खुशकिस्मत**-वि. (फा.) भाग्यवान.

**खुशख़त**-वि. (फा.) १ चांगल्या तऱ्हेनें लिहिलेलें पत्र. २ सुंदर अक्षर लिहिणारा.

**खुशख़बरी**-स्त्री. (फा.) सुवार्ता.

**खुशदिल**-वि. (फा.) १ आनंदी; प्रसन्न चित्त. २ विनोदी; मस्कऱ्या.

**खुशनुमा**-वि. (फा.) सुंदर; मनोहर;

**खुशबू**-स्त्री. (फा.) सुवास; सुगंध.

**खुशहाल**-वि. (फा.) सुखी; संपन्न.

**खुशामद**-स्त्री. (फा) खुशामत.

**खुशियाली**-स्त्री. (धा.) १ आनंद; प्रसन्नता. २ कुशल; क्षेम; खुशाली.

**खुशी**-स्त्री. (फा.) प्रसन्नता; आनंद; खुशी.

**खुश्क**-वि. (फा.) १ शुष्क; कोरडा. २ अरसिक. ३ कफल्लक.

**खुश्कसाली**-स्त्री. (फा.) अनावृष्टि.

**खुश्की**-स्त्री. (फा.) १ रुक्षपणा; नीरसता. २ जमीन; भूमी (खुश्कीचा मार्ग). ३ सारण. ४ आवर्षण.

**खुशाल-खुश्याल**-वि. (फा.) आनंदी; खुष.

**खुसुरफुसुर**-स्त्री. (अनु.) कानगोष्ट; कुजबुज.

**खूँखार**-वि. (फा.) १ क्रूर; भयंकर. २ रक्तपिपासु. ३ निर्दय; क्रूर.

**खूँट**-पु. (सं) १ कोपरा; कोना; टोंक. २ कोनशीला. ३ बाजू; दिशा. ४ भाग; हिस्सा.

**खूँट**-स्त्री. (सं.) एक कानांतील दागिना.

**खूँट**-स्त्री. (सं.) चौकशी; विचारपूस.

**खूँट**-पु. (?) कानांतील मळ.

**खूँटना**-क्रि.स. (सं.) १ विचारपूस करणें; छेडणें. २ घटणें.

**खूँटा**-पु. (सं.) खुंटा

**खूँटी**-स्त्री. (सं.) १ खुंटी. २ ज्वारी वगैरेचे कापणीनंतर शेतांत राहिलेले खुंट. ३ विट्टी. ४ सीमा; हद्द.

**खूँद**-स्त्री. (सं.) घोड्याचें एकाच जागेवर नाचणें, पाय आपटणें.

**खूँदना**-क्रि.अ. (सं.) १ नाचणें; पाय आपटणें. २ पायांनी तुडविणें. ३ मळणें; तिंबणें.

**खूटना**-क्रि.अ. (सं.) १ खुंटणें; बंद होणें. २ संपणें; कमी होणें.

**खूद-खूदह-खूदर**-पु.(सं.) तळचा गाळ; गाळ.

**खून**-पु. (फा.) १ रक्त; रुधिर. २ खून.

**खूब**-वि. (फा.) चांगला; उत्तम; उमदा.

**खूब**-क्रिवि. (फा.) चांगल्या रीतीनें; उत्तम तऱ्हेनें.

**खूबडसाबड**-वि. (अनु.) उंचसखल.

**खूबसूरत**-वि. (फा.) सुंदर; मनोहर.

**खूबसूरती**-स्त्री. (फा.) सौंदर्य; सुंदरता.

**खूबानी**-स्त्री.(फा.) जरदाळू.

**खूबी**-स्त्री. (फा.) १ चांगुलपणा; उत्तमता. २ वैशिष्ट्य; गुणविशेष.

**खूसट**-पु. (सं.) घुबड.

**खूसट**-वि. (सं.) १ अरसिक. २ निर्बुद्ध. ३ अपशकुनी.

**खूसर**-पु. खूसट पहा.

**खेड़ा**-पु. (सं.) खेडें.

**खेत**-पु. (सं.) १ शेत. २ पीक. ३ युद्धक्षेत्र. ४ उत्पत्तिस्थान.

**खेतिहर**-पु. (सं.) शेतकरी.

**खेतीबारी**-स्त्री. (सं.) शेतकरी.

**खेदा**-पु. (सं.) १ रान उठविण्याचें काम. २ शिकार.

**खेदित**-वि. (सं.) १ खिन्न; दु:खी. २ शिथिल; थकलेला.

**खेना**-क्रिस. (सं.) १ वल्हविणें. २ कालक्षेप करणें.

**खेप**-स्त्री. (सं.) १ खेप. २ दोष. ३ खोटें नाणें.

**खेपना**-क्रि स.(सं.) व्यतीत करणें.

**खेपड़ी**-स्त्री. (सं.) वल्हें.

**खेम**-पु. (सं.) क्षेम.

**खेमा**-पु. (फा.) तंबू; खेमा.

**खेरवा**-पु. (सं.) नावाडी.

**खेरा**-पु. (सं.) खेडें.

**खेल**-पु. (सं.) खेळ.

**खेलक**-पु. (सं.) खेळाडू.

**खेलना**-क्रि.अ. (सं.) खेळणें.

**खेलवाड**-पु. (सं.) खेळ; क्रीडा.

**खेलवाडी**-वि. (सं.) १ खेळाडू. २ विनोदी; खेळाडू वृत्तीचा.

**खेलवार**-पु. (सं.) १ खेळ; हास्यविनोद. २ तमाशा; खेळ.

**खेलाई**-स्त्री. (सं.) खेळ.

**खेलाड़ी**-पु. १ खेळाडू.२ तमासगीर.

**खेवट-खेवटिया**-पु. नावाडी.

**खेवणी**-स्त्री.(सं.)वल्हें.

**खेवनहार**-पु.(सं.)नावाडी.

**खेवरियाना**-क्रि.स.( दे. ) एकत्रित करणें.

**खेवा**-पु. ( सं. ) १ नावेचें भाडें. २ नावेंतून नदी ओलांडणें. ३ खेप. ४ मालानें भरलेली नाव.

**खेवाई**-स्त्री. ( सं. ) नाव वाल्हविण्याचें काम. २ वल्हविण्याची मजूरी.

**खेह**-स्त्री. ( सं. ) धूळ; राख.

**खैंचना**-क्रि.स. खींचना पहा.

**खैर**-स्त्री. ( फा. ) कुशल; क्षेम.

**खैर**-अव्य. ( फा. ) असो; कांहीं हरकत नाहीं.

**खैरखाह**-बि. ( फा. ) शुभचिंतक.

**खैरा**-वि. ( सं. ) तपकिरी रंगाचा.

**ख़ैरात**-पु. ( अ. ) १ दान. २ पुण्य.

**खैरियत**-स्त्री. ( फा. ) १ क्षेमकुशल. २ कल्याण; हित.

**खैलर**-स्त्री. ( सं ) रवी.

**खैला**-पु. ( सं. ) पाडा.

**खोंइचा**-पु. पदर ( लुगड्याचा ).

**खोंखना**-क्रि.अ.( अनु ) खोकणें.

**खोंखी**-स्त्री.( अनु. ) खोकला.

**खोंगा**-पु. ( दे. ) १ अटकाव; अडकाठी. खैला पहा.

**खोंच**-स्त्री ( सं. ) १ टोंकदार वस्तूनें झालेली जखम; निघालेली खपली. २ कपड्याला आखटल्यामुळें पडलेलें भोंक.

**खोंच**-पु. ( दे. ) १ मूठभर. २ मूठ; पसा.

**खोंचिया**-पु. ( दे. ) भीक मागणारा; भिकारी.

**खोंची**-स्त्री.(दे.)भिकाऱ्याला देण्याच्या वस्तू (धान्य, पालेभाजी इ. ).

**खोंटना**-क्रि.स ( शं. ) खुडणें;तोडणें.

**खोंडा**-वि. ( सं. ) दांत पडका.

**खोंतल-खोंता; खोंथा**-पु. घरटें ( पक्षाचें ).

**खोंप**-स्त्री. धांवदोरा.

**खोंपना**-क्रि.स. गडना पहा.

**खोखला**-वि. (सं.) पोकळ.

**खोज**-स्त्री. ( सं. ) १ शोध; तपास. २ चिन्ह; निशाणी; पत्ता.

**खोजना**-क्रि.अ. ( सं. ) शोधणें; तपास करणें; धुंडाळणें.

**खोजमिटा**-वि. ( सं. ) मागमूससुद्धा नाहीसा झालेला; नष्ट; सत्यनाश झालेला.

**खोजवाना**-क्रि.स.( सं. ) शोधविणें.

**खोजा**-पु. ( फा. ) १ अंतःपुररक्षक; खोजा. २ नोकर;चाकर. ३ सरदार; माननीय व्यक्ति

**खोजी**-वि. ( सं. ) शोधणारा.

**खोट**-स्त्री. ( सं. ) १ दोष; खोड. २ भेसळीची वस्तु.

**खोटा**-वि. ( सं. ) खोटा; असत्य.

**खोटाई**-स्त्री. ( सं. ) १ खोटेपणा; क्षुद्रता. २ कपट. ३ दोष.

**खोड़**-स्त्री. ( सं. ) पितर; देवता; भूत-प्रेत इ.ची अवकृपा; कोप.

**खोड़रा**-पु. ( सं. ) जुन्या वृक्षाची ढोल.

**खोद**-पु. ( फा. ) शिरस्त्राण; जिरटोप.

**खोद**-पु. खोज पहा.

**खोदना**-क्रि.स. ( सं. ) खोदणें.

**खोना**-क्रि स. ( सं. ) १ हरवणें; गहाळ करणें;

**खोनचा**-पु. ( फा. ) खोमचा.

**खोपड़ा**-पु. ( सं. ) १ डोक्याची कवटी. २ डोकें. ३ नारळांतील खोबरें. ४ नारळ. ५ भिकेची नरोटी.

**खोपड़ी**-स्त्री. ( सं. ) डोक्याची कवटी. २ डोकें.

**खोपा**-पु. ( सं. ) १ छपराचा कोंपरा. २ घराचा कोंपरा. ३ खोपा. ४ वेणी. ५ खोबऱ्याचा गोळा.

**खो भरना**-क्रिअ. आडवें पडणें; मध्यें पडणें.

**खोमार**-पु. ( ? ) केरकचरा टाकण्याचा खड्डा.

**खोय**-( फा. ) स्वभाव.

**खोया**-पु. ( सं. ) खवा.

**खोर**-स्त्री. गल्ली; बोळ.

**खोरना**-क्रि. अ. ( सं. ) स्नान करणें.

**खोरा**-पु. ( सं. ) १ पेला. २ वाडगा.

**खोरा**-वि. ( सं. ) लंगडापांगळा; अपंग.

**खोराक**-पु. ( फा. ) खुराक.

**खोराकी**-वि. ( फा. ) खादाड.

**खोरि**-स्त्री. अरुंद गल्ली.

**खोरिया**-स्त्री. ( सं. ) १ लहान पेला. २ चमकदार लहान टिकल्या.

**खोल**-पु. ( सं. ) १ खोळ. २ साप इ.ची कात. ३ मोठी चादर.

**खोलना**-क्रि.स. ( सं. ) उघडणें; खोवणें; सोडणें.

**खोवा**-पु. ( सं. ) खवा.

**खोह**-स्त्री. ( सं. ) १ गुहा. २ दरी. ३ खिंड.

**खोही**-स्त्री. ( सं. ) पानांची छत्री.

**खौफ़**-पु. ( अ. ) भय; भीति.

**खौर**-स्त्री. ( सं. ) १ त्रिपुंड; चंदनाचें आडवें गंध. २ स्त्रियांचा एक दागिना.

**खौरना**-क्रि.स. ( सं. ) गंध लावणें.

**खौरा**-पु. ( सं. ) १ खैंडा. २ एक प्रकारची खरूज.

**खौरा**-वि. ( सं. ) खवडया.

**खौरि**-स्त्री. खौर पहा.

**खौरी**-स्त्री. खोपडी पहा.

**खौरी**-स्त्री. (दे.) राख.

**खौरु**-पु. (दे.) बैलाची डरकाळी.

**खौलना**-क्रि.स. (सं.) खवळणें; उकळणें.

**खौलाना**-क्रि.स. (सं.) उकळविणें.

**खौहा**-वि. (सं.) खादाड.

**ख्याल**-पु. (अ.) १ ध्यान. २ अंदाज; अटकळ. ३ विचार; मत. ४ आदर. ५ ख्याल (संगीत प्रकार).

**ख्याल**-पु. (सं.) खेळ; थट्टा; विनोद.

**ख्याली**-वि. (अ.) कल्पित.

**खिष्टान**-पु. ख्रिश्चन.

**ख़्वाजा**-पु. (फा.) १ मालक स्वामी. २ सरदार. ३ प्रसिद्ध व्यक्ति. ४ मोठा व्यापारी. ५ उच्च दर्जाचा फकीर. ६ खोजा; द्वारपाल.

**ख़्वान्**-पु. (फा.) परात.

**ख़्वाब**-पु. (फा.) १ स्वप्न. २ झोंप.

**ख़्वार**-वि. (फा.) १ सत्यानाश झालेला; खराब. २ तिरस्कृत.

**ख़्वारी**-स्त्री (फा.) १ नाश. २ अपमान; बेइज्जत.

**ख़्वास्तगार**-पु. (फा.) इच्छुक.

**ख़्वाह**-स्त्री. (फा.) इच्छा; मनीषा.

**ख़्वाह**-अव्व. (फा.) अथवा; किंवा; नाहीतर.

**ख़्वाहिश**-स्त्री. (फा.) इच्छा; मनीषा.

**ख़्वाहिशमंद**-वि. (फा.) इच्छुक.

---

## ग

**गंग-बरार**-पु. (सं. +फा.) मळीची जमीन (नदीच्या पुरानें पहिली माती वाहून जाऊन त्या जागीं पुराबरोबर आलेली दुसरी माती सांचते अशी).

**गंगाल**-पु. (सं.) घंगाळ.

**गंगालाभ**-पु. (सं.) मृत्यु.

**गंगौटी**-स्त्री. (सं.) गंगेच्या किनाऱ्याची वाळू किंवा माती.

**गंज**-पु. (सं.) १ टक्कल; केस गळण्याचा रोग. २ खवडा.

**गंज**-स्त्री. (फा.) १ खजीना. २ रास; ढेर. ३ समूह; झुंड. ४ धान्याचें कोठार. ५ धान्याचा बाजार. ६ वाणी आळी; बाजार पेठ. ७ मद्यपात्र. ८ मदिरालय. ९ संच.

**गंज**-पु. (सं.) संच.

**गंजना**-क्रि.स. (सं.) १ अवज्ञा करणें. २ नाश करणें; चूरचूर करणें.

**गंजा**-पु. (सं.) टक्कल पडण्याचा रोग.

**गंजा**-वि. (सं.) टकल्या.

**गंजी**-स्त्री. (फा.) १ गंज; रास; ढीग. २ रताळें.

**गंजी**-स्त्री. (इं.) गंजीफ्राक; बनियन.

**गंजेडी**-वि. (सं.) गांजेकस.

**गंठकटा**-पु. (सं.) खिसेकापू.

**गंठजोड; गँठबंधन**-पु. (सं.) विवाहसमयीं वरवधूंच्या वस्त्रास गांठ मारण्याचा विधी.

**गंड**-पु. (सं.) १ कपोल; गाल. २ कानशील. ३ गंडा. ४ फोड. ५ चिन्ह; डाग. ६ मंडलाकार डाग; करकोचा. ७ गांठ.

**गँडतरा**-पु. (सं.) हगोलें; दुपटें.

**गंडमूर्ख**-वि. (सं.) महामूर्ख.

**गंडा**-पु. (सं.) १ गांठ. २ गंडा.

**गँडासा**-पु. (सं.) १ परशु. २ गवत कापण्याचा विळा.

**गँडेरी**-स्त्री. (सं.) गंडेरी.

**गँडोरा**-पु. (सं.) हिरवा कच्चा खजूर.

**गंता**-पु. (सं.) जाणारा.

**गंदगी**-स्त्री. (फा.) १ घाण; मलीनता; गलिच्छपणा. २ अशुद्धता; अपवित्रता. ३ विष्टा; मैला.

**गँदला**-वि. (फा.) घाणेरडा; मलिन; अस्वच्छ.

**गंदा**-वि. (फा.) १ घृणित. २ अस्वच्छ; मलिन. ३ अशुद्ध.

**गंदुम**-पु. (सं.) गहूं.

**गंदुमी**-वि. (सं.) गहूं वर्ण.

**गँदोलना**-क्रि.सं. (फा.) (तळयांतील पाणी) गढूळ करणें; घाण करणें.

**गंधराज**-पु. (सं.) १ मोगरा. २ चंदन.

**गंधी**-पु. (सं.) १ गंधी; अत्तरें, सुगंधी तेलें इ. विकणारा. २ एक प्रकारचें गवत. ३ एक किडा.

**गंधोला**-वि. (सं.) घाणेरडा;

**गँवँ**-स्त्री. (सं) १ डाव; हूक. २ २ मतलब; प्रयोजन. ३ वेळ; अवसर; मोका. ४ उपाय; युक्ति.

**गँवई**-स्त्री. (सं.) लहान गांव.

**गँवरदल**-वि. (हिं.) १ खेडवळ. २ कुरूप; बेडौल. ३ अडाणी; उद्धट.

**गँवहियाँ**-पु. (सं.) पाहुणा.

**गँवना**-क्रि.स. (सं.) १ काल व्यतीत करणें; वेळ गमावणें. २ गमाविणें; घालविणें.

**गँवरा**-वि. (सं.) १ गांवढळ; खेडवळ. २ मूर्ख.

**गँवारी**-स्त्री. (सं.) १ खेडवळपणा. २ मूर्खपणा.

**गँवारी**–वि.स्त्री. ( सं. ) १ खेडवळ. २ अडाणी; मूर्ख.

**गँवारू** वि. गँवरा पहा.

**गँस**–पु. (सं.) १ आढी; द्वेष; हाड-वैर. १ वर्मी बोलणें; टोंचून बोलणें.

**गँस**–स्त्री. (सं.) १ बाणाचें टोंक. २ उपहासात्मक बोलणें.

**गँसना**–क्रि.त. ( सं. ) करकचून बांधणें.

**गँसीला**–वि. (सं.) १ अणकुचीदार; २ मजबूत घट्ट विणीचा.

**गईकरना**–क्रि. (अ.) गय करणें.

**गईबहोर**–वि. सांडलेली वस्तू शोधून देणारा; मोडलेली वस्तू नीट करणारा.

**गगरा**–पु. (सं.) घागर.

**गगरिया, गगरी**–स्त्री. (सं.) घागर; कळशी.

**गच**–पु. (अनु.) १ फरशीची जमीन; चुनेगच्ची जमीन. २ प्लॅस्टर ऑफ पॅरीस. ३ चुनेगच्ची जमीन बनविण्याचा मसाला. ४ एकाद्या नरम वस्तूवर टोंकदार हत्यार खुपसतांना होणारा आवाज.

**गचकारी**–स्त्री. (अ.+फा.) चुनेगच्चीचें काम.

**गचगर**–पु. चुनेगच्चीचें काम करणारा.

**गचना**–क्रि.स. (अनु.) १ गच्च भरणें २ करकचून बांधणें.

**गचपच**–पु. गिचपिच पहा.

**गचाका**–पु. (अनु.) गचकन पडण्याचा आवाज.

**गचाका**–स्त्री. तरुण जवान स्त्री.

**गचाका**–क्रि. (वि.) भरपूर.

**ग़चक़**–स्त्री. (फा,) १ दारू प्याल्यानंतर तोंडाची घाण जाण्याकरितां खाण्याचा पदार्थ. २ चटकन तोंडांत टाकण्याची चीज. ३ नाश्ता; फराळ.

**ग़जब**–पु. (अ.) १ कोप; घुस्सा; राग. २ गहजब; आपत्ति; संकट. ३ जुलूम; अन्याय.

**गजरबजर**–१ घालमेल; घोटाळा. २ अरबट चरबट खाद्य; भक्ष्य अभक्ष्य पदार्थ.

**गजरा**–पु. गाजराचा पाला (गुरांना घालण्याचा ).

**गजरा**–पु. गजरा; हार.

**ग़जल**–स्त्री. (अ.) गझल.

**गजवान**–पु. (सं.) माहुत.

**गजही**–स्त्री. बांबूची रवी.

**गज्जर**–पु. ( अनु. ) दलदलीची जमीन.

**गज्जल**–पु. (सं.) अंजीर.

**गज्झा**–पु. (सं.) बुडबुडे.

**गज्झा**-पु. १ ढेर; गंज. २ खजीना. ३ धन; संपत्ति. ४ लाभ; फायदा.

**गज्झिन**-वि. १ घन; दाट. २ जाड. ३ घट्ट विणीचा.

**गटकना**-क्रि.स. (सं.) १ गिळणें; गटकावणें. २ दडपणें; मारणें; गिळंकृत करणें.

**गटना**-क्रि.अ. (सं.) बांधणें.

**गटपठ**-स्त्री. (अनु.) १ गट्टी; मैत्री. २ सहवास.

**गटी**-स्त्री. (सं.) गांठ.

**गट्टा**-पु. (सं.) १ मनगट. २ गांठ. ३ बीज. ४ एक मिठाई.

**गट्टी**-स्त्री- (दे.) नदीचा किनारा.

**गट्टू**-पु. (सं.) दस्ता; मूठ.

**गट्ठर**-पु. (सं.) गठ्ठा; बोजा.

**गट्ठा**-पु. (सं.) १ लांकडाचा अथवा गवताचा भारा. २ मोठी गठडी.

**गठकटा**-वि.पु. (सं.) १ खिसेकापू. २ भामटा.

**गठन**-स्त्री. (सं.) घडण; बनावट.

**गठना**-क्रि.अ. (सं.) २ सांधलें जाणें; जुळणें. २ वीण घट्ट होणें. ३ गठणें; वश होणें; कटांत सामील होणें. ५ वठणें; उठून दिसणें. ५ दृढ मैत्री होणें; संघट्टन होणें.

**गठरी**-स्त्री. (सं.) गठडी.

**गठवाना**-क्रि.स. (सं.) १ गांठविणे. २ शिवणें; जोडणें. ३ मोठे मोठे जाडे टाके घालणें. ४ जोडणें.

**गठाना**-क्रि.स. (सं.) गठवाना पहा.

**गठाव**-पु. (सं.) घडण; बनावट.

**गठित**-वि. (सं.) घडविलेला; बनविलेला.

**गठिया**-स्त्री. (सं.) गठडी.

**गठिना**-क्रि.स. (सं.) १ गांठविणें. २ गांठ मारणें.

**गठीला**-वि. (सं.) गाठीगाठींचा.

**गुठीला**-वि. (सं.) घर्डीव; मजबूत; पक्का.

**गठौत**-स्त्री.(सं.) १ मैत्री; स्नेह. २ परस्पर विचारानें पक्का झालेला निश्चय; ठराव. ३ उपयुक्तता.

**गडँक-गडंग**-पु. शस्त्रास्त्रें व दारूगोळ्याचें कोठार.

**गड़ंग**-पु. (सं.) १ गर्व; ताठा; ऐट. २ वढाई.

**गडंगिया**-वि. (सं.) १ वढाईखोर. २ गर्विष्ठ.

**गड़**-पु. (सं.) १ आडोसा. २ तटबंदी. ३ खड्डा; खाई. ४ किल्ला; गड.

**गड़काना**-क्रि.स. (अनु.) गडगड करणें.

**गड़काना**–क्रि.सं. (अ.) बुचकळणें; बुडविणें.

**गड़गड़ाहट**–स्त्री. (अनु.) १ गड-गडाट. २ गुडगुडीचा आवाज.

**गड़गड़ी**–स्त्री. (अनु.) नगारा.

**गड़गूदड़**– पु. (अनु.) तुकडया तुकडयांची गोधडी.

**गड़च्चा**–पु. (?) १ धमकी. २ चमका पहा.

**गड़ना**–क्रि.अ. (सं.) १ बोंचणें. २ टोंचणें. २ बोंचल्यासारखा होणें. ३ दबलें जाणें;गाडलें जाणें. ४जम बसणें; स्थिरावणें. ५ खांब वगैरे जमिनीवर उभा होणें.

**गड़पना**–क्रि.स. (अनु.) गडप करणें; गिळंकृत करणें.

**गड़प्पा**–पु. (सं.) १ खड्डा; खळगा. २ धोक्याची जागा.

**गड़बड़**–वि. (सं.) १ उंचसखल. २ अस्ताव्यस्त. ३ क्रमरहित.

**गड़बड़**–स्त्री. (सं.) १ गडबड; घोटाळा. २ उपद्रव; दंगा; गडबड.

**गड़बड़ा**–पु. (सं.) खड्डा.

**गड़बड़ना**–क्रि.अ. (सं.) १ गड-बडणें; गोंधळणें. २ बिघडणें; अव्य-वस्थित होणें; विस्कळित होणें.

**गड़बड़ाना**–क्रि.अ. (सं.) १ गोंधळविणें. २ बिघडविणें. ३ अस्ताव्यस्त करणें.

**गड़बड़िया**–वि. (सं.) गडबडया; उपद्रवी.

**गड़बड़ी**–स्त्री. गडबड पहा.

**गड़रिया**–पु. (सं.) धनगर; मेंढपाळ.

**गड़वाना**–क्रि.स. (सं.) गाडविवणें.

**गड़हा**–पु. (सं.) खड्डा.

**गडा**–पु. (सं.) रास; ढीग; ढेर.

**गड़ाना**–क्रि.स. (सं.) भोंसकणें; खुपसणें; टोंचणें.

**गडाना**–क्रि.स. (सं.) गाडविणें.

**गडायन**–वि. (सं.) टोंचणारा; बोंचणारा.

**गडारी**–स्त्री. (सं.) १ मंडलाकार रेषा; वर्तुळ. २ घेरा.

**गडारी**–स्त्री. (सं.) १ रहाटाची कप्पी. २ चाक; गिरकी; फिरकी; चक्री.

**गडारीदार**–वि. (सं.+फा.) १ आडव्या रेघांचें (कापड). २ घेरदार.

**गडुई**–स्त्री. (सं.) तोटी असलेली लोटी; झारी.

**गडुल**–पु. (सं.) कुबडा मनुष्य.

१३

**गडुल**-वि. (सं.) कुबडा.
**गडुवा**-पु. (सं.) गडुई पहा.
**गडेरिया**-पु. (सं.) गडरिया पहा.
**गडोना**-क्रि.स. (सं.) खुपसणें.
**गडोला**-पु. (सं.) १ घास. २ चूळ.
**गडोलना**-पु. बाबागाडी.
**गडौना**-पु. (सं.) कांटा.
**गड्ड**-पु. (सं.) गड्डी; गड्डा; चळत.
**गड्डर**-पु. भेडा पहा.
**गड्डाम-गड्डामी**-वि. (इं.) नीच; बदमाष; हलकट.
**गड्ढा**-पु. (सं.) खड्डा.
**गढंत**-वि. (सं.) कल्पित.
**गढंत**-स्त्री. (सं.) काल्पनिक गोष्ट.
**गढ**-पु. (सं.) १ गड; किल्ला. २ खाई.
**गढ़त**-स्त्री. (सं.) बनावट; घडण.
**गढ़न**-स्त्री. (सं.) बनावट; रचना; आकृति.
**गढना**-क्रि.स. (सं.) १ घडविणें. २ बनविणें; फसविणें; गंडविणें. ३ थापा मारणें. ४ मारणें; पिटणें.
**गढपति**-पु. (सं.) किल्लेदार.
**गढवाल**-पु. किल्लेदार.
**गढा**-पु. (सं.) खड्डा.
**गढाना**-क्रि.स. (सं.) घडविणें; बनविणें.
**गढाना**-क्रि.अ. (सं.) मनास न रुचणें.
**गढिया-गढैया**-पु. (सं.) घडविणारा; घडकाम करणारा.
**गत**-वि. (सं.) १ गत; व्यतीत. २ मेलेला. ३ विरहित.
**गत**-स्त्री. (सं.) १ गति; अवस्था. २ रूप; रंग; वेष; आकृति. ३ कामांत, उपयोगांत आणणें. ४ दुर्दशा; नाश. ५ क्रियाकर्म. ६ वाद्यांची गत (तबला; सतार इ.) ७ नाचण्याचा ढंग.
**गतका-गद्गा**-पु. (सं.) गदगा.
**गतकुल**-पु. (सं.) बेवारसी इस्टेट.
**गतांक**-वि. (सं.) निकामी.
**गतिया**-स्त्री. (सं.) तबलजी.
**गत्तालखाना**-पु. (सं.+फा.) बुडित खातें.
**गथना**-क्रि.स. (सं.) १ गुंफणें; ओवणें. २ थापा देणें.
**गद्**-पु. (सं.) १ व्याधि. २ विष.
**गद्कारा**-वि.पु. (अनु.) मऊ; गुबगुबीत.
**गद्म**-पु. (अ.) आधाराकरितां लावलेलें लाकूड; टेकू.

**गद्र**-पु. (अ.) १ खळबळ; दंगा-धोपा. २ बंड.

**गद्राना**-क्रि.अ. (अ.) १ पिकणें. २ यौवनावस्थेंत अंग भरणें. ३ डोळयांस चिपडें, पू इ. येणें.

**गद्ला**-वि.(फा.) मळकट.

**गद्लाना**-क्रि.अ. (फा.) पाणी गढूळ होणें.

**गद्हा**-पु. (सं.) १ रोग निवारण करणारा; वैद्य; चिकित्सक. २ गाढव; गद्धा. ३ मूर्ख; गाढव.

**गदाई**-वि. (फा.) १ तुच्छ; नीच; क्षुद्र. २ रद्दी; निकामी.

**गदाका**-वि. बांधेसुद.

**गदाका**-पु. एकाद्याला उचलून जमीनीवर आपटण्याची क्रिया.

**गदित**-वि. (सं.) कथित.

**गदी**-वि. (सं.) १ रोगी. २ गदाधर.

**गदेला**-पु. १ जाड गादी. २ रजई. ३ लहान बालक.

**गद्दर**-वि. (दे.) अर्धवट पिकलेला; अर्धकच्चा.

**गद्दर**-अनु; (दे.) मोठी गादी.

**गद्दा**-पु. (अनु.) १ जाड गादी. २ हत्तीच्या पाठीवर घालण्याची जाड गादी. ३ गवत,कापूस इ. चें गाठोडें; भारा; बोजका.

**गद्दी**-स्त्री. (अनु.) गादी.

**गद्दीनशीन**-वि. सिंहासनाधिष्ठित. २ गादीचा वारस.

**गधा**-पु. (सं.) गद्धा; गाढव.

**ग़नी**-पु. (अ.) धनवान; श्रीमंत; धनिक.

**ग़नीम**-पु. (अ.) १ गनीम; शत्रु. २ लुटारू.

**ग़नीमत**-स्त्री. (अ.) १ लुटीचा माल. २ फुकटचा माल. ३ चांगली गोष्ट.

**गन्ना**-पु. (सं.) ऊस.

**गप गप्पा**-स्त्री. (सं.) १ थाप; गप्प. २ अफवा.

**गपकना**-क्रि.स. (सं.) एकदम गिळून टाकणें; गटकावणें.

**गपडचौथ**-पु. (सं.) विसंगत गप्पा; थापा.

**गपिया**-वि. थापाड्या; गप्पीदास.

**गपोड-गपोड़ा**-पु. गप्प; थाप.

**गप्पी**-वि. गप्पीदास.

**गप्फा**-पु. (अनु.) १ मोठा घास. २ लाभ; फायदा.

**गफ़**-वि. दाट; घट्ट;

**ग़फ़लत**-स्त्री. (अ.) १ बेपरवाई. २ चूकभूल; गफलत. ३ बेसावधपणा.

**गबद्द**-वि. मूर्ख; मथ्थड.

**गबन**-पु. (अ.) अफरातफर.

**गबरू**--वि. (फा.) १ तरणाबांड. २ भोळाभाबडा; सरळ.

**गबरू**-पु. (फा.) पति.

**गबरून**-पु. (फा.) एक प्रकारचें कापड.

**गब्बर**-वि. (सं.) १ गर्विष्ठ; घमेंड-खोर. २ सुस्त. ३ किंमती; बहुमोल. ४ श्रीमंत; गब्दर.

**गब्भा**-पु. (सं.) १ गादी. २ गवताचा भारा.

**गब्र**-पु. (फा.) पारशी.

**गभुआर**-वि. (सं.) १ जावळ न काढलेला. २ जन्मल्यापासून ठेवलेले जावळ. ३ अज्ञान.

**गम**-पु. (सं.) १ मार्ग; रस्ता. २ मैथुन.

**गम**-स्त्री. (सं.) प्रवेश; गति (बुद्धीची).

**ग़म**-पुं. (अ.) १ दुःख; शोक. २ चिंता; काळजी.

**गमक**-पु. (सं.) १ जाणारा. २ बोधक; सूचक.

**गमक**-स्त्री. (सं.) सुगंध; सुवास.

**ग़मकीला**-वि. (सं.) सुगंधित.

**ग़मखोर**-वि. (अ.+फा.) सहनशील.

**ग़मगी**-वि. (फा.) दुःखी; खिन्न; उदास.

**गमत**-पु. (सं.) १ रस्ता; मार्ग. २ पेशा; व्यवसाय.

**गमनाक**-वि. (फा.) शोकपूर्ण.

**गमला**-पु. (?) मातीची कुंडी.

**गमागम**-पु. (सं.) येणेंजाणें.

**गमाना**-क्रि.स. (सं.) गमाविणें.

**गमार**-वि. (सं.) खेडवळ.

**ग़मी** स्त्री. (अ.) १ मृताबद्दलचा शोक. २ शोकाचा काल. २ मृत्यु; निधन.

**गम्मत**-स्त्री. (मराठी) गंमत.

**गय**-पु. (सं.) १ घर. २ द्रव्य; धन ३ आकाश. ४ प्राण. ५ पुत्र.

**गयाल**-स्त्री. (दे.) बेवारशी मिळकत.

**गर**-पु. (सं.) १ रोग. २ विष.

**गर**-पु. (सं.) गळा; मान.

**गरक**-वि. (अ.) गर्क.

**ग़रक़ाब**-पु. (अ.) बुडण्याची अवस्था.

**ग़रक़ाब**-वि. (अ.) १ निमग्न. २ अत्यंत लीन.

**ग़रकी**--स्त्री. (अ.) १ बुडी; डुबकी. २ अतिवृष्टि. ३ पाण्याखालची जमीन. ४ खाचर. ५ लंगोटी.

**ग़रकी**-स्त्री. चाक; कप्पी.

**गरगज**-पु. (सं.) १ बुरूज. २ उंच टेकाड. ३ नांवेचें लांकडी छत. ४ फाशीचा तख्ता.

**गरगज**-पु. (सं.) मोठा; विशाल.

**ग़रज**-स्त्री. (अ.) १ जरूरी, गरज; आवश्यकता. २ प्रयोजन; मतलब; आशय. ३ इच्छा.

**ग़रज़मंद**-वि. (अ.+फा.) गरजू.

**ग़रज़ी, ग़रजू**-वि. गरजू.

**गरट्ट**-पु. (सं.) समूह; झुंड.

**गरदन**-स्त्री. (फा.) मान; गर्दन.

**गरद्दा**-पु. (फा.) धूळ; माती; केर-कचरा.

**गरदनियाँ**-स्त्री. (फा.) अर्धचंद्र.

**गरब**-पु. (सं.) गर्व.

**गरमागरमी**-स्त्री. (फा.) १ आवेश; उत्साह. २ भांडण; बाचाबाची.

**गरमाना**-क्रि.(अ +फा.) १ तापणें. गरम होणें; ऊष्ण होणें. २ मस्त होणें; गरम होणें. ३ रागावणें. ४ आवेश चढणें.

**गरमाना**-क्रि.स. (फा.) तापविणें.

**गरमाहट**-स्त्री. (फा.) उष्णता.

**गरमी**-स्त्री. (फा.) गरमी; उष्णता.

**गरमीदाना**-पु. घामोळें.

**गरहर**-पु. (सं.) लोढणें.

**गरहेंडुवा**-पु. (सं.) कसाई.

**गराँव**-पु. (सं.) दावें.

**गराडी**-स्त्री. (अनु.) १ चाक; विहीरीची कप्पी. २ वळ; वण.

**गराना**-क्रि.स. (सं.) १ गाळणें. २ पिळणें.

**गरारा**-वि. (सं.) १ गर्विष्ट; उद्धट. २ बलवान; प्रबल.

**गरारा**-पु. (अ.) १ पाण्याच्या गुळण्या. २ गुळण्या करण्याचें औषध.

**गरारी**-स्त्री. गराडी पहा.

**गरियाना**-क्रि. (अ.) शिवीगाळ करणें.

**गरियार**-वि. (सं.) आळशी; सुस्त.

**गरिष्ठ**-वि. (सं.) १ अत्यंत भारी. २ पचण्यास जड.

**गरी**-स्त्री. (सं.) १ नारळांतील खोबरें. २ गर.

**गरीबनिवाज, गरीबनेवाज**-वि. (फा.) दयाळु.

**गरीबपरवर**-वि. (फा.) कनवाळू; गरीबांवर दया करणारा.

**गरूआ**-वि. (सं.) भारी; वजनी.

**गरूर**-पु. (अ.) घमेंड; गर्व.

**गरूरत**-पु. घमेंड; गर्व.

**गरूरी**-वि. (अ.) घमेंडी; अभिमानी.

**गरूरी**-स्त्री. (अ.) अभिमान; घमेंड.

**गरेडिया**-पु. गडरिया पहा.

**गरेबान**-पु. (फा.) गळपट्टी; कॉलर.

**गरेरना**-क्रि.स. (सं.) १ घेरणें. २ अडविणें; रोखणें.

**गरेरी, गरेली**-स्त्री. गराडी पहा.

**गरोह**-पु. (फा.) झुंड; समूह; जत्था.

**गर्गर**-पु. (सं.) १ भोंवरा. २ घागर.

**गर्गरी**-स्त्री. (सं.) १ घागर. २ माधणी. ३ रवी.

**गर्द**-स्त्री. (फा.) धूळ; राख.

**गर्दखोर-गर्दखोरा**-वि. (फा.) धूळखाऊ; मळखाऊ.

**गर्दखोर-गर्दखोरा**-पु. (फा.) पाय पुसणें.

**गर्दन**-पु. गरदन पहा.

**गर्दाबाद**-वि. (फा.) १ धुळीस मिळालेलें; ध्वस्त. २ धुळीनें भरलेलें. ३ बेशुद्ध.

**गर्दिश**-स्त्री (फा.) १ फेरा; चक्कर. विपत्ति; संकट.

**गलकंबल**-पु. (सं.) गाय, म्हैस इ. च्या मानेखालील लोंबता भाग; पोळी.

**गलगला**-वि. ओला; भिजलेला.

**गलगलाना**-क्रि. (अ.) भिजणें; ओलें होणें.

**गलगाजना**-क्रि. (अ.) आनंदित होऊन बोलणें.

**गलगुच्छा**-पु. गलमुच्छा पहा.

**गलगुथना**-वि. अंगापिंडानें गुबगुबीत.

**गलजोत**-वि. असह्य.

**गलजोत**-स्त्री. दोन तीन जनावरें एकत्र बांधण्याचें दावें.

**गलतंग**-वि. बेशुद्ध.

**गलतंस**-पु. (सं.) निपुत्रिक.

**ग़लत**-वि. (अ.) १ अशुद्ध; भ्रममूलक. २ असत्य; मिथ्या.

**गलतान**-वि. (फा.) फिरणारा.

**गलती**-स्त्री. (अ.) चूक; भूल.

**गलबाँही**-स्त्री. (सं.) कंठालिंगन.

**गलमुच्छा**-पु. कल्ले; गुलमिशा.

**गला**-पु. (सं.) गळा.

**गलाना**-क्रि.स. (सं.) १ विरघळविणें. २ (पैसा) खर्च करणें.

**गलानि**-स्त्री. (सं.) ग्लानि.

**गलार**-वि. (सं.) भांडखोर.

**गलार**-पु. (सं.) मैना.

**गलित**-वि. (सं.) जीर्ण.

**गलियारा**-पु. **गलियारी**-स्त्री.
**गली**-स्त्री. गल्ली; अरुंद बोळ.
**गलीचा**-पु. (फा.) १ गालीचा; रेताड जमीन.
**ग़लीज़**-वि. (अ.) १ घाणेरडा; गलिच्छ. २ अशुद्ध; अपवित्र.
**ग़लीज़**-पु. (अ.) १ केरकचरा. २ मल; विष्ठा.
**ग़लीत**-वि. (अ.) १ मलिन. दुर्दशाग्रस्त.
**गलेफ**-पु. गिलाफ पहा.
**गलेबाज़**-वि. (सं.+फा.) गोड गळ्याचा; सुंदर आवाजाचा.
**गलैचा**-पु. गलीचा पहा.
**गल्प**-स्त्री. (सं.) १ गप्पा; थापा. २ शेखी; ऐट. ३ लहान लहान गोष्टी.
**गल्ला**-पु. (फा.) झुंड; कळप.
**गल्ला**-पु. (अनु.) गलका; गडबड; आरडाओरड.
**गल्ला**-पु. (अ.) १ शेतांतील पैदास; पीक. २ धान्य. ३ गल्ला; ४ दुकानांतील रोजची रोकड.
**गल्लाफ़रोश**- पु. (फा.) धान्याचा व्यापारी.
**गल्ली**-स्त्री. (सं.) गल्ली.
**गवँ**-स्त्री. (सं.) १ संधी; सुयोग. २ मतलब; प्रयोजन.
**गवाछ**-पु. (सं.) गवाक्ष; झरोका.
**गवारा**-वि. (फा.) १ मनपसंत; अनुकूल. २ सह्य; अंगीकार करण्यास योग्य.
**गवास**-पु. (सं.) कसाई; गोवध करणारा.
**गवाह**-पु. (फा.) साक्षीदार; साक्षी.
**गवाह**-स्त्री. (फा.) साक्ष.
**गवेधु-गवेधुक**-पु. गवास पहा.
**गवेषणा**-स्त्री. (सं.) शोध; तपास.
**गवैया**-वि. (सं.) गाणारा; गायक.
**गवैहाँ**-वि. (सं.) खेडूत; खेडवळ.
**गव्य**-वि. (सं.) गाईपासून मिळणारे तूप, शेण, गोमूत्रादि पदार्थ.
**गव्य**-पु. (सं.) १ गायींचा कळप. २ पंचगव्य.
**ग़श**-पु. (अ.) मूर्च्छा; बेहोशी.
**ग़शी**-स्त्री. मूर्च्छा; बेहोषी.
**गश्त**-पु. (फा.) १ गस्त; पहारा. २ भ्रमण; दौरा.
**गश्ती**-पु. (फा.) गस्तवाला.
**गश्ती**-वि. (फा.) फिरणारा; हिंडणारा.
**गसना**-क्रि.स. (सं.) जखडणें; गांठविणें.
**गसीला**-वि. (सं.) दाट विणीचा; घट्ट जखडलेला.

**गस्सा**-पु. (सं.) घांस; ग्रास;

**गहँडिल**-वि. गढूळ पाणी.

**गहकना**-क्रि.अ. (सं.) सुखलाभ; आनंदित होणें.

**गहकोड़ा**-पु. (सं.+कोडा प्रत्यय) गिऱ्हाईक

**गहगड्ड**-वि. (सं.) भारी; घोर.

**गहगहा**-वि. (सं.) १ हर्षभरित; प्रफुल्लित. २ घमाघम; जोरानें (वाद्य इ. वाजविणें).

**गहगहाना**-क्रि.अ. (सं.) १ आनंदित होणें. २ घसघसीत पीक येणें.

**गहेगहे**-क्रिवि. (सं.) प्रफुल्लितपणें; हर्ष भरानें.

**गहन**-वि. (सं.) १ गहन; गंभीर; खोल. २ दुर्गम; निबिड. ३ कठीण; गहन.

**गहन**-पु. (सं.) १ खोलपणा; खोली. २ दुर्गमस्थान. ३ कुंज; निकुंज; एकांत स्थान. ४ दुःख. ५ हाल.

**गहन**-पु. (सं.) १ ग्रहण. २ कलंक; दोष. ३ विपत्ति; संकट. ४ गहाण.

**गहन**-स्त्री. (सं.) १ पकड. २ हट्ट; आग्रह.

**गहना**-क्रि.स. (सं.) पकडणें; धरणें.

**गहना**-पु. (सं.) १ दागिना; अलंकार. २ गहाण; तारण.

**गहनि**-स्त्री. (सं.) हट्ट; दुराग्रह.

**गहबर**-वि. (सं.) १ गहिंवरलेला; व्याकूळ. २ दुर्गम. ३ निमग्न.

**गहबरना**-क्रि.अ. (सं.) १ गहिंवरणें. २ घाबरणें; व्याकूळ होणें.

**गहर-गहरू**-स्त्री. (?) उशीर; विलंब.

**गहर**-वि. (सं.) गूढ; गहन.

**गहरा**-वि. (सं.) १ खोल; अथांग २ खोलगट. ३ पुष्कळ. ४ दृढ; मजबूत. ५ दाट; घट्ट.

**गहराना**-क्रि.अ. (सं.) खोल होणें.

**गहराना**-क्रि.स. (सं.) खोल करणें.

**गहराना**-क्रि.अ. (सं.) नाराज होणें; रुसणें.

**गहराव**-पु. (सं.) गहराई पहा.

**गहरे**-क्रिवि. (सं.) चांगल्या तऱ्हेनें; यथेच्छ.

**गहवा**-पु. (सं.) सांडशी.

**गहवारा**-पु. (सं.) पाळणा.

**गहाई**-स्त्री. (सं.) पकड.

**गहुआ**-पु. (सं.) सांडशी.

**गहेला**-वि. (सं.) १ हट्टी. २ मानी; घमेंडी. ३ मूर्ख; आडाणी. ४ पागल.

**गाँछना**-क्रि.स. (सं.) गुंफणें.

**गाँज**-पु. (फा.) रास; ढेर.

**गाँजना**–क्रि. ( सं.+फा. ) ढीग करणें; रचणें.

**गाँठ**–स्त्री. (सं.) गांठ.

**गाँठकट**–पु. (सं.) १ खिसेकापू. २ भामट्या; ठक.

**गाँठगोभी**–पु. ( सं. ) कोबीच्या कांद्याचा एक प्रकार; गड्डा कोबी.

**गाँठना**–क्रि.स. ( सं. ) १ गांठविणें. २ टांके मारणें; शिवणें. ३ सांधणें; जोडणें. ४ काम साधणें; मतलब साधणें. ५ वश करणें; गठविणें.

**गाँठी**–स्त्री. (.सं) १ एक दागिना. गाँठ पहा.

**गाँड**–स्त्री. (सं.) गांड; ढुंगण.

**गाँडा**–पु. (सं.) १ उंसाचा दांडका; गंडेरी. २ ऊंस. ३ झाडाच्या फांदीचा किंवा खोडाचा तुकडा; ओंडका.

**गाँथना**–क्रि.स. (सं.) १ गुंफणें. २ २ शिवणें.

**गाँवँ-गाँव**–पु. (सं.) गांव; खेडें.

**गाँस**–स्त्री. (सं.) १ रहस्य २ वैर; द्वेष. ३ अटकाव. ४ विरोध. ५ घडण; बनावट. ६ शस्त्राचें टोंक. ७ गांठ. ८ अधिकार. ९ देखरेख.

**गाँसना**–क्रि.स. (सं.) १ गुंफणें. २ टोंचणें; भोंक पाडणें. ३ ठांसून भरणें ४ नजरेमध्यें ठेवणें. ५ काबूंत ठेवणें.

**गाँसी**–स्त्री. (सं.) १ तीर अथवा भाल्याचें टोंक. २ गांठ. ३ कपट. ४ मनोमालिन्य.

**गाऊघप**–वि. १ लाट्यागंगाधर. २ खर्चीक; उधळ्या.

**गागर-गागरी**–स्त्री. (सं.) घागर.

**गाच**–पु. (अ.) जाळीदार कापड.

**गाछ**–पु. (सं.) १ रोपटें. २ वृक्ष.

**गाछी**–स्त्री. (सं.) १ कुंज; बाग. २ खजुराचे कोंब. ३ जनावराच्या पाठीवर लादण्याची थैली; पडशी.

**गाज**–स्त्री. (सं.) १ गर्जना; आरडा ओरड. २ विजेचा कडकडाट. ३ वीज.

**गाज**–पु. (अनु.) फेस.

**गाज**–स्त्री. (?) कांचेची बांगडी.

**गाजना**–क्रि.अ. (सं.) गर्जणें; ओरडणें.

**ग़ाज़ा**–पु. (फा.) फेस पावडर.

**ग़ाज़ी**–पु. (अ.) धर्मयोद्धा; वीर.

**गाड़**–स्त्री. ( सं. ) १ खड्डा. २ धान्याचें पेंव. ३ शेताचा बांध.

**गाड़ना**–क्रि.अ. (सं.) १ गाडणें; पुरणें. २ खिळा वगैरे ठोकणें. ३ गुप्त राखणें; लपविणें.

**गाडर**–स्त्री. भेंड पहा.

**गाड़ा**–पु. ( सं. ) १ खड्डा. २ खंदक.

**गाड़ा**-पु. (सं.) गाडा; बैलगाडी.

**गाड़ी**-स्त्री. ( सं. ) गाडी.

**गाढ**-वि. (सं.) १ अतिशय; अधिक. २ दृढ; मजबूत. ३ घन; घट्ट; खोल; अथांग. ५ बिकट; कठिण.

**गाढ**-पु. (सं.) १ संकट; विपत्ति. २ माग.

**गाढा**-वि. (सं.) १ घट्ट; दाट. २ घट्ट विणीचा. ३ प्रचंड. ४ कठिण; बिकट.

**गाढा**-पु. ( सं. ) १ जाडें भरडें कापड. २ मस्त हत्ती.

**गाढ़ें**-क्रिवि. ( सं. ) १ चांगल्या प्रकारें. २ दृढता पूर्वक.

**गात**-पु. (सं.) गात्र.

**गाता**-पु. (सं.) गवई.

**गाती**-स्त्री. (सं.) संन्याश्याच्या छाटी-प्रमाणें वस्त्र नेसण्याची पद्धत.

**गाद**-स्त्री. (सं.) १ तळाचा गाळ. २ तेलाची मळी. ३ गोंद वगैरे चिकट पदार्थ.

**गादड़**-वि. (सं.) भित्रा.

**गादड़**-पु. १ अडेल बैल. २ मेंढा.

**गादड़**-स्त्री. गीदड पहा.

**गादर**-वि. गादड़ दहा.

**गादा**-पु. (सं.) अर्धवट पिकलेलें पीक.

**गादुर**-पु. (सं.) चमगादड़ पहा.

**गाध**-पु. (सं.) १ स्थान; जागा. २ पाण्याचा ठाव. ३ नदीचा प्रवाह. ४ लोभ.

**गाध**- वि. ( सं. ) १ उथळ. २ स्वल्प; थोडें.

**गाना**-पु. (सं. ) गाणें.

**गाना**-क्रि.स. (सं.) गाणें.

**गाफ़िल**-वि. (अ.) गाफील.

**गाभिन--गाभिनी**-स्त्री. ( सं. ) गाभण; गाभणी.

**गायत**-वि. (अ.) अत्यंत; अधिक.

**गायताल**-पु. १ निकृष्ट प्रतीचा बैल; निकामी जनावर. २ निरुपयोगी वस्तू.

**गायताल**-वि. रद्दी; निकामी.

**गायन**-पु. ( सं. ) १ गवई. २ गायन; गाणें.

**गायब**-वि. (अ.) बेपत्ता; लुप्त.

**गायबाना**-क्रिवि. (अ.) १ गुप्त रीतीनें. पश्चात्; पाठीमागें; अनुपस्थितींत; परोक्ष.

**गार**-स्त्री. शिवी.

**गारत**-वि. (अ.) गारद; नष्ट; ध्वस्त.

**गारद्**-स्त्री. ( इं. ) १ शिपायांची पलटण. २ पाहरा; गार्ड.

**गारना**-क्रि.स. (सं.) १ गाळणें; रस पिळणें; उगाळणें. ३ त्यागणें; दूर करणें. ४ नष्ट करणें.

**गारा**-पु. (सं.) गिलावा.

**गारा**-पु. (दे.) पाणी जास्त दिवस न राहणारी उताराची जमीन.

**गारी**-स्त्री. ( सं. ) १ शिवी. २ नांवाला काळोखी फासण्याजोगा दोषारोप. ३ विवाह प्रसंगी गाण्याचें एक गीत.

**गारुडि-गारुडी**-पु. ( सं. ) १ गारुडी. २ सर्पाचा मांत्रिक.

**गारो**-पु. (सं.) १ गर्व; अभिमान. २ मान; प्रतिष्ठा.

**गालगूल**-पु. ( सं. ) अवाच्या सवा गप्पा; वटवट.

**गाला**-पु. कापसाचा बेळू.

**गाला**-पु. १ वटवट करण्याची सवय; तोंडाळपणा २ घास.

**गालिब**-वि. (अ.) श्रेष्ठ; विजयी.

**गालिम**-वि (अ.) बलवान; प्रबल.

**गाली**-स्त्री. ( सं. ) १ शिवी. २ कलंक; दोषारोप.

**गालीगलौज**-स्त्री. (स.+अनु.) १ शिवीगाळ; बाचाबाची. २ शिवी.

**गाव**-पु. (फा.) गाय; बैल.

**गावकुशी**-स्त्री. (फा.) गोवध.

**गावकुस**-पु. लगाम.

**गावखाना**-पु. (फा.) गोशाळा.

**गावखुर्द**-वि. ( फा. ) १ बेपत्ता; गायब. २ नष्ट; ध्वस्त.

**गावजोरी**-स्त्री. (फा.) १ शिरजोरी; गुंडपणा. २ हाणामारी.

**गावड**-स्त्री. (सं.) गळा.

**गावतकिया**-पु. (फा.) मोठा तक्या.

**गावदी**-वि. (स.) मठ्ठ; ठोंब्या; आडाणी.

**गावदुम**-वि. (फा.) निमुळता.

**गावल**-पु. दलाल.

**गावली**-स्त्री. दलाली.

**गास**-पु. (सं.) संकट; विपत्ति.

**गाह**-पु. (सं;) १ गहन. २ मर्मज्ञ.

**गाह**-पु. (सं.) १ मगर. २ पकड.

**गाहक**-पु. (सं.) ग्राहक.

**गाहकी**-स्त्री. (सं.) विक्री.

**गाहकताई**-स्त्री. (सं.) गुणग्राहकता.

**गाहन**-पु. (सं.) बुडी मारण्याची क्रिया; स्नान.

**गाहना**-क्रि.स. ( सं. ) १ बुडी मारणें. २ मंथन करणें. ३ पकडणें.

**गाहा**-स्त्री. ( सं. ) कथा; वृत्तान्त; वर्णन.

**गिंजना**-क्रि. (अ.) सुरकुतणें; चोळामोळा होणें.

**गिंदुरी**-स्त्री. इँडुरी पहा.

**गिचपिच-गिचिर--पिचिर**-वि. (अनु.) १ क्रमवार नसलेला; २ सरमिसळ. ३ अस्पष्ट; गिचमिड.

**गिजगिजा**-वि. (अनु.) १ गिळगिळित. २ लिबलिबित.

**गिज़ा**-स्त्री. ( फा. ) खाण्याजोगा; खाद्यपदार्थ.

**गिटपिट**-स्त्री. (अनु.) वटवट; बडबड.

**गिट्टक**-स्त्री. (सं.) चिलमींतील खडा.

**गिट्टा**-पु. ( सं. ) १ चिलमींतील खडा. २ खडा.

**गिट्टी**-स्त्री. (सं.) १ खडी. २ खापराचे तुकडे. ३ चिलमींतील खडा.

**गिड़गिड़ाना**-क्रि.अ. (अनु.) अत्यंत नम्रतेनें विंनति करणें.

**गिड़गिड़ाहट**-स्त्री. (अनु.) अत्यंत नम्र विंनति.

**गिड्डा**-वि. (दे.) ढेंगणा; ठेंगू; खुजा.

**गिनगिनाना**-क्रिअ. ( अनु. ) १ अतिशय जोर लावल्यानें शरीर कंप पावणें; रोमांचित होणें.

**गिंनगिनाना**-क्रि. (सं.) पकडून गरगरां फिरविणें.

**गिनती**-स्त्री. (सं.) गणती.

**गिनना**-क्रि.स. (सं.) गणणें.

**गिन्नी**-स्त्री. ( सं. ) फिरविण्याची क्रियाः चक्कर.

**गिरगिट, गिरगिटान**-पु. (सं.) सरडा.

**गिरदा**-पु. (फा.) १ घेरा; चक्कर. २ गोल तक्या. ३ लाकडाची थाळी. ४ ढाल; फरी.

**गिरदान**-पु. गिरगिट पहा.

**गिरना**-क्रि.अ. (सं.) पडणें; ओघळणें.

**गिरफ्त**-स्त्री. ( फा. ) १ पकड. ताबा. २ पकडण्याची क्रिया.

**गिरफ्तार**-वि. (फा.) गिरफदार; पकडलेला.

**गिरवान**-पु. (सं.) देव; देवता.

**गिरवान**-पु. (फा.) १ गळपट्टी; कॉलर. २ गळा.

**गिरवी**-वि. (फा.) गहाण.

**गिरह**-स्त्री. (फा.) १ गांठ. २ खिसा. ३ पेर; जोड. २ सव्वा दोन इंचांचें एक माप. ५ कोलांटी.

**गिरहकट**-पु. ( फा.+सं. ) खिसे कापू.

**गिरहदार**-वि. (फा.) गांठीगांठीचा.

**गिरहबाज़**-पु. ( फा. ) कोलांट्या उडया घेत उडणारें कबूतर.

**गिरहर**-वि. (सं.) पतनोन्मुख.

**गिराँ**-वि. (फा.) १ महाग; मूल्यवान. २ जड; भारी. ३ अप्रिय; वाईट.

**गिराना**-क्रि.स. (सं.) पाडणें.

**गिरानी**-स्त्री. (फा.) १ महागाई. २ दुष्काळ. ३ अभाव; कमतरता.

**गिरी**-स्त्री. (सं.) गर.

**गिरो**-पु. गिरवा पहा.

**गिर्गिट**-पु. गिरगिट पहा.

**गिर्द**-अव्य. (फा.) आसपास; भोंवती.

**गिल**-स्त्री. (फा.) १ माती. २ गिलावा.

**गिल**-पु. (सं.) १ मगर. २ जंबीरी लिंबू. ३ भक्षण करणारा; भक्षक.

**गिलकार**-पु. (फा.) १ गिलावा करणारा; गवंडी.

**गिलकारी**-स्त्री. (फा.) गिलाव्याचें काम.

**गिलट**-पु. (इं.) १ गिलिट. २ सोन्याचा मुलामा देण्याचें काम.

**गिलटी**-स्त्री. (सं.) १ सांध्यांतील गांठ. २ प्लेगची गांठ.

**गिलना**-क्रि.स. (सं.) गिळणें.

**गिलाबिला**-वि. (अनु.) अत्यंत कोमल; अत्यंत नाजूक.

**गिलबिलाना**-क्रि.अ. (अनु.) कुजबुजणें.

**गिलम**-स्त्री. (फा.) १ लोंकरीचा मऊ गालीचा. २ जाड व मऊ बिछाना.

**गिलम**-वि. (फा.) मऊ; नरम; कोमल.

**गिलसुर्ख**-स्त्री. (फा.) गेरू.

**गिलहरी**-स्त्री. (सं.) खार (प्राणी).

**गिला**-पु. (फा.) १ तक्रार. २ निंदा; कागाळी.

**गिलाई**-स्त्री. गिलहरी पहा.

**गिलाफ़**-पु. (अ.) १ खोळ. २ मोठी रजई. ३ म्यान.

**गिलाय**-स्त्री. गिलहरी पहा.

**गिली**-स्त्री. गिल्ली पहा.

**गिलोला**-पु. (फा.) गोफणीनें मारावयाचा मातीचा गोळा.

**गिलौरी**-स्त्री. (दे.) अनेक पानांचा विडा.

**गिलौरीदान**-पु. (दे.+फा.) पानदान.

**गिल्टी**-स्त्री. गिलटी पहा.

**गिल्ला**-पु. गिला पहा.

**गिल्ली**-स्त्री. गुल्ली पहा.

**गींजना**-क्रि. (सं.) चुरगळणें; कुस्करणें.

**गींव**–स्त्री. (सं.) गळा.

**गीदड, गीदर**–पु. (सं.) कोल्हा.

**गीदड़**–वि. (सं.) भित्रा.

**गीदी**–वि. (फा.) भित्रा.

**गीधना**–क्रि.अ. (सं.) चटावणें; लालचावणें.

**गीबत**–स्त्री. (अ.) १ अनुपस्थिति; चुगलखोरी.

**गीला**–वि. (सं.) ओला.

**गुंग-गुंगा**–वि. गूँगा पहा.

**गुंगी**–स्त्री. दुतोंडया साप.

**गुंगी**–वि. (स्त्री.) गूँगा; गूँगी पहा.

**गुंगुआना**–क्रि.अ. (अनु.) १ धुमसणें; जाळ नीट न होणें. २ गेंगाणें बोलणें.

**गुंचा**–पु. (अ.) १ कळी. २ नाचरंग.

**गुंची**–स्त्री. घुंघची पहा.

**गुंज**–स्त्री. (सं.) १ गुंजारव. २ गुंज ३ सोन्याचा गोफ.

**गुंजा**–स्त्री. (सं.) गुंज.

**गुंजाइश**–पु. (फा.) १ जागा; अवकाश. २ सोय.

**गुंजान**–वि. (फा.) घन.

**गुंटा**–पु. (दे.) लहान सरोवर.

**गुंटा**–पु. ठेंगण्या जातीचा घोडा.

**गुंठा**–वि. (दे.) ठेंगणा; ठेंगु.

**गुंड**–वि. दळलेला; कुटलेला.

**गुंडई**–स्त्री. (सं.) गुंडगिरी.

**गुंडली**–स्त्री. १ फेटा. २ चुंबळ.

**गुंडा**–वि. (सं.) बदमाष; गुंड.

**गुंडा**–पु. (सं.) गुंड.

**गुंडी**–स्त्री. गेंडुरी पहा.

**गुँधना**–क्रि.स. (सं.) मळणें; तिंबणें.

**गुँधना**–क्रि.अ. (सं.) १ गुंफणें. २ गुंतणें; गुंतागुंत होणें.

**गुंफ**–पु. (सं.) १गुंतडा; गुंतागुंत. २ गुच्छ. ३ दाढी. ४ कल्ला.

**गुंफन**–पु. (सं.) गुंतागुंत.

**गुंबज-गुंबद**–पु. (फा.) देवळाचा गोल घुमट.

**गुंबा**–पु. (सं.) टेंगुळ.

**गुंभी**–स्त्री. (सं.) अंकुर.

**गुआ**–पु. (सं.) १ सुपारी. २ चिकण सुपारी.

**गुआर-गुआरी**–स्त्री. (सं.) गवार.

**गुइयाँ**–पु. (स्त्री.) मित्र; साथी; मैत्रीण.

**गुगानी**–स्त्री. (दे.) पाण्यावरील तरंग.

**गुगुलिया**–पु. (अनु.) माकडाचा खेळ करणारा.

**गुच्ची**–स्त्री. (अनु.) १ लहान खळगा. २ विटीदांडूच्या खेळांतील गल.

**गुच्ची**–वि.स्त्री. (अनु.) लहान.

**गुच्चीपारा--पाला**–पु. गलीमध्यें कवडया फेंकण्याचा खेळ.

**गुच्छ-गुच्छक**–पु. (सं.) १ गुच्छ. २ गवताची पेंढी. ३ झुडुप. ४ मोराचा पिसारा. ४ मोत्यांचा हार. ६ बत्तीस पदरी हार.

**गुच्छा**–पु. (सं.) गुच्छ.

**गुज़र**–पु. (फा.) १ गुजराण. २ गति; पोहोंच.

**गुज़रगाह**–पु. (फा.) १ मार्ग; रस्ता. २ नदीचा घाट.

**गुज़रना**–क्रि.अ. (फा.) १ गुजरणें. २ एखाद्या ठिकाणावरून पुढें जाणें. ३ निर्वाह होणें; निभणें. ४ नदीपार होणें.

**गुजरबसर**--पु. (फा.) गुजराण; उदरनिर्वाह.

**गुजरिया-गुजरेटी**–स्त्री. (सं.) १ गुजराती स्त्री. २ गवळण; गोपी.

**गुजश्ता**–वि. (फा.) व्यतीत; भूतकालीन; मागचा.

**गुजारना**–क्रि.स. (फा.) गुजारणें.

**गुजारिश**–स्त्री. (फा.) निवेदन.

**गुजी**–सं. मेकूड.

**गुटका**–पु. (सं.) २ गुटिका. २ लहान आकाराचें पुस्तक.

**गुटरगूँ**–स्त्री. (अनु.) कबुतरांचें घुमणें.

**गुट्ट**–पु. (सं.) १ समूह; झुंड. २ गट; कंपू.

**गुट्ठल**–वि. (स.) १ मोठी कोय किंवा बी असलेलें फळ. २ मठ्ठ; मूर्ख; ठोंब्या. ३ कोयीच्या आकाराचा.

**गुट्ठल**–पु. (सं.) १ गुठळी. २ प्लेगची गांठ.

**गुठली**–स्त्री. (सं.) १ कोय. २ फळांतील बी.

**गुडंबा**–पु. (सं.) गुळांबा.

**गुड**–पु. (सं.) गूळ.

**गुडगुडाहट**–स्त्री. (अनु.) गुडगुड आवाज.

**गुडगुडी**–स्त्री. (अनु.) गुडगुडी; हुक्का.

**गुडधानी-गुडधानिया**–स्त्री. (सं.) गहूं भाजून गुळाच्या पाकांत केलेले लाडू.

**गुडाखू**–पु. गुडाखू; हुक्क्याचा तंबाखू.

**गुडिया**–स्त्री. (सं.) चिंध्यांची बाहुली.

**गुनी**–स्त्री. (सं.) पतंग.

**गुड़ी**–स्त्री. (सं.) १ गांठ; गोळी. २ द्वेष; आकस.

**गुड्वा**–पु. (सं.) कापडाचा पुतळा.

**गुड्डा**–पु. (सं.) कापडाचा पुतळा. २ मोठा पतंग; वावडी.

**गुड्डी**-स्त्री. (सं.) १ पतंग. २ गुडघ्याचें हाड.

**गुणकार**-पु. (सं.) १ संगीतज्ञ. २ आचारी. ३ पाकशास्त्र निपुण.

**गुत्थमगुत्था**-पु. (सं.) १ गुंतागुंत. २ हातघाई; मारामारी.

**गुत्थी**-स्त्री. (सं.) गुंतडा.

**गुत्स**-पु. (सं.) गुच्छ.

**गुथना**-क्रि.अ. (सं.) १ गुंफले जाणें. २ गुंतागुंत होणें. ३ कुस्तींत एकमेकांना पकडून ठेवलें जाणें.

**गुदकार-गुदुकारा**-वि. (सं.) १ गर असलेला; भरलेला. २ मांसल; गुबगुबीत.

**गुदगुदा**-वि. (सं.) मांसल; मऊ; गुबगुबीत.

**गुदगुदाना**-क्रि.अ. (सं.) १ गुदगुदल्या करणें. २ विनोद करणें; हंसविणें. ३ उत्कंठित करणें; मनांत गुदगुल्या उत्पन्न करणें.

**गुदगुदी**-स्त्री. (सं.) गुदगुली.

**गुदडी**-स्त्री. (सं.) गोधडी.

**गुदडीबाजार**-पु. चोरबाजार; जुना बाजार.

**गुदरानना**-क्रि.स. (फा.) १ निवेदन करणें; समोर ठेवणें. २ भेट देणें; नजर करणें. ३ कथन करणें; हकीगत सांगणें.

**गुदरिया-गुदरी**-स्त्री. (सं.) गोधडी.

**गुदा**-स्त्री. (सं.) गुदद्वार.

**गुदाना**-क्रि.स. (सं.) गोंदविणें.

**गुदार**-पु. (फा.) १ गरदार. २ मांसल.

**गुदी**-स्त्री. (दे.) गोदी.

**गुद्दा**-पु. १ गुदा पहा. २ झाडाची जाड फांदी.

**गुद्दी**-स्त्री. (सं.) १ फळांतील बीच्या मधला गर. २ डोक्याच्या मागला भाग. ३ तळहातावरील मांस.

**गुनगुना**-वि. (अनु.) १ गेंगाण्या; नाकांत बोलणारा. २ कोमट.

**गुनगुनाना**-क्रि.अ. (अनु.) १ गुणगुणणें. २ नाकांत बोलणें.

**गुनहगार**-वि. (फा.) १ गुन्हेगार २ पापी; अपराधी.

**गुनही**-पु. (फा.) गुन्हेगार; अपराधी.

**गुना**-पु. (सं.) पट; आवृत्ति; गुणिलें (उदा. दुगुना-दुप्पट).

**गुनाह**-पु. (फा.) गुन्हा.

**गुनाहा**-पु. (फा.) गुन्हेगार.

**गुनिया**-पु. (सं.) गुणवान; गुणी.

**गुनिया**-स्त्री. गुण्या.

**गुनी**-वि. (सं.) गुणी.

**गुप्फा**-पु. (सं.) गुच्छ.

**गुफा**–स्त्री. (सं.) गुहा.

**गुफ्तगू**–स्त्री. (फा.) बातचीत; चर्चा.

**गुबरैला**–पु. (सं.) शेणकिडा.

**गुबार**–पु. (अ.) १ धूळ. २ मनांत तुंबून राहिलेला द्वेष; राग; त्वेष, दु:ख इत्यादि.

**गुब्बारा-गुबारा**–पु. (अ.) फुगा.

**गुम**–वि. (फा.) १ हरवलेला. २ गुप्त; अप्रकट. ३ अप्रसिद्ध.

**गुमटा**–पु. (सं.) टेंगुळ.

**गुमना**–क्रि.अ. (फा.) हरवणें.

**गुमनाम**–वि. (फा.+सं.) अप्रसिद्ध; अज्ञात.

**गुमर**–पु. (फा.) १ अभिमान; घमेंड. २ दीर्घ द्वेष; अढी. ३ कुजबुज; कानगोष्ट.

**गुमराह**–वि. (फा.) १ कुपथगामी. २ वाट चुकलेला.

**गुमराही**–स्त्री. (फा.) १ भूल; भ्रम. २ कुमार्ग.

**गुमान**–पु. (फा.) १ अनुमान; कयास. २ घमेंड; गर्व.

**गुमाना**–क्रि.स. (फा.) हरवणें; गमावणें.

**गुमानी**–वि. (फा.) गर्विष्ठ; घमेंडी.

**गुमाश्ता**–पु. (फा.) गुमास्ता.

**गुमिटना**–क्रि.अ. (सं.) लपेटलें जाणें.

**गुमेटना**–क्रि.स. (सं.) लपेटणें.

**गुम्मठ**–पु. (फा.) घुमट.

**गुम्मा**–पु. (दे.) मोठी वीट.

**गुरंबा**–पु. गुळांबा.

**गुर**–पु. (सं.) १ मूलमंत्र. २ गूळ. ३ सार; मख्खी.

**गुरगा**–पु. (सं.) १ चेला; शिष्य. २ नोकर. ३ गुप्तचर; गुप्तहेर.

**गुरचो**–स्त्री. (सं.) सुरकुती; वळी.

**गुरदा**–पु. (फा.) १ यकृत. २ हिम्मत; साहस.

**गुरवा**–वि. (सं.) गर्विष्ठ.

**गुराई**–स्त्री. गोराई पहा.

**गुरिया**–स्त्री. (सं.) १ मणी. २ मणका. ३ कापलेला गोल किंवा चौकोनी तुकडा.

**गुरुआइन**–स्त्री. (सं.) १ गुरुपत्नी. २ शिक्षिका.

**गुरुआई**–स्त्री. (सं.) १ गुरूचें कर्तव्य किंवा धर्म. २ चलाखी; धूर्तता.

**गुरेरना**–क्रि.स. (सं.) १ गुरगुरणें; डोळे वटारून बघणें.

**गुरेरा-गुरेला**–पु. (फा.) गोफणींतील दगड.

**गुर्ज़**–पु. (फा.) १ गदा; सोटा. २ बुरूज.

**गुर्राना**-क्रि.अ. (अनु.) गुरगुरणें.

**गुर्विणी**-स्त्री. (सं.) गर्भार स्त्री.

**गुल**-पु. (फा.) १ फूल गुलाबाचें. २ गालावरील खळी. ४ वण; चट्टा. ५ दिव्यांतील वातीचा जळका भाग. ६ पायतणाची खोट ७ बुबुळ. ८ निखारा. ९ नायिका; सुंदरी.

**गुल**-पु. (दे.) १ हलवायाची भट्टी. २ शेताच्या बांधावरून नेलेला पाण्याचा पाट. ३ कनवटी.

**गुल**-पु. (फा.) गलबला.

**गुलअब्बास**-पु. (फा.) गुलबाशीचें फूल.

**गुलकारी**-स्त्री. (फा.) वेलबुट्टीचें काम; नक्षी काम.

**गुलगपाड़ा**-पु. गलबला; आरडा-ओरड; कल्लोळ.

**गुलगुल**-वि.(सं.)नरम;मऊ;कोमल.

**गुलगुलाना**-क्रि. (सं.) दाबून दाबून मऊ करणें; (आंबा) घोळणें.

**गुलगोथना**-पु. गलेलठ्ठ; थुलथुलित अंगाचा.

**गुलचला**-पु. तोफ चालविणारा; गोलंदाज.

**गुलचा**-पु. (सं.) गालगुच्चा; प्रेमळ पणानें गालावर मारलेली चापटी.

**गुलचाना--गुलचियाना**-क्रि. स. (सं.) गालगुच्चा घेणें.

**गुलछरी**-पु. स्वैर व स्वच्छंद भोग-विलास.

**गुलज़ार**-पु. (फा.) बागबगीचा.

**गुलज़ार**-वि. (फा.) सुंदर; रम्य; शोभिवंत.

**गुलझटी-गुलझडी**-स्त्री. (सं.) १ गुंतडा. २ सुरकुत्या.

**गुलत्थी**-स्त्री. पातळ व मऊ भात; गुरगुरीत भात.

**गुलदस्ता**-पु. (फा.) फुलांचा गुच्छ.

**गुलदान**-पु. (फा.) फुलदाणी.

**गुलदुम**-पु. (फा.) बुलबुल पक्षी.

**गुलनार**-पु. (फा.) १ डाळिंबाचें फूल. २ डाळिंबी रंग. ३ नुसतीं फुलें येणारें डाळिंबाचें झाड.

**गुलबकावली**-स्त्री. (फा.) बका-वलीचें फूल.

**गुलमा**-पु. टेंगूळ.

**गुलमेख**-पु. (फा.) खिळा.

**गुलशन**-पु. (फा.) बाग.

**गुलशब्बो**-पु. (फा.) १ रातराणीचें फूल; रातराणीचें झाड. २ अंधारांत एकमेकांस चापट मारण्याचा खेळ.

**गुलाबजामुन**-पु. (फा.+सं.) गुलाब जाम.

**गुलाबपाश**-पु. (फा.) गुलाबदाणी.

**गुलाबाँस**-पु. गुलअब्बास पहा.

**गुलिस्ताँ**-पु. (फा.) बाग.

**गुली**-स्त्री. गुल्ला पहा.

**गुलूबंद**-पु. (फा.) गळपट्टा.

**गुलेल**-स्त्री. (फा.) गिलोल.

**गुलेला**-पु. (फा.) १ गिलोलींतून मारण्याची मातीची गोळी. २ गिलोल.

**गुलौर-गुलौरा**-पु. गूळ बनविण्याचा कारखाना.

**गुल्फ**-पु. (सं.) घोटा.

**गुल्लक**-पु. गल्ल्याची पेटी.

**गुल्ला**-पु. (फा.) १ गिलोरीनें मारावयाची मातीची गोळी. २ एक बंगाली मिठाई (रसगुल्ला).

**गुल्ला**-पु. (फा.) गलबला; गलका.

**गुल्ला**-पु. गंडेरी.

**गुल्ली**-स्त्री. (सं.) १ फळांतलि बी; अठीळ. २ कसलाही लांबट व गोल तुकडा. ३ विटी. ४ केवडयाचें फूल. ५ गंडेरी. ६ फांसा.

**गुसल**-पु. गुस्ल पहा.

**गुसाँई**-पु. (सं.) गोसावी.

**गुसा**-गुस्सा पहा.

**गुस्ताख**- वि. (फा.) धृष्ट; अशिष्ट; अमर्यादशील; बेअदबी.

**गुस्ल**-पु. (अ.) स्नान.

**गुस्लखाना**-पु. (अ.) स्नानगृह.

**गुस्सा**-पु. (अ.) घुस्सा; राग; क्रोध.

**गुस्सैल**-वि. (अ.) रागीट.

**गुहना**-क्रि.स. (सं.) गुंफणें.

**गुहराना**-स्त्री. (सं.) हांकारणें; पुकारणें.

**गुहांजनी**-स्त्री. (सं.) रांजणवाडी.

**गुहार-गुहारी**-स्त्री. (सं.) रक्षणाकरितां आरोळी; धावा; करुण हांक.

**गुहाल**-पु. (सं.) गोशाळा.

**गूँगा**-वि. (फा.) मुका.

**गूँगी**-पु. (स्त्री.) मुकी.

**गूँज**-स्त्री. (सं.) १ गुंजारव. २ प्रतिध्वनि. ३ भोवऱ्याची आरी.

**गूँजना**-क्रि.अ. (सं.) १ घुमणें; दुमदुमणें. २ प्रतिध्वनि होणें. ३ भुंग्यांचा गुंजारव होणें.

**गूँथना**-क्रि. (सं.) गूथना पहा.

**गूँधना**-क्रि.स. (सं.) गळणें; तिंबणें.

**गूँधना**-क्रि.स. (सं.) गुंफणें.

**गूझा**-पु. १ मोठी करंजी. २ गर. ३ फळांतील रेषा.

**गूथना**-क्रि.स. (सं.) १ गुंफणें. २ शिवणें; गांठविणें.

**गूद**-पु. (सं.) गर.

**गूद**-पु. (सं.) १ खड्डा; गर्ता. २ खोल चिन्ह (जखमेचें); वण.

**गूदड़**-पु. (सं.) फटकूर.

**गूदा**-पु. (सं.) १ गर. २ मगज; मेंदू. ३ सार भाग.

**गून**–स्त्री. ( सं. ) नाव ओढण्याचा दोर.

**गूमडा**–पु. (सं.) टेंगूळ.

**गूमना**–क्रि. (सं.) मळणें; तिंबणें.

**गूलर**–पु. (सं.) १ औदुंबराचें झाड. २ उंबराचें फळ.

**गूह**–पु. (सं.) विष्ठा; गू.

**गूहाँचनी**–स्त्री. गूहांजनी पहा.

**गूहाछीशी**–१ छी थू; बदनामी. २ शिव्यागाळीचें भांडण.

**गृहस्थी**–स्त्री. (सं.) १ गृहस्थाश्रम; घरदार; गृहव्यवस्था. ३ कुटुंब; मुलेंबाळें. ४ घरांतील सामान.

**गृही**–पु. (सं.) गृहस्थ; गृहस्थाश्रमी.

**गेंडना**–क्रि.स. (सं.) १ शेताभोंवती कुंपण घालणें. २ घेरणें.

**गेंडली**–स्त्री.(सं.) १ फेटा; २ वेटोळें

**गेंडा**–पु. (सं.) १ उंसाच्या वरचीं पानें. २ उंस. ३ उंसाची गंडेरी. ४ उंसाचीं वाडें. ५ दगडाची ऐरण. ६ गेंडा.

**गेंडु-गेंडुक**–पु. (सं.) चेंडू.

**गेंडुआ**–पु. (सं.) १ तक्या. २ उसें. ३ मोठा चेंडू.

**गेंडुरी-गेंडुली**–स्त्री. (सं.) १ चुंबळ २ फेटा. ३ सापाचें वेटोळें.

**गेंद**–पु. (सं.) चेंडु.

**गेंदई**–वि. (सं.) पिवळसर.

**गेंदघर**–पु. (सं) १ जिमखाना. २ बिलियर्ड रूम.

**गेंदतड़ी**–स्त्री. (सं.+अनु.) रप्पारप्पीचा खेळ.

**गेंदबल्ला**–पु. (सं.) चेंडुफळी.

**गेंदवा**–पु. (सं.) तक्या.

**गेंदा**–पु. (सं.) झेंडू.

**गेंदुवा**–पु. गेंदवा पहा.

**गेगला**–वि. (दे.) बावळट.

**गेड़ना**–क्रि.स. (सं.) १ मंडलाकार रेघ मारणें. २ प्रदक्षिणा घालणें; भोंवती फिरणें. ३ घेरणें; वेढणें.

**गेदा**–पु. ( सं. ) पंख न फुटलेलें पांखरू.

**गेरना**–क्रि अ. (सं.) १ टाकणें. २ सांडणें. ३ लवंडणें.

**गेरना**–क्रिस. (सं.) १ भोंवती फिरणें; प्रदक्षिणा घालणें. २ घेरणें.

**गेरांव**–पु. ( फा. ) दाव्याचा गळयाभोंवतींचा भाग.

**गेरूआ**–वि. (सं.) भगवा; गेरूच्या रंगाचा.

**गेह**–पु. (सं.) घर.

**गेहनी**–स्त्री. (सं.) गृहिणी.

**गेही**–पु. (सं.) गृहस्थ.

**गेहुआँ**–वि. (सं.) गव्हाच्या रंगाचा; बदामी.

**गेहूँ**–पु. (सं.) गहू.

**गेंडा**–पु. (सं.) गेंडा.

**गैंती**–स्त्री. (दे.) कुदळ.

**गैना**–पु. (सं.) ठेंगण्या जातीचा बैल.

**गैब**–पु. (अ.) अपरोक्षता; अदृश्यता. –वि. भविष्य; अदृश्य.

**गैबी**–वि. (अ.) १ गुप्त; अज्ञात.

**गैया**–स्त्री. (सं.) गाय.

**ग़ैर**–वि. (अ.) १ अन्य; दुसरा. २ परका.

**गैर**–स्त्री. (फा.) अत्याचार; जुलुम.

**ग़ैरत्**–स्त्री. (अ.) लज्जा; शरम.

**गैरमनकूला**–वि. (अ.) स्थिर; अचल; स्थावर.

**गैरमामुली**–वि. (अ.) असाधारण.

**ग़ैरमुनासिब**–वि. (अ.) अनुचित; अयोग्य.

**ग़ैरमुमकिन**–वि. (अ.) असंभाव्य.

**ग़ैरवाजिब**–वि. (अ.) गैरवाजवी; अयोग्य; अनुचित.

**गैरहाज़िर**–वि. (अ.) गैरहजर.

**गैरिक**–पु. (सं.) १गेरू; काव. २ सोनें.

**गैल**–पु. (सं.) रस्ता; मार्ग.

**गैला-गैलारा**–पु. (सं.) १ चाकोरी. २ गाडी रस्ता.

**गोंइँठा**–पु. (सं.) गोंवरी.

**गोंइँया**–पु. स्त्री. गोइयाँ पहा.

**गोंई**–स्त्री. (सं.) बैल जोडी..

**गोंछ**–स्त्री. कल्ले.

**गोंट**–स्त्री. (सं.) धोतराचा कमरे-भोंवती गुंडाळण्याचा भाग.

**गोंडना**–क्रि.स. (सं.) १ टोंक बोथट करणें; टोंक मुडपून बोथट करणें. २ करंजीची पाळ मुडपणें.

**गोंठनी**–स्त्री.(सं.) कातणें (करंज्यांचें).

**गोंडला**–पु. (सं.) १ कडें. २ वर्तुळ.

**गोंडरी**–स्त्री. (सं.) १ कडें. २ चुंबळ.

**गोंडला**–पु. (सं.) वर्तुळ.

**गोंड़ा**–पु. (सं.) १ आवार; गोठा. २ मोहल्ला. ३ खेडें. ४ वाडी. ५ मोठा रुंद रस्ता. ६ अंगण; चौक.

**गोंद्**–पु. (सं.) गोंद; डिंक.

**गो**–पु. (सं.) गाय. २ इंद्रिय. ३ वाणी; वाचा. ४ दृष्टी. ५ माता. ६ दुभतीं जनावरें.

**गो**–अव्य. (फा.) यद्यपि; जरी.

**गोइँठा**–पु. (सं.) गोंवरी.

**गोइंदा**–पु. (फा.) हेर.

**गोइयाँ**–पु. (स्त्री.) मित्र; साथी; सहचर; दुकंगडी.

**गोऊ**-वि. ( सं. ) चोरणारा; लपविणारा.

**गोकुल**-पु. (सं.) १ गायींचा समूह. २ गोशाळा. ३ गोकुल.

**गोरखा**-पु. (सं.) झरोका.

**गोज़**-पु. ( फा. ) अपान वायु.

**गोजा**-पु. ( सं. ) १ शिमटी. २ अंकुर; कोंब.

**गोजी**-स्त्री. ( सं. ) १ शिमटी. २ लाठी.

**गोजीत**-वि. ( सं. ) जितेंद्रिय.

**गोझनवट**-पु. (दे.) पदर. (लुगड्याचा).

**गोझा**-पु. (सं.) १ करंजी. २ खिसा.

**गोट**-स्त्री. (सं.) गोट; कांठ.

**गोट**-पु. (सं.) गांव; २ खेडें.

**गोट**-स्त्री. (सं.) मंडळ; जमात. २ सहल; सफर.

**गोठ**-स्त्री. (सं.) सोंगटी; गोटी.

**गोटा**-पु. (सं.) १ लेस; कांठ. २ लेंडी; सुखलेली विष्टा.

**गोटी**-स्त्री. (सं.) १ गोटी. २ सोंगटी ३ फायद्याची बाब. ४ युक्ति; उपाय.

**गोठ**-स्त्री. (सं.) १ गोशाळा; गोठा. २ श्राद्धकर्म. ३ सफर; सफल.

**गोठिल**-वि. (सं.) बोथट.

**गोड़**-पु. (सं.) पाय.

**गोड़इत**-पु; (सं.) १ गांवचा पहारेकरी. २ टपाल पोंचविणारा.

**गोड़ना**-क्रि.स. (सं.) खणणें; खुरपणें; उकरणें.

**गोडा**-पु. (सं.) गुढगा.

**गोड़ाई**-पु. (सं.) १ खणणें. २ खणण्याची मजुरी.

**गोड़ारी**-स्त्री. (सं) ताजें कापलेलें हिरवें गवत.

**गोड़ारी**-स्त्री. (सं) १ पायगत. २ जोडा.

**गोड़िया**-पु. (सं.) लहान पाय.

**गोड़िया**-पु. (सं.) युक्तिबाज.

**गोड़िया**-पुं. (सं.) नावाडी.

**गोड़ी**-स्त्री. (दे.) लाभ; फायदा.

**गोड़ी**-स्त्री. (सं.) पाय.

**ग़ोता**-पु. (अ.) बुडी; गोता.

**गोतिया-गोती**-वि. (सं.) आपल्या गोत्राचा भाऊबंद.

**गोद**-स्त्री. (सं.) १ मांडी; उत्संग; कूस. ३ (लुगड्याचा) पदर.

**गोदना**-क्रि.स. ( सं. ) १ गोंदणें. २ टोंचणें. ३ एखाद्या कामाच्या मागें लागणें. ४ टोंचून कोलणें.

**गोदना**-पु. ( सं. ) शरीरावर गोंदलेलें चिन्ह.

**गोदनी**-स्त्री. ( सं. ) टोंचण्याचें हत्यार वा साधन.

**गोदाम**-पु. (इं.) गुदाम; कोठार; वखार.

**गोन**-स्त्री. (सं.) गोण; पोतें.

**गोना**-क्रि.स. (सं.) लपविणें.

**गोनिया**-स्त्री. (सं.) गुण्या.

**गोनिया**-पु. (सं.) गोणी वाहणारा हमाल.

**गोनी**-स्त्री. (सं.) १ गोणी. २ गोणपाट.

**गोपना**-क्रि.स. (सं.) लपविणें.

**गोफ**-पु. (सं.) १ दास; सेवक. २ दासीपुत्र. ३ गोपींचा समूह. ४ नजर गहाण.

**गोफ**-वि. (सं.) १ गुप्त ठेवण्यालायक. २ रक्षण करण्यालायक. ३ गुप्त; लपविलेला.

**गोफन-गोफना**-पु. (सं.) गोफण.

**गोफा**-वि. (सं.) १ नुकतेंच आलेलें पान; कोंवळें पान (केळ; सुरण इ. चें). २ एक हाताचीं बोटें दुसऱ्या हाताच्या बोटांत अडकविणें.

**गोबर**-पु. (सं.) १ गाईचें शेण. २ शेण.

**गोबरगणेश**-पु. (सं.) बावळट; मूर्ख.

**गोबरी**-स्त्री. (सं.) १ गोवरी. २ शेणाचें सारवण.

**गोबरैला**-पु. (सं.) शेणकिडा.

**गोभी**-स्त्री. (सं.) कोबी.

**गोया**-क्रिवि. (फा.) मणूं कांहीं.

**गोर**-पु. (फा.) कबर.

**गोर**-वि. (सं.) गौर; गोरा.

**गोरखइमली**-स्त्री. (सं.) १ कल्पवृक्ष. २ गोरखचिंच.

**गोरखधंधा**-पु. (सं.) १ गुंतागुंत. २ कोडें; कूट प्रश्न.

**गोरस**-पु. (सं.) १ दूध. २ दही. ३ ताक. ४ इंद्रिय सुख.

**गोरसा**-पु. (सं.) गाईच्या दुधावर वाढविलेला.

**गोरसी**-स्त्री. (सं) दूध तापविण्याची शेगडी.

**गोरा**-वि. (सं.) गोरा.

**गोराई**-स्त्री. (सं.) १ गोरेपणा. २ सौन्दर्य.

**गोरी**-स्त्री. (सं.) सुंदर व गौर वर्ण स्त्री.

**गोरू**-पु. (सं.) गाय; म्हैस; बैल इ. शिंगें असलेलीं जनावरें.

**गोल**-वि. (सं.) गोल; वर्तुलाकार.

**गोल**-पु. (सं.) १ गोल; गोळा. २ घडा.

**गोल**-पु. (फा.) झुंड; समूह; मंडळी.

**गोल**-पु. (सं.) घोटाळा; गडबड.

**गोलक**-पु. (सं.) १ गोलक. २ मातीचा कुंडा. ३ अत्तर. ४ बुबुळ. ५ डोळ्यांतील बाहुली. ६ घुमट. ७ फंड; निधी. ८ गल्ला.

**गोलमाल**-पु. (सं.) गडबडगुंडा; घोटाळा.

**गोलमिर्च**-स्त्री. (सं.) मिरी.

**गोला**-वि. (सं.) गोळा.

**गोलाधार**-वि. (सं.) मुसळधार.

**गोली**-स्त्री. (सं.) १ गोळी. २ लहान घागर.

**गोलोवा**-पु. (सं.) हार.

**गोश**-पु. (फा.) कान.

**गोशमाली**-स्त्री. (फा.) १ कान-उघाडणी. २ कान पिळण्याची शिक्षा.

**गोशा**-पु. (फा.) १ कोपरा; कोन. २ एकांतस्थान. ३ दिशा; बाजू. ४ गोषा.

**गोश्त**-पु. (फा.) मांस.

**गोष्ठ**-पु. (सं.) १ गोठा. २ सल्ला-मसलत. ३ दल; मंडळी.

**गोष्ठी**-स्त्री. (सं.) १ सभा; मंडळी; बातचीत; गोष्टी. ३ सल्ला; परामर्ष. ४ एकांकिका.

**गोसाई**-पु. (सं.) १ गोसावी. २ प्रभु; स्वामी; ईश्वर.

**गोसाई**-वि. (सं.) श्रेष्ठ; बडा.

**गोह**-स्त्री. (सं.) घोरपड.

**गोहन**-पु. (सं.) १ मित्र; सवंगडी. २ सहवास; संगत.

**गोहरा**-पु. (सं.) गोवरी.

**गोहराना**-क्रि.अ. (सं.) पुकारणें; हांकारणें; बोलावणें.

**गोहरौर**-पु. (सं.) गोवऱ्यांची रास.

**गोहार--गोहारि--गोहारी**-स्त्री. (सं.) १ हंबरडा; धांवा. २ आरडा ओरड. ३ आरोळी ऐकून रक्षणार्थ जमलेल्या लोकांचा समूह.

**गोहारी**-स्त्री. (सं.) १ गोहार पहा. २ नुकसान भरपाईसाठीं दिललें द्रव्य.

**गोही**-स्त्री. (सं.) १ गुपित गोष्ट. २ फळांतील बी; अठीळ.

**गौं**-स्त्री. (सं.) १ सुयोग; संधी; मोका. २ प्रयोजन; मतलब; अर्थ.

**गौंहाँ**-वि. (सं.) गांवासंबंधी.

**गौ**-स्त्री. (सं.) गाय.

**गौख**-स्त्री. (स.) १ गवाक्ष; झरोका. २ ओढा.

**गौखा**-स्त्री. (सं.) १ गौख पहा. २ गाईचें कातडें.

**गौखी**-स्त्री. (सं.) जोडा.

**गौंगा**-पु. (अ.) १ गलका. २ अफवा; बोलवा.

**गौन**-पु. (सं.) गमन.

**गौनहार**-स्त्री. (सं.) पाठराखीण. (नवऱ्या मुलीची).

**गौना**-पु. (सं.) विवाहानंतर वधुगृहीं जाऊन वरानें वधूस स्वगृहीं आणण्याचा विधी.

**गौर**-पु. (अ.) सूक्ष्म चिंतन; बारकाईनें विचार; विचार.

**गौरा**-वि. (सं.) १ गौर वर्ण स्त्री. २ हळद. ३ पार्वती.

**गौरी**-स्त्री. (सं.) १ गौर वर्ण स्त्री. २ गौरी पार्वती. ३ तुळस. ४ हळद. ५ गौर वर्ण गाय.

**गौहर**-पु. (सं.) मोती.

**ग्यान**-पु. (सं.) ज्ञान.

**ग्यारस**-स्त्री. (सं.) एकादशी.

**ग्यारह**-वि. (सं.) अकरा.

**ग्रंथचुंबक**-पु. (सं.) एकाद्या विषयाचें वरवरचें ज्ञान असलेला.

**ग्रंथसंधि**-स्त्री. (सं.) ग्रंथविभाग.

**ग्रंथिल**-वि. (सं.) गांठीगांठीचा.

**ग्रंस**-पु. (सं.) कुटिलता.

**ग्रसना**-क्रि.स. (सं.) १ ग्रासणें. २ सतावणें.

**ग्रांडील**-वि. (इं.) खूप उंच; उचाडया.

**ग्राममुख**-पु. (सं.) बाजार.

**ग्राम्य**-वि. (सं.) १ गांवासंबंधी; ग्रामीण. २ खेडवळ; आडाणी.

**ग्राम्यधर्म**-पु. (सं.) स्त्रीप्रसंग; मैथून.

**ग्रासना**-क्रि.स. (सं.) १ पकडणें; ग्रासणें. २ सतावणें.

**ग्राह**-पु. (सं.) १ मगर. २ ग्रहण. ज्ञान. ४ ग्राहक.

**ग्राहक**-पु. (सं.) ग्राहक; गिऱ्हाईक.

**ग्लान**-वि. (सं.) कमजोर. २ म्लान; थकलेला. ३ रोगी; आजारी.

**ग्वार**-स्त्री. (सं.) गवार.

**ग्वारफली**-स्त्री. (सं.) गवारीची शेंग.

**ग्वाल-ग्वाला**-पु. (सं.) गवळी.

**ग्वालिन**-स्त्री. (सं.) गवळण.

**ग्वैंठना**-क्रि.स. (सं.) मुरगळणें; पिरगळणें; पीळ घालणें.

**ग्वैंड़ा**-पु. (सं.) गांवच्या आसपासची जमीन.

**ग्वैंड़े**-क्रिवि. (सं.) निकट; जवळ; समीप.

**ग्वैंयाँ**-स्त्री. (सं.) गोइँयाँ पहा.

## घ

**घँगोल**–पु. (दे.) कुमुद.

**घँघरा**–पु. घघरा पहा.

**घँघराधोर**–पु. भ्रष्टाकार; सोंवळ्या-ओवळ्याच्या विचाराचा अभाव.

**घँघरी**–स्त्री. घघरी पहा.

**घँघोरना–घँघोलना**–क्रिसं. (सं.) १ ढवळून ढवळून विरघळविणें. २ ढवळून पाणी गढूळ करणें.

**घंट**–पु. १ घट; घडा. २ मृतकाच्या क्रियेमध्यें पिंपळावर बांधण्याचें जलपात्र. ३ घंटा.

**घंटा**–पु. १ घंटा. २ तास; घंटा.

**घंटाघर**–पु. घड्याळ बसविलेला उंच मनोरा.

**घंटिका**–स्त्री. (सं.) १ लहान घंटी. २ घुंगुर. ३ रहाटाला लावलेला लहान लोटा.

**घंटी**–स्त्री. (सं.) १ घंटा. २ लहान लोटा. ३ घंटेचा आवाज. ४ घुंगुर. ५ पडजीभ. ६ घाटी; कंठमणी.

**घई**–स्त्री. १ पाण्यांतील भोंवरा. २ खांब; टेका; आधार.

**घई**–वि. (सं.) अत्यंत खोल; अथांग.

**घघरा**–पु. (सं.) घागरा; लेहंगा.

**घचाघच**–स्त्री. (अनु.) गचागच.

**घट**–पु. (सं.) १ घट; घडा. २ शरीर; पिंड. ३ मन; हृदय. ४ कुंभ राशि.

**घट**–वि. (सं.) घटलेला; थोडा; कमी.

**घटक**–पु. (सं.) मध्यस्थ. २ विवाह-संबंध जुळवून आणणारा. ३ दलाल. ४ चतुर मनुष्य; कर्तबगार. ५ चारण. ६ घडा.

**घटका**–पु. (सं.) मरणसमयीं लागलेली घरघर.

**घटकार**–पु. (सं.) कुंभार.

**घटती**–स्त्री. (सं.) १ घटती; अवनती. २ न्यूनता; कमतरता. ३ हीनता; अप्रतिष्ठा.

**घटना**–क्रि.अ. (सं.) १ उपस्थित होणें; घडणें; होणें. २ जमणें; नीट बसणें; लागू होणें.

**घटना**–क्रि.अ. (सं.) घटणें; कमी होणें.

**घटना**–पु. (सं.) घटना; प्रसंग; गोष्ट.

**घटबढ**–स्त्री. (सं.) न्यूनाधिक्य; कमी अधीक; चढउतार.

**घटवाना**–क्रि.स. (सं.) घटविणें; कमी करविणें.

**घटवाई**–पु. (सं.) नदीच्या घाटावरचा कर घेणारा.

**घटवाई**–स्त्री. (सं.) कमी करविणें.

**घटवार**-पु. (सं.) १ घटवाई पहा २ नावाडी. ३ घाटावरील भिक्षुक. ४ घाटावरील देवता.

**घटवालिया-घटवारिया**-पु. (सं.) घाटावरचा पंड्या.

**घटा**-स्त्री. (सं.) १ भरून आलेले ढग; मेघमाला. २ समूह; झुंड.

**घटाई**-स्त्री. (सं.) हीनता; अप्रतिष्ठा.

**घटाटोप**-पु. (सं.) १ चारी बाजूंनी भरून आलेल्या ढगांचें आच्छादन. २ कोणतीही वस्तु झांकण्याचें आच्छा दन. ३ मोठा जन समूह.

**घटाना**-क्रि.स. (सं.) १ घटविणें; कमी करणें. २ अप्रतिष्ठा करणें; मान हानी करणें.

**घटाव**-पु. (सं.) १ घटाव; न्यूनता. २ पूर ओसरणें; ओहोटी. ३ अवनति.

**घटिक**-पु. (सं.) प्रहरी.

**घटिया**-वि. (सं.) १ अल्पमोली; स्वस्तांतला; साधारण प्रतीचा. २ तुच्छ; नीच; अधम.

**घटिहा**-वि. (सं.) १ दगलबाज; कावेबाज. २ संधिसाधु. ३ धूर्त; चलाख. ५ व्यभिचारी. ५ दुष्ट.

**घटी**-स्त्री. (सं.) १ कमतरता; न्यूनता. २ हानि; नुकसान.

**घटी**-स्त्री. (सं.) १ घडी; घटी. २ घड्याळ. ३ लहान घागर. ४ रहाटाचा लोटा.

**घट्टा**-पु. (सं.) १ घट्टा. २ नुकसान; तोटा; न्यूनता. ३ भेग; फट.

**घठ्ठा**-पु. (सं.) घट्टा; वण.

**घड़घड़ाना**-क्रि.अ. (सं.) गडगडणें; धडधड आवाज होणें.

**घड़घड़ाहट**-स्त्री. (अनु.) गडगडाट; धडधडाट.

**घड़िया**-स्त्री. (सं.) १ सोनें गाळण्याचें मातीचें भांडें. २ मातीचा लहान पेला. ३ मधाचें पोळें. ४ पोळें. ४ गर्भाशय. ५ लोखंड गाळण्याचें मातीचें भांडें. ६ रहाटाचा लोटा.

**घड़ियाल**-पु. (सं.) १ मगर. २ घंटा.

**घड़ी**-स्त्री. (सं.) १ घड्याळ. २ घडी; घटका. ३ वेळ; संधी.

**घड़ीसाज**-पु. (सं.+फा.) घड्याळजी.

**घड़ौंची**-स्त्री. (सं.) घडवंची; तिपाई; तिवई.

**घतर**-पु. (दे.) प्रभातकाल.

**घांतेया**-पु. (सं.) घातकी.

**घतियाना**–क्रि.स. (सं.) १ फसविणें; घात करणें. २ चोरून ठेवणें; लपविणें.

**घनघनाहट**–स्त्री. (अनु.) घणघणाट.

**घनघोर**–वि. (सं.) १ दाट; घनदाट; गर्द. २ भीषण; घनघोर; घोर.

**घनघोर**–पु. (सं.) १ घणघणाट; भीषण ध्वनि. २ वादळाचा गडगडाट.

**घनचक्कर**–पु. (सं.) १ चक्रम; विक्षिप्त. २ उडाण टप्पू. ३ मूर्ख. ४ जंजाळ.

**घनतोल**–पु. (सं.) चातक.

**घनबेल**–वि. (सं.) वेलबुट्टीदार.

**घना**–वि. (सं.) १ दाट; गाढ. २ भरीव; घन. ३ निकटचा. घनिष्ट. ४ भरपूर; पुष्कळ.

**घनाघन**–पु. (सं.) वादळी पाऊस; जोराचा पाऊस.

**घने**–वि. (सं.) पुष्कळ; अनेक.

**घनेरा**–वि. (सं.) अतिशय; पुष्कळ.

**घनेरे**–वि. (सं.) असंख्य; अतिशय.

**घपचिपाना**–क्रि.अ. घाबरणें.

**घपची**–स्त्री. (सं.) हाताच्या पंज्यांची पकड.

**घपला**–पु. (अनु.) गुंतागुंत; मिसळ.

**घपुआ**–वि. मूर्ख; आडाणी; बावळट.

**घपूचंद**–पु मूर्ख; बेअक्कल.

**घप्पू**–वि. घपुआ पहा.

**घबडाना**–क्रि.अ. घबराना पहा.

**घबराना**–क्रि.अ. (सं.) घाबरणें. २ भांबावणें.

**घबराना**–क्रि स. (सं.) १ घाबरविणें. २ भांबाऊन टाकणें.

**घबराहट**–स्त्री. (सं.) १ भीती. २ गोंधळ; गडबड. ३ घाई; उतावळेपणा; बेचैनी.

**घमंका**–पु. (अनु.) ठोसा; बुक्का.

**घमंड**–पु. (सं.) घमेंड.

**घमंडी**–वि. (सं.) घमेंडी.

**घमर**–पु. (अनु.) नगाऱ्याचा आवाज; गंभीर आवाज.

**घमरौल**–स्त्री. (अनु.) १ गोंधळ; गलका. २ घोटाळा; गडबड.

**घमसा**–पु. (अनु.) धपका.

**घमसा**–पु. १ उष्मा; उकाडा. २ आधिक्य.

**घमसान**–पु. तुमुळ युद्ध; घनघोर युद्ध.

**घमाका**–पु. (अनु.) १ धडाका; आघात. २ घम घम आवाज.

**घमाघम**–स्त्री. (अनु.) १ धामधूम; २ आघाताचा मोठा आवाज. ३ घम घम असा मोठा आवाज.

**घमाघमी**-स्त्री. (अनु.) १ घमाघम पहा. २ मारपीट.

**घमाना**-क्रि.अ. अंगावर ऊन घेणें; उन्हांत बसणें.

**घर**-पु. (सं.) घर.

**घरघराना**-क्रि.अ. (अनु.) घर-घरणें.

**घरघराहट**-स्त्री. (अनु.) घरघराट.

**घरघाल-घरघालन**-वि. (सं.) घर बुडव्या.

**घरदासी**-स्त्री. (सं.) गृहिणी; पत्नी.

**घरनी**-स्त्री. (सं.) गृहिणी; पत्नी.

**घरफोड़ना**-पु. (सं.) घरभेद्या.

**घरफोरी**-स्त्री. (सं.) घरभेदी.

**घरबसा**-पु. (सं.) जार; उपपति.

**घरबसी**-स्त्री. (सं.) रखेली.

**घरबार**-पु. (सं.) १ घरदार. २ संसार.

**घरबारी**-पु. (सं.) कुटुंबवत्सल; संसारी.

**घरबैसी**-स्त्री. घरवसी पहा.

**घररना**-क्रि.अ. (सं.) खरडणें; घासपटणें.

**घरवा-घरवाहा**-पु. (सं.) १ कुटी; घरकुल. २ घरौंदा पहा.

**घरवात**-स्त्री. (सं.) घरांतील सामान संपत्ती इ.; संसार.

**घरहाँई**-स्त्री. (सं.) १ चुगल खोर स्त्री. २ घरभेदी स्त्री.

**घराऊ**-वि. (सं.) १ घरगुती. २ आपसांतील.

**घराती**-पु. (सं.) वधूकडील वऱ्हाडी.

**घराना**-पु. (सं.) घराणें.

**घरिया**-स्त्री. घडिया पहा.

**घरियाना**-क्रि.अ घड्या घालणें.

**घरी**-स्त्री. (सं.) घडी.

**घरीक**-क्रिवि. (सं.) घडीभर; क्षण-भर.

**घरुआ**-पु. (सं.) नीटनेटका संसार; चांगली गृह व्यवस्था.

**घरुआदार**-पु. (सं.) नीटनेटका संसार करणारा.

**घरुआदारी**-स्त्री. (सं.) संसारीपणा.

**घरुवा**-पु. घरुआ पहा.

**घरू**-वि. (सं.) गृहसंबंधी.

**घरेला-घरेलू**-वि. (सं.) १ घरगुती. २ पाळीव (जनावर); खाजगी.

**घरैया**-वि. (सं.) १ घरोब्याचा. २ घरचा.

**घरैया**-पु. (सं.) १ कुटुंबांतील व्यक्ति. २ घरोब्याचा; घनिष्टसंबंधी.

**घरो**-पु. घड़ा पहा.

**घरौंदा-घरौंधा**-पु. (सं.) १ खेळां-तील घर; घरकुल; छोटें घर.

**घरौना**-पु. (सं.) १ घर; निवासस्थान. २ खेळांतील घर.

**घर्घर**-पु. (अनु.) घरघर; घरघराट; खडखडाट.

**घर्म**-पु. (सं.) ऊन्ह; सूर्यताप.

**घर्मबिंदु**-पु. (सं.) घाम; धर्मबिंदु.

**घर्रा**-पु. (अनु.) घशाची घरघर.

**घर्राटा**-पु. (अनु.) घोरण्याचा आवाज; घोरणें.

**घरामी**-पु. (सं.) घरें शाकारणारा.

**घलना**-क्रि.अ. (सं.) १ गळणें; निखळणें. २ मारामारी होणें. ३ बंदुकीची गोळी इ. सुटणें.

**घलाघल**-स्त्री. मारामारी.

**घलाघल**-स्त्री. (दे.) मारामारी; मारपीट.

**घलुआ**-पु. (सं.) धार; वर्तावळा.

**घवद**-स्त्री. घौद पहा.

**घवरी**-स्त्री. (सं.) पानांचा अथवा फळांचा घोंस.

**घसकना**-क्रि.अ.(ध्व.)खिसकना पहा.

**घसखुदा**-पु. (सं.) १ गवत कापकापणारा; गवत उपटणारा. २ मूर्ख; आडाणी.

**घसना**-क्रि.अ. (सं.) घांसणें; घासटणें.

**घसना**-क्रि.स. (सं.) खाणें.

**घसिटना**-क्रि.अ. (सं.) फरपटणें; खरडणें.

**घसियारा**-पु. (सं.) गवतविक्या.

**घसीट**-स्त्री. (सं.) १ घाईनें खरडणें. २ घाईनें खरडलेला मजकूर.

**घसीटना**-क्रि.स. (सं.) १ फरपटत ओढणें; फरपटणें. २ फराफर लिहिणें; खरडणें. ३ बळजबरीनें एकाद्या कामांत गोवणें; गुंतविणें.

**घस्सा**-पु. घिपसा पहा.

**घहनाना**-क्रि.अ. (अनु.) खणखणणें; घणघणणें.

**घहरना-घहराना**-क्रि.अ.(अनु.) गरजणें.

**घहरानि**-स्त्री. (अनु.) गर्जना; गरजण्याचा आवाज.

**घहरारा-घहरारी**-पु.स्त्री. (अनु.) गंभीर शब्द; घोर शब्द.

**घाँ**-स्त्री. (सं.) दिशा; बाजू.

**घाँघरा-घाँगरी**-पु.स्त्री.(सं.)घागरा; परकर.

**घाँटी**-स्त्री. (सं.) घाटी.

**घाँह-घाँही**-पु. (सं.) दिशा; बाजू.

**घाइ**-पु. (सं.) घाव; जखम.

**घाइल**-वि. (सं.) घायाळ.

**घाई**-स्त्री. (सं.) १ दिशा; बाजू. २ दोन वस्तूंमधील जागा; संधि.

३ वेळां; वार. (एक वार दोन वार इ.) ४ पाण्यांतील भोंवरा.

**घाई**-स्त्री. ( सं. ) १ बेचक. २ आघात; वार; प्रहार. ३ धोका; कपट.

**घाउ**-पु. घाइ पहा.

**घाऊघप**-वि. (सं.) मुकाट्यानें गिळंकृत करणारा; साळसुद चोर.

**घाग-घाघ**-पु. १ अत्यंत चतुर मनुष्य. २ जादुगार.

**घाघरा**-पु. ( सं. ) परकर; घागरा.

**घाघी**-स्त्री. ( सं.) कोळयाचें मोठें जाळें.

**घाट**-पु. (सं.) १ घाट. २ दिशा; बाजू. २ तऱ्हा; पद्धत. ४ तरवारीची धार. ५ डोंगर. ६ चोळीचा गळा. ७ मानेचा मागील भाग.

**घाट**-स्त्री. (सं.) १ धोका; कपट; दगा. २ दुष्कर्म.

**घाट**-वि. (सं.) कमी; थोडा.

**घाटवाल**-पु. ( सं. ) घाटावरील पंडया.

**घाटा**-पु. ( सं ) नुकसान; तोटा.

**घाटि**-पु. (सं.) कमतरता; न्यून.

**घाटि**-स्त्री. (सं.) पापकर्म; निंद्यकृत्य.

**घाटिका**-स्त्री. ( सं. ) मानेचा मागील भाग.

**घाटिया**-पु. (सं.) घाटावरील पंडया.

**घाटी**-स्त्री. ( सं. ) १ दरी; दोन पर्वतांमधील सखल भाग. २ घाट; घाटी.

**घाटी**-स्त्री. (सं.) गळयाचा मागील भाग.

**घात**-पु. ( सं. ) १ आघात; प्रहार; २ वध; हत्या. ३ अहित.

**घात**-स्त्री. (सं.) १ मोका; संधि. १ २ योग्य संधीची मार्ग प्रतीक्षा. ३ कपट; युक्ति; डावपेंच. ४ ढब.

**घातक-घातकी-घातिक**-पु. (सं.) १ घातकी. २ हिंसक. ३ मृत्युयोग. ४ वैरी; शत्रु.

**घातिया-घाती**-पु. (सं.) १ वध करणारा; संहारक. २ नाश करणारा.

**घातुक**-वि. (सं.) १ हिंसक. २ निष्ठूर; क्रूर.

**घान**-पु. (सं.) १ घाणा; एका वेळेला जात्यांत किंवा घाण्यांत घालावयाचें धान्य इ. अथवा एक वेळेस तळून होतील एवढया पुऱ्या इ. २ प्रहार; आघात.

**घानी**-स्त्री. १ घान पहा. २ समूह; ढेर; रास.

**घाम**-पु. (सं.) ऊन्ह; सूर्यताप.

**घामड़**-वि. (सं.) १ उन्हानें घामाघूम होऊन धांपा टाकणारें जनावर. २ मूर्ख; आडाणी. ३ आळशी.

**घाय**-पु. (सं.) घाव; जखम.

**घायल**-वि. (सं.) घायाळ; जखमी.

**घारी**-स्त्री. गोठा.

**घाल-घाला**-पु. (सं.) धार; वरतावळा.

**घालक**-पु. (सं.) घातक; हिंसक.

**घालना**-क्रि.स. (सं.) १ घालणें; ठेवणें. २ नाश करणें; बिघाड करणें. ठार करणें; मारणें.

**घालमेल**-पु. (सं.) १ घालमेल. २ घनिष्टता; स्नेह.

**घालिका-घालिनी**-स्त्री. (सं.) नाश करणारी.

**घाव**-पु. (सं.) घाव; जखम.

**घास-घासी**-पु. (सं.) घास; चारा.

**घाह**-पु. (सं.) बेचक.

**घिऑडा**-पु. (सं.) तुपाचें भांडें; तुपाची बरणी.

**घिग्घी**-स्त्री. (अनु.) मुसमुसणें; हुंदका.

**घिघियाना**-क्रि.अ. (अनु) १ रडत रडत केविलवाणेपणानें विनवणें. किलबिलाट करणें.

**घिचपिच**-स्त्री. (सं.) १ गचडी; जागेची टंचाई; जागेची अडचण. २ अनेक वस्तूंची लहान जागेंत गर्दी; गचडी.

**घिचपिच**-वि. गिचमिड; अस्पष्ट.

**घिन**-स्त्री. (सं.) घृणा; सिसारी.

**घिनाना**-क्रि.अ. (सं.) घृणा करणें; तिरस्कार करणें.

**घिनावना-घिनौना**-वि. (सं.) १ घाणेरडा; किळसवाणा. २ तिरस्करणीय.

**घियातोरी**-स्त्री. (सं.) घोसाळें.

**घिरना**-क्रि.अ. (सं.) १ घेरलें जाणें. २ एकत्र होणें; जमा होणें. (ढग).

**घिरनी**-स्त्री. (सं.) १ कप्पी; चाक. २ दोर वळण्याचा चरखा. ३ चाक.

**घिराई**-स्त्री. (सं.) १ घेरण्याची क्रिया. २ जनावरांना चारण्याचें काम जनावरांना चारण्याची मजूरी.

**घिराना**-क्रि. स. (अनु.) फरपटणें; घांसणें.

**घिरायँद**-पु. (सं.) लघ्वीची दुर्गंधि.

**घिराव**-पु. (सं.) १ घेरणें. २ घेरा.

**घिरौंची**-स्त्री. घड़ौंची पहा.

**घिरौरा**-पु. (दे.) घुशीचें बीळ.

**घिसकना**-क्रि.स. खसकना पहा.

**घिसघिस**-स्त्री. १ आळसामुळें झालेली दिरंगाई. २ व्यर्थ विलंब; व्यर्थ टाळाटाळ.

**घिसना**-क्रिस. (सं.) घासणें; रगडणें; उगाळणें.

**घिसना**-क्रि.अ. झिजणें.

**घिसाई**-स्त्री. (सं.) १ घासण्याचें काम; घासणावळ. २ घासणें.

**घिसाव**-पु. (सं.) घर्षण.

**घिस्सपिस्स**-पु. १ घसट; दाटमैत्री. २ अपवित्र संबंध; अनुचित संबंध.

**घिस्समघिस्सा**-पु (सं.) १ खूप गर्दी; धक्काबुक्की; रेटारेटी. २ दोरीवर दोरी घासून ती तोडण्याचा खेळ.

**घिस्सा**-पु. (सं.)१ घर्षण. २ धक्का; ठोकर; रट्टा. ३ घिस्समघिस्सा पहा.

**घींच**-स्त्री. मान; गळा.

**घींचना**-क्रि.स. (सं.) खेंचणें.

**घी**-पु. (सं.) तूप.

**घीकुवाँर**-पु. (सं.) कोरफड.

**घुँइ-घुँइयाँ-घुइँ**-स्त्री. (दे.) अळकुडी.

**घुंगची-घुंघची**-स्त्री. (सं.) गुंज.

**घुँघनी**-स्त्री. (अनु.) उसळ; घुगरी.

**घुँघरारे-घुँघराले**-वि. कुरळे (केंस).

**घुँघरू**-स्त्री. (अनु.) १ घुंगुर. २ घुंगुरमाळ. ३ मरण समयींची घरघर. ४ हरभऱ्याच्या दाण्यावरचें फोलपट.

**घुँघरुबंद**-स्त्री. (सं.) नाचणारी वेश्या.

**घुँघरार**-वि. कुरळे (केंस).

**घुंटना**-क्रि.अ. घुटना पहा.

**घुंडी**-स्त्री. (सं.) गुंडी.

**घुग्घी**-स्त्री. (दे.) १ धनगर किंवा शेतकऱ्याची डोक्यावरून घेण्याची कांबळी; कुंची. २ एक पक्षी.

**घुग्घू**-पु. (सं.) घुबड.

**घुघुआना**-क्रि.अ. (सं.) १ घुबडाचें ओरडणें. २ मांजराचें गुरगुरणें.

**घुघुरी**-स्त्री. १ घुँघरु पहा. २ घुँघनी पहा.

**घुटकना**-क्रि.स. (अनु.) १ घोटघोट पिणें. २ गिळणें.

**घुटकी**-स्त्री. (अनु.) अन्न नलिका.

**घुटना**-पु. (सं.) गुढगा.

**घुटना**-क्रि.अ. (सं.) गुदमरणें; श्वास कोंडणें.

**घुटना**-क्रि.अ. (अनु.) १ घोटलें जाणें. २ दाट मैत्री होणें. ३ खेळीमेळीनें बोलणें होणें. ४ अभ्यास घोटून घोटून तयार होणें.

**घुटरूँ**-पु. (सं.) गुढगा.

**घुटवाना**-क्रि.स. (अनु.) १ घोटविणें; घोटवून घेणें. २ हजामत करवून घेणें.

**घुटाई**–स्त्री. (अनु.) १ घोटण्याचें काम; घोटाई. २ घोटणावळ; घोटाई.

**घुट्टा**–पु. घोटा पहा.

**घुडकना**–क्रि.स. (सं.) दटावणें; दरडाऊन बोलणें.

**घुडकी**–स्त्री. (सं.) दरडाविणें; दटावणी.

**घुडचढा**–पु. (सं.) घोडेस्वार.

**घुडचढी**–स्त्री. (सं.) १ वरानें घोडयावरून वधुगृहीं जाण्याची चाल. २ घोडयावरून फिरत जलसे करणारी वेश्या.

**घुड़दौड**–स्त्री. (सं.) १ घोडदौड. २ घोडदौडीचा रस्ता किंवा मैदान. ३ घोडयांची शर्यत. (जुगार) ४ अश्वमुखी नाव. ५ घोडेस्वारांची कवाईत.

**घुडसाल**–स्त्री. (सं.) अश्वशाळा; घोडयांची पागा.

**घुडिया**–स्त्री. (सं.) १ लहान घोडी. २ घोडिया पहा.

**घुडुकना**–क्रि. (सं.) घुडकना पहा.

**घुण; घुन**–पु. (सं.) कीड.

**घुनघुना**–पु. (अनु.) खुळखुळा.

**घुनना**–क्रि.स. (सं.) १ कीडणें; कीड लागणें. २ खंगणें.

**घुन्ना**–वि. (अनु.) १ घुम्या. २ कुढया.

**घुन्नी**–वि.स्त्री. (अनु.) १ घुमी. २ कुढी.

**घुन्नी**–वि.स्त्री. (अनु.) मौन.

**घुप**–वि. (सं.) अंधार गुडुप.

**घुमँडना**–क्रि.अ. घुमडना पहा.

**घुमक्कड**–वि. (सं.) भटक्या.

**घुमटा**–पु. (सं.) चक्कर; भोंवळ.

**घुमड**–स्त्री. (सं) मेघांची दाटी. मळभ.

**गुमडी**–स्त्री. (सं.) १ गरगर फिरण्याची क्रिया. २ भोंवळ येण्याचा रोग. ४ प्रदक्षिणा.

**घुमना**–वि. (सं.) भटक्या.

**घुमनी**–वि.स्त्री. (सं.) भटकी.

**घुमरना·घुमराना**–क्रि.अ. (अनु.) १ मोठा आवाज होणें; घोंगावणें. २ घुमडना पहा. ३ फिरणें.

**घुमरी**–स्त्री. (सं.) १ घुमडी पहा. २ पाण्यांतील भोंवरा.

**घुमाना**–क्रि.स. (सं.) १ फिरविणें. २ वांकविणें.

**घुमाव**–पु. (सं.) १ वळण; वांकण. फेरा; चक्कर. ३ बांक; वक्रता; वाटोळेपणा.

**घुमावदार**–वि. (सं.+फा.) वाटोळा; बांकदार.

**घुरकना**–क्रि. (सं.) घुड़कना पहा

**घुरघुर**-पु. (अनु.) घुरघुर.

**घुरना**-क्रि.अ. (सं.) व. ; आवाज होणें.

**घुरना**-क्रि. (अ.) घुलना पहा.

**घुरबिनिया**-स्त्री. केरकचऱ्यांतून उपयुक्त वस्तू वेंचून काढण्याचें काम.

**घुरहरी-घुरूहरी**-स्त्री. (सं.) पाऊल वाट.

**घुर्मित**-वि. (सं. ) फिरता.

**घुर्राना**-क्रि.अ. गुर्राना पहा.

**घुलना**-क्रि.अ. (सं.) १ विरघळणें. २ (गूळ वगैरे) चिघळणें. ३ पिलपिलित होणें; मऊ होणें. ४ क्षीण होणें. ५ (समय) व्यतीत होणें.

**घुलवाना**-क्रि.स. (सं.) वितळविणें; विरघळविणें.

**घुलाना**-क्रि.स. (सं.) १ विरघळविणें. २ चघळणें. ३ पिलपिलित करणें; घोळणें. ४ सुरमा लावणें. ५ (वेळ) दवडणें.

**घुलावट**-स्त्री. (सं ) मिसळणें.

**घुसडना-घुसना**-क्रि.स. (सं.) १ घुसणें. २ बोंचणें.

**घुसपैठ**-स्त्री. (सं.) गति; धांव.

**घुसना-घुसेडना**-क्रि.स. (सं.) १ खुपसणें; घुसडणें. २ टोंचणें; बोंचणें.

**घूँघची**-स्त्री. घुंगची पहा.

**घूँघट**-पु. (सं.) घुंगट; ओढणीचा तोंडावरील भाग; बुरखा.

**घूँघर**-पु. (अनु.) केसांचा कुरळेपणा.

**घूँघरवारे-घूँघरवाले**-वि. (अनु.) कुरळे (केस).

**घूँघरी**-स्त्री. (अनु.) नूपुर; वाळे.

**घूँघरू**-पु. घुंघरु पहा.

**घूँचा**-पु. घूँसा पहा.

**घूँट**-पु. (अनु.) घोट.

**घूँटना**-क्रि.अ. (अनु.) पीणें.

**घूँटी**-स्त्री. (अनु.) बाळगुटी.

**घूँस**-स्त्री. घूस पहा.

**घूँसा**-पु. (अनु.) १ बुक्का; मुटका. २ ठोसा; बुक्का; बुक्की.

**घूक**-पु. घुग्घू पहा.

**घूका**-पु. (दे.) अरुंद तोंडाची उभट करंडी.

**घूघ**-स्त्री. जिरेटोप.

**घूघी**-स्त्री. (दे.) १ थैली. २ खिसा. ३ घुग्घी पहा.

**घूघू**-पु. घुग्घू पहा.

**घूटना**-क्रि.अ. (सं.) श्वास कोंडणें.

**घूना**-वि. (दे.) १ चतुर; अनुभवी. २ घुन्ना पहा.

**घूम**-स्त्री. (सं.) घुमाव पहा.

**घूमना**-क्रि.अ. (सं.) १ फिरणें; चक्कर खाणें. २ फिरणें; भटकणें.

३ प्रवास करणें. ४ गोल फिरणें. ५ वळणें; वाकणें. ६ उन्मत्त होणें. ७ परत येणें; परत फिरणें.

**घूमनी**-स्त्री. (सं.) भोंवळ; चक्कर.

**घूमघुमारा**-वि. (सं.) घेरदार.

**घूरघुरा**-पु. (सं.) पु. १ कचऱ्याची जागा; उकिरडा. २ कचऱ्याचा ढीग.

**घूरना**-क्रि.अ. (सं.) १ डोळे वटारून पहाणें. २ फिरणें; भटकणें.

**घूस**-स्त्री. (सं.) १ घूस. २ लांच.

**घेघा**-पु. (दे.) १ अन्ननलिका. २ एक गळ्याचा रोग.

**घेडौंचो**-स्त्री. घडौंची पहा.

**घेतल-घतला**-पु. (दे.) पुणेरी जोडा.

**घेपना**-क्रि. (सं.) १ हातांनी व पायांनी तुडवून मळणें. २ खरवडणें; सोलणें.

**घेर**-पु. (सं.) घेर.

**घेरघार**-पु. (सं.) १ घेरा; फैलाव. २ घिरट्या; वारंवार येजा. ३ खुशामत.

**घेरना**-क्रि.स. (सं.) १ घेरणें; वेढणें. २ गुरें चारणें. ३ खुशामत करणें.

**घेरा**-पु. (सं.) घेरा.

**घेवर**-पु (सं.) घीवर.

**घैया**-पु. (सं.) १ निरशा दुधावरची मलई काढण्याचें काम. २ झाडाची फांदी कापण्याकरितां अथवा रस काढण्याकरितां केलेला घाव.

**घैर-घैरू-घैरो**-पु. (दे.) १ उपहास; टवाळी. २ चुगली; चहाडी.

**घैला**-पु. (सं.) घडा; घागर.

**घैहल-घैहा**-वि. (सं.) वि. घायाळ; जखमी.

**घोंघा**-पु. (दे.) कालव.

**घोंघा**-वि. १ सारहीन. २ मूर्ख; अडाणी.

**घोंचा**-पु. (सं.) १ झुबका; गुच्छ. २ वांकड्या शिंगाचा बैल.

**घोंटना**-क्रि.स. (अनु.) १ घोटघोट पिणें. २ लाटणें; लांबविणें; गिळंकृत करणें.

**घोंटना**-क्रि.स. (सं.) १ (गळा) श्वास बंद पडेल अशा प्रकारें दाबणें; गळा दाबणें. २ घोटना पहा.

**घोंपना**-क्रि स. (अनु.) १ खुपसणें; टोंचणें. २ गांठविणें; ओबडधोबड शिलाई करणें.

**घोंसला-घोंसुआ**-पु. (सं.) घरटें.

**घोखना**-क्रि.स. (सं.) घोकणें; पाठ करणें.

**घोत्रा** पु. (दे.) हरभऱ्याची कीड.

**घोटना**-क्रि स. (सं.) १ घोटणें. २ वाटणें. ३ खलणें. ४ घोटणें; पाठ करणें. ५ दम देणें; फटकारणें. ६ हजामत करणें. ७ गळा दाबणें.

**घोटना-घोटा**-पु. (सं.) पु. १ घोटण्याचें हत्यार. २ घोटाई.

**घोटा**-पु. (सं.) गुळगुळीत गोटा (हजामत).

**घोटाला**-पु. (दे.) घोटाळा.

**घोट्ट**-पु. (सं.) १ गुढगा. २ घोटणारा. ३ घोटण्याचें साधन.

**घोडिया**-स्त्री. (सं.) १ लहान घोडी. २ खुंटी. ३ तट्टू. ४ घडवंची. ५ तुळईचा घोडा.

**घोर**-वि. (सं.) १ घोर; भयंकर. २ दाट; गाढ. ३ वाईट. ४ भारी.

**घोर**-स्त्री. (सं.) गर्जना; शब्द.

**घोर**-क्रिवि. (सं.) अत्यंत.

**घोरना**-क्रि. (सं.) घोलना पहा.

**घोरना**-क्रि अ. गरजणें; भारी आवाज करणें.

**घोरा**-पु (सं.) १ घोडा. २ खुंटा.

**घोरी**-स्त्री. (सं.) १ घोडी. २ अघोरी पहा.

**घोलदही**-पु. मठ्ठा.

**घोलना**-क्रि.स. (सं.) १ घोळणें. २ मिसळणें.

**घोलुवा**-वि. (सं.) घोळलेला.

**घोलुवा**-पु. (सं.) १ पातळ औषध. २ रस्सा. ३ अर्क. ४ अफूचें पाणी.

**घोष**-पु. (सं.) १ गवळयांची वस्ती. २ गवळी. ३ गोशाळा. ४ तट; कांठ; किनारा. ५ घोष; शब्द; आवाज. ६ गर्जना; घोष.

**घोसी**-पु. (सं.) गवळी.

**घौद**-पु. (दे.) घड; घोंस.

**घौहा**-वि. (सं.) जखमी.

**घौहा**-पु. (सं.) मार लागलेलें फळ.

---

## च

**चंक**-वि. (सं.) पुरापुरा; संपूर्ण; सारा.

**चंकुर**-पु. (सं.) १ रथ. २ झाड.

**चंक्रमण**-पु. (सं.) घिरट्या घालणें.

**चंग**-स्त्री. (फा.) लहान डफ.

**चंग**-स्त्री. (सं.) पतंग.

**चँगना**-क्रि. (सं.) आवळणें; कसणें ताणणें.

**चंगबाई**-स्त्री. वातरोग.

**चंगा**-वि. (सं.) १ तंदुरुस्त; निरोगी; धडधाकट. २ छान; सुंदर. ३ निर्मळ शुद्ध. ४ चांगला; भला.

**चंगु**–पु. (सं.) १ पंजा. २ पकड; काबू; अधिकार.

**चंगुल**–१ पक्षी, मांजर, वाघ इ.चा पंजा. २ चिमूट.

**चँगेर-चँगेरी-चँगेली**–स्त्री. (सं.) १ दुरडी; टोपली. २ उथळ व पसरट टोपली. ३ फुलांची परडी. ४ बांबूच्या टोपलींचा पाळणा. ५ पखाल.

**चंच**–पु. (सं.) १ पांच अंगुळांचें माप. २ चोंच. ३ हरीण. ४ एरंडाचें झाड.

**चंचा**–स्त्री. (सं.) बुजगावणें.

**चंचु**–स्त्री. (सं.) १ एरंडाचें झाड. २ हरिण. ३ एक प्रकारची पालेभाजी.

**चंचु**–पु. (सं.) चोंच.

**चंचुर**–वि. (सं.) दक्ष; निपुण.

**चँचोरना**–क्रिस. (अनु.) दातांनी चाऊन चाऊन खाणें; चुंफणें.

**चंट**–वि. (सं.) १ धूर्त; कावेबाज. २ हुशार; चलाख.

**चंड**–वि. (सं.) १ उग्र; प्रखर. २ बलवान. ३ कठोर. ४ कठिण; बिकट. ५ रागीट; क्रोधी.

**चँडाई**–स्त्री. (सं.) १ घाई. २ जबरदस्ती.

**चंडु**–पु. (सं.) १ उंदीर. २ एक वानराची जात.

**चंडु**–पु. अफूपासून तयार केलेला मादक पदार्थ; चंडोल.

**चंडोल**–पु. (सं.) १ एक प्रकारची पालखी. २ मातीचें एक खेळणें.

**चंद**–वि. (फा.) थोडें; कांहीं.

**चंदनी**–स्त्री. (सं.) चांदणें.

**चँदराना**–क्रि.स. (सं.) चिडविणें; बहकाविणें.

**चँदला**–वि. (सं.) टक्कल पडलेला; टकल्या.

**चँदवा**–पु.(सं.) १ चांदवा. २ एक प्रकारचा लहान मंडप; मंडपाचें छत.

**चंदा**–पु. (सं.) चंद्र.

**चंदा**–पु. (सं.) वार्षिक वर्गणी; वर्गणी.

**चांदिका - चंदानि - चंदिनी**–स्त्री. (सं.) चंद्रिका पहा.

**चँदिया**–स्त्री. (सं.) १ टाळू; कवटी. २ लहान पोळी; चांदकी. ३ तळ्यांतील अतिशय खोल जागा. ४ चांदीची टिकली.

**चँदोया-चँदोवा**–पु. चँदवा पहा.

**चंद्र**–पु. (सं.) चंद्र.

**चंद्र**–वि. (सं.) १ आनंददायक; आल्हाददायक. २ सुंदर; रमणीय.

**चंद्रहास**–पु. (सं.) १ तलवार. २ चांदी.

**चंद्रिका**-स्त्री. (सं.) १ चांदणें. २ लहान वेलची. ३ मोठी वेलची. ४ चमेली किंवा जुई.

**चंपई**-वि. (सं.) पिवळसर.

**चंपत**-वि. (दे.) गडप झालेला; पसार झालेला; निसटलेला; पळालेला.

**चँपना**-क्रि.अ. (सं.) १ ओझ्याखालीं दबणें; चेपलें जाणें. २ लज्जित होणें. ३ उपकारानें दबणें.

**चंपू**-पु. (सं.) गद्य-पद्यमय काव्य.

**चंबल**-पु. (सं.) भरती; पूर.

**चंबल**-पु. (फा.) १ भीक मागण्याचा कटोरा. २ चिलमीचें फडकें.

**चँवर**-पु. (सं.) १ चवरी. २ झालर. ३ घोडा इ. च्या डोक्यावर लावण्याचा तुरा.

**चउतरा**-पु. चबुतरा पहा.

**चउर**-पु. चँवर पहा.

**चउहट्ट**-पु. (सं.) चौरस्ता; चौक; बाजार; चव्हाटा.

**चक**-पु. (सं.) १ चक्रवापक्षी. २ एक खेळणें. ३ चाक. ४ जमीनीचा मोठा पट्टा-भाग. ५ खेडें. ६ अधिकार. ७ वैपुल्य. ८ सत्ता. ९ साधु. १० खल; दुष्ट.

**चक**-वि. (सं.) १ आश्चर्यचकित झालेला. २ भरपूर; विपुल.

**चकई**-स्त्री. (सं.) १ चक्रवापक्षाची मादी. २ चाक असलेलें एक प्रकारचें खेळणें.

**चकई**-वि. (सं) गोल आकाराचें.

**चकचकाना**-क्रि.अ. (अनु.) १ पाझरणें; थेंब थेंब पाणी अथवा इतर द्रव स्त्रवणें. २ ओलें चिंब होणें.

**चकचकी**-स्त्री. (अनु.) चिपळया.

**चकचून**-वि. (सं.) दळलेला; चूर्ण केलेला.

**चकचौंध**-स्त्री. चकाचौंध पहा.

**चकचौंधना**-क्रि.अ. दृष्टी दिपणें; डोळे दिपणें.

**चकचौंधना**-क्रि.स. डोळे दिपविणें.

**चकचौंधी-चकचौंह**-स्त्री. चकचौंध पहा.

**चकचौहना**-क्रि. (अ.) आशेनें पाहणें; आशेनें नजर लाऊन पाहणें.

**चकड़बा**-पु. चकरबा पहा.

**चकडोर**-पु.(सं.) चकीला गुंडाळलेला दोरा.

**चकत**-पु. दातांची पकड; चावा.

**चकताई**-पु. चकत्ता पहा.

**चकती**-स्त्री. (सं.) चकती; ठिगळ.

**चकत्ता**-पु. (सं.) १ शरीरावरील डाग; चकदळ. २ खाजविल्यामुळें शरीरावर उठलेली सुजल्यासारखी

वाटोळीं लाल चकदळें; गांध. ३ चावल्या-मुळें उठलेले दातांचे वण; चावा.

**चकना**-क्रि.अ. (सं.) चकित होणें; विस्मित होणें.

**चकनाचूर**-वि. (सं.) १ चक्काचूर झालेला. २ थकलेला; भागलेला.

**चकपक**-वि. (सं.) चकित; स्तंभित.

**चकपकाना**-क्रि.अ. (सं.) १ विस्मितपणें इकडे तिकडे बघणें. २ साशंकपणें इकडे तिकडे बघणें.

**चकफेरी**-स्त्री. (सं.) प्रदक्षिणा; फेरी.

**चगबंदी**-स्त्री. (सं+फा.) जमीनीचे लहान लहान भाग पाडणें.

**चकमा**-पु. (सं.) १ फसवणूक. २ नुकसान; हानि; तोटा. ३ मुलांचा एक खेळ.

**चकरबा**-पु. (सं.) १ घोटाळा. २ विचित्र परिस्थिति; पेंच. ३ तंटा; बखेडा.

**चकरा**-पु. (सं.) पाण्याचा भोंवरा.

**चकरा**-वि. (सं.) विस्तृत; लांबरुंद.

**चकराना**-क्रि.अ. (सं.) १ डोकें भिरभिरणें. २ विस्मित होणें; घाबरणें; बुचकळयांत पडणें.

**चकरानी**-स्त्री. (फा.) सेविका; मोलकरीण.

**चकारया**-पु. (फा.) चाकर; सेवक.

**चकरी**-वि. (सं.) १ चक्की. २ चकरी (खेळणें).

**चकरी**-स्त्री. (सं.) भटक्या; अस्थिर.

**चकलई**-स्त्री. (सं.) रुंदी.

**चकला**-पु. (सं.) १ लांकडी अथवा दगडी पोळपाट. २ जातें. ३ इलाखा; जिल्हा. ४ शहरांतील वेश्या राहतात तो विभाग.

**चकला**-वि. (सं.) रुंद.

**चकली**-स्त्री. (सं.) १ कप्पी; चाक. २ सहाण.

**चकली**-वि.स्त्री. रुंद.

**चकलेदार**-पु. (सं.+फा) एकाद्या प्रदेशाचा कर वसूल करणारा सरकारी अधिकारी. (जिल्हाधिकारी वगैरे).

**चकहा**-पु. (सं.) चाक; चक्र.

**चका**-पु. (सं.) १ चाक; चक्र. २ चकवा पक्षी.

**चकाचक**-स्त्री. (अनु.) तलवार इ.चे घाव पडण्याचा शब्द.

**चकाचक**-वि. (अनु.) पूर्ण भिजलेला; पूर्ण मुरलेला; लडबडलेला.

**चकाचक**-वि (अनु.) भरपूर; चापून.

**चकाचौंध**-स्त्री. (अनु.) अत्यंत प्रखर प्रकाशामुळें डोळयापुढें आलेली अंधेरी.

**चकाना**-क्रि.अ. (सं.) विस्मित होणें.

**चकाबू**-पु. ( सं. ) चक्रव्यूह.

**चकित**-वि. ( सं. ) १ चकित; आश्चर्यचकित. २ भ्यालेला. ३ भित्रा.

**चकित**-पु. (सं.) १ विस्मय. २ व्यर्थ भय. ३ भित्रेपणा.

**चकितवंत**-वि. (सं.) आश्चर्ययुक्त; विस्मयकारक.

**चकोटना**-क्रि.स. ( सं. ) चिमटा घेणें.

**चकोतरा**-पु. (सं. ) साखरलिंबू.

**चक्क**-पु. (सं.) १ कुंभाराचें चाक. २ चक्रवाक पक्षी. ३ पीडा; दुःख.

**चक्का**-पु. १ चाक; चक्र. २ चक्का ( श्रीखंडाचा ). ३ माप देण्याकरितां विटा वा दगडांचा केलेला ढीग. ४ चाकासारखी चपटी गोल वस्तु.

**चक्कू**-पु. चाकू.

**चख**-पु. ( सं. ) डोळा.

**चख**-पु. (फा. ) भांडण; तंटा.

**चखचौंध**-स्त्री. चकचौंध पहा.

**चखना**-क्रि.स. (सं.) चाखणें.

**चखाचखी**-स्त्री. ( फा. ) वैर; वैमनस्य.

**चखाना**-क्रि.स. ( सं. ) चाखविणें; खाउं घालणें.

**चखिया**-वि. भांडखोर.

**चखु**-पु. ( सं. ) डोळा.

**चखोडा**-पु. ( सं. ) १ तीट (दृष्ट लागूं नये यासाठीं ). २ गालबोट.

**चखौती**-स्त्री. (सं.) मसालेदार जेवण; स्वादिष्ट जेवण.

**चगड़**-वि. ( दे. ) चलाख; हुषार.

**चचा**-पु. ( सं. ) काका.

**चचिया**-वि. ( सं. ) चुलत.

**चची**-स्त्री. ( सं. ) काकी.

**चचेरा**-वि. ( सं. ) चुलत.

**चचोड़ना**-क्रि.स. ( अनु. ) दातांनीं चाऊन चाऊन चोखणें.

**चट**-क्रिवि. ( सं. ) झटपट; चटकन; लौकर.

**चट**-पु. ( सं. ) १ डाग. २ जखमेचा वण. ३ कलंक.

**चटक**-स्त्री. ( सं. ) १ डाग. २ जखमेचा वण. ३ कलंक.

**चटक**-स्त्री. (सं. ) १ कांति; चमक; दीप्ती; सौंदर्य. २ चपळाई; वेग; गति.

**चटक**-क्रिवि. (सं.) वेगानें; चटकन; झटकन; झटपट.

**चटकन**-पु. चटकना पहा.

**चटकना**-क्रिअ. (अनु.) १ तडकणें; फुटणें. २ तडतडणें ( कोळसे ). ३ चडफडत बोलणें. ४ तडकणें; भेगा

आक्रमण. ५ डावपेंच. ६ वार; वेळा. (एक वार; दोन वेळां इ.).

**चोटइल**-वि. चुटैल पहा.

**चोटाना**-क्रि.अ. (सं.) जखमी होणें.

**चोटार**-वि. १ जखम करणारा. २ जखमी.

**चोटिया**-स्त्री. चोटी पहा.

**चोटी**-स्त्री. (सं.) १ शेंडी. २ वेणी. ३ आगवळ. ४ पक्षांच्या डोक्यावरचा तुरा. ४ सर्वांत उंच भाग; शिखर.

**चोटीपोटी**-स्त्री. १ मिठ्ठास बोलणें; साखर पेरलेलें बोलणें. २ बनावट बोलणें; इकडचें तिकडचें बोलणें.

**चोटीवाला**-पु. भूत; प्रेत अथवा पिशाच्च.

**चोट्टा**-पु. चोरटा; चोर.

**चोड़**-पु. (सं.) उत्तरीय वस्त्र.

**चोड़ी**-स्त्री. (सं.) साडी.

**चोथ**-पु. चौंथ पहा.

**चोद**-पु. (सं.) १ चाबूक. २ भाला.

**चोदक**-वि. (सं.) प्रेरणा करणारा.

**चोदना**-स्त्री. (सं.) स्त्री प्रसंग करणें.

**चोदना**-स्त्री. (सं.) १ प्रेरणा. २ विधिवाक्य; विधी.

**चोदास**-स्त्री. (सं.) कामवासना.

**चोद्य**-पु. (सं.) १ प्रश्न. २ पूर्व पक्ष.

**चोद्य**-वि. (सं.) प्रेरणा करण्यास योग्य.

**चोप**-पु. (सं.) १ इच्छा. २ आवड; शोख. ३ उत्साह. ४ उत्तेजन; प्रोत्साहन.

**चोप**-पु. कच्या आंब्याचा चीक.

**चोप**-स्त्री. चोब पहा.

**चोपदार**-पु. चोबदार पहा.

**चोपना**-क्रि.अ. (सं.) मोहित होणें; आसक्त होणें.

**चोपी**-वि. (सं.) १ इच्छुक. २ उत्साही.

**चोब**-स्त्री. (फा.) १ तंबूचा खांब. २ नगारा वाजविण्याची छडी. ३ सोनें वा चांदीनें मढविलेला दंड. ४ सोटा; छडी.

**चोबदार**-पु. (फा.) चोपदार.

**चोबा**-पु. चोब पहा.

**चोभाना**-क्रि. (सं.) चुभाना.

**चोया**-पु. चोआ पहा.

**चोरकट-चोरचकार**-पु. (सं.) चोर; उचल्या.

**चोराचोरी**-क्रिवि. (सं.) लपून छपून; चोरून.

**चोराना**-क्रि.स. (सं.) चोरणें.

**चोरिका**-स्त्री. (सं.) चोरी.

**चोल-चोलक**-पु. (सं.) १ चोळी. २ लांब अघळपघळ अंगरखा. ३ वल्कल. ४ कवच. ५ एक लता.

**चोलकी**-पु. **चोलन**-स्त्री. (सं.) १ बांबूचा अंकूर; कोंब. २ नारंगीचें झाड. ३ मनगट.

**चोलना**-पु. चोला पहा.

**चोलसुपारी**-स्त्री. चिकण सुपारी.

**चोला**-पु. (सं.) १ पायघोळ पोकळ अंगरखा, हा साधु व फकीर वापरतात. ३ शरीर.

**चोली**-स्त्री. (सं.) १ चोळी. २ चोला १ पहा. ३ टोपली; पाटी. ४ अंगरख्याचा वरचा भाग जेथें बंद वगैरे असतात.

**चोल्ला**-पु. चोला पहा.

**चोषक**-वि. (सं.) शोषक.

**चोषण**-पु. (सं.) शोषण.

**चौंक**-स्त्री. (सं.) साश्चर्य भय; (एकदम अकस्मात एकादी भयदायक घटना घडली असतां होणारी मनाची अवस्था) दचक.

**चौंकना**-क्रिअ. (सं.) १ दचकणें-बिचकणें; भयचकित होणें. २ जागरूक होणें; सावध होणें. ३ विस्मित होणें. ४ कचरणें; भिणें.

**चौंकाना**-क्रि.स. (सं.) १ दचकविणें; बिचकविणें. २ भडकविणें. ३ चकित करणें; विस्मित करणें; आश्चर्यचकित करणें

**चौंतरा**-पु. चबूतरा पहा.

**चौंधियाना**-क्रि.अ. (सं.) १ डोळे दिपणें; डोळ्यांना प्रकाश सहन न होणें. २ दृष्टि मंद होणें.

**चौंर**-पु. (सं.) चवळी. २ झुबका; गोंडा.

**चौंरा**-पु. (सं.) धान्याचें पेंव.

**चौंराना**-क्रि.स. (सं.) १ चवरी वारणें. २ झाडू मारणें; कुंचा फिरविणें; झाडणें.

**चौंरी**-स्त्री. (सं.)१ चवरी. २ पांढऱ्या शेपटीची गाय. ३ आगवळ.

**चौंसठ**-वि. (सं.) चौसष्ट.

**चौंह**-पु. (दे.) १ गालफड. २ जलचरांचें श्वासोच्छ्वास करण्याचें इंद्रिय.

**चौ**-वि. (सं.) चार.

**चौअन**-वि. चौवन पहा.

**चौआ**-पु. (सं.) १ चतुष्पाद प्राणी. २ चारबोटांचें अंतर. ३ चव्वा (खेळाच्या पत्त्यांमधील).

**चौआना**-क्रि.अ. (सं.) १ विस्मित होणें. २ घाबरणें.

**चौक**-पु. (सं.) १ चौक. २ चौक; अंगण. ३ चौकोन. ४ सोंगट्यांचा पट. ५ समोरचे चार दांत. ६ सीमंत कर्म.

**चौकठ**-पु. चौखट पहा.

**चौकड़**-वि. (सं.) दुरुस्त; चांगला; ठीक.

**चौकड़ी**-स्त्री. (सं.) १ हरिणाचें चौखूर धांवणें. २ उडी. ३ चौकडी; चार माणसांचा समूह.

**चौकड़ी**-स्त्री. (सं.) चार घोड्यांची गाडी.

**चौकन्ना**-वि. (सं.) १ सावध; जागरूक. २ साशंक; शंकित.

**चौकस**-वि. (सं.) १ सावध; जागरूक; हुशार. २ चांगला; बरोबर; ठीक.

**चौकसी**-स्त्री. (सं.) खबरदारी; सावधानता.

**चौका**-पु. (सं.) १ दगडाचा चौकोनी पाटा. २ दगडाचा अथवा लांकडाचा पोळपाट. ३ समोरचे चार दांत. ४ एक दागिना. ५ स्वयंपाकगृह. ६ सारवण; पोतेरें (शेणाचें अथवा मातीचें). ६ चौफुला; चौकडा. (चार वस्तूंचा संग्रह किंवा संच.) ७ चव्वा. ८ चौकोनी तुकडा.

**चौकी**-स्त्री. (सं.) १ खुर्ची. २ बंदराचें प्रवेशद्वार. ३ अड्डा; मुक्कामाची जागा. ४ चौकी; नाकें. ५ पहारा; रखवाली; चौकी. ६ देवास किंवा पिरास वहावयाच्या वस्तू. ७ जादूटोणा. ८ एक गळ्यांतील दागिना. ९ लहान पोळपाट. १० चौरंग.

**चौकोना-चौकोर**-वि. (सं.) चौकोनी.

**चौखट**-स्त्री. (सं.) १ दाराची चौकट. देवडी.

**चौखटा**-पु. (सं.) आरसा अथवा चित्राची चौकट (फ्रेम).

**चौखना**-वि. (सं.) चार मजली (घर.)

**चौखा**-पु. (सं.) चार गांवांच्या सीमा जेथें मिळतात असें ठिकाण.

**चौखूँट**-पु. (सं.) १ चार दिशा. २ भूमंडल.

**चौखूँट**-क्रिवि. (सं.) चौफेर; चारी दिशांना.

**चौखूँटा**-वि. (सं.) चौकोनी; चारकोनी.

**चौगड़ा**-पु. (सं.) १ ससा. २ चौघडा पहा.

**चौगड्डा**-पु. (सं.) १ चार वस्तूंचा समूह. २ चौखा पहा.

**चौगान**-पु. (फा.) १ पोलोचा खेळ. २ पोलोची काठी. ३ नगारा वजावण्याच्या कामच्या. ४ पोलोचें मैदान.

**चौगानी**-स्त्री. (फा.) हुक्क्याची तोंडात धरावयाची नळी.

**चौगिर्द**-क्रिवि. (सं.+फा.) चारही बाजूस; चोहोंकडे.

**चौगुना-चौगून**-वि. (सं.) चार पट; चौपट.

**चौगोडा**-वि. (सं.) चार पायांचा.

**चौगोडा**-पु. (सं.) ससा.

**चौगोडिया**-स्त्री. (सं.) १ एक प्रकारची उंच खुर्ची. २ बांबूचा एक प्रकारचा पारध्यांचा सांपळा यांस एक प्रकारचा चिकट गोंद लावतात. म्हणजे पक्षांचें पंख चिकटतात.

**चौगोशा**-पु. (फा.) चौकोनी तबक (ट्रे).

**चौगोशिया**-वि.स्त्री. (फा.) चार कोनांची.

**चौगोशिया**-स्त्री. (फा.) एक प्रकारची चार टोकें असलेली टोपी.

**चौगोशिया**-वि.स्त्री. (फा.) चाकोनी.

**चौघड़**-पु. दाढ.

**चौघड़ा**-पु. (सं.) १ चार कप्पे असलेला विड्याचा डबा. २ चार खण असलेला डबा. ३ एक प्रकारची मोठी वेलची. ४ चौघड़ा.

**चौचंद**-पु. (सं.) निंदा.

**चौचार**-वि. (सं.) चिंधड्या.

**चौड़ा**-वि. (सं.) रुंद.

**चौड़ाई-चौडान**-स्त्री. (सं.) रुंदी.

**चौड़ाना**-क्रि.स. (सं.) रुंद करणें; पसरविणें.

**चौतनिया**-स्त्री. (सं.) १ चोळी. २ चौतनी पहा.

**चौतनी**-स्त्री. (सं.) चार बंदांचें टोपडें.

**चौतरा**-पु. चबुतरा पहा.

**चौतरा**-पु. (सं.) तंबोरा

**चौताली**-स्त्री. (दे) कापसाचें बोंड.

**चौथ**-स्त्री. (सं.) १ चतुर्थी. २ चौथा हिस्सा; चतुर्थांश.

**चौथ-चौथा**-वि. चवथा.

**चौदंती**-स्त्री. (सं..) अल्लड; उद्धट.

**चौदस-चौदश**-स्त्री. (सं.) चतुर्दशी.

**चौदह**-वि. (सं.) चौदा.

**चौधरी**-पु. (सं.) कोणत्याही जातीचा, समाजाचा मुख्य.

**चौप**-पु. चोप पहा.

**चौपग**-पु. (सं.) चतुष्पाद प्राणी.

**चौपट**-वि. (सं.) चारही बाजूंनी उघडा; असुरक्षित.

**चौपट**-वि. (सं.) नष्ट; नाश झालेला.

**चौपट**-वि. (सं.) नाश करणारा सत्यानाशी.

**चौपड़**-पु. (सं.) १ सोंगटयांचा खेळ. २ सोंगटया व सोंगटयांचा पट. ३ बाजेची चौकटी चौकटीची वीण.

**चौपत**-स्त्री. (सं.) कपडयाची घडी.

**चौपताना-चौपरतना**-क्रि.स.(सं.) घडया घालणें.

**चौपहल-चौपहिलू**-वि. (सं.+फा.) चार बाजू असलेला (लांबी रुंदी व उंची इ.)

**चौपा**-पु. चौपाया पहा.

**चौपाई**-स्त्री. (सं.) खाट; बाज.

**चौपाया**-पु. (सं.) चतुष्पाद प्राणी.

**चौपाल**-पु. (सं.) १ वर छप्पर असून चारही बाजूंनी मोकळी जागा. २ बैठक. ३ ओसरी. ४ पालखी.

**चौपैया**-पु. (सं.) खाट.

**चौफला**-पु. (सं.) चार पात्यांचा चाकू.

**चौफेरी**-स्त्री. (सं.) प्रदक्षिणा.

**चौफेरा**-क्रिवि. (सं.) चौफेर.

**चौबंदी**-स्त्री. १ कर. २ घोडयाची नालबंदी.

**चौबच्चा**-पु. १ कुंड; हौद. २ धन पुरलेला खड्डा.

**चौबा**-पु. (सं.) मथुरेचा पंडया.

**चौबाई**-स्त्री. १ चारही बाजूंनी वाहणारी हवा. २ अफवा. ३ खळबळीची चर्चा.

**चौबारा**-पु. १ चारही बाजूंनी दरवाजे असलेली मोकळी हवेशीर बैठकीची खोली. २ वरती छत आणि चारही बाजूंनी मोकळी बैठकीची जागा.

**चौबारा**-क्रिवि. चवथ्यांदा.

**चौबिस**-वि. (सं.) चोवीस.

**चौभड़**-स्त्री. (सं.) दाढ.

**चौमंजिला**-वि. (सं+फा.) चार मजली.

**चौमासा**-पु. (सं.) चातुर्मास.

**चौमुख**-क्रिवि. (सं.) चौफेर; चारही बाजूंस.

**चौमुहानी**-स्त्री. (सं.+फा.) चौक; चौरस्ता.

**चौरंग**-पु. (सं.) तरवारीचा एक हात.

**चौंरंग**-वि. (सं.) तलवारीनें तुकडे तुकडे झालेला.

**चौरंगा**-वि.(सं.) चार रंगी; चौरंगी.

**चौरंगिया**-स्त्री. मल्लखांबाची एक कसरत.

**चौर**-पु. (सं.) १ चोर. २ पावसाचें पाणी बरेच दिवस सांठलेलें खाचर.

**चौरस**-वि. (सं.) १ सपाट; समतल. २ चौपहल पहा.

**चौरसाना**-क्रि.स. (सं.) सपाट करणें.

**चौरा**-पु. (सं.) १ चबुतरा; चौथरा. २ वेदी. ३ चौबारा (पु.) पहा. ४ पांढऱ्या शेपटीचा बैल.

**चौरानबे**-वि. (सं.) चौऱ्याण्णव.

**चौरासी**-वि.(सं.) चौऱ्यायशी.

**चौराहा**-पु. (सं.) चौक; चौरस्ता.

**चौरी**-स्त्री. (सं.) लहान चबुतरा; लहान वेदी.

**चौरी**-स्त्री. (सं.) चोरी.

**चौरेठा**-पु. (सं.) भिजविलेल्या तांदुळाचें पीठ.

**चौवा**-पु. (सं.) हाताच्या चार बोटांचा समूह. २ अंगठा सोडून बोटांभोवती गुंडाळलेला दोरा. ३ चार बोटांवर गुंडाळलेल्या दोऱ्याइतकी लांबी. ४ चव्या.

**चौवालीस**-वि. (सं.) चव्वेचाळीस.

**चौस**-पु. (दे.) पूड; चूर्ण.

**चौसर**-पु. (सं.) १ सोंगट्यांचा खेळ. २ सोंगट्यांचा पट. ३ चार पदरी हार.

**चौसरी**-स्त्री. (सं.) चौसर पहा.

**चौसिंघा**-वि. (सं.) चार शिंगांचा.

**चौहट्टा**-पु. (सं.) १ चारी बाजूंना दुकानें असलेला चौक. २ चौक; चौरस्ता. ४ चव्हाटा.

**चौहड़**-पु. (दे.) चौभड़ पहा.

**चौहत्तर**-वि. (सं.) चौऱ्याहत्तर.

**चौहद्दी**-स्त्री. (सं.+फा.) चार बाजूंच्या हद्दी.

**चौहरा**-वि. (सं.) १ चौपदरी; चौघडी. २ चौपट.

**चौहैं**-क्रिवि. (दे.) चारी बाजूंस; चोहोंकडे.

**च्यवन**-पु. (सं.) १ ठिबकणें; गळणें; स्रवणें. २ एक ऋषि.

**च्यूत**-पु (सं.) आंबा फळ व वृक्ष.

---

## छ

**छंग**-पु. (सं.) १ उत्संग; मांडी. २ कूस; छाती.

**छंगा**-वि. (सं.) हाताला सहा बोटें असलेला.

**छंगुनिया, छंगुलिया, छंगुली**-स्त्री. छगुनी पहा.

**छंगू**-वि. छंगा पहा.

**छंछाल**-पु. (दे.) हत्ती.

**छँटना**-क्रि.अ. (सं.) १ अलग होणें; संबंध तुटणें. २ शिवडलें जाणें.

३ छाटलें जाणें; कापलें जाणें. ४ साफ होणें; मळ निघणें. ५ क्षीण होणें; म्लान होणें.

**छँटाई**-स्त्री. (सं.) १ निवड; छाटणी. २ कापणी. ३ सफाई.

**छँटाना**-क्रि.स. (सं.) १ छाटविणें; कापविणें. २ निवडविणें; छाटविणें. ३ सोलविण; तासविणें.

**छँटाव**-पु. छँटाई पहा.

**छँडना**-क्रि.स. (सं.) १ सोडणें; त्यागणें. २ कांडणें.

**छँडना**-क्रि.अ. (सं.) ओकणें.

**छँड़रना**-क्रि.अ.(सं.) टरकणें;फाटणें; तडकणें.

**छँडाना**-क्रि.स. (सं.) हिसकावून घेणें; बुचाडणें.

**छँडुआ**-वि. (सं.) १ सोडून दिलेला; मुक्त. २ ज्याला शासन होऊं शकत नाहीं असा; अदंडय. ३ अनिर्बंध.

**छंद्**-पु. (सं.) १ छंद. २ इच्छा; अभिलाषा. ३ स्वैराचार; स्वेच्छाचार. ४ बंधन; गांठ. ५ कपट. ६ आकार; डौल. ७ मतलब; अभिप्राय. ८ एकांत. ९ विष. १० आवरण; झांकण. ११ युक्ति.

**छंद्क**-वि. (सं) १ रक्षक. २ छली पहा.

**छंद्क**-छल पहा.

**छँद्ना**-क्रि.अ. (सं.) पाय दोरीनें बांधले जाणें.

**छंद्गातन**-पु. (सं.) ढोंगी साधु; ढोंगी.

**छंद्बंद्**-पु. कपट; धोका.

**छंद्ी**-स्त्री. (सं.) एक प्रकारची बांगडी.

**छंद्ी**-वि. (सं.) कपटी; धोकेबाज.

**छंदे्ली**-स्त्री. छंदी पहा.

**छंदोबद्ध**-वि. (सं.) श्लोकबद्ध.

**छ**-पु. (सं.) १ कापणें; तोडणें. २ झांकण. ३ घर. ४ खंड; तुकडा.

**छ**-वि. (सं.) १ निर्मल; साफ; स्वच्छ. २ चंचल.

**छ**-वि. (सं.) सहा.

**छकड़ा**-पु. (सं.) छकडा; बैलगाडी.

**छकड़ा**-वि. (सं.) खिळखिळा; मोडका.

**छकड़िया**-स्त्री. (सं.) सहा भोयांनीं उचलावयाची पालखी.

**छकड़ी-छकरी**-स्त्री. (सं.) १ सहांचा समूह, गट. २ छकड़िया पहा. ३ सहा घोडयांची गाडी.

**छकना**-क्रि.अ. (सं.) १ तृप्त होणें (खाऊन पिऊन). २ मद्य पिऊन तर्र होणें; झिंगणें. ३ चकणें. ४ अचंबित॰

होणें; आश्चर्यचकित होणें. ५ हैराण होणें; त्रासणें.

**छकाछक**-वि.(सं.) १ खाऊनपिऊन तृप्त; संतुष्ट. २ परिपूर्ण; भरलेला. ३ निशेंत चूर; मदमत्त; उन्मत्त.

**छकाना**-क्रि.स. (सं.) चकविणें; आश्चर्यचकित करणें. २ खाऊंपिऊं घालून तृप्त करणे. ३ खूप मद्य पाजून तर्र करणें; मस्त करणें. ४ त्रासविणें; हैराण करणें.

**छक्का** पु. (सं.) १ छक्का. २ सहांचा समूह. ३ फाशांचा एक डाव. ४ द्यूत; जुगार. ५ शुद्धी; शुद्ध; भान; अवसान.

**छगड़ा**-पु. (सं.) बकरा.

**छगण**-पु.(सं.) वाळलेलें शेण; गोवरी.

**छगन**-पु. (सं;) छकुला; चिमणा; लहान बालक

**छगन**-वि. (सं.) छकुला; छबकडा.

**छगनमगन**-लहान लहान मुलें; चिमुकलीं मुलें.

**छगरी**-स्त्री. (सं.) लहान बकरी.

**छगुनी**-स्त्री. (सं.) करंगळी.

**छछिआ-छछिया**-स्त्री. १ ताक पिण्याचें अथवा मोजण्याचें भांडें. २ ..ताक; मठ्ठा.

**छछुंदर-छछूँदर**-पु. (सं.) १ घूस. २ एक प्रकारचा रजपूत लोकांचा ताईत. ३ चिचुंद्री (फटाक्यांचा एक प्रकार.)

**छछेरू**-पु. (सं.) तुपाची बेरी.

**छजना**-क्रि. अ. (सं.) १ खुलून दिसणें; शोभणें; साजणें. २ उचित असणें; योग्य असणें; साजेसें असणें.

**छज्जा**-पु. (सं.) १ सज्जा; गॅलरी. २ छपराचा भिंतीच्या पुढें आलेला भाग.

**छटंकी**-स्त्री. (सं.) १ छटाक. २ अतिशय लहान.

**छटकना**-क्रि.अ. (अनु.) १ सटकणें; निसटणें. २ दूर दूर राहणें. ३ ताब्यांत न राहणें; अधीन न राहणें; बहकणें. ४ उडी मारणें.

**छटकाना**-क्रि. स. (अनु.) १ सटकविणें; निसटविणें. २ हिसडा देऊन सटकविणें; सोडविणें. ३ ओढून काढणें (पकडींत किंवा दाबाखालीं असलेली वस्तु).

**छटना**-क्रि. अ. छँटना पहा.

**छटपटाना**-क्रि. अ. (अनु.) १ हात पाय झाडणें; तडफडणें. २बेचैन होणें; व्याकूळ होणें. ३ उत्कंठित होणें; अधीर होणें.

**छटपटी**–स्त्री. ( अनु.) १ व्याकुळता. २ उत्कंठा.

**छटांक**–स्त्री. (सं.) छटाक.

**छटा**-स्त्री. ( सं. ) १ दीप्ती; प्रकाश; झळक; प्रभा. २ शोभा; सौंदर्य. ३ वीज.

**छटाफल**–पु. (सं.) ताड.

**छटाभा**–स्त्री. ( सं. ) १ चहऱ्यावरील तेज; चेहऱ्यावरील कांति २ विजेची चमक.

**छठ**–स्त्री. ( सं. ) षष्ठी.

**छठवाँ-छठा**-वि. ( सं. ) साहावा.

**छठी**-स्त्री. ( सं. ) जन्मल्यानंतर सहाव्या दिवशीं करण्यांत येणारा संस्कार; सठीपूजन.

**छड़**–स्त्री. (सं.) १ गज; सळई. २ दांडी; लांब बारीक काठी; छडी.

**छड़ना**–क्रि.स. सडणें(धान्य इ. ).

**छड़ा**-पु. ( सं. ) १ पायांत घालावयाचा तोडा. २ मोत्यांच्या सरांची माळ.

**छडा**–वि. ( सं. ) सडा; एकटा.

**छड़िया**–पु.(सं.) पहारेकरी;द्वारपाल.

**छड़ियाल**–पु. ( सं. ) एक प्रकारचा भाला.

**छड़ी**–स्त्री. ( सं. ) १ बारीक काठी; छडी. २ पताका; झेंडा.

**छड़ी**–वि.स्त्री. ( सं. ) सडी; एकटी.

**छड़ीबरदार**–पु.(सं.+फा.)भालदार.

**छण**–पु. (सं.) क्षण.

**छत**–पु. (सं.) १ छत. २ गच्ची.

**छत**–पु. (सं. ) क्षत.

**छतना**–पु. ( सं. ) पानांची छत्री.

**छतनार**--वि. (सं.) पसरलेला;विस्तृत.

**छतरी**–स्त्री. (सं.) १ छत्री. २ छतना पहा. ३ मंडप.

**छतिया**–स्त्री. ( सं. ) छाती.

**छतियाना**–क्रि.स. ( सं. ) छातीजवळ नेणें; आलिंगिणें.

**छतीसा**–वि. ( सं. ) १ चतुर; हुषार. २ कपटी; धोकेबाज.

**छत्ता**–पु. ( सं. ) १ छत्री. २ छत. ३ मधमाशीचें पोळें. ४ छत्रीसारखी दूर वर पसरलेली वस्तु. ५ कमळाचा बीजकोश.

**छत्तीसा**–पु. (सं. ) न्हावी; हजाम.

**छत्तीसा**–वि. छतीसा ( वि. ) पहा.

**छत्तीसी**–वि.स्त्री. ( सं. ) दुर्वर्तनी स्त्री; छिनाल.

**छत्री**–वि. (सं.) छत्रधारी.

**छत्री**–पु. (सं.) १ नापित; न्हावी. २ क्षत्रिय.

**छदन**–पु. ( सं. )१ आच्छादन;आवरण. २ पान. ३ पंख. ४ तमालपत्र.

**छद्र**-पु. खोडकर मुलगा.

**छन**-पु. क्षण.

**छनक**-स्त्री. (अनु.) झणकार; झंकार; झुणझुण.

**छनक**-स्त्री. (अनु.) भीतीमुळें पळून जाण्याची क्रिया.

**छनक**-पु. (अनु.) एक क्षण.

**छनकना**-क्रि.अ. (अनु.) १ तापलेलें लोखंड अथवा तवा यांवर पडलेलें पाणी चर्र् आवाज होऊन उडून जाणें. २ छनछन आवाज होणें.

**छनकना**-क्रि.अ. (अनु.) भिऊन किंवा बुझुन पळत सुटणें.

**छनकमनक**-स्त्री. (अनु.) १ आभूषणांचा झणकार; छुनछुन आवाज. २ थाटमाट.

**छनकाना**-क्रि.स. (अनु.) १ पाणी कमी करण्याकरितां विस्तवावर ठेऊन उकळणें. २ तापलेल्या भांड्यांत पाणी किंवा इतर द्रव पदार्थ टाकून उकळविणें. ३ बुझविणें; भडकविणें.

**छनछनाना**-क्रि.अ. (अनु.) १ छनछन आवाज होणें. २ उकळत्या तेलांत भाजी किंवा इतर पदार्थ घालताना आवाज होणें. ३ तापलेल्या तव्यावर पाणी पडल्यानें आवाज होणें.

**छनछनाना**-क्रि.स.. (अनु.) छनछन आवाज करणें.

**छननमनन**-पु. (अनु.) उकळत्या तेलांत पदार्थ पडताना होणारा आवाज.

**छनना**-क्रि.अ. (सं.) १ गाळलें जाणें. २ भोकें पडून जाळी होणें. ३ छाननी होणें. ४ तळून निघणें. ५ जखमांनी शरीराची चाळण होणें. ६ मद्य प्यालें जाणें.

**छनना**-पु. (सं.) गाळण्याचें साधन.

**छनाना**-पु. (सं.) १ झणकार. २ रुपयांचा खणखण आवाज.

**छनाना**-क्रि.स. (सं.) १ चाळून अथवा गाळून घेणें. २ दारु पाजणें. ३ तळविणें.

**छनिक**-वि. (सं.) क्षणिक.

**छन्न**-वि. (सं.) १ आच्छादित; झांकलेला. २ लुप्त; गायब.

**छन्न**-पु. (सं.) १ एकान्तस्थान; निर्जनस्थान. २ गुप्तस्थान.

**छन्न**-पु. (अनु.) १ तापलेल्या पदार्थावर पाणी पडल्यावर होणारा आवाज. २ छन् आवाज.

**छन्नमति**-वि. (सं.) मूर्ख; बेअक्कल.

**छन्ना**-पु. (सं.) छनना पहा.

**छप**-स्त्री. (अनु.) सप्प असा आवाज.

**छपकना**-क्रि.स. (अनु.) छडीनें छम् छम् मारणें. २ कटयार किंवा तरवारीनें छिन्न भिन्न करणें.

**छपका**-पु. (अनु.) डोक्यावर घालण्याचा एक अलंकार.

**छपका**-पु. (अनु.) १पाण्याचा सपका. २पोहतांना हातपाय मारण्याची क्रिया. ३ पातळ कामटी; शिमटी.

**छपछपाना**-क्रिअ. (अनु.) १पाण्यावर पाय किंवा इतर वस्तु आपटून आवाज उत्पन्न होणें. २ थोडसें पोहणें; डुंबणें; डुबुकडुबुक करणें.

**छपछपाना**-क्रि.स. (अनु.) पाण्यावर पाय किंवा काठी इ. आपटून सप सप आवाज उत्पन्न करणें.

**छपटना**-क्रि. अ. (सं.)१ चिकटणें; लागणें. २ आलिंगित होणें.

**छपटाना**-क्रि. स. (सं.) १ चिकटविणें; खेटविणें. २ आलिंगिणें.

**छपटी**-स्त्री. (सं.) १ लांकडाची धलपी. २ सालपट.

**छपटी**-वि. (सं.) कृष; हडकुळा.

**छपद**-पु (सं.) भुंगा.

**छपन**-वि. (सं.) गुप्त; लुप्त; गायब.

**छपन**-पु. (सं.) नाश; संहार.

**छपना**-क्रि. अ. (सं.) १ छापलें जाणें. २ चिन्हांकित होणें. ३ देवी टोंचल्या जाणें. ४ छिपना पहा.

**छपरी**-स्त्री. (सं.) झोंपडी; मठी.

**छपवाई**-स्त्री. (सं.) छपाई पहा.

**छपाई**-स्त्री. (सं.) १ छपाई; मुद्रण; २ छापण्याची मजुरी.

**छपाना**-क्रि. स. (सं.) १ छापविणें. २ देवी टोंचणें. ३ छिपाना पहा.

**छबडा**-पु. (दे.) हारा; पाटी.

**छवि**-स्त्री. (सं.) छवि पहा.

**छबिला**-वि. (सं.) सुंदर; देखणा.

**छब्बी**-स्त्री. पैसा.

**छब्बीस**-वि. (सं.) सव्वीस.

**छमंड**-पु. (सं.) पितृहीन बालक.

**छमकना**-क्रि. अ. (अनु.) वाजवून छमछम आवाज करणें. २ दागिन्यांचा आवाज करणें; एट दाखविणें.

**छमछम**-स्त्री. (अनु.) १ छमछम असा नूपुरांचा आवाज. २ पाऊस पडण्याचा आवाज.

**छमछम**-क्रि. वि. (अनु.) छमछम आवाज करीत.

**छमना**-क्रि. स. (सं.) क्षमा करणें.

**छमा**-स्त्री. (सं.) क्षमा.

**छमाछम**-क्रि. वि. छमछम पहा.

**छमाछम**-स्त्री. (अनु.) छमछम आवाज; नूपुरांचा आवाज.

**छमिच्छा**-स्त्री. (सं.) १ समस्या. २ इशारा; संकेत.

**छय**-पु. ( सं. ) क्षय.

**छर**-पु. छल पहा. क्षर पहा.

**छरकना**-क्रि. अ. (अनु.) १ सर सर करीत विखुरणें. २ घसरणें; घरंगळणें.

**छरछर**-पु. (अनु.) १ छडी मारल्याचा सट सट आवाज. २ छरे आपटल्याचा आवाज.

**छरछराना**-क्रि. अ. ( सं. ) झोंबणें; आग होणें; चुरचुरणें.

**छरछराहट**-स्त्री. ( सं. ) चुरचुरणें; झोंबणें.

**छरना**-क्रि. अ. (सं.) १ स्रवणें; वाहणें. २ ठिबकणें; टपकणें; ३ सटकणें; निखळणें.

**छरना**-क्रि. अ. भुतानें पछाडलें जाणें.

**छरभार**-पु (सं.) १ कामाचा बोजा; कार्यभार. २ भांडण; बखेडा.

**छरहरा**-वि. (सं.) १ फाटक्या अंगाचा; सडपातळ. २ अतिशय चपळ; चलाख.

**छरा**-पु. (सं.) १ छडा पहा. २ लड. ३ विजारीची नाडी. ४ दोरी; रश्शी.

**छरिया**-पु. ( सं. ) चोपदार.

**छरीया**-वि. (स.) १ सडा; एकटा. २ प्रवासांत बरोबर विशेष सामान नसलेला.

**छरीला**-पु. (सं.) दगडफूल.

**छरोरा**-पु. (सं.) ओरखडा.

**छर्दन**-पु (सं.) **छर्दि**-स्त्री **छर्दिका**-स्त्री. ओकारी; वमन.

**छर्रा**-पु- (अनु.) छर्रा; बंदुकीची बारीक गोळी.

**छलंक-छलंग**-स्त्री. छलाँग पहा.

**छल**-पु. (सं.) १ कपट; फसवणूक. बहाणा; बतावणी; मिष. २ ठगी; धूर्तता.

**छल**-पु. (अनु.) १ पाण्याचे थेंब खालीं पडतांना होणारा आवाज. २ ओंजळींन वरून पाणी घालतांना पडणारी धार.

**छलक**-स्त्री. छलकन पहा.

**छलक**-पु. ( सं. ) फसव्या; धूर्त; कपटी.

**छलकन**-स्त्री. ( अनु. ) उसळी; उसळून बाहेर येणें.

**छलकना**-क्रि.अ. (अनु.) १ ओसंडणें; उसळून हिसकळून बाहेर पडणें; डचमळून सांडणें. २ प्रकट होणें; वर येणें.

**छलकाना**-क्रि स. (अनु.) उसळविणें; हिसकळविणें; हिसके देऊन सांडणें.

**छलछलाना**-क्रि अ. (अनु.) १ सळ ळ करीत वाहणें; झुळुझुळु वाहणें; २ सळसळ आवाज करणें.

**छलछिद्र**-पु. (सं.) कपट; फसवेगिरी; लबाडी.

**छलछिद्री**-पु. (सं.) धोकेबाज; लबाड.

**छलना**-क्रि.स. (सं) धोका देणें; फसविणें; दगा देणें.

**छलनी**-स्त्री. (सं.) चाळण.

**छलहाई**-वि स्त्री. (सं.) कपटी.

**छलहाई**-स्त्री. (सं.) कपट.

**छलाँग**-स्त्री. (सं.) उडी.

**छला**-पु. (सं.) अंगठी.

**छला**-स्त्री. (सं.) चमक; कांति; दीप्त.

**छलाना**-क्रि.स. (सं.) प्रतारण। करविणें; धोक्यांत टाकविणें.

**छलावा**-पु. (सं.) १ भु ाचा भास; भुताची सावली. २ आग्या वेताळ. ३ इंद्रजाल; जादू.

**छलित**-वि (सं.) वंचित, प्रतारित.

**छलिया**-वि. (सं.) कपटी.

**छली**-वि (सं) धोकेबाज.

**छल्ला**-पु (सं.) १ छला पहा. २ कडें :वळें ३ एक पंजाबी गीत प्रकार. ४ मंडलाकार वस्तु.

**छल्ली**-स्त्री. (सं.) १ छाल पहा. २ लता; वेल. ३ संतति. ४ एक प्रकारचें फूल.

**छवना**-पु. (सं.) १ छावा; बछडा. २ डुकराचें पिलूं.

**छवा**-पु. (सं.) छावा.

**छवा**-पु. (दे.) एँडी पहा.

**छवाई**-स्त्री. (सं.) १ शाकारणी. २ शाकारण्याची मजुरी.

**छवाना**-क्रि.स. (सं.) शाकारून घेणें.

**छवैया**-पु (सं.) कौलें शाकारणारा.

**छह**-वि. छ पहा.

**छहरना**-क्रि. अ (सं.) विमकटणें; इतस्ततः पसरणें; विखुरणें.

**छहरा**-वि. (सं.) १ सहा पदरी. २ उत्पन्नाचा सहावा भाग.

**छहराना**- क्रि. अ. छहरना पहा.

**छहराना**-क्रि. स. पसरविणें; इतस्ततः पसरविणें; विखुरणें.

**छहियाँ**-स्त्री (सं) छाया.

**छाँ**-स्त्री. छाँह पहा.

**छाँक** पु. (फा.) तुकडा; खंड.

**छाँगना**-क्रि स. (सं) कापणें; छाटणें; तोडणें.

**छाँगुर**-पु. (सं.) हाताला सहा बोटें असलेला.

**छाँछ**-स्त्री (सं.) छाछ पहा.

**छाँट**-स्त्री. ( सं. ) १ छाटणी; छाट. २ कतरण. ३ धान्याचा कोंडा. ४ निवडून काढलेल्या रद्दी वस्तू. ५ ओकारी.

**छाँटन**-स्त्री. ( सं.) छाँट २, ४ पहा.

**छाँटना**-क्रि. स. ( सं. ) १ छाटणें; कापणें. २ निवडणें. ३ निवडणें; पसंत करणें. ३ धान्य निवडणें; भुसा काढणें. ४ साफसूफ करणें; घाण काढून टाकणें. ५ छाटाछाट करून कमी करणें. ६ गप्पा छाटणें. ७ वगळणें; दूर ठेवणें.

**छाँटचिट्ठी**-स्त्री. परवानापत्र; पासपोर्ट.

**छाँडना**-क्रि. स. ( सं. ) सोडणें; टाकणें.

**छाँद**-स्त्री. ( सं ) जनावरांचे पाय बांधण्याची दोरी.

**छादना**-क्रि. स. ( सं. ) १ दोरीनें बांधणें; जखडणें. २ पायांना मिठी मारून बसणें ( पाय धरणें ).

**छांदा**-पु. ( सं. ) भाग; वांटा; हिस्सा.

**छांदा**-पु. सुग्रास भोजन; पक्वान्न.

**छाँवँ**-स्त्री. छाँह पहा.

**छाँवड़ा**-पु. ( सं.) १ छावा. २ बालक.

**छाँस**-स्त्री. १ धान्याचा कोंडा. २ कण्या. ३ केरकचरा.

**छाँह**-स्त्री. ( सं. ) छाया; सावली.

**छाँहगीर**-पु. ( सं. + फा. ) १ छत्र; राजछत्र. २ आरसा.

**छाँही**-स्त्री. छाँह पहा.

**छाक**-स्त्री. ( सं. ) १ तृप्ति; इच्छापूर्ति. २ दुपारचें जेवण. ३ नशा; मस्ती; मद.

**छाकना**-क्रि. अ. ( सं. ) १ यथेच्छ खाणें. २ दारू पिऊन तर्र होणें.

**छाकना**-क्रि. अ. ( सं. ) आश्चर्य चकित होणें.

**छाग**-पु. ( सं. ) बकरा.

**छागन**-पु. ( सं. ) गोवरीचा विस्तव.

**छागर**-स्त्री. ( सं. ) बकरी.

**छागल**-पु. ( सं. ) बकरा.

**छाछ**-स्त्री. ( सं. ) ताक.

**छाज**-पु. ( सं. ) १ सूप. २ छप्पर.

**छाजन**-पु. ( सं. ) आच्छादन; वस्त्र; कपडा.

**छाजन**-स्त्री. ( सं. ) १ छप्पर; कौलार २ शाकारण्याचें काम.

**छाजना**-क्रि. अ. ( सं. ) साजणें; शोभणें; शोभून दिसणें.

**छाजा**-पु. छज्जा पहा.

**छाजित**-वि. ( सं. ) शोभित.

**छाडना; छाड़ना**-क्रि. अ. ( सं. ) ओकणें.

**छाडना; छाड़ना**–क्रि.स. छाँड़ना; छोड़ना पहा.

**छात**–पु. (सं.) १ छत्री. २ राजछत्र. ३ आधार; छत्र.

**छात**–वि. कृश.

**छाता**–पु. (सं.) १ छाती. २ रुंद छाती; छाताड. ३ छातीचा घेर. ४ छत्री.

**छाता**–स्त्री. (सं.) १ छाति. २ स्तन.

**छात्रक**–पु. (सं.) विद्यार्थी.

**छात्रगंड**–पु. (सं.) अतिशय हुशार विद्यार्थी.

**छात्रवृत्ति**–स्त्री. (सं.) शिष्यवृत्ति.

**छात्रालय**–पु.(सं.)विद्यार्थी वसतिगृह.

**छानन**–पु. (सं.) १ आच्छादन; आवरण. २ छिपाव पहा. ३ आच्छादण्याचें काम.

**छादित**–वि. (सं.) आच्छादित.

**छान**–स्त्री. (सं.) छप्पर.

**छान**–स्त्री. (सं.) जनावरांचे पाय बांधण्याची दोरी.

**छानना**–क्रि. स. (सं.) १ गाळणें. चाळणें. ३ छाटणें; निवडणें. ४ पडताळणें; पारखणें. ५ मादक पेय पिणे.

**छानना**–क्रि.स. (सं.) दोरीनें बांधणें; जखडणें.

**छानबीन**–स्त्री. (सं.) १ तपास; शोध. २ पूर्ण विचार.

**छाना**–क्रि.स. (सं.) १ झांकणें. २ आच्छादणें. ३ पसरणें. ४ शाकारणें.

**छाना**–क्रि अ. (सं.) १ फैलणें; पसरणें. २ राहणें; मुक्काम करणें.

**छानबे**–वि. (सं.) शहाण्णव.

**छाप**–पु. (सं.) छाप; ठसा.

**छापना**–क्रि स. (सं.) छापणें.

**छापा**–पु. (सं.) १ ठसा; छाप. २ मुद्रा; सील. ३ मोहर; मुद्रा. ४ हाताच्या पंजाचा छाप. ५ मुद्रण यंत्र. ६ नक्कल; प्रतिकृति. ७ छापा; हल्ला.

**छाम**–वि. (सं.) कृष; क्षीण.

**छायांक**–पु. (सं.) चंद्रमा.

**छायामित्र**–पु. (सं.) छत्री.

**छार**–पु. (सं.) १ क्षार. २ मीठ. ३ खारे पदार्थ. ४ भस्म; राख. ५ धूळ.

**छाल**–स्त्री. (सं.) १ झाडाची साल. २ अशुद्ध साखर.

**छालना**–क्रि.स. (सं.) १ चाळणें; गाळणें. २ भोकें पाडून जाळीदार करणें.

**छाला**–पु. (सं.) १ साल. २ चामडें. ३ भाजल्यामुळें आलेला फोड. ४ फुगोटा.

**छाली**–स्त्री. (सं.) १ कातरलेली सुपारी. २ सुपारी.

**छावँ**-स्त्री. (सं.) १ छाया. २ आश्रय. ३ प्रतिबिंब.

**छावनी**-स्त्री. (सं.) १ छप्पर. २ २ सैन्याची छावणी.

**छावा**-पु. (सं.) १ छावा. २ पुत्र; मुलगा. ३ जवान हत्ती.

**छासट**-वि. (सं.) सहासष्ट.

**छिंछी**-स्त्री. (अनु.) फवारा.

**छिंड़ाना**-क्रि.स (सं.) हिसकाऊन घेणें.

**छि**-अव्य. छी.

**छिडला**-पु (सं.) रोपटें.

**छिगुनिया-छिगुनी- छिगुली**-स्त्री. (सं.) करंगळी.

**छिच्छ**-स्त्री (अनु.) थेंब; शिंतोडा.

**छिछकारना**-क्रि.स. (सं.) शिंपडणें.

**छिछपाना**-वि. (सं.) निंदा करणें; धिक्कारणें.

**छिछिला**-वि. उथळ.

**छिछिलाई**-स्त्री. उथळपणा.

**छिछोरपन; छिछोरापन**--पु. नीचता; क्षुद्रता.

**छिछोरा**-वि. (सं.) क्षुद्र; नीच.

**छिजना**-क्रि.अ. छीजना पहा.

**छिटकना**-क्रि.अ. (सं.) १ विखुरणें; पसरणें; फैलणें. २ चारी बाजूंना प्रकाश किरण पसरणें.

**छिटकनी**-स्त्री. सिटकनी पहा.

**छिटक**-पु. (सं.) पालखीचा पडदा; पडदा.

**छिटकाना**-क्रि.स. (सं.) पसरविणें; विखुरविणें.

**छिटकी**-स्त्री. छीट; छीटा पहा.

**छिटकुनी**-स्त्री. कामटी.

**छिटनी**-स्त्री. दुरडी; पाटी; टोपली.

**छिटवा**-पु. हारा.

**छिट्टी**-स्त्री. (सं.) सूक्ष्मजलकण; तुषार.

**छिड़कना**-क्रि.स. (सं.) १ शिंपडणें; शिंपणें. २ ओवाळून टाकणें.

**छिड़काई**-स्त्री. (सं.) शिडकाव.

**छिडकाना**-क्रि.स. शिंपडविणें.

**छिडकाव**-पु. (सं.) शिडकाव.

**छिडना**-क्रि अ. (सं.) आरंभ होणें; सुरू होणें; चालू होणें.

**छितनी**-स्त्री. लहान टोपली; दुरडी.

**छितरना**-क्रि. अ छितराना पहा.

**छितराबितर**-वि. तितर बितर पहा.

**छितराना**-क्रि अ क्रि स (सं.) विखुरणें; पसरणें; अस्त व्यस्त पसरणें.

**छिति**-स्त्री (सं.) क्षिती; पृथ्वी.

**छित्वर**-वि. (सं.) १ वेरी २ नाश करणारा

**छिदना**-क्रि.अ.( सं )१ भोंक पडणें. २ जखमी होणें. ३ टोचणें; बोचणें.

**छिद्रा**-वि. (सं.) १ विवर. २ भोकें; भोकें असलेला; जाळीदार. ३ जीर्ण; फाटका.

**छिद्रा**-वि. (सं.) क्षुद्र; हलका.

**छिदाना; छिदवाना**-क्रि.स. (सं.) १ भोंक पाडविणें. २ टोंचविणें.

**छिनक**-क्रिवि. (सं.) क्षणभर; थोडा-वेळ.

**छिनकना**-क्रि. स. (सं.) नाक शिंकरणें.

**छिनकना**-क्रि.अ.रागानें निघून जाणें.

**छिनछावि**-स्त्री. वीज.

**छिनना**-क्रि. अ. (सं.) हिसकावून घेतलें जाणें; हरण केलें जाणें.

**छिनना**-क्रि.अ. (सं.) १ छिन्नीच्या आघातानं फुटणें. २ छिन्नीनें दग-डाला टांकी लागणें.

**छिनरा**-वि. (स.) परस्त्रीगामी.

**छिनवाना-छिनाना**-क्रि.स. (सं.) हरण करणें; हिसकावून घेवविणें.

**छिनार--छिनाल**-वि. (स्त्री.) छिनाल.

**छिनाला**-पु (सं.) व्यभिचार; अनुचित संबंध.

**छिन्ना**-स्त्री. (सं.) १ छिनाल स्त्री. २ एक वनस्पति.

**छिपकली**-स्त्री. पाल.

**छिपना**-क्रि.अ. (सं.) लपणें; दडणें; आड होणें.

**छिपाछिपी**-क्रिवि. गुपचुप; गुप्तपणें.

**छिपाना**-क्रि.स. (सं.) लपविणें; दड-विणें.

**छिपारुस्तम**-पु. (सं.+फा.) १ वरून शहाजोग परंतु अंतर्यामी लबाड मनुष्य. २ गुणवान परंतु अप्रसिद्ध व्यक्ति.

**छिपाव**-पु. (सं.) गौप्य; लपवा-लपवी.

**छिबडी**-स्त्री (सं.) १ एक प्रकारची डोली. २ दुरडी; टोपली.

**छिमा**-स्त्री. (सं.) क्षमा.

**छिया**-स्त्री. (सं.) १ तिरस्कृत व घाणेरडी वस्तु; घृणित वस्तु. २ मळ.

**छिया**-वि. (सं.) घृणित; मलिन.

**छिया**-स्त्री. कन्या; मुलगी

**छियानबे**-वि. छानबे पहा.

**छियालिस-छियालीस**-वि. (सं.) सेहेचाळीस.

**छियासी**-वि. (सं.) शहायशीं.

**छिरकना**-क्रि.स. छिडकना पहा.

**छिरहा**-वि. हट्टी.

**छिलकना**-क्रि. ( सं. ) छिडकना पहा.

**छिलका**-पु. (सं.) साल; सालपट; टरफल.

**छिलछिला**-वि. छिछला पहा.

**छिलना**-क्रि.अ. ( सं. ) १ छिलले जाणें; तासलें जाणें. २ खरचटणें. ३ घसा खाजणें.

**छिलवाना-छिलाना**-क्रि.स. ( सं.) सोलविणें; तासविणें.

**छिलाई**-स्त्री. ( सं. ) १ तासणावळ; सोलणावळ. २ तासणें; छिलणें.

**छिलुड**-पु. ( स. ) १ छिलका पहा. २ भुपकट.

**छिहत्तर**-वि. ( सं. ) शहात्तर.

**छिहरना**-क्रि.अ. पसरणें; विखुरणें; फैलणें.

**छिहाई**-स्त्री. १ एकावर एक वस्तु रचण्याचें काम. २ चिता. ३ स्मशान.

**छिहाना**-क्रि.स. ( सं. ) ढीग रचणें; रास रचणें.

**छिहानी**-पु. स्मशान.

**छिहराना**-क्रि. स. छहराना पहा.

**छींक**-स्त्री. ( सं. ) शिंक.

**छींकना**-क्रि. अ. ( सं. ) शिंकणें.

**छींट**-स्त्री. ( स. ) १ तुषार; जलकण. २ ठिपका; शिंतोडा. ३ ठिपक्या-ठिपक्यांचें कापड; चीट.

**छींटना**-क्रि. स. ( सं. ) शिडकणें; शिंपडणें.

**छींटा**-पु. ( सं. ) १ शिंतोडा; तुषार. २ ठिपका. ३ गांजाचा दम. ४ व्यंगोक्ति.

**छींदा**-स्त्री. ( सं. ) शेंग.

**छींका**-पु. ( सं. ) १ शिंकें. २ जाळी-दार खिडकी. ३ बैलाच्या तोंडावर बांधण्याचें जाळें. ४ जाळीदार टोपली; करंडी. ५ दोरीचा झुलता पूल.

**छीछडा**-पु. ( सं. ) मांसाचा टाकाऊ भाग.

**छीछला**-वि. छिछला पहा.

**छीछालेदर**-स्त्री. दुर्दशा; दुर्गति.

**छीज**-स्त्री. ( सं. ) नुकसान; झीज.

**छीजना**-क्रि. अ. ( सं. ) झिजणें; कमी होणें.

**छीट**-स्त्री. छींट पहा.

**छीटा**-पु. ( सं. ) जाळीदार टोपली.

**छीड़**-स्त्री. ( सं. ) गर्दीचा अभाव.

**छीतना**-क्रि. स. ( सं. ) १ विंचू, डांस इ. चें दंश करणें. २ मारणें; पिटणें.

**छीता**-पु. ( दे. ) नववधूचें माहेरी अथवा सासरी जाणें.

**छीति**–स्त्री. (सं.) हानि; झीज.

**छीतीछान**–वि. (सं.) १ छिन्नविच्छिन्न. २ इतस्ततः पसरलेलें.

**छीदा**–वि. (सं.) १ विरळ. २ जाळीदार.

**छीन**–वि. (सं.) १ क्षीण; कृश. २ मंद; शिथिल.

**छीनचंद्र**–पु. (सं.) बिजेचा चंद्र.

**छीनता**–स्त्री. (सं.) क्षीणता.

**छीनना**–क्रि. स. (सं.) १ हिसकावून घेणें. २ कापणें; कापून अलग करणें. ३ बळकावणें. ४ दगड घडविणे. ५ जातें पाटा इ. स टाकी लावणें.

**छीना**–क्रि.स. (सं.) शिवणें; स्पर्श करणें.

**छीनाखसोटी-छीनाछीनी छीना झपटी**–स्त्री. जबरदस्तीनें हिसकाऊन घेण्याची क्रिया; हिसकाहिसकी; खेंचाखेंच.

**छीप**–वि. (सं.) वेगवान; चपळ.

**छीप**–स्त्री. (सं.) १ छाप; चिन्ह; ठसा. २ अंगावर चट्टे उठण्याचा रोग. ३ सीप पहा.

**छीप**–स्त्री. (दे.) मासे पकडण्याचा गळ.

**छीपी**–पु. (सं.) खडी काढणारा.

**छीबर**–स्त्री. चिटाचें जाड कापड.

**छीमी**–स्त्री. (सं.) शेंग.

**छीर**–पु. (सं.) क्षीर.

**छीर**–स्त्री. १ कपड्याचा कांठ. २ कपड्याला पडलेली चीर. ३ कपड्यावर उठविण्याचा छाप.

**छीरज**–पु. (सं.) दहीं.

**छीरप**–पु. (सं.) बालक; मूल.

**छीरफेन**–पु. (सं.) साय.

**छीलना**–क्रि.अ. (सं.) १ सोलणें; छिलणें; तासणें. २ खरवडून काढणें. ३ घसा खाजणे.

**छीलर**–पु. (सं.) १ उथळ डबकें. २ मोटेचें पाणी ज्यांत पडतें तें थारोळें.

**छुंगली**–स्त्री. घुंगुर असलेली अंगठी.

**छुआना**–क्रि. (सं.) छुलाना पहा.

**छुआछुत**–स्त्री. (सं.) १ शिवाशीव; स्पर्शास्पर्श. २ स्पर्शास्पर्श विचार.

**छुईमुई**–स्त्री. लाजाळूचें झाड.

**छुगनु**–पु. (अनु.) घुंगुर.

**छुच्छा**–वि. छूछा पहा.

**छुच्छी**–स्त्री. १ लहान नळी. २ चमकी. ३ फनेल; नसराळें.

**छुछाकरना**–क्रि.स. (अनु.) १ कुत्र्याला छू छू करणें. २ झिडकारणें; दुत् कारणें.

**छुछुंदर**–पु. (सं.) छछूंदर पहा.

**छुछुआना**-क्रि.अ. विनाकारण इकडे तिकडे भटकणें.

**छुट**-अव्य. (सं.) शिवाय; अतिरिक्त; खेरिज; सोडून.

**छुटकाना**-क्रि.स. (सं.) १ सोडणें. २ सोडविणें.

**छुटकारा**-पु. (सं.) १ सुटका; मोकळीक; मुक्तता. २ आपत्ती, ऋण, बाधा इ. तून मुक्तता; सुटका. ३ सुटी; मोकळीक.

**छुटना**-क्रि. अ. छूटना पहा.

**छुटपन**-पु. १ छोटेपणा; लहानपणा. २ बालपण.

**छुटवाना**-क्रि.स. छोड़वाना पहा.

**छुटाई**-स्त्री. छोटाई पहा.

**छुटौती**-स्त्री. साऱ्याची अथवा व्याजाची सूट.

**छुट्टा**-वि. (सं.) १ सुटा. २ एकटा. एकाकी. ३ सडा.

**छुट्टी**-स्त्री. (सं.) १ सुट्टी. २ मुक्तता; सुटका.

**छुड़वाना**-क्रि.स. (सं.) दुसऱ्या-कडून सोडवून घेणें.

**छुड़ाना**-क्रि.स. (सं.) सोडविणें.

**छुडौनी**-स्त्री. (सं) १ सूट. २ सोडवणुकीकरितां दिलेलें द्रव्य.

**छुत**-स्त्री. (स.) भूक.

**छुतिहा**-वि. (सं.) १ अस्पृश्य. २ पतित कलंकित; निकृष्ट.

**छुतैला**-वि. (सं.) सांसार्गिक.

**छुधा**-स्त्री. (सं.) क्षुधा; भूक.

**छुनछुनाना**-क्रि. अ. छुनछुन वाजणें.

**छुपाना**-क्रि. स. छिपाना पहा.

**छुपना**-क्रि. अ. छिपना पहा.

**छुभित**-वि. (सं.) १ चंचलचित्त. २ घाबरलेला.

**छुरधार**-अत्यंत तीक्ष्ण धार.

**छुरहरी**-स्त्री. (सं.) न्हाव्याची धोकटी.

**छुरा**-पु. (सं.) १ सुरा. २ वस्तरा.

**छुरित**-पु. (सं.) विजेची चमक.

**छुरित**-वि. (सं.) खचित; जाडित.

**छुरी**-स्त्री. (सं.) सुरी; चाकू.

**छुलकना**-क्रि.अ. (अनु.) थोडें थोडें मुतणें.

**छुलकी**-स्त्री. (अनु.) थोडें थोडें मुतण्याची क्रिया.

**छुलछुलाना**-क्रि. अ. १ छुलकना पहा. २ थोडें थोडें पाणी शिंपडणें. ३ छितराना पहा.

**छुलाना**-क्रि.स. (सं.) स्पर्श करविणें; शिवविणें.

**छुवना**-क्रि. (सं.) छूना पहा.

**छुवाछूत**-स्त्री. छूआछूत पहा.

**छुवावा**–पु. (सं.) संबंध; संसर्ग.

**छुहना**–क्रि.अ. (सं.) १ स्पर्शिलें जाणें. २ रंगविलें जाणें.

**छुहना**–क्रि. स. छूना पहा.

**छुहारबेर**–पु. (सं.) पिकलेलें बोर.

**छुहारा**-पु. (सं.) खारीक.

**छुहारी**–स्त्री. लहान खारीक.

**छूही**-स्त्री. चुन्याची फक्की.

**छूंछ-छूँछा**–वि. (सं.) १ पोकळ; रिकामा; रिता. २ निस्सार. ३ निर्धन.

**छूँछी**–स्त्री. छुच्छी पहा.

**छूछक**–पु. (सं.) १ सुतक. २ सोहेर.

**छूछा**–वि. छूँछा पहा.

**छूछू**–वि. (सं.) मूर्ख.

**छूछू**–स्त्री. (अनु.) दाई.

**छूट**–स्त्री. (सं.) १ सुटका; मुक्ति. २ फुरसद; अवकाश. ३ सूट. ४ स्वतंत्रता. ५ शिविगाळ. ६ काडीमोड. ७ पाण्याचे तुषार.

**छूटना**–क्रि.अ. (सं.) सुटणें.

**छूना**–क्रि.अ. (सं.) स्पर्श होणें.

**छूना**–क्रि.स. (सं.) १ स्पर्श करणें; शिवणें. २ लावणें; लिंपणें.

**छूरा**–पु. (सं.) सुरा; वस्तरा.

**छूरी**–स्त्री. (सं.) सुरी.

**छेंकना**–क्रि क. (सं.) १ आच्छादित करणें; घेरणें; व्यापणें. २ आडकाठी करणें; रोखणें. ३ रेघ ओढून मर्यादित करणें. ४ लेखणीनें काट मारून चुका दुरुस्त करणें.

**छेक**–पु. (सं.) १ भोंक; छिद्र. २ खंड; विभाग.

**छेक**–पु. (सं.) पाळीव पशु पक्षी.

**छेटा**–स्त्री. (सं.) आडकाठी; बाधा.

**छेडना**–क्रि.स. १ डिवचणें; टोंचणें. २ खोडी करणें; छेडणें. ३ उपहास करणें; कुचेष्टा करणें. ४ प्रारंभ करणें; सुरू करणें. ५ थट्टा करणें. ६ (तंबोरा इ. वाद्यांची तार) छेडणें.

**छेड़ा**–पु. दोरी; रश्शी.

**छेदना**–क्रि.स. (सं.) १ छेदणें; भोंक पाडणें. २ कापणें. ३ जखम करणें; घाव करणें.

**छेदना**–पु. (सं.) भोंक पाडण्याचें साधन.

**छेना**–पु. (सं.) १ नासलेल्या दुधाचा चोथा. २ गोवरी.

**छेना**–क्रि.स. (सं.) कुऱ्हाडीनें कापणें छिन्न करणें.

**छेनी**–स्त्री. (सं.) छिन्नी.

**छेमंड**–पु. (सं.) आईबाप नसलेला पोरका मुलगा.

**छेम**–पु.. (सं.) क्षेम.

**छेरना**–क्रि.स. (सं.) वारंवार परसाकडे जाणें.

**छेरी-छेली**–स्त्री. (सं.) बकरी; मेंढी.

**छेव**–पु. (सं.) १ आघात; वार; प्रहार. २ जखमेचा वण. ३ घाव; जखम. ४ येणारी आपत्ति. ५ ग्रहमान फिरल्यामुळें ओढवणारी आपत्ति.

**छेघ**–स्त्री. टेव पहा.

**छेवर-छेवरा**–पु. १ साल. २ टवका. ३ त्वचा; चामडें.

**छेवा**–पु. १ सोलण्याचें अथवा कातण्याचें काम. २ घाव; जखम. ३ अतिशय जोरानें वाहणारें पाणी.

**छेह**–स्त्री. (सं.) १ छाया. २ राख; माती.

**छेहर**–स्त्री. (सं.) छाया.

**छैना**–क्रि.अ. (सं.) झिजणें; क्षीण होणें; नाश पावणें.

**छैया**–पु. (सं.) छबकडा; चिमुकला.

**छैल**–पु. (सं.) रंगेल नखरेबाज मनुष्य.

**छैलाचिकनिया - छैलछबिला - छैला**–पु. शौकिन रंगेल मनुष्य.

**छोंढ़ा**–पु. (सं.) मथाणी; रवी.

**छोंडि**–स्त्री. (सं.) १ मथाणी; रवी. २ मोठें भांडें.

**छो**–पु. (सं.) १ प्रेम; प्रीति. २ दया कृपा. ३ क्षोभ; क्रोध; कोप.

**छोकड़ा**–पु. (सं.) छोकरा; मुलगा.

**छोकडिया-छोकडी**–स्त्री. (सं.) छोकरी; मुलगी.

**छोकला**–पु. (सं.) सालपट; साल.

**छोट-छोटका**–वि. (सं.) छोटा; लहान.

**छोटा**–वि. (सं) छोटा; लहान.

**छोटाई**–स्त्री.(सं.) लघुता.

**छोडना**–क्रि.स. (सं.) सोडणें.

**छोडवाना**–क्रि.स. (सं.) दुसऱ्याकडून सोडविणें.

**छोडाना**–क्रि.स.(सं.) सोडविणें.

**छोप**–पु. (सं.) १ जाड थर; जाड लेप. २ गिलावा. ३ आघात; वार; प्रहार. ४ बचाव; आडोसा.

**छोपना**–क्रि.स (सं.) १ लिंपणें. २ गिलावा करणें. ३ ग्रासणें; झाकून टाकणें. ४ लपविणें; पडदा टाकणें (एकाद्या कृत्यावर). ५ आघातापासून रक्षण करणें.

**छोभ**–पु. (सं.) १ क्षोभ. २ पूर.

**छोभना**–क्रि.अ. (सं.) मनांत खळबळ उडणें.

**छोर**–पु. (सं.) १ कांठ; किनारा. २ २ सीमा; हद्द. ३ कोपरा; टोंक.

**छोरना**-क्रि.स. (सं.) १ सोडणें. २ हिराऊन घेणें.

**छोरा**-पु. (सं.) छोकरा; मुलगा.

**छोराछोरी**-स्त्री. १ झोंबाझोंबी. २ भांडणतंटा.

**छोरी**-स्त्री. (सं.) छोकरी; मुलगी.

**छोलना**-क्रि.स. (सं.) सोलणें; खरवडणें.

**छोह**-पु. १ प्रेम; ममता; स्नेह; २ दया; कृपा.

**छोहगर**-वि. प्रेमी; ममता दाखविणारा.

**छोहरा**-पु. (सं.) छोकरा; मुलगा.

**छोहरी**-स्त्री. (सं.) छोकरी; मुलगी.

**छोहाना**-क्रि.अ. (सं.) १ प्रेम करणें २ दया करणें; अनुग्रह करणें.

**छोहारा**-पु. छुहारा पहा.

**छोही**-वि.(स.)स्नेही; ममता ठेवणारा.

**छौंक**-स्त्री. (अनु.) फोडणी.

**छौंकना**-क्रि.स. (अनु.) फोडणी देणें; फोडणींत टाकणें.

**छौंड़ा**-पुं. (सं.) धान्याचें पेव.

**छौकना**-क्रि.अ. (सं.) (जनावराचें) चौखूर उधळून ढुशी मारणें.

**छौना**-पु. छावा.

**छौर**-पु. (सं.) क्षौर.

**छौर-छौरा**-पु. ज्वारी बाजरीची ताटें.

## ज

**जंग**-स्त्री. (फा.) लढाई; युद्ध.

**जंग**-पु. (फा.) गंज; तांब.

**जंगआवर-जंगजू**-वि. (फा.) लढवैय्या; योद्धा.

**जंगरैत**-वि. मेहनती; परिश्रमी.

**जँगला**-पु. (पोर्तुगीज) १ खिडकी, दरवाजे गॅलरी इ. ठिकाणीं लावलेले गज जाळी इत्यादि; कठडा. २ जाळी किंवा गज लावलेली खिडकी.

**जंगली**-वि. (सं.) रानटी; वन्य.

**जंगार**-पु. (फा.) मोरचुत.

**जंगारी**-वि. (फा.) निळया रंगाचा.

**जंगाल**-पु. जंगार पहा.

**जंगाल**-पु. (सं.) पाणी अडविण्याचा बांध.

**जंगाली**-जंगारी पहा.

**जंगी**-वि. (फा.) १ लढाई संबंधी- २ लढाऊ. ३ मोठा; धिप्पाड. ४ वीर; योद्धा.

**जंगुल**-पु. (सं.) विष.

**जंघा**-स्त्री. मांडी.

**जंघाल**-पु. (सं.) दूत; जासूद.

**जंचना**-क्रि.अ. (सं.) १ पाहिलें जाणें; तपासलें जाणें; परीक्षा होणें. २ मनास येणें; पसंतीस उतरणें. ३ पटणें; उमजणें.

**जँचा**-वि. (सं.) १ तपासलेला; परीक्षा केलेला. २ अचूक; अन्वर्थ.

**जंजर-जंजल**-वि. (सं.) निकामी; जुनापुराणा.

**जंजाल**-पु. (सं.) १ जंजाळ; भानगड. २ गुंतागुंत. ३ जाळें.

**जंजालिया-जंजाली**-वि. (सं.) भांडखोर; उपद्रवी.

**जंजीर**-स्त्री. (फा.) १ सांखळी. २ बेडी. ३ दाराची कडी.

**जंजीरा**-पु.(फा.) सांखळीची शिवण.

**जंतर**-पु. (सं.) १ यंत्र; कळ. २ मंतरलेला ताईत. ३ एक गळ्यांतील अलंकार. ४ वीणा. ५ धोंडा. ६ मातीचें मोठें ढेकूळ. ७ वेधशाळा.

**जंतर-मंतर**-पु. (सं.) १ जादूटोणा. २ वेधशाळा.

**जंतरी**-स्त्री. (सं.) १ पंचांग. २ जादूगार. ३ तार काढण्याचें यंत्र. ४ वाद्यकुशल; वाद्य वादन पटु.

**जँतसार**-स्त्री. (सं.) जमीनींत जातें बसविण्याची जागा.

**जंता**-पु. (सं.) १ यंत्र; कळ. २ सोनाराचें तार खेंचण्याचें यंत्र.

**जंता**-वि. (सं.) शासन करणारा.

**जँताना**-क्रि.अ.दळलें जाणें; पीठ होणें.

**जंती**-स्त्री. (सं.) १ तार खेचण्याचें यंत्र. २ आई; माता.

**जंतु**-पु. (सं.) प्राणी; जीव; जनावर.

**जंतुका**-स्त्री. (सं.) लाख.

**जंत्र**-पु. (सं.) १ यंत्र; कळ. २ ताईत ३ कुलूप.

**जंत्रना**-क्रि.स. (सं.) कुलूप ठोकणें; कुलपांत ठेवणें.

**जंत्रमंत्र**-पु. जंतरमंतर पहा.

**जंत्रित**-वि. (सं.) १ सामावलेला. २ बांधलेला. ३ बंद केलेला.

**जंत्री**-पु. (सं.) तंतु वाद्य वाजविणारा; वाद्य पटु.

**जंत्री**-पु. (सं.) वाद्य.

**जंत्री**-वि. (सं.) बद्ध करणारा; जखडून टाकणारा.

**जंत्री**-स्त्री. (सं) जंतरी पहा.

**जंदरा**-पु. (सं.) १ यंत्र; कळ. २ जातें. ३ कुलूप.

**जंबाल**-पु. (सं.) १ चिखल. २ शेवाळें. ३ केवडा. ४ गंज.

**जंबीर**-पु. (सं.) १ जंबीरी लिंबु. २ रानतुळस.

**जंबु-जंबुल-जंबू**-पु. (सं.) जांभूळ.

**जंबुका**-स्त्री. (सं.) किसमिस.

**जंभ**-पु. (सं.) १ दाढ. २ अबडा. ३ जांभई.

**जंभका**-स्त्री. (सं.) जांभई.

**जंभन**-पु. (सं.) १ भक्षण. २ जांभई. ३ संभोग.

**जंभा-जँभाई**-स्त्री. (सं.) जांभई.

**जँभाना**-क्रि.स. (सं.) जांभई देणें.

**जई**-स्त्री. (सं.) जव; जवाचे कोंवळे अंकूर.

**ज़ईफ़**-वि. (अ.) वृद्ध; म्हातारा.

**ज़ईफ़ी**-स्त्री. (अ.) वृद्धावस्था.

**जकंद**-स्त्री. (फा.) उडी; झेंप.

**जकंदना**-क्रि.स. (फा.) उडी मारणें; झेंप टाकणें; झडप घालणें.

**जक**-पु. (सं.) १ यक्ष, २ कंजूष मनुष्य. ३ भूत; प्रेत आदि.

**जक**-स्त्री. १ हट्ट; दुराग्रह. २ नाद; छंद.

**जक**-स्त्री. (फा.) १ पराभव. २ तोटा; नुकसान. ३ भीति. ४ लज्जा.

**जकड**-स्त्री. (सं.) जखड; बंधन; ताण.

**जकडना**-क्रि. स. (सं.) जखडणें; करकचून बांधणें.

**जकना**-क्रि. अ. (अनु.) आश्चर्य चकित होणें; विस्मित होणें.

**ज़कात**-स्त्री. (अ.) १ दान; खैरात. २ कर; जकात.

**जकित**-वि. (अनु.) चकित; विस्मित.

**ज़खीरा**-पु. (अ.) १ भांडार; कोष; खजीना. २ रास; ढीग. ३ झाडें व झाडांचें बी वगैरे मिळण्याचें ठिकाण.

**जखैया**-पु. (सं.) खवीस.

**जख्म**-पु. (फा.) जखम.

**जगजगा**-पु. (अनु.) देगड.

**जगजगा**-वि. (अनु.) झगझगीत.

**जगजगाना**-क्रि.अ. (अनु.) झळकणें; चमकणें.

**जगद्वाल**-पु. (सं.) अवडंबर.

**जगत्**-पु. (सं.) जग; जगत.

**जगत**-पु. १ विहिरीभोंवती बांधलेला कठडा. २ जगत.

**जगतशेठ**-पु (सं.) धनाढ्य व्यापारी.

**जगदंतक**-पु. (सं.) मृत्यु.

**जगद्**-पु. (सं.) पालक; रक्षक.

**जगना**-क्रि. अ. (सं.) १ झोपेंतून जागें होणें; उठणें. २ सावध होणें. ३ धुमसत असलेला विस्तव फुलूं लागणें; प्रज्वलित होणें; पेट घेणें. ४ चमकणें.

**जगमग-जगमगा**-वि. १ चमकदार. २ प्रकाशित.

**जगमगाना**-क्रि.अ. (अनु.) झळकणें; चमकणें.

**जगमगाहट**-स्त्री. झळक; चमक; चकचकाट.

**जगर**-पु. (सं.) कवच.

**जगरमगर**-वि. जगमग पहा.

**जगवाना**-क्रि.स. ( सं. ) जागे करणें.

**जगात**-पु. जकात पहा.

**जगाती**-पु. ( फा. ) जकात वसूल करणारा.

**जगाना**-क्रि.स. ( सं. ) १ जागें करणें. २ शुद्धीवर आणणें. ३ विस्तव फुलविणें.

**जगार**-स्त्री. ( सं. ) जाग्रण.

**जगीला**-वि. ( सं. ) झोंपेस आलेला.

**जग्घ**-स्त्री. ( सं. ) १ खाण्याची क्रिया;खाणें. २ सहभोजन; जेवणावळ.

**जघन**-पु. ( सं. ) १ कमरेच्या खालचा भाग. २ नितंब.

**जघन्य**-वि. ( सं. ) १ अंतिम. २ २ त्याज्य ३ निकृष्ट.

**जचना**- जँचना पहा.

**ज़च्चा**-स्त्री- (फा.) बाळंतीण.

**ज़च्चाखाना**-पु. ( फा. ) प्रसूतिगृह.

**जजमान**-पु. ( सं. ) यजमान.

**जजिया**-पु. १ दंड. २ कर.

**जज़ीरा**-पु ( फा. ) द्वीप; बेट.

**जटना**-क्रि. स. फसवून लुबाडणें; ठकविणें.

**जटल**-स्त्री. ( सं. ) थाप; गप्प.

**जटाचीर**-पु. ( सं. ) महादेव; शंकर.

**जटाना**-क्रि.स. ठकविणें.

**जटामासी**-स्त्री. ( सं. ) एक सुगंधित वनस्पति.

**जटामासी**-पु. ( सं. ) महादेव;शिव.

**जटाल**-पु. ( सं. ) वटवृक्ष.

**जटाल**-वि. ( सं. ) जटाधारी.

**जटित**-वि. ( सं. ) जडित; जडविलेला.

**जटिल**-वि. ( सं. ) १ जटाधारी. २ कठिण; दुर्बोध. ३ क्रूर; हिंसक; दुष्ट.

**जटिल**-वि. ( सं. ) १ जटाधारी. २ ब्रम्हचारी. ३ सिंह. ४ शिव.

**जठेरा**-वि. ( सं. ) ज्येष्ठ; मोठा.

**जठेरी**-स्त्री. ( सं ) म्हातारी.

**जड़**-वि. ( सं ) जड.

**जड़**-पु. ( सं. ) जल; पाणी.

**जड़**-स्त्री. ( सं ) १ वृक्षाचें मूळ. २ पाया; आधार; मूळ.

**जड़क्रिया**-वि( सं. ) आळशी; धीमा.

**जड़ना**-क्रि.स. ( सं. ) १ जडविणें. २ बसविणें; ठोकणें. ३ प्रहार करणें. मारणें. ४ ( आरोप ) लादणें.

**जड़ाई**-स्त्री. ( सं. ) जडाई; जडविण्याचें काम.

**जड़ाऊ**-वि. ( सं. ) जडावाचें.

**जड़ावर-ल**-पु. ( सं. ) थंडीचे कपडे; गरम कपडे.

**जड़िया**-पु. ( सं. ) जडावाचें काम करणारा.

**जड़ी**-स्त्री. (सं.) औषधी मुळी.
**जड़ैया**-स्त्री. (सं.) हिंवताप.
**जढ़ाना**-क्रि.अ. (सं.) हट्ट करणें; अडून बसणें.
**जतन**-पु. (सं.) यत्न.
**जतनी**-पुं. (सं.) १ यत्न करणारा. २ चतुर; चलाख.
**जतलाना**-क्रि.स. (सं.) जतावणें; बजावणें.
**जताना**-क्रि.स. (सं.) बजावणें.
**जतारा**-पु. वंश; घराणें; कुळ.
**जती**-पु. (सं.) यति; संन्याशी.
**जतु**-पु. (सं.) १ डिंक. २ लाख. ३ शिलाजित.
**जतुक**-पु. (सं.) १ हिंग. २ लाख.
**जतुगृह**-पु. (सं.) पर्णकुटी; झोंपडी
**जतेक**-क्रि वि. (सं.) जितका.
**जत्था**-पु. (सं.) जत्था.
**जथा**-क्रिवि. (सं.) ज्याप्रमाणें.
**जथा**-स्त्री. (सं.) जत्था.
**जथा**-स्त्री. (सं.) पुंजी; धन.
**जद**-क्रि.वि. (सं.) जेव्हां; जेव्हां केव्हां.
**जद**-अव्य. (सं.) जर; अगर.
**जदपि**-क्रि.वि. (सं.) यद्यपि.
**जदीद**-वि. (अ.) नवीन; नवा.
**जद्दबद्द**-पु. (सं.) दुर्वचन.
**ज़नखा**-वि. (फा.) १ हिजड़ा. २ बायकी हावभाव करणारा.
**जनघर**-पु. (सं.) मंडप.
**जनना**-क्रि.स. (सं.) जन्म देणें.
**जनम**-पु. (सं.) जन्म.
**जनमना**-क्रि.अ. (सं.) जन्मणें.
**जनमर्य्यादा**-स्त्री. (सं.) लौकिक आचार; रीती.
**जनमसँघाती**-पु. (सं.) जन्माचा सोबती.
**जनमाना**-क्रि.अ. (सं.) जन्म देणें.
**जनयिता**-पु. (सं.) जन्मदाता; पिता.
**जनयित्री**-स्त्री. (सं.) जन्मदात्री; आई; माता.
**जनरव**-पु. (सं.) १ किंवदंती; अफवा. २ लोकनिंदा; बदनामी. ३ गलका; ओरडा.
**जनवरी**-स्त्री. (इं.) जानेवारी.
**जनवास सा**-पु. (सं.) १ जानोसा. २ समाज; सभा. ३ निवासस्थान.
**जनश्रुत**-वि. (सं.) प्रख्यात; प्रसिद्ध; महशूर.
**जनश्रुति**-स्त्री. (सं.) लोकप्रवाद; अफवा.
**जनाई**-स्त्री. (सं.) १ दाई. २ सुईण; ३ सुईणीचें शुल्क.

**जनज़ा**-पु. (अ.) १ प्रेत; तिरडी.

**जनाना**-क्रि.स. (सं.) बजावणें; जतावणें.

**ज़नाना**-वि. (फा.) १ स्त्रियासंबंधी. २ नपुंसक; हिजडा. ३ निर्बल; दुर्बल.

**ज़नाना**-पु. (फा.) जनाना; जनानखाना.

**ज़नानापन**-पु. स्त्रीत्व.

**जनाब**-पु. (अ.) महाशय; महाराज.

**जनाव**-पु. (सं.) जाणीव; सूचना; इशारा.

**जनाश्रय**-पु. (सं.) १ धर्मशाळा. २ घर; मकाण. ३ मंगलकार्यालय.

**जनि**-स्त्री. (सं.) १ जन्म. २ स्त्री; पत्नी. ३ आई; माता. ४ जन्मभूमि. ५ स्त्री.

**जनि**-अव्य. (सं.) नाहीं; नको; न.

**जनियाँ**-स्त्री. (सं.) प्रिया; प्रियतमा.

**जनी**-स्त्री. (सं.) १ दासी; सेविका. २ स्त्री. ३ माता. ४ कन्या.

**जनी**-वि.स्त्री. (सं.) उत्पन्न केलेली; जन्मलेली.

**जनु**-क्रिवि. (सं.) जसें; जणूं काय.

**जनु**-स्त्री. (सं.) जन्म; उत्पत्ति.

**जनेऊ**-पु. (सं.) जानवें; यज्ञोपवीत.

**जनेत**-स्त्री. (सं.) वरात.

**जनेव**-पु. (सं.) जानवें.

**जनेश**-पु. (सं.) राजा.

**जनैया**-वि. (सं.) माहितगार; जाणकार; जाणणारा.

**जन्मी**-पु. (सं.) प्राणी; जीव.

**जन्य**-पु. (सं.) १ सामान्य मनुष्य. २ अफवा; लोकापवाद. ३ राष्ट्र. ४ लढाई; युद्ध. ५ बाजार. ६ निंदा. ७ वर; नवरदेव. ८ वरपक्ष. ९ पुत्र. १० पिता. ११ शरीर. १२ जन्म. १३ जाति.

**जन्य**-वि. (सं.) १ जनसंबंधी. २ राष्ट्रीय. ३ उत्पन्न झालेला.

**जन्या**-स्त्री. (सं.) १ नव वधूची पाठराखीण. २ वधू. ३ प्रीति; स्नेह.

**जपना**-क्रि.स. (सं.) जप करणें.

**जपनी**-स्त्री. (सं.) जपमाळ.

**जपाना**-क्रि.स. (सं.) जप करविणें.

**जफ़ा**-स्त्री. (फा.) सक्ती; अन्याय्य व अत्याचारपूर्ण व्यवहार; जुलूम.

**जफ़ाकश**-वि. (फा.) १ सहनशील. २ मेहनती; परिश्रमी.

**जफील**-स्त्री. (अ.) १ शीळ. २ शिट्टी.

**जफीलना**-क्रिअ. (अ.) शिट्टी वाजविणें.

**जब**-क्रिवि. (सं.) जेव्हां.

**ज़बर**-वि. (फा.) १ बलवान; ताकदवान. २ मजबूत; दृढ.

**ज़बरई**-स्त्री. (फा.) अत्याचार; जबरी; बळजबरी; सक्ती.

**ज़बरदस्त; जबरा**-वि. (फा.) जबरदस्त; बळकट; शक्तिवान.

**ज़बह**-पु. (अ.) हिंसा; गळा कापून प्राण घेण्याची क्रिया.

**ज़बहा**-पु. साहस; हिम्मत.

**ज़बाँ**-स्त्री. जबान पहा.

**ज़बान**-स्त्री. (फा.) १ जीभ; जिव्हा. २ भाषा. ३ वायदा; प्रतिज्ञा. ४ बोलण्याची तऱ्हा.

**ज़बानदराज़**-वि. (फा.) प्रौढी मिरवून बोलणारा; शेखी मिरविणारा.

**ज़बानबंदी**-स्त्री. (फा.) १ लेखी जबाब. २ मौन.

**ज़बानी**-वि. (फा.) तोंडी; मौखिक.

**ज़बून**-वि. (फा.) खराब; वाईट; निकृष्ट.

**ज़ब्त**-पु. (अ.) जप्त.

**ज़ब्र**-पु. (अ.) जुलूम; सक्ती.

**ज़ब्रन**-क्रिवि. (अ.) बलपूर्वक; जबरदस्तीनें.

**जमन**-पु. (सं.) मैथुन.

**जमकना**-क्रि.अ. चमकना पहा.

**जमघट--जमघटा--जमघट्ट**-पु. जमाव; गर्दी.

**जमना**-क्रि.अ. (सं.) १ थिजणें; गोठणें. २ जमणें; गोळा होणें. ३ जमणें; साधणें.

**जमनिका**-स्त्री. पडदा.

**जमा**-वि. (अ.) जमा.

**जमा**-स्त्री. (अ.) १ भांडवल; पुंजी; मूळ; धन. २ धन; पैसा. ३ भूमिकर. ४ बेरीज; संकलन; जमा.

**जमाइ**-वि (सं.) जांवई.

**जमाजथा**-स्त्री. धन संपत्ति.

**जमात**-स्त्री. (अ.) १ जमाव; जथा. २ श्रेणी; दर्जा.

**ज़मानत**-स्त्री. (अ.) जामीनकी.

**ज़मानती**-पु. (अ.) जामीन; जामीनदार.

**जमाना**-क्रि.स. (सं.) १ गोठविणें; जमविणें. २ नीट बसाविणें. ३ प्रहार करणें. ४ जमविणें.

**ज़माना**-पु. (फा.) १ काळ; जमाना; समय. २ विलंब; उशीर. ३ बढतीचे दिवस; ऐश्वर्याचे दिवस. ४ जगत; दुनिया; संसार.

**ज़मानासाज़**-वि. (फा.) संधिसाधु.

**जमामार**-वि. दुसऱ्यांचे पैसे बळकावून बसणारा.

**जमाल**-पु. (अर.) सौंदर्य; रूप.

**जमावडा**-पु. जमाव; गर्दी.

**जमींकंद**-पु. ( फा.+सं. ) सुरण.

**ज़मींदोज़**-वि. ( फा ) जमीनदोस्त.

**ज़मीमा**-पु. (फा.) परिशिष्ट; पुरवणी.

**जमुरका**-पु. ( फ़ा. ) कुलाबा पहा.

**जमुरी**-स्त्री. ( फा. ) सांडशी.

**ज़मुर्रद**-पु. ( फा. ) पन्ना नामक एक रत्न; पाचू.

**ज़मुर्रदी**-वि. ( फा. ) निळसर रंगाचा.

**जमूरक-जमूरा**-पु. ( फा. ) एक प्रकारची लहान तोफ.

**जम्हाइ**-स्त्री. जँभाई पहा.

**जम्हाना**-क्रि.अ. जँभाना पहा.

**जयजीव**-पु. ( सं.) एक अभिवादन प्रकार.

**जयपत्री**-स्त्री. जावित्री पहा.

**जया**-स्त्री. (सं. )१ दुर्गा. २ पार्वती. ३ ध्वज; पताका. ४ भांग.

**जयी**-वि. ( सं. ) विजयी.

**जय्य**-वि. ( सं. ) जिंकण्यायोग्य.

**जर**-पु. ( सं. ) जरा; वृद्धावस्था.

**जर**-पु. ( फा. ) १ सोनें. २ संपत्ति. धन.

**जरकटी**-पु. एक शिकारी पक्षी.

**जरकस-जरकसी**-बि. ( फा. ) जरतारी.

**जरखेज़**-वि. ( फा. ) सुपीक.

**जरगह-जरगा**-पु. ( फा. ) एक प्रकारचा चारा.

**जरछार**-वि. ( सं. ) भस्मीभूत; नष्ट.

**जरठ**-वि. ( सं. ) १ कर्कश; कठिण. २ वृद्ध; जरठ. ३ जीर्ण; जुना. ४ पिवळट पांढरा.

**जरठ**-पु. ( सं. ) म्हातारपण.

**जरतारा**-वि. जरतारी.

**जरतुआ**-वि. द्वेष्टा.

**जरद**-बि. ( फा. ) पिवळा.

**ज़रदा**-पु. ( फा. ) १ एक प्रकारचा साखरभात. २ जर्दा. ३ पीतवर्ण घोडा.

**जरदा**-पु. ( सं. ) एक पक्षी.

**ज़रदी**-स्त्री. ( फा. ) १ पिवळेपणा. २ अंड्यांतील पिवळा बलक.

**जरदोज़**-पु. ( फा. ) जरीचें काम करणारा.

**जरदोज़ी**-स्त्री. ( फा. ) जरीचें काम.

**जरन**-स्त्री. जलन पहा.

**जरब**-स्त्री. ( अर. ) १ आघात; वार. २ थाप. ३ गुणाकार.

**जरबीला**-वि. ( फा. ) सुंदर.

**जरमुआ**-वि. ( सं. ) जळफळणारा; द्वेष्टा.

**ज़रर**-पु. ( अर. ) १ हानि; नुकसान. २ आघात; इजा. ३ संकट; आपत्ति.

**ज़रा**-वि. क्रिवि. जरा; थोडासा; किंचित.

**जराअत**-स्त्री. (अर.) १ शेती; शेतीचें काम. २ शेत जमीन; लागवडीची जमीन. ३ पीक.

**जराग्रस्त**-वि. (सं.) वृद्ध.

**जरिमा**-स्त्री. (सं.) वृद्धत्व; वृद्धावस्था.

**ज़रिया**-पु. ( अर. ) १ संबंध. २ हेतु; कारण. ३ उपाय.

**जरीब**-स्त्री. ( फा. ) १ जमीन मोजण्याची सांखळी. २ लाठी; छडी.

**जरीबाना-जरीमाना**-पु. जुरमाना पहा.

**ज़रूर**-क्रिवि. ( अर. ) अवश्य; जरूर.

**जरूरत**-स्त्री. ( अर. ) आवश्यकता.

**जरूरी**-वि. (अ.) आवश्यक.

**ज़र्क़बर्क़**-वि. ( फा. ) भडकदार; झगझगीत.

**ज़र्द**-वि. ( फा. ) पिवळा

**ज़र्दा**-पु. जर्दा.

**ज़र्दी**-स्त्री. (फा.) पिवळेपणा.

**ज़र्रा**-पु. ( अर. ) अणु; कण.

**ज़र्रा**-वि. जरा. पहा.

**जर्रार**-वि. ( अर.) १ बलिष्ट; प्रबळ. २ लढवैय्या.

**जर्रारी**-स्त्री. (अर.) बहादुरी; शौर्य.

**जर्राह**-पु. (अर.) शस्त्रवैद्य.

**जलंधर**-पु. (सं.) जलोदर.

**जल**-पु. (सं.) १ पाणी; जल. २ वाळा. ३ पूर्वाषाढा नक्षत्र.

**जलकरंक**-पु. (सं.) १ नारळ. २ कमळ. ३ शंख. ४ पाणवेल.

**जलकल्क-जलकुंतल**-पु. (सं.) १ शेवाळ. २ चिखल.

**जलगर्द**-पु. ( सं.+फा. ) पाणसाप.

**जलचादर**-स्त्री.( सं.+फा. ) पाण्याचा शांत व स्थिर असा पृष्ठभाग.

**ज़लज़ला**-पु. ( अर. ) भूकंप.

**जलन**-स्त्री. (सं.) १ जळफळाट; मत्सर; असूया. २ जळजळ; दाह; आग.

**जलना**-क्रि अ. (सं.) १ जळणें. २ द्वेष करणें. ३ पोळणें; भाजणें.

**जलपान**-पु. (सं.) न्याहारी; फराळ.

**जलप्रदान**-पु. (सं.) उत्तरक्रिया.

**जलप्रपा**-पु. (सं.) पाणपोई.

**जलप्रपात**-पु. (सं.) धबधबा.

**जलप्रांत**-पु. (सं.) जलाशयाच्या भोंवतालचा प्रदेश.

**जलप्लावन**-पु. (सं.) १ महापूर २ जलप्रलय.

**जलबिंब**-पु. ( सं. ) पाण्यावरचा बुडबुडा.

**जलभँवरा**–पु. (सं.) पाण्यावर अति जलद चालणारा एक किडा.

**जलम**–पु. (सं.) जन्म.

**जलमल**–पु. (दे.) फेस.

**जलमोद**–पु. (सं.) वाळा; खस.

**जलवाना**–क्रि.स. (सं.) आग लावविणें.

**जलवाह**–पु. (सं.) मेघ.

**जलसा**–पु. (अर.) १ सभा; अधिवेशन. २ समारंभ; उत्सव. ३ जलसा; गाणें.

**जलहर**–वि. (सं.) जलमय.

**जलहरी**–स्त्री. (सं.) अभिषेक पात्र.

**जलहार**–पु. (सं.) पाणी भरणारा; कावडवाला.

**जलहास**–पु. (सं) समुद्राचा फेस.

**जलांचल**–पु. (सं.) पाण्याचा पाट.

**जलांजल**–पु. (सं) १ शेवाळें. २ झरा.

**जलांबिका**–स्त्री. (सं.) विहिर.

**जलाक**–स्त्री. (सं.) १ पोटांतील जळजळ. २ उन्हाची झळ.

**जलाजल**–पु. झिरमिळया; झालर.

**जलातन**–वि. (सं.) १ चिडखोर; रागीट; तापट. २ द्वेषी; मत्सरी.

**जलाना**–क्रि.स. (सं.) १ जाळणें. २ पेटविणें. ३ भाजणें. ४ भडकाविणें; त्वेष उत्पन्न करणें.

**जलापा**–पु. (सं.) जळफळाट.

**जलापा**-पु. एक विलायती रेचक औषध.

**जलापात**–पु. (सं.) धबधबा.

**जलार्णव**–पु. (सं.) वर्षाकाल; पावसाळा.

**जलाल**–पु. (सं.) १ तेज; प्रकाश. २ प्रभाव.

**जलावतन**–वि. (अर.) हद्दपार केलेला; हद्दपार.

**जलावतनी**–स्त्री. (अर.) हद्दपारी.

**जलावन**–पु. (सं.) सरपण; जळण.

**जलावर्त**–पु. (सं.) पाण्यांतील भोंवरा.

**जलाहल**–वि. (सं.) जलमय.

**ज़लील**–वि. (अर.) १ तुच्छ. २ अपमानित.

**जलूस**–पु. (अर.) जुलूस; मिरवणूक; उत्सव.

**जलेबा**–पु. मोठी जिलबी.

**जलेबी**–स्त्री. जिलबी.

**जलेभ**–पु. (सं.) पाणहत्ती.

**जलेवाह**–पु. (सं.) पाणबुडया.

**जल्द**-क्रिवि (अर.) जलद; शीघ्र.

**जल्दी**–स्त्री. (अर.) घाई.

**जल्दी**–क्रिवि. जल्द पहा.

**जल्पक**–वि. (सं.) बाताडया; वाचाळ.

**जल्पन**–पु. (सं.) १ ढक्कवाद;वटवट. घमेंडखोर बोलणें.

**जल्पाक**–वि. जल्पक पहा.

**जल्पित**–वि.(सं.)१ मिथ्या बोलणें. २ सांगितलेलें; कथित.

**जल्लाद**–पु (अ.) १ फांसावर चढविणारा मांग. २ क्रूर मनुष्य.

**जल्ह**–पु. (सं.) अग्नि.

**जवन**–वि. (सं.) वेगवान.

**जवनी**–स्त्री. (सं.) वेग.

**जवस**–पु. (सं.) घास; चारा.

**जवस्**–पु. (सं.) वेग.

**जवाँमर्द**–वि. (फा.) जवान मर्द; शूर वीर.

**जवाँमर्दी**–स्त्री.(फा.)बहादुरी;मर्दुमकी.

**जवाई**–स्त्री. (सं) १ जाणें; गमन; जाण्याची क्रिया. २ जाताना दिलें जाणारें द्रव्य.

**जवान**–वि.(फा.) १ तरुण; जवान. २ वीर.

**जवान**–पु. (फा.) १ पुरुष; जवान. २ शिपाई. ३ वीर पुरुष.

**जवानी**–स्त्री. (फा.) तारुण्य; जवानी; ज्वानी.

**जवाब**–पु. (अर.) १ जबाब; उत्तर. २ बदला; प्रत्युत्तर. ३ जोडीची किंवा बरोबरीची वस्तु. ४ नोकरीवरून दूर केल्याची आज्ञा.

**जवाबदेह**–वि. (फा.) उत्तर दाता.

**जवाबदेही**–स्त्री. (फा.) १ उत्तर देण्याची क्रिया. २ उत्तरदायित्व; जबाबदारी.

**जवाबसवाल**–पु. (फा.) १ प्रश्नोत्तर. २ वादविवाद.

**जवाबी**–वि. (फा.) जबाबी.

**जवार**–पु. (अर.) १ शेजार;पडोस. २ आसपासचा प्रदेश.

**जवार**–पु. (अर.) १अवनति;दुर्दशा. २ जंजाल.

**जवाल**–पु. (अर.) अवनति; उतरती कळा. २ विपत्ति; झंझट.

**जवाहर**–पु. (अर.) रत्न; मणी; जवहीर.

**जवाहरात**–पु.(अर.)जवाहीर;रत्नें.

**जवाहिर**–पु. जवाहर पहा.

**जवी**–वि. (सं.) वेगवान.

**जशन**–पु. (फा.) १ धार्मिक उत्सव. २ उत्सव; समारंभ. ३ आनंद; हर्ष. ४ नांच गाणें; जलसा.

**जस**–पु. (सं.) यश.

**जसद–जस्त–जस्ता**–पु. (सं.) जस्त.

**जहँ**–क्रि. वि. (सं.) जहाँ पहा.

**जहँड़ना–जहँडाना**–क्रि.अ. १ नुकसान सोसणें. भ्रमांत पडणें.

**ढँढोरची**-पु. (अनु.+फा.) दौंडी-वाला.

**ढँढोरना**-क्रि.स. (अनु.) धुंडाळणें; चाचपणें.

**ढँढोरा**-पु. (अनु.) १ दौंडी. २ दौंडी पिटण्याचा ढोल.

**ढँढोरिया**-पु. ढँढोरची पहा.

**ढँपना**-क्रि.अ. (सं.) झांकणें.

**ढँपना**-पु. (सं.) झांकण.

**ढ**-पु. (सं.) १ ढोल. २ कुत्रा. ३ कुत्र्याची शेपटी. ४ ध्वनि; नाद. ५ साप.

**ढई देना**-क्रि.अ. ठाण मांडून बसणें.

**ढकना**-पु. (सं.) झांकण.

**ढकना**-क्रि.स. (सं.) झांकणें.

**ढकनिया--ढकनी**-स्त्री. (सं.) झांकण; झांकणी.

**ढका**-पु. (सं.) १ तीन शेरांचें माप. २ मोठा ढोल.

**ढका**-पु. (अनु.) धक्का; टक्कर.

**ढका**-पु. (इं.) जहाजाचा धक्का; डॉक; गोदी.

**ढकिल**-स्त्री. (अनु.) रेटारेटी; चढाई.

**ढकेलना**-क्रि.स. (अनु.) ढकलणें.

**ढकोसना**-क्रि.स. (अनु.) ढोसणें; ढसाढसा पिणें.

**ढकोसला**-पु. (सं.) थोतांड; पाखंड; ढोंग.

**ढक्कन**-पु. (सं.) झांकण.

**ढक्का**-पु. (अनु.) १ मोठा ढोल. २ नगारा; डंका.

**ढक्की**-स्त्री. (दे.) डोंगराची उतरण.

**ढच्चर**-पु. (सं.) १ भांडण; तंटा-बखेडा. २ खोटा देखावा; ढोंग. ३ ३ अतिशय कृश व वृद्ध.

**ढटिंगड़-ढटिंगड़ा--ढटिंगर**-पु. (सं.) धटिंगण.

**ढट्ठा**-पु. कानांपर्यंत बांधण्याचा साफा. २ बूच.

**ढट्ठी**-स्त्री. बूच.

**ढड्ढा**-वि. (दे.) १ अवाढव्य आणि बेढब. २ सांगाडा. ३ खोटा देखावा.

**ढड्ढो**-स्त्री. (दे.) अतिशय कृश म्हातारी. २ बोलभांड स्त्री. ३ एक पक्षीण.

**ढनमनाना**-क्रि.अ. (अनु.) लुढकना पहा.

**ढपना**-पु. (सं.) झांकण.

**ढप्पू**-वि. (दे.) अतिशय मोठा.

**ढफ**-पु. (अ.) डफ.

**ढब**-पु. (सं.) १ ढब; तऱ्हा; बनावट. २ स्वभाव. ३ युक्ति; उपाय.

**ढबुआ**-पु. ढबू पैसा.

**ढमलाना**-क्रि.स. (दे.) लुढकाना पहा.

**ढयना**-क्रि.अ. (सं.) ढासळणें.

**ढरकना**-क्रि.अ. (सं.) १ लवंडणें; सांडणें; ढळणें. २ ओघळणें.

**ढरका**-पु. (सं.) १ एक नेत्ररोग. २ जनावरांस औषध पाजण्याचें नळकांडें.

**ढरकाना**-क्रि.स. (सं.) सांडणें; ओघळविणें; ओतणें.

**ढरना**-क्रि.अ. (सं.) ढलना पहा.

**ढरनि**-स्त्री. (सं.) १ ढळणें; पतन. २ गति; स्पंदन. ३ प्रवृत्ति; कल. ४ कृपाळुपणा; दयाळुपणा; क्षमाशीलता.

**ढरहरना**-क्रि.स. (सं.) १ ढळणें; सरकणें. २ झुकणें.

**ढरहरा**-वि. (सं.) उताराचा; उतरता.

**ढरहरी**-स्त्री. पकोडी पहा.

**ढरहरी**-वि. (स्त्री.) ढरहरा पहा.

**ढराई**-स्त्री. ढळाई पहा.

**ढराना**-क्रि.स. १ ढलाना पहा. २ ढरकाना पहा.

**ढरारा**-वि. १ घरंगळणारा. २ शीघ्र परिवर्तनशील.

**ढर्रा**-पु. (सं.) १ प्रकार; तऱ्हा; शैली. २ मार्ग; युक्ति; उपाय. ३ वर्तणूक; आचरण.

**ढलकना**-क्रि.अ. (सं.) सांडणें; लवंडणें.

**ढलका**-पु. (सं.) एक नेत्ररोग.

**ढलकाना**-क्रि.स. (सं.) १ सांडणें; ओतणें. २ ढकलणें.

**ढलना**-क्रि.अ. (सं.) १ ढळणें; सरकणें. २ सांडणें; ओघळणें. ३ व्यतित होणें; गुजरणें. ४ घरंगळणें. ५ हलणें; डोलणें. ६ आकर्षित होणें; प्रवृत्त होणें. ७ प्रसन्न होणें; अनुकूल होणें. ८ साच्यांत ओतली जाणें.

**ढलवाँ**-वि. (सं.) ओतीव.

**ढलवाना**-क्रि.स. (सं.) ओतविणें.

**ढलाई**-स्त्री. (सं.) १ ओतकाम. २ ओतकामाची मजूरी.

**ढलाना**-क्रि.स. ढलवाना पहा.

**ढलुवा**-वि. ढलवाँ पहा.

**ढलैत**-पु.(सं.) ढाल घेऊन लढणारा; सैनिक.

**ढवरी**-स्त्री. (दे.) नाद; संवय.

**ढहना**-क्रि.अ. (सं.) १ ढांसळणें. २ नष्ट होणें.

**ढहरी**-स्त्री. (सं.) उंबरठा.

**ढहरी**-स्त्री. (दे.) मडकें.

**ढहाना**-क्रि.स. (सं.) ध्वस्त करणें; ढासळविणें.

**ढाँकना**-क्रि.स. (सं.) झांकणें.

**ढँग**-वि. (दे.) ढालवाँ पहा.

**ढाँच-ढाँचा**-पु. (सं.) १ सांगाडा. २ बनावट; घडण. ३ तऱ्हा; प्रकार. ४ हाडांचा सांपळा.

**ढाँचना**-क्रि.स. ढाँकना पहा.

**ढाँस**-स्त्री. (अनु.) ढांस.

**ढाँसना**-क्रि.स. खोकणें.

**ढाई**-वि. (सं.) अडीच.

**ढाक**-पु. (सं.) १ पळसाचें झाड. २ रणभेरी; रणदुंदुभी.

**ढाकन**-पु. (सं.) झांकण.

**ढाड**-स्त्री. (अनु.) १ आरोळी; डरकाळी. २ किंकाळी.

**ढाढस**-पु. (सं.) १ धीर; धैर्य. २ हिम्मत; साहस.

**ढाढ़िन**-स्त्री. (दे.) गाणारीण (मुसलमान).

**ढाढ़ी**-पु. (दे.) उत्सव प्रसंगीं गाणें म्हणणारे मुसलमान गवई.

**ढाना**-क्रि.स. (सं.) १ ध्वस्त करणें. २ खालीं पाडणें.

**ढापना**-क्रि.स. ढाँपना पहा.

**ढाबर**-वि. (दे.) गढूळ; मातट; मळकट.

**ढाबा**-पु. (दे.) १ ओलती पहा. २ जाळें. ३ गवताचें छप्पर. ४ खाणावळ.

**ढामक**-पु. (अनु.) नगाऱ्याचा शब्द.

**ढार**-पु. (सं.) १ ढाळ; उतार. २ मार्ग; प्रणालि. ३ बनावट; रचना.

**ढार**-स्त्री. (सं.) ढालीच्या आकाराचें एक कर्णभूषण.

**ढारना**-क्रि.स. (सं.) १ सांडणें; लवंडणें; ओतणें. २ टाकणें; सोडणें; पाडणें.

**ढारस**-पु. ढाढस पहा.

**ढाल**-स्त्री. (सं.) १ ढाल. २ उतार. ३ प्रकार; ढंग.

**ढालना**-क्रि. (स.) १ ढारना पहा. २ मदिरा पिणें. ३ विकणें. ४ स्वस्त दरानें माल खपवून टाकणें. ५ व्यंगार्थानें बोलणें.

**ढालवाँ**-वि. उतरता.

**ढालिया**-पु. ओतकाम करणारा.

**ढालुआँ-ढालू**-वि. ढालवाँ पहा.

**ढावना**-क्रि.स. (दे.) पाडणें; टाकणें; ओतणें.

**ढास**-पु. (सं.) चोर; लुटारू.

**ढासना**-पु. (सं.) १ तक्या; उशी. २ टेकण; आधार.

**ढाहना**-क्रि.स. (सं.) ध्वस्त करणें; पाडणें; जमीनदोस्त करणें.

**ढिंढोरना**-क्रि.स. (सं.) १ धुंडाळणें; हुडकणें. २ घुसळणें.

**ढिंढोरा**-पु. ( अनु. ) १ दवंडी पिटण्याचा ढोल. २ दवंडी.

**ढिग**-क्रिवि. (सं.) जवळ; निकट.

**ढिग**-स्त्री. (सं.) १ निकटता; सामीप्य. २ तट; किनारा. ३ कांठ; किनार.

**ढिठाई**-स्त्री. (सं.) १ धृष्टता; उद्धटपणा. २ निर्लज्जपणा. ३ धार्ष्ट्य.

**ढिपुनी**-स्त्री. (दे.) १ डेख. २ बोंट.

**ढिबरी**-स्त्री. ( सं. ) १ चिमणी (दिवा). २ चाकी ( Nut ). २ चामड्याचा वायसर.

**ढिमका**-स्त्री. ( अनु. ) अमुक; अमका; तमका; फलाणा.

**ढिलाढला**-वि. १ सैल; ढिला. २ पातळ (द्रव पदार्थ).

**ढिलाई**-स्त्री. ( सं. ) ढिलाई.

**ढींगर**-पु. (सं. ) १ धष्टपुष्ट मनुष्य. २ जार.

**ढींढ-ढोंढ़ा**-पु. ( सं. ) १ मोठें पोट. २ गर्भ.

**ढीट**-स्त्री. ( दे. ) रेघ; रेषा; लकीर.

**ढीठ**-वि. (सं.) १ उद्धट; बेपर्वा. २ निडर; धीट; साहसी.

**ढीठता**-स्त्री. ढिठाई पहा.

**ढीठा**-वि. ढीठ पहा.

**ढीठा**-पु. ढिठाई पहा.

**ढीम**-पु. (दे.) १ दगडाचा गोटा. २ मातीचें ढेकूळ.

**ढीमा**-पु. (दे.) माती, वीट, दगड इ. चा तुकडा.

**ढील**-स्त्री. (सं.) शैथिल्य; सुस्ती; आळस.

**ढील**-वि. (सं.) सैल.

**ढील**-पु. ऊ.

**ढीलना**-क्रि.स. (सं.) १ सैल करणें. २ बंधमुक्त करणें. ३ पातळ करणें.

**ढीला**-वि. (सं.) १ ढीला; सैल. २ धीमा; शांत. ३ मंद; आळशी. ४ नपुंसक.

**ढीह**-पु. ( सं. ) ढीग; उंचवटा.

**ढुंढ**-पु. (सं.) उचल्या; चोर.

**ढुंढवाना**-क्रि.स. (सं.) तपास करविणें.

**ढुंढी**-स्त्री. ( दे. ) दंड; मुसकी.

**ढुकना**-क्रि.अ. (दे.) १ घुसणें; प्रवेश करणें. २ तुटून पडणें. ३ आड उभें राहून डोकावणें.

**ढुकास**-स्त्री. (अनु.) अतिशय तृष्णा.

**ढुक्का**-पु. ढूका पहा.

**ढुच्च-ढुच्चा**-पु. ( दे. ) बुक्का; ठोसा.

**ढुरकना**-क्रि.अ. (सं.) १ घसरून पडणें. २ कलंडणें.

**ढुरना**-क्रि.अ. (सं.) १ लवंडून वाहणें; टपकणें. २ डगमगणें. ३ हलणें;हेलकावे खाणें. ४ अनुकूल होणें. ५ घसरून पडणें.

**ढुरहुरी**-स्त्री. (सं.) पाऊलवाट.

**ढुलकना**-क्रि.अ. (सं.) कोलमडून पडणें.

**ढुलना**-क्रि.अ. (सं.) १ लवंडणें; सांडणें. २ घरंगळणें; घसरणें. ३ झुकणें; वळणें. ४ प्रसन्न होणें; अनुकूल होणें. ५ हेलकावे खाणें.

**ढुलवाई**-स्त्री. (सं.) १ लोटण्याचें काम; लोटण्याची मजुरी.

**ढुलाना**-क्रि.स. (सं.) १ सांडविणें; ओतविणें. २ कलंडविणें; पाडणें. ३ प्रवृत्त करणें. ४ हलविणें. ५ लोटविणें.

**ढूँकना**-क्रि.अ. (सं.) ढुकना पहा.

**ढूँका**-पु. (दे.) आडून डोकाऊन पाहणें.

**ढूँढ**-स्त्री. (सं.) शोध; तपास.

**ढूँढना**-क्रि.स. (सं.) धुंडणें; शोधणें.

**ढूह-ढूहा**-पु. (सं.) ढीग; ढिगारा.

**ढेंकली**-स्त्री. (सं.) ओकती; विहीरींतून पाणी काढण्याचें एक साधन. २ तिरपी शिवण. ३ खाली डोकें वर पाय करून चालण्याची क्रिया. ४ धान्य कुटण्याचें यंत्र.

**ढेंकी**-स्त्री. (सं.) धान्य कुटण्याचें यंत्र.

**ढेंकुर-ढेंकुली**-स्त्री. ढेंकली पहा.

**ढेंढ़**-पु. (दे.) १ कावळा. २ एक नीच जात धेड. ३ मूर्ख.

**ढेंढ़र**-पु. डोळयांतील वडस.

**ढेंढवा**-पु. काळया तोंडाचा वानर.

**ढेंढा**-पु. ढेंढ पहा.

**ढेंढी**-स्त्री. (सं.) १ कपाशीचें बोंड. २ अफूचें बोंड.

**ढेंप-ढेंपी**-स्त्री. (दे.) १ डेख. २ स्तनाग्र.

**ढेऊ**-पु. (दे.) पाण्याची लाट; तरंग.

**ढेपुनी**-स्त्री. (दे.) १ डेख. २ टेंगुळ. २ स्तनाग्र.

**ढेबरी**-स्त्री. ढिबरी पहा.

**ढेबुक-ढेबुवा**-पु. (दे.) पैसा (तांब्याचा).

**ढेममौज**-स्त्री. (दे.+फा.) समुद्राची लाट.

**ढेर**-पु. (सं.) ढेर; रास; ढीग.

**ढेर**-वि. (सं.) अधिक जास्त.

**ढेरी**-स्त्री. ढेर पहा.

**ढेल**-स्त्री. ढेला पहा.

**ढेलवाँस**-स्त्री. (सं.) गोफण.

**ढेला**-पु. (सं.) १ दगड वीट इ.चा तुकडा. २ ढेकूळ.

**ढेलाचौथ**-स्त्री. (सं.) गणेश चतुर्थी (भाद्रपद शुद्ध चतुर्थी).

**ढैया**-स्त्री. १ अडीच शेरांचें माप. २ अडीचकी.

**ढोंकना**-क्रि.स. (अनु.) पाणी इ. ढोसणें.

**ढोंका**-पु. (दे.) ढोका पहा.

**ढोंगधतूर**-पु. थोतांड; पाखंड.

**ढोंढ़**-पु. (सं.) १ कळी. २ बोंड.

**ढोंढी**-स्त्री. (सं.) बेंबी.

**ढोका**-पु. (दे.) १ धोंडा. २ ढेकूळ.

**ढोटा**-पु. (सं.) १ पुत्र; मुलगा. २ बालक.

**ढोटी**-स्त्री. (सं.) मुलगी; कन्या.

**ढोटौना**-पु. ढोटा पहा.

**ढोड़**-पु. (दे.) उंट.

**ढोना**-क्रि.स. (सं.) १ ओझें वाहणें. २ उचलून नेणें.

**ढोरना**-क्रि.स. (सं.) १ सांडणें; लवंडविणें. २ हलविणें; वारविणें.

**ढोरा**-पु. (सं.) ढोर.

**ढोरी**-स्त्री. (सं.) ध्यान; एकाग्रता.

**ढोलना**-पु. (सं.) १ ढोलाच्या आकाराचा ताईत. २ रस्ते दाबण्याचा रूळ. ३ पाळणा.

**ढोलना**-क्रि.स. (सं.) ढोरना पहा.

**ढोलनी**-स्त्री. (सं.) पाळणा.

**ढोला**-पु. (सं.) १ किडक्या फळांतील किडा. २ गांवाच्या हद्दीची भिंत अथवा चबुतरा. ३ शरीर; देह. ४ पति; प्रियकर. ५ मूर्ख मनुष्य.

**ढोलिया**-पु. (सं.) ढोलक्या.

**ढोली**-स्त्री. (सं.) १ २०० पानांची गड्डी. २ थट्टा.

**ढोव**-पु. नजराणा; भेट.

**ढौकन**-पु. (सं.) लांच.

**ढौकना**-क्रि.स. (दे.) ढोसणें; पिणें.

**ढौरी**-स्त्री. (दे.) ध्यान; एकाग्रता; तल्लीनता.

---

## त

**तंक**-पु. (सं.) १ भय. २ विरह; दुःख. ३ छिनी; टांकी. ४ कपडा; वस्त्र.

**तंग**-पु. (फा.) खोगीर आवळण्याची कसणी.

**तंग**-वि. (फा.) १ तंग; घट्ट. २ त्रासलेला. ३ अरुंद; संकुचित.

**तंगदस्त**-वि. (फा.) १ कंजूष; कृपण. २ गरीब; अकिंचन.

**तंगहाल**-वि. (फा.) १ विपद्ग्रस्त. २ गरीब; निर्धन. ३ रोगग्रस्त; मरणासन्न.

**तंगा**-पु. (दे.) ढबु पैसा.

**तंगी**-स्त्री. ( फा. ) १ कमतरता; न्यूनता. २ अडचण; संकोच. ३ दुःख; क्लेश. ४ निर्धनता; गरीबी.

**तंड**-पु. (सं.) नृत्य.

**तंत**-पु. (सं.) १ तंतु. २ तत्व. ३ तंतुवाद्य. ४ इच्छा; कामना. ५ वशता; अधीनता.

**तंत**-स्त्री. (सं.) आतुरता; अधीनता.

**तंत**-वि. (सं) तंतोतंत.

**तंतुकी**-स्त्री. (सं.) नाडी.

**तंतुवाय**-पु. (सं.) १ कोळी. २ कोष्टी.

**तंत्रसंस्था**-स्त्री. (सं.) शासनसंस्था (गव्हर्नमेंट).

**तंत्रा**-स्त्री. (सं.) तंद्रा पहा.

**तांत्रि**-स्त्री. (सं.) १ तंत्री पहा. २ तंद्रा पहा.

**तंत्री**-स्त्री. (सं.) १ वाद्याची तार. २ शीर; नस. ३ रज्जु; रश्शी. ४ तंतुवाद्य. ५ वीणा.

**तंत्री**-पु. (सं.) १ तंतुवाद्यवादक. २ गायक.

**तंत्री**-वि. (सं.) १ आळशी. २ अधीन.

**तंदरा**-स्त्री. तंद्रा पहा

**तंदुरुस्त**-वि. (फा.) निरोगी.

**तंदूर**-पु. (फा.) रोट्या भाजण्याची एक प्रकारची चूल.

**तंदूरी**-पु. (दे.) एक प्रकारचें पिवळें रेशीम.

**तंदूरी**-वि. (फा.) भट्टींतील.

**तंदेही**-स्त्री. (फा.) १ परिश्रम; मेहनत. २ प्रयत्न. ३ ताकीद; सूचना.

**तंद्रा-तंद्रि**-स्त्री. (सं.) १ झोंपेची तंद्री. २ गुंगी; ग्लानि.

**तंद्री**-स्त्री. (सं.) १ तंद्रा पहा. २ भंवई.

**तँबिया**-पु. (सं.) तांब्याचें नरसाळें.

**तँवियाना**-क्रि.अ. (सं.) १ तांबूस होणें. २ कळकणें.

**तंबीह**-स्त्री. (अ.) १ तंबी. २ दंड; शिक्षा.

**तंबूर-तंबूरा**-पु. (सं.) तंबोरा.

**तंबोल**-पु. (सं.) विडा; तांबूल.

**तँबोली**-पु. (सं.) तांबोळी.

**तँवार**-स्त्री. १ घेरी; भोंवळ. २ बारीक ताप.

**तँवारी**-स्त्री. तँवार पहा.

**तअज्जुब**-पु. (अ.) आश्चर्य; विस्मय.

**तअम्मुल**-पु. (अ.) १ विचार; चिंता; फिकीर. २ उशीर; वेळ. ३ ३ धैर्य.

**तअल्लुक**-पु. (अ.) १ तालुका. २ मोठी जमीनदारी.

**तअल्लुक**-पु. (अ.) संबंध.

**तअस्सुब**-पु. (अ.) पक्षपात (धार्मिक बाबतींत).

**तइक**-पु. चांभार.

**तइँ**-प्रत्य. १ शीं; ला. २ प्रति; साठीं.

**तइँ**-अव्य. करितां; साठीं.

**तउ**-अव्य. तेव्हां; त्यावेळीं.

**तऊ**-अव्य. (सं.) तरीही; तरीसुद्धां.

**तक**-अव्य. (सं.) पर्यंत.

**तक**-स्त्री. (सं.) १ तराजू. २ तराजूचें पारडें.

**तकडा**-वि. तगडा; धट्टाकट्टा.

**तकड़ी**-स्त्री. (दे.) तराजू.

**तकदमा**-पु. (अ.) अंदाजपत्रक.

**तक़दीर**-स्त्री. (अ.) १ अंदाज. २ भाग्य; नशीब.

**तक़दीरवर**-वि. (अ+फा.) भाग्यवान.

**तकन**-स्त्री. (सं.) पाहणें; दृष्टी; टक.

**तकना**-क्रि.अ. (सं.) १ न्याहाळणें. २ आश्रय घेणें.

**तकमील**-स्त्री. (अ.) पूर्णता.

**तक़रार**-स्त्री. (अ.) तक्रार; हुज्जत.

**तक़रीब**-स्त्री. (अ.) उत्सव; समारंभ.

**तकरीबन**-क्रिवि. (अ.) सुमारें; अंदाजें; जवळजवळ.

**तक़रीर**-स्त्री. (अ.) १ चर्चा; संभाषण. २ व्याख्यान; भाषण.

**तक़र्रुरी**-स्त्री. (अ.) नियुक्ति.

**तकला**-पु. (सं.) मोठी टकळी.

**तकली**-स्त्री. (सं.) टकळी.

**तकलीफ**-स्त्री. (अ.) कष्ट; दुःख.

**तकल्लुफ**-पु. (अ.) शिष्टाचार.

**तकसी**-स्त्री. नाश; दुर्दशा.

**तकसीम**-स्त्री. (अ.) १ वांटणी. २ भाग.

**तकसीर**-स्त्री (अ.) १ अपराध; दोष. २ भूल; चूक.

**तकाई**-स्त्री. (सं.) पहाणें.

**तक़ाजा**-पु. (अ.) तगादा.

**तकान**-स्त्री. (दे.) थकवा.

**तकाना**-क्रि.स. पहावयास लावणें; दाखविणें.

**तकाना**-क्रि.अ. (सं.) कडे जाणें.

**तक़ावी**-स्त्री. (अ.) तगाई.

**तकिया**-पु. (फा.) १ तक्क्या. २ आश्रय; आसरा. ३ विश्रांतीची जागा. ४ फकीराचें निवासस्थान.

**तकियादार**-पु. (फा.) फकीर.

**तकिल**-पु. (सं.) १ धूर्त. २ औषध.

**तकिला**-स्त्री. (सं.) औषध.

**तकुआ**-पु. तकला पहा.

**तकुआ-तकैया**-पु. (सं.) पहाणारा.

**तक्मा**–देवीचा आजार.

**तख़फ़ीफ़**–स्त्री. ( अ. ) न्यूनता.

**तख़मीनन्**–क्रि.वि. ( अ. ) अंदाजें.

**तख़मीना**–.पु. ( अ. ) अंदाज; अनुमान.

**तख़ालिया**–पु. (अ.) एकांतस्थान.

**तखान**–पु. (सं.) सुतार.

**तखीत**–स्त्री. (अ.) १ शोध;तपास. २ तहक़ीकात पहा.

**तख्तपोश**–पु. ( फा. ) १ चादर; पलंगपोस. २ तख्त; सिंहासन.

**तख्तबंदी**–स्त्री. ( फा. ) लांकडी फळयांची भिंत.

**तख्ता**–पु. ( फा. ) १ तक्ता; फळी. २ तक्तपोशी. ३ तिरडी. ४ कागदाचा ताव. ५ वाफा.

**तख्ती**–स्त्री. (फा.) १ फळी. २ लिहिण्याची पाटी. ३ पट्टी.

**तगड़ी**–स्त्री. (दे.) तागडी.

**तगदमा–तगदम्मा**–पु. ( अ. ) अंदाज पत्रक.

**तगमा**–पु. (तु.) पदक; बिल्ला.

**तगाई**–स्त्री. ( सं. ) शिवणावळ; शिलाई.

**तगाड़ा**–पु. (दे.) घमेलें.

**तगाना**–क्रि.स. (सं.) शिवणें; शिवून घेणें.

**तगार-तगारी**–स्त्री. (दे.) १ घमेलें. २ हलवायाची मोठी कढई. ३ उखळी पुरण्याचा खड्डा.

**तगियाना**–क्रि. स. तागना पहा.

**तगीर**–पु.(अ.) **तगीरी**–स्त्री. परिवर्तन.

**तघार-तघारी**–स्त्री. तगारी पहा.

**तचना**–क्रि.अ. (सं.) तापणें.

**तचा**–स्त्री. (सं.) त्वचा.

**तचाना**–क्रि.स. (सं.) तापविणें.

**तच्छिन**–क्रिवि. ( सं. ) तत्क्षणीं; तात्काळ.

**तज़किरा**–पु. ( अ. ) १ चर्चा. २ उल्लेख.

**तजन**–पु. (सं.) त्यजन; त्याग.

**तजरबा**–पु. (अ.) १ अनुभव. २ पारख.

**तजरबाकार**–पु. ( अ.+फा. ) अनुभवी.

**तजरबाकारी**–पु. ( अ.+फा. ) अनुभव.

**तजरूबा**–पु. तजरबा पहा.

**तजल्ली**–स्त्री. (अ.) १ प्रकाश. २ चमक; तेज.

**तजवीज़**–स्त्री. ( अ. ) १ सम्मती; विचार. २ निर्णय; निकाल. ३ तजवीज; व्यवस्था.

**तजिया**–स्त्री. (अ.) लहान तराजू.
**तटंक**–पु. (सं.) कर्णफूल; ताटंक.
**तट**–पु. (सं.) १ क्षेत्र; शेत. २ प्रदेश. ३ तीर; किनारा. ४ महादेव.
**तट**–क्रिवि. (सं.) समीप; निकट; जवळ.
**तटका**–वि. (सं.) १ ताजें. २ नवें; कोरें.
**तटनी**–स्त्री. (सं.) नदी.
**तटस्थ**–वि. (सं.) किनाऱ्यावर राहणारा; कांठावर राहणारा. २ जवळ राहणारा. ३ तटस्थ.
**तटाक**–पु. (सं.) तळें.
**तटी**–स्त्री. (सं.) १ तीर; तट. २ नदी.
**तड़**–पु. (सं.) १ भाग; तट; पक्ष. २ जमीन; खुश्की.
**तड़क**–स्त्री. (अनु.) १ तडा; चीर. २ तडकणें. ३ चटणी; लोणचें इ. चवदार पदार्थ.
**तडकना**–क्रि.अ. (सं.) १ तडकणें; २ उकलणें; उलणें. ३ रागावणें; कडाडणें. ४ उफळणें.
**तड़का**–पु. (अनु.) १ पहाट. २ छौंक पहा.
**तडकाना**–क्रि.स. (अनु ) १ भेग पाडणें. २ मोठा आवाज करणें.
**तड़कीला**–वि. १ चमकदार; भडक. २ तडकणारा.
**तड़क्का**–क्रिवि. तड़ाका पहा.
**तड़प**–स्त्री. (अनु.) १ तडफड; तळमळ. २ चमक.
**तड़पना-तड़फना**–क्रि.अ. (अनु.) १ तडफडणें; तळमळणें. २ गरजणें.
**तड़पाना**–क्रि.स. (अनु.) सतावणें; छळणें.
**तडाक**–क्रिवि. (अनु.) झटपट; चटकन.
**तड़ाक-ग**–पु. (सं.) तळें.
**तड़ाका**–क्रिवि. चटकन; झटपट.
**तड़ावा**–स्त्री. (सं.) १ दिखाऊपणा. २ ढोंग.
**तड़िया**–स्त्री. (दे.) समुद्र कांठची हवा.
**तड़ी**–स्त्री. (अनु.) १ थप्पड. २ बहाणा. ३ कपट; लबाडी.
**तत**–पु. (सं.) तत्व.
**तत**–वि. (सं.) तप्त.
**तताथेई**–स्त्री. (अनु.) नाचाचे बोल.
**ततसार**–स्त्री. (सं.) भट्टी; आगटी.
**ततहंडा**–पु. (सं.) पाणी तापविण्याचा हंडा.
**तताई**–स्त्री. (सं.) उष्णता; आंच.
**ततामह**–पु. (सं.) पितामह.

**तति**-स्त्री. (सं.) १ श्रेणी; पंक्ति. २ समूह. ३ विस्तार.

**ततुरि**-वि.(सं.)१हिंसक.२ तारणारा.

**ततैया**-स्त्री.(सं.)१ गांधील माशी. २ लवंगी मिरची.

**ततैया**-वि. १ चलाख. २ बुद्धिमान.

**तत्त**-पु. तत्व.

**तत्ता**-वि. (सं.) तप्त; गरम.

**तत्तोथंबो**-पु. १ भांडणामध्यें मध्यस्थी. २ धीर देणें.

**तत्त्वता**-स्त्री. (सं.) यथार्थता; वास्तविकता.

**तत्त्वदर्श-तत्त्वदर्शी**-पु. (सं.) तत्वज्ञानी.

**तत्त्वदृष्टि**-स्त्री. (सं.) ज्ञानचक्षु.

**तत्त्वभाव**-पु. (सं.) प्रकृति; स्वभाव.

**तत्थ**-वि. (सं.) मुख्य; प्रधान.

**तत्थ**-पु. (सं.) शक्ति; बल.

**तत्रभवान**-पु. (सं.) माननीय; पूज्य; श्रेष्ठ.

**तथा**-अव्य. (सं.) १ आणि; व. २ असेंच; अशा प्रकारें.

**तथ्यभाषी**-वि. (सं.) सत्यभाषी.

**तद्**-क्रिवि. (सं.) तेव्हां.

**तदनु**-क्रिवि. (सं.) १ तदनंतर; तसेंच. २ त्या प्रकारें.

**तदबीर**-स्त्री. (अ.) युक्ति; उपाय.

**तदाकार**-वि. (सं.) १ तसाच. २ तन्मय.

**तदारुक**-पु. (अ.) १ तपास; शोध. २ बंदोबस्त. ३ दंड; शिक्षा.

**तदीय**-सर्व. (सं.) त्याचा.

**तद्धन**-पु. (सं.) कृपण.

**तन**-पु. (सं.) शरीर; तनु.

**तन**-क्रिवि. बाजूस; कडे.

**तनकीह**-स्त्री. (अ.) शोध; तपास.

**तनख़ाह-तनख्वाह**-स्त्री. (फा.) तनखा; वेतन.

**तनजेब**-स्त्री. अतिशय तलम मलमल.

**तनज्जुल**-पु. (अ.) **तनज्जुली**-स्त्री. उतरती कळा; अवनति.

**तनतना**-पु. १ दरारा. २ क्रोध.

**तनत्राण**-पु. (सं.) चिलखत; कवच.

**तनदिही**-स्त्री. तंदेही पहा.

**तनना**-क्रि.अ. १ ताणलें जाणें. २ झुकणें; वांकणें. ३ उभ राहणें; ताठ होणें. ४ रुसणें; अकडून जाणें.

**तनपात**-पु. तनुपात.

**तनपोषक**-वि. (सं.) स्वार्थी.

**तनमय**-वि. तन्मय

**तनरुह**-पु. तनुरुह पहा.

**तनसल**-पु. (दे.) स्फटिक.

**तनसीख़**-स्त्री. (अ.) रद्द करणें.
**तनसुख**-पु. (सं.) अतिशय पातळ छापील मलमल.
**तनहा**-वि. (फा.) एकाकी; एकटा.
**तनहाई**-स्त्री. (फा.) एकांत.
**तना**-पु. (फा.) झाडाचें खोड.
**तना**-क्रिवि. १ कड; बाजूस. २ तन पहा.
**तनाई**-स्त्री. **तनाऊ**-पु. तनाव पहा.
**तनाज़ा**-पु. (अ.) १ भांडण; तंटा. २ वैर.
**तनाना**-क्रि. स. ताणविणें.
**तनाव**-स्त्री. (अ.) तंबूची दोरी. २ २ दोरीवरच्या नाचाची दोरी.
**तनाव**-पु. (सं.) १ ताण. २ कपडे वाळत घालण्याची दोरी. ३ दोरी; रश्शी.
**तनि-तनिक**-क्रिवि. (सं.) थोडासा; अल्पः जरासा.
**तनि-तनिक**-वि. लहान.
**तनिका**-स्त्री. (सं.) दोरी.
**तनिया**-स्त्री. (सं.) १ लंगोट; लंगोटी. काचा. ३ चोळी.
**तनिष्ठ**-वि. (सं.) कृश व दुर्बळ.
**तनी**-स्त्री. (सं.) नाडी; बंद. २ तनिया पहा.
**तनी**-क्रिवि. वि. तनिक पहा.
**तनु**-वि. (सं.) १ कृश. २ थोडा. ३ कोमल; नाजूक ४ सुंदर.
**तनु**-स्त्री. (सं.) १ देह; तनु. २ त्वचा. ३ स्त्री. ४ सापाची कात.
**तनुक**-वि. क्रिवि. तनिक पहा.
**तनुक**-पु. तनु पहा.
**तनुता**-स्त्री. (सं.) १ लघुता. २ दुर्बलता.
**तनुत्र**-पु. तनुत्राण पहा.
**तनुधारी**-वि. (सं.) देहधारी.
**तनुपात**-पु. (सं.) देहपात; मृत्यु.
**तनुभव**-पु. (सं.) पुत्र.
**तनुरस**-पु. (सं.) घाम.
**तनुराग**-पु. (सं.) उटणें.
**तनुरुह**-पु. (सं.) रोम; अंगावरील केस.
**तनुवार**-पु. (सं.) कवच; चिलखत.
**तनुसर**-पु. (सं.) घाम.
**तनू**-पु. (सं.) १ पुत्र. २ शरीर. ३ गाय.
**तनूपा**-पु. (सं.) जठराग्नि.
**तनूरूह**-पु. तनुरुह पहा.
**तनैना**-वि. (सं.) १ ताणलेला. २ तिरका. ३ क्रुद्ध; नाराज.
**तनैया**-स्त्री. (सं.) कन्या.

**तनोज**-पु. (सं.) रोम; अंगावरील केंस.

**तन्नाना**-क्रि. अ. ताठरणें; अकडून बसणें.

**तन्नी**-स्त्री. (सं.) १ तराजूच्या पारड्यांची दोरी. २ धारदार छिन्नी. ३ ३ शिडें उभारण्याची दोरी.

**तन्नी**-पु. व्यापारी जहाजावरील एक अधिकारी.

**तन्मय**-वि. तन्मय.

**तन्मात्र**-पु. (सं.) **तन्मात्रा**-स्त्री. पंचमहाभूतें.

**तन्वी**-स्त्री. (सं.) एक वृत्त.

**तन्वी**-वि. (स्त्री.) सडपातळ स्त्री.

**तपड़ी**-स्त्री. (दे.) १ उंचवटा. २ एक प्रकारचें फळ.

**तपन**-पु. (सं.) १ ज्वलन; आंच; दाह. २ सूर्य. ३ उन्ह.

**तपना**-स्त्री. (सं.) ताप; ज्वलन.

**तपनकर**-पु. (सं,) सूर्यकिरण.

**तपना**-क्रि.अ. १ तापणें (सर्व अर्थ मराठी प्रमाणें.)

**तपनी**-स्त्री. (सं.) १ शेकोटी. २ भट्टी. ३ तपस्या.

**तपनीय-तपनीयक**-पु. (सं.) सुवर्ण.

**तपसाली**-पु. (सं.) तपस्वी.

**तपा**-पु. (सं.) तपस्वी.

**तपा**-वि. (सं.) तपस्येंत मग्न.

**तपाक**-पु. (फा.) १ आवेश. २ वेग.

**तपात्यय**-पु (सं.) वर्षाकाल.

**तपाना**-क्रि.स. (सं.) तापविणें.

**तपाव**-पु. (सं.) उष्णता; ताप.

**तपिश**-स्त्री. (फा.) आंच; ताव; ऊष्णता.

**तपी**-पु. (सं.) तपस्वी.

**तपु**-पु. (सं.) १ अग्नि. २ सूर्य. ३ शत्रु.

**तपु**-वि. (सं.) १ तप्त; ऊष्ण. २ तापविणारा.

**तपेदिक**-पु. क्षयरोग.

**तपौनी**-स्त्री. (सं.) तपनी पहा.

**तफ़रीक़**-स्त्री. (अ.) १ भिन्नता. २ बाकी काढणें; वजा करणें (गणित.) ३ फरक; अंतर. ४ वांटणी.

**तफ़रीह**-स्त्री. (अ.) १ प्रसन्नता. २ विनोद; थट्टा. ३ फेरफटका; सहल. ४ ताजेपणा.

**तफ़सील**-स्त्री. (फा.) १ विस्तृत वर्णन. २ टीका. ३ सूची. ४ विवरण; तपशील.

**तफ़ावत**-पु. (अ.) १ फरक; तफावत. २ अंतर (Distance).

**तब**–अव्य. ( सं. ) तेव्हां; त्या वेळीं.

**तबक़**–पु. (अ.) १ लोक ( स्वर्ग व पाताळ. ) २ घडी. ३ तबक. ४ मुसलमान स्त्रियांची प्रार्थनेची पद्धति. ५ शरीरावरील डाग; चक्रदळें. ६ थर.

**तबक़डी**–स्त्री. ( अ. ) तबकडी.

**तबक़ा**–पु. ( अ. ) १ खंड; विभाग. २ घडी. ३ थर. ४ तबक (१) पहा. ५ थवा; झुंड. ६ पद; हुद्दा.

**तबाकिया**–वि. (अ.) घडयाघडयांचा; थरांचा.

**तबदील**–वि. ( अ. ) फरक झालेला; बदल झालेला.

**तबदीली**-स्त्री. ( अ. ) **तबद्दुल**–पु. बदल; परिवर्तन.

**तबर**–पु. ( फा. ) १ कुऱ्हाड. २ परशु.

**तबरदार**–पु. ( फा. ) कुऱ्हाड चालविणारा.

**तबल**–पु. (फा. ) नगारा; ढोल.

**तबलची तबलिया**–पु. ( फा. ) तबलजी.

**तबाक़**–पु. ( अ. ) मोठें तबक; परात.

**तबाबत**–स्त्री. ( फा. ) वैद्यक.

**तबाह**–वि. ( फा. ) नष्ट; बरबाद.

**तबाही**–स्त्री. ( फा. ) नाश.

**ताबिअत-तबीअत**–स्त्री. (अ.) १ चित्त; मन; जीव. २ बुद्धि; समज.

**तबीअतदार**–वि. ( अ. ) १ समजदार; हुशार. २ रसिक;

**तबीब**–पु. ( अ. ) वैद्य.

**तभी**–अव्य. (सं.) १ त्यावेळीं. २ या करितां.

**तमंचा**–वि. ( फा. ) पिस्तुल.

**तमअ**–स्त्री. (अ.) १ लालच; लोभ. २ इच्छा.

**तमक**–पु. १ आवेश; जोश. २ तीव्रता. ३ क्रोध. ४ एक श्वासरोगाचा प्रकार.

**तमकना**–क्रि.अ. क्रोधाविष्ट होणें.

**तमग़ा**–पु. (तु.) पदक; बिल्ला.

**तमचर**–पु. (सं.) १ राक्षस. २ घुबड.

**तमचुर-तमचोर**–पु. (सं. ) कोंबडा.

**तमतमाना**–क्रि. अ. १ क्रोधानें लाल होणें. २ चमकणें (क्वचित).

**तमतमाहट**–स्त्री. जळफळाट; क्रोध.

**तमता**–स्त्री. ( सं. ) अंधेर.

**तमस्सुक**–पु. ( सं. ) ऋणपत्र; दस्तऐवज.

**तमहीद**–स्त्री. (अ.) भूमिका; प्रास्ताविक निवेदन.

**तमाँचा-तमाचा**–पु. (फा.) थप्पड.

**तमाम**-वि. (अ.) संपूर्ण; सर्व; कुल.

**तमारि**-पु. (सं.) सूर्य.

**तमाशगीर-तमाशबीन**-पु. (अ.) १ तमाशा पाहाणारा. २ वेश्यागामी.

**तमाशा**-पु. (अ.) १ तमाशा. २ अद्‌भुत गोष्ट.

**तमाशाई**-पु. (अ.) तमाशा पाहणारा.

**तमि**-पु. (सं.) १ रात्र. २ मोह.

**तमिनाथ**-पु. (सं.) चंद्रमा.

**तमिस्र**-पु. (सं.) १ अंधार. २ क्रोध. ३ नरक.

**तमिस्रा**-स्त्री. (सं.) अंधेरी रात्र.

**तमी**-स्त्री. (सं.) १ रात्र. २ हळद.

**तमीज़**-स्त्री. (अ.) १ विवेक; सारासार विचार. २ ओळख. ३ ज्ञान: बुद्धि. ४ अदब.

**तमीश**-पु. (सं.) चंद्रमा.

**तमोंध**-वि. (सं.) १ अज्ञानी. २ क्रोधी.

**तमोर**-पु. (सं.) विडा.

**तय**-वि. (अ.) १ पुरा केलेला; समाप्त. २ निश्चित; मुकर. ३ निर्णित.

**तया**-पु. तवा.

**तरंगक**-पु. (सं.) १ पाण्यावरील तरंग. २ स्वर; लहरी.

**तरंगवती तरंगालि**-स्त्री. (सं.) नदी.

**तरंगी**-वि. (सं.) लहरी.

**तरंड**-पु. (सं.) १ नाव; नौका. २ वल्हें.

**तरंत**-पु. (सं.) १ समुद्र. २ राक्षस. ३ बेडूक.

**तरंती**-स्त्री. (सं.) नाव; होडी.

**तर**-वि. (फा.) १ भिजलेला; ओला. २ शीतल. ३ सुखलेला नाहीं असा; ताजा. ४ पोसलेला; भरलेला.

**तर**-पु. (सं.) १ पार करण्याची क्रिया. २ अग्नि. ३ वृक्ष. ४ रस्ता. ५ गति.

**तर**-क्रिवि. खालीं; तळाशी.

**तरक**-स्त्री. तड़क पहा.

**तरक**-पु. (सं.) १ तर्क. २ अडचण. ३ चूक; गलती.

**तरकना**-क्रि.अ. १ तडकना पहा. २ तर्क करणें; विचार करणें. ३ उसळणें; उड्या मारणें.

**तरकश-तरकस**-पु. (फा.) बाणांचा भाता.

**तरका**-पु. तड़का पहा.

**तरका**-पु. (अ.) मेलेल्या माणसाची वारसास मिळणारी संपत्ति.

**तरकारी**-स्त्री. (फा.) १ भाजी. २ खाण्यायोग्य मांस.

**तरकी**-स्त्री. (सं.) कर्णफूल.

**तरकीब**-स्त्री. (अ.) १ संयोग; मेळ २ बनावट; रचना. ३ युक्ति; उपाय. ४ शैली; रचना; प्रणाली.

**तरकुल**-पु. (सं.) ताड वृक्ष.

**तरकुला**-पु. (सं.) **तरकुली**-स्त्री. कर्णफूल.

**तरक्क़ी**-स्त्री. (अ.) बढती; उन्नति.

**तरखा**-पु. (सं.) पाण्याचा जोरदार प्रवाह.

**तरखान**-पु. (सं.) सुतार.

**तरगुलिया**-स्त्री. (दे.) अक्षता ठेवण्याचें तबक.

**तरछट-तरछन**-स्त्री. तलछट पहा.

**तरछा**-पु. शेण एकत्र करण्याचें स्थान.

**तरछाना**-क्रि.अ. नेत्रसंकेत करणें.

**तरज**-पु. तर्ज़ पहा.

**तरजना**-क्रि.अ. १ मारणें; दटावणें. २ कान उघाडणी करणें.

**तरजुई**-स्त्री. (फा.) लहान तराजु.

**तरजुमा**-पु. (अ.) भाषांतर.

**तरण**-पु. (सं.) १ नदीपार करणें; पार करणें. २ पाण्यावर तरंगणारा तराफा. ३ उद्धार. ४ स्वर्ग.

**तरणि**-पु. (सं.) १ सूर्य. २ किरण.

**तरणि-तरणी**-स्त्री. (सं.) नौका.

**तरतराना**-क्रि.अ. (अनु.) तडतडणें.

**तरतीब**-स्त्री. (अ.) क्रम.

**तरदीद**-स्त्री. (अ.) १ काट मारणें; रद्द करणें. २ खंडन; प्रत्युत्तर.

**तरद्दुद**-पु. (अ.) चिंता; काळजी.

**तरनतार**-पु. (सं.) मोक्ष; मुक्ति.

**तरनतारन**-पु. (सं.) १ उद्धार. २ उद्धार करणारा.

**तरना**-क्रि.स. (सं.) पार करणें.

**तरना**-क्रि.अ. (सं.) सद्गति मिळणें; मुक्त होणें.

**तरना**-क्रि. स. तलना पहा.

**तरनि**-स्त्री. तरणि पहा.

**तरनी**-स्त्री. (सं.) १ नाव; नौका. २ मिठाईचें ताट ठेवण्याची बैठक.

**तरप**-स्त्री. तड़प पहा.

**तरपत**-पु. (सं.) १ सुबत्ता. २ आराम; चैन.

**तरपना**-क्रि.अ. तड़पना पहा.

**तरपर**-क्रिवि. १ खालींवर. २ एकापाठीमागून दुसरा.

**तरफ़**-स्त्री. (अ.) १ दिशा; बाजू. २ काठ; कड. ३ पक्ष; बाजू.

**तरफ़दार**-वि. (फा.) पक्षपाती बाजूचा; पक्षाचा.

**तरफ़दारी**-स्त्री. (फा.) पक्षपात; समर्थन.

**तर-बतर**-वि. ( फा. ) ओला; भिजलेला.

**तरबहना**-पु. ताम्हन.

**तरबूज़**-पु. (फा.) टरबूज.

**तरमीम**-स्त्री. ( अ. ) संशोधन; दुरुस्ती.

**तरराना**-क्रि.अ. ( अनु. ) अकडणें.

**तरल**-वि. (सं.) १ हलता; डोलता; चंचल; चल. २ क्षणभंगुर; अस्थिर. प्रवाही; द्रव. ४ कांतिमान; चकचकीत. ५ पोकळ.

**तरल**-पु. ( सं. ) १ माळेच्या मधला मणि. २ हार. ३ हिरा. ४ लोखंड. ५ तळ. ६ घोडा.

**तरलता**-स्त्री. ( सं. ) १ चंचलता. २ प्रवाहित्व.

**तरला**-स्त्री. ( सं. ) १ मदिरा. २ मधमाशी.

**तरलाई**-स्त्री. ( सं. ) १ चंचलता. २ चपलता. २ द्रवत्व.

**तरवन**-पु. कर्णफूल.

**तरवर**- पु. (सं.) मोठा वृक्ष.

**तरवरिया-तरवरिहा**-पु. ( सं.) तरवार बहाद्दर.

**तरवाई-सिरवाई**-स्त्री. उंच जमीन व सखल जमीन.

**तरवार**-पु. १ तरवार. २ तरवर पहा.

**तरवारि**-पु. ( सं. ) तलवार.

**धरवारी**-पु. ( सं.) तलवार बहाद्दर.

**तरस्**-पु. ( सं. ) १ बळ. २ वेग. ३ वानर. ४ रोग. ५ किनारा; तट.

**तरस**-पु. ( सं. ) दया; करुणा.

**तरसना**-क्रि.अ. ( सं. ) एकाद्या गोष्टीची इच्छा धरून काळजी करीत बसणें.

**तरसाना**-क्रि.स. ( सं. ) १ एकादी गोष्ट न देऊन त्रास देणें. २ व्यर्थ लालूच दाखविणें.

**तरह**-स्त्री. (अ.) १ प्रकार; तऱ्हा. २ रचना; बनावट; घाट. ३ रीति; ढंग; तऱ्हा. ४ युक्ति; उपाय. ५ दशा; अवस्था.

**तरहटी**-स्त्री. १ सखल जमीन. २ डोंगराच्या पायथ्याची जमीन.

**तरहदार**-वि. ( फा. ) १ सुंदर बनावटीचा; सुंदर विणीचा. २ शौकिन.

**तरहर**-क्रिवि. तळाशीं; खालीं.

**तरहर**-वि. १ तळाचा; बुडाचा. २ निकृष्ट.

**तरेहल**-वि १ अधीन. २ पराजित.

**तरा**-पु. १ तला पहा. २ तलवा पहा.

**तराई**-स्त्री. डोंगराच्या पायथ्याची जमीन. २ डोंगराची घाटी ३ नक्षत्र तारा.

**तराना**-पु. (फा.) १ तराणा. २ गाणें; गीत.

**तराप**-स्त्री. (अनु.) तोफेचा आवाज.

**तरापा**-पु. (अनु.) १ हाहाकार. २ तराफा.

**तराबोर**-वि. (फा.) खूप भिजलेला.

**तरारा**-पु. १ उसळी; उडी. २ पाण्याची धार.

**तरावट**-स्त्री. (फा.) १ ओलेपणा. २ थंडावा; गारवा. ३ थंडावा आणणारा आहारांतील पदार्थ. ४ स्निग्ध भोजन, तूप, दूध, इ.

**तराश**-स्त्री. (फा.) १ कापणी; काट. २ काट छाट. ३ ढंग; शैली. ४ काटलेले पत्ते.

**तराशना**-क्रि.स. (फा.) काटणें; छाटणें.

**तरास**-पु. त्रास पहा.

**तराहीं**-क्रिवि. तळाशीं; खालीं.

**तारिंदा**-पु. समुदांत नांगरून ठेवलेलें पीप वा लांकडी ओंडके.

**तरि**-स्त्री. (सं.) १ नौका. २ पदर.

**तरिक**-पु. (सं.) १ पाण्यांत तरंगणारा ओंडका. २ नौकाकर घेणारा. ३ नाविक.

**तरिका**-स्त्री. (सं.) नौका.

**तरिका**-पु. कर्णभूषण.

**तरिता**-स्त्री. (सं.) १ तर्जनी. २ भांग; गांजा. ३ वीज.

**तरिया**-पु. (सं.) तरंगणारा.

**तरियाना**-क्रि.स. (सं.) १ खालीं टाकणें; खालीं बसविणें तळाशीं बसविणें. २ झांकणें; लपविणें. ३ भांड्याच्या तळाशी माती सारविणें.

**तरियाना**-क्रि. अ. तळाशीं बसणें; तळाशीं जमणें.

**तरिबन**-पु. (सं.) कर्णफूल.

**तरिहँत**-क्रिवि. तळाशीं.

**तरी**-स्त्री. (सं.) १ नाव; नौका. २ गदा. ३ कपडयांची पेटी. ४ धूर. ५ पदर. ६ कर्णफूल.

**तरी**-स्त्री. (फा.) १ आर्द्रता. २ थंडी. ३ सखल जमीन (येथें पाणी साठून राहते). ४ डोंगराच्या पायथ्याची जमीन.

**तरी**-स्त्री. (सं.) १ जोडयाचा तळवा. २ तळाशीं जमलेला गाळ.

**तरीका**-पु. (अ.) १ ढब; रीति; ढंग. २ चाल; व्यवहार. ३ युक्ति; उपाय.

**तरीष**-पु. (सं.) १ वाळलेलें शेण. २ नौका. ३ तराफा. ४ समुद्र. ५ व्यवसाय. ६ स्वर्ग.

**तरीषी**-स्त्री. (सं.) इंद्राची कन्या.

**तरेंदा**-पु. (सं.) पाण्यांत तरंगणारा ओंडा.

**तरे**-क्रिवि. (सं.) तळाशीं.

**तरेटी**-स्त्री. (सं.) डोंगर पायथ्याची जमीन.

**तरेरना**-क्रि. स. (सं.) डोळे वटारणें.

**तरैला**-पु. स्त्रीच्या दुसऱ्या पतीचा पुत्र.

**तरौंटा**-पु. (सं.) जात्याची तळची पाळी.

**तरौंस**-पु. (सं.) तट; तीर; किनारा.

**तरौना**-पु. (सं.) कर्णफूल.

**तर्क**-पु. (सं.) १ तर्क. २ चतुर बोलणें. ३ व्यंगोक्ति.

**तर्क**-पु. (अ.) त्याग.

**तर्कक**-पु. (सं.) १ तर्क करणारा. २ याचक.

**तर्कण**-पु. (सं.) तर्क करणें; विचार, करणें.

**तर्कणा-तर्कना**-स्त्री. (सं.) विचार तर्क.

**तर्कणा-तर्कना**-क्रि.अ. (सं.) विचार करणें.

**तर्कवितर्क**-पु. (सं.) १ विचार; तर्कवितर्क. २ वादविवाद; ऊहापोह.

**तर्कश**-पु. (फा.) बाणांचा भाता.

**तर्कसी**-स्त्री. (फा.) बाणांचा लहान भाता.

**तर्काभास**-पु. (सं.) कुतर्क.

**तर्कारी**-स्त्री. भाजी.

**तर्की**-पु. (सं.) तर्क करणारा;

**तर्कीब**-स्त्री. तरकीब पहा.

**तर्कु**-पु. **तर्कुटी**-स्त्री. तकला पहा.

**तर्कुल**-पु. (सं.) ताडाचें झाड व फळ.

**तर्क्य**-वि. (सं.) विचारार्ह; चिंत्य.

**तर्ज़**-पु.स्त्री. (अ.) १ प्रकार; तऱ्हा. २ रीति; शैली. २ बनावट; रचना.

**तर्जन**-पु. (सं.) १ धमकावणी. २ क्रोध. ३ तिरस्कार

**तर्जना**-क्रि.स. (सं.) धमकावणें.

**तर्जुमा**-पु. (अ.) भाषांतर.

**तर्ण**-पु. (सं.) गाईचें वासरूं.

**तर्त्तरीक**-पु. (सं.) १ नाव; नौका.

**तर्त्तरीक**-वि. तरून जाणारा.

**तर्पण**-पु. १ (सं.) तृप्त करणें. २ तर्पण.

**तर्पित**-वि. (सं.) तृप्त केलेला.

**तर्रा**-पु. (दे.) चाबकाची दोरी.

**तर्राना**-पु. (फा.) तराणा.

**तर्राना**-क्रि. अ. चर्राना पहा.

**तर्री**-स्त्री. (दे.) एक प्रकारचें चाऱ्याचें गवत.

**तर्ष**-पु. (सं.) १ तृष्णा; अभिलाषा. २ तराफा. ३ समुद्र. ४ सूर्य.

**तर्षण**-पु. (सं.) १ तृष्णा; तहान. २ अभिलाषा.

**तर्षित**-वि. (सं.) १ तहानेला. २ इच्छुक.

**तल**-पु. (सं.) १ तळ; बूड. २ पाण्याचा तळ. ३ पायाचा तळवा. ४ हाताचा तळवा. ५ थप्पड. ६ पृष्ठ-भाग. ७ वन. ८ खड्डा. ९ छत. १० ताड. ११ दस्ता; मूठ. १२ वीत. १३ आधार; सहारा. १४ मनगट. १५ महादेव. १६ एक नरक. १७ पाताळ.

**तलक**-पु. (सं.) १ तलाव. २ एक प्रकारचें फळ.

**तलक**-अव्य. पर्यंत.

**तलघरा**-पु. (सं.) तळघर.

**तलछट**-स्त्री. (सं.) तळाचा गाळ.

**तलना**-क्रि.स. (सं.) तळणें.

**तलपट**-वि. (दे.) तळपट; नाश.

**तलफ़**-वि. (अ.) नष्ट; उध्वस्त.

**तलफना**-क्रि.अ. (अनु.) १ कष्ट वा दुःखानें अंग टाकणें. २ बेचैन होणें; व्याकूळ होणें.

**तलफ़ी**-स्त्री. (फा.) १ नाश; खराबी. २ हानि.

**तलब**-स्त्री. (अ.) १ शोध; तपास. २ इच्छा; अभिलाषा. ३ आवश्यकता. ४ बोलावणें. ५ वेतन.

**तलबगार**-वि. (फा.) चाहता; मागणारा.

**तलबी**-स्त्री. (अ.) १ बोलावणें. २ मागणी.

**तलबेली**-स्त्री. (अ.) उत्कंठा.

**तलमल**-पु. (सं.) तलछट पहा.

**तलमलाना**-क्रि.अ. (दे.) तळमळणें.

**तलमलाहट**-स्त्री. (दे.) तळमळ.

**तलव**-पु. (सं.) गाणारा.

**तलवा**-पु. (सं.) तळवा.

**तलहटी**-स्त्री. (सं.) डोंगर पायथ्याची भूमि.

**तलहा**-वि. (सं.) तलावासंबंधी; तळ्यांत होणारा.

**तलाई**-स्त्री. (सं.) लहान तळें.

**तलाउ**-पु. (सं.) तलाव.

**तलाक़**-पु. (अ.) काडीमोड.

**तलाची**-स्त्री. (सं.) चटई.

**तलाबेली**-स्त्री. तलबेली पहा.

**तलाश**-स्त्री. (फा.) १ शोध. २ २ आवश्यकता.

**तलाशना**-क्रि. स. शोधणें.
**तलाशी**-स्त्री. (फा.) शोध.
**तलित**-वि. (सं.) तळलेला.
**तलिन**-वि. (सं.) १ दुर्बळ; क्षीण. २ विरळ. ३ कमी; थोडा. ४ साफ; स्वच्छ.
**तलिन**-स्त्री. (सं.) शय्या; पलंग.
**तलिम**-पु. (सं.) १ छत. २ शय्या. ३ खड्ग. ४ चांदवा.
**तलिया**-स्त्री. (सं.) समुद्राचा तळ.
**तली**-स्त्री. (सं.) १ तळभाग. २ तळाचा मळ. ३ पायाची खोट. ४ विवाहप्रसंगीं वधुवरांच्या आसनाखालीं ठेवलेला पैसा, रुपया आदि.
**तलुआ**-पु. (सं.) १ तळवा. २ ताळू.
**तले**-क्रिवि. (सं.) तळाशीं.
**तलेटी**-स्त्री. (सं.) १ तळ भाग. २ डोंगरपायथ्याची जमीन.
**तलैया**-स्त्री. (सं.) लहान तळें.
**तलोदरी**-स्त्री. (सं.) भार्या; पत्नी.
**तलोदा**-स्त्री. (सं.) नदी.
**तलौंछ**-स्त्री. (सं.) तळाचा गाळ.
**तल्क**-पु. (सं.) वन.
**तल्ख**-वि. (फा.) १ कडु. २ खवट.
**तल्खी**-स्त्री. (फा.) कडुपणा.
**तल्प**-पु. (सं.) १ शय्या; पलंग. २ गच्ची; सज्जा.
**तल्पकीट**-पु. (सं.) ढेकुण.
**तल्लु**-पु. (सं.) १ बीळ. २ तळें.
**तल्लह**-पु. (सं.) कुत्रा.
**तल्ला**-पु. (सं.) १ तळची घडी. २ अस्तर. ३ सामीप्य.
**तल्लिका**-स्त्री. (सं.) किल्ली.
**तल्ली**-स्त्री. (सं.) १ जोड्याचें तळ. २ तळचा गाळ. ३ तरुणी. ४ नाव; नौका.
**तवज्जह**-स्त्री. (फा.) १ ध्यान; लक्ष. २ कृपा दृष्टि.
**तवना**-क्रि.अ. (सं.) १ तापणें; गरम होणें. २ दुःखानें पीडित होणें. ३ तेज, कीर्ती पसरविणें. ४ क्रोधानें जळणें.
**तवनी**-स्त्री. (सं.) लहान तवा.
**तवाज़ा**-पु. (अ.) १ आदर; मान. २ पाहुणचार.
**तवाना**-वि. (फा.) बळकट; बलिष्ट.
**तवाना**-क्रि.स. (सं.) १ तापविणें. २ झांकण ठेवून भांड्याचें तोंड बंद करणें.
**तवायफ़**-स्त्री. (अ.) वेश्या.
**तवारा**-पु. (सं.) ज्वलन; दाह; ताप.
**तवारीख़**-स्त्री. (अ.) इतिहास.
**तवालत**-स्त्री. (अ.) १ लांबी. २ २ आधिक्य. ३ बखेडा.

**तविष**-पु. (सं.) १ स्वर्ग. २ समुद्र. ३ व्यवसाय. ४ शक्ति.

**तविष**-वि. (सं.) १ वृद्ध. २ महत्. ३ बलवान.

**तशख़ीश**-स्त्री. (अ.) १ निश्चय. २ रोगनिदान.

**तशरीफ़**-स्त्री. (अ.) मोठेपणा; श्रेष्ठता.

**तशरीफ़ रखना**--विराजमान होणें; बसणें.

**तशरीफ़ लाना**-येणें; पदार्पण करणें.

**तशरीफ़ लेजाना**-प्रस्थान करणें; जाणें.

**तश्त**-पु. (फा.) १ तस्त. २ परात.

**तश्तरी**-स्त्री. (फा.) १ तबक. २ बशी. ३ झांकणी.

**तष्ट**-वि. (सं.) १ तासलेला. २ कुट-लेला; दळलेला.

**तष्टा**-पु. (सं.) १ तासणारा. २ घडणकाम करणारा. ३ विश्वकर्मा.

**तष्टा**-पु. (फा.) ताम्हन.

**तस**-वि. (सं.) तसा.

**तस**-क्रिवि. (सं.) त्या प्रकारचा; तसा.

**तस्कीन**-स्त्री. (अ.) उत्तेजन.

**तस्दीक़**-स्त्री. (अ.) १ सच्चेपणा. २ सच्चेपणाचें समर्थन. ३ साक्ष.

**तसबीह**-स्त्री. (अ.) तसदी; तक-लीफ.

**तसद्दुक़**-पु. (अ.) बलिदान; सम-र्पण.

**तसनीफ़**-स्त्री. (फा.) ग्रंथरचना.

**तसबीह**-स्त्री. (फा.) जपमाळ.

**तसमा**-पु. (फा.) चामड्याचा पट्टा.

**तसला**-पु. (फा.) तसराळें.

**तसली**-स्त्री. (फा.) लहान तसराळें.

**तसलीम**-स्त्री. (फा.) १ सलाम; प्रणाम. २ कबूली; स्वीकृती.

**तसल्ली**-स्त्री. (अ.) धीर सांत्वन.

**तसवीर**-स्त्री. (अ.) चित्र; तसबीर.

**तसवीर**-वि. (अ.) चित्रासारखा सुंदर.

**तहँ**-क्रिवि. तहाँ पहा.

**तह**-स्त्री. (अ.) १ तळ. २ पापुद्रा. ३ घडी.

**तहक़ीक**-स्त्री. (अ.) १ सत्य. २ सत्यशोधन; तपास. ३ जिज्ञासा.

**तहक़ीक़ात**-स्त्री. (अ.) शोध; तपास.

**तहख़ाना**-पु. (फा.) तळघर.

**तहज़ीब**-स्त्री. (अ.) सभ्यता; सभ्य आचरण.

**तहदरज़**-वि. (फा.) घडी न मोडलेला कपडा.

**तहमत**-पु. (फा.) लुंगी.

**तहरी**-स्त्री. (दे.) १ मटार भात. २ खिचडी. ३ पेठ्याची वडी.

**तहरीर**-स्त्री. (अ.) १ लेख; लिखाण. २ लेखन शैली. ३ लेखी प्रमाण पत्र. ४ लेखन शुल्क.

**तहरीरी**-वि. (अ.) लिखित.

**तहलका**-अ. (अ.) १ मृत्यु. २ नाश. ३ खळबळ; धूमधाम.

**तहवील**-स्त्री. (अ.) १ सोपविणें. २ अनामत; ठेव. ३ खात्यावरील जमेची रक्कम.

**तहवीलदार**-पु. (अ.) खजीनदार.

**तहसनहस**-वि. (दे.) ध्वस्त; नष्ट.

**तहसील**-स्त्री. (अ.) १ वसुली. २ वसूल. ३ वसूलीची कचेरी.

**तहसीलना**-क्रि.स. (अ.) वसूल करणें.

**तहाँ**-क्रिवि. (सं.) तेथें.

**तहाना**-क्रि.स. (सं.) घडी करणें; गुंडाळणें.

**तहियाँ**-क्रिवि. (सं.) तेव्हां.

**तहियाना**-क्रिवि. तहाना पहा.

**तहीं**-क्रिवि. (सं.) तेथें.

**तहोबाला**-वि. (फा.) उलथापालथ.

**ताँई**-क्रिवि. ताईं पहा.

**ताँगा**--पु. टाँगा पहा.

**तांत**-वि. (सं.) १ श्रांत; थकलेला. २ त नें अंत होणारा.

**ताँत**-स्त्री. (सं.)१ तांत. २ धनुष्याची दोरी. ३ तंतू. ४ वाद्याची तार.

**ताँतड़ी**-स्त्री. (सं.) तांत पहा.

**तांतव**-वि. (सं.) तंतुमय.

**ताँता**-पु. (सं.) पंक्ति; श्रेणी.

**ताँति**-स्त्री. ताँत पहा.

**ताँतिया**-वि. (सं.) कृश.

**ताँती**-स्त्री. (सं.) १ ओळ; श्रेणी. २ संतति.

**ताँती**-पु. (सं.) कोष्टी.

**ताँबा**-पु. (सं.) तांबें.

**तांबूली**-पु.(सं.) पानपट्टी विकणारा.

**ताँवर**-स्त्री. **ताँवरी**-स्त्री. **ताँवरो**-पु. (सं.) १ ताप; ज्वर. २ हिवताप. ३ मूर्च्छा.

**ताँसना**-क्रि.सं. (सं.) डोळे वटारणें; धमकावणें.

**ताईं**-अव्य. (सं.)१ पर्यंत. २ समीपः जवळ. ३ समक्ष. ४ निमित्त; संबंधांत; करितां.

**ताई**-स्त्री. (सं.) १ ज्वर; ताप. २ हिवताप. ३ उथळ कढई. ४ मोठी चुलती.

**ताईत**-पु. (फा.) ताईत.

**ताईद**-स्त्री. (अ.) १ पक्षपात. २ पुष्टि; समर्थन.

**ताईद**-पु. (अ.) सहायक; दुय्यम; नायब.

**ताउ**-पु. ताव पहा.

**ताऊ**-पु. (सं.) बापाचा मोठा भाऊ.

**ताऊन**-पु. (अ.) प्लेग.

**ताऊस**-पु. (अ.) १ मोर. २ तंतुवाद्य; ताऊस.

**ताऊसी**-वि. (अ.) १ मोरासारखा. २ उदी.

**ताक**-स्त्री. (सं.) १ अवलोकन; दृष्टिक्षेप. २ टक; स्थिर दृष्टि. ३ प्रतीक्षा. ४ शोध; तपास.

**ताक़**-पु. (अ.) कोनाडा.

**ताक़**-वि. (अ.) १ विषम. २ अद्वितीय; अनुपम.

**ताकझाँक**-स्त्री. १ राहून राहून निरखून पाहणें. २ आडून पाहणें. ३ देखरेख; निरीक्षण. ४ शोध.

**ताक़त** स्त्री. (अ.) ताकत.

**ताकना**-क्रि.स. (सं.) १ टक लावून पाहणें; पाहणें. २ अजमावणें; ताडणें. ३ हेरून ठेवणें. ४ दृष्टि ठेवणें; लक्ष ठेवणें.

**ताकरी**-स्त्री. (सं.) एक नागरी लिपीशीं जुळणारी लिपी.

**ताकि**-अव्य. (फा.) या करितां कीं; ज्या योगें.

**ताकीद**-स्त्री. (अ.) ताकीद.

**ताख**-पु. ताक़ पहा.

**ताखडा**-वि. तगड़ा पहा.

**ताखड़ी**-स्त्री. (सं.) तागडी.

**ताग**-पु. तागा पहा.

**तागड़ी**-स्त्री. (सं.) १ चांदीची घागऱ्यांची कमरेची सांखळी. २ करगोटा.

**तागना**-क्रि.स. (सं.) टाके घालणें.

**तागा**-पु. (सं.) धागा; दोरा.

**ताज**-पु. (अ.) १ राजमुगुट. २ तुरा. ३ घुमट. ४ ताजमहाल.

**ताजगी**-स्त्री. (फा.) ताजेपणा; टवटवी.

**ताजन-ताजना**-पु. (फा.) चाबूक.

**ताज़ा**-वि. (फा.) ताजा.

**ताज़िया**-पु. (अ.) ताबूत.

**ताज़ी**-वि. (अ.) अरबी; अरबसंबंधी.

**ताज़ीम**-स्त्री. (अ.) उभे राहून नमस्कार वगैरे करणें; सन्मान प्रदर्शन.

**ताड़काफल**-पु. (सं.) मोठी वेलची.

**ताड़ना**-स्त्री. (सं.) १ प्रहार; मार. २ शासन; दंड.

**ताड़ना**-क्रि.स. (सं.) मारणें.

**ताड़ना**-क्रि.स. (सं.) ताडणें; समजणें.

**तात**-पु. (सं.) तात; पिता. २ पूज्य व्यक्ति.

**तात**-वि. (सं.) तापलेला; गरम.

**तातगु**-पु. (सं.) काका.

**तातल**-पु. (सं.) १ पितृतुल्य संबंधी. २ रोग. ३ पक्वता.

**तातल**-वि. (सं.) गरम; तप्त.

**ताता**-वि. (सं.) गरम; तप्त.

**ताताथेई**-स्त्री. (अनु.) थयथय.

**ताति**-पु. (सं.) पुत्र.

**तातिल**-स्त्री. (अ.) सुट्टीचा दिवस; सुट्टी.

**तादाद**-स्त्री. (अ.) १ संख्या. २ गणती; सुमार.

**तान**-स्त्री. (सं.) १ ताण. २ तान.

**तानना**-क्रि.स. (सं.) ताणणें.

**तानपूरा**-पु. (सं.) तंबोरा.

**ताना**-पु. (अ.) टोमणा.

**ताना**-पु. (सं.) १ विणीचा उभा धागा; ताणा २ गालिचाचा व सतरंजीचा माग.

**ताना-वाना**-पु. (सं.) विणीचे आडवे व उभे धागे.

**तानी**-स्त्री. (सं.) विणींतील उभे धागे.

**तानूर**-पु. १ पाण्यांतील भोंवरा. २ वाऱ्याचा भोंवरा.

**तापना**-क्रि.अ. (सं.) तापणें.

**तापना**-क्रि.स. (सं.) तापविणें.

**ताफ्ता**-पु. (फा.) एक प्रकारचा चकचकीत कपडा.

**ताब**-स्त्री. (फा.) १ उष्णता; ताप. २ चमक; दीप्ति. ३ शक्ति; सामर्थ्य. ४ सहनशक्ति.

**ताबड़तोड़**-क्रिवि. (अनु.) एका पाठोपाठ दुसरा.

**ताबूत**-पु. (अ.) मृताची पेटी.

**ताबे**-वि. (अ.) ताब्यांत; अधीन.

**ताबेदार**-वि. (फा.) ताबेदार.

**ताबेदार**-स्त्री. (फा.) नोकर.

**ताबेदारी**-पु. (अ.+फा.) नोकरी.

**ताम**-पु. (सं.) १ अस्वस्थता. २ क्लेश; दुःख. ३ दोष; विकार ४ ग्लानि.

**ताम**-वि. (सं.) १ भीषण; भयानक; २ दुःखी; व्याकुल.

**ताम**-पु. (सं.) १ क्रोध. २ अंधार.

**तामजान**-पु. एक प्रकारची पालखी.

**तामड़ा**-वि. (सं.) १ तांबडा. २ २ भुरकट तांबडा.

**तामडा**-पु. (सं.) १ एक प्रकारचा दगड. २ एक तऱ्हेचा कागद. ३ टक्कल पडलेला मनुष्य. ४ स्वच्छ आकाश.

**तामस**-पु. (सं.) १ सर्प. २ दुष्ट; खल. ३ घुबड. ४ राग; क्रोध. ५ अंधेर. ६ अज्ञान.

**तामसी**-वि. (सं.) तामसी.

**तामसी**-स्त्री. (सं.) १ अंधेरी रात्र. २ महाकाली. ३ जटा.

**तामील**-स्त्री. (अ.) अम्मल बजावणी.

**ताय**-पु. (सं.) १ ताप; उष्णता. २ ज्वलन. ३ ऊन्ह.

**तायना**-क्रि.स. (सं.) तापविणें.

**तायफ़ा**-पु. (फा.) १ वेश्यांचा ताफा. २ वेश्या.

**ताया**-पु. (सं.) वडिलांचा मोठा भाऊ.

**तार**-पु. (सं.) १ चांदी. २ तार. ३ सुव्यवस्था. ४ बरोबर मापाचा. ५ युक्ति. ६ तारा. ७ डोळयांतील बाहुली. ८ झांज. ९ चिपळया. १० एक कर्णभूषण.

**तारकश**-पु. (सं.+फा.) तार खेंचणारा.

**तारघाट**-पु. (सं.) मतलब साधण्याची योजना.

**तारतार**-वि. (सं.) फाटलेला चिंध्या चिंध्या झालेला.

**तारपीन**-पु. (इं.) टरपेंटाईन.

**तारबर्की**-स्त्री. (सं.+फा.) टेलीग्राफी.

**ताराज**-पु. (फा.) १ लूटमार. २ नाश; विध्वंस.

**तारी**-स्त्री. (सं.) १ टाळी. २ किल्ली.

**तारीक**-वि. (फा.) १ काळा. २ धूसर.

**तारीकी**-स्त्री. (फा.) १ शाई. २ अंधार.

**तारीफ़**-स्त्री. (अ.) १ वर्णन; विवरण; २ प्रशंसा; तारीफ. ३ गुणविशेष.

**तारू**-स्त्री. (सं.) टाळू.

**तार्किक**-पु. (सं.) तत्ववेत्ता.

**ताल**-पु. (सं.) १ हाताचा तळवा. २ टाळी. ३ ताल. ४ झांज. ५ चष्म्याचें भिंग. ७ तरवारीची मूठ. ८ वीत. ९ ताड (झाड व फळ).

**तालमेल**-पु. (सं.) १ ताळमेळ. २ अनुकूल योग.

**तालरस**-पु. (सं.) ताडी.

**तालसाँस**-पु. ताडगोळा.

**ताला**-पु. (सं.) टाळें; कुलूप.

**तालाकुंजी**-स्त्री. (सं.) कडी कुलूप.

**तालाब**-पु. (सं.+फा.) तलाव.

**तालिका**-स्त्री. (सं.) १ किल्ली. २ सूची; यादी; अनुक्रमणिका. ३ कागद पत्रांचा गठ्ठा. ४ चापट; थप्पड. ५ मंजिष्ठ (वनस्पती).

**तालिब**-पु. (अ.) शोधक. २ इच्छुक.

**तालिबइल्म**-पु. (अ.) विद्यार्थी.

**तालिम**-स्त्री. (सं.) शय्या; बिछाना.

**ताली**-स्त्री. (सं.) १ किल्ली; चावी. २ ताड़ी (पेय). ३ भुईआंवळा. ४ तूर. ५ टाळी. ६ तळें.

**तालीका**-स्त्री. (अ.) १ जप्ती. २ जप्तीच्या मालाची यादी.

**तालीम**-स्त्री. (अ.) १ शिक्षण. २ अभ्यास.

**तालु-तालू**-पु. (सं.) १ टाळू; ताळू. २ मेंदू.

**तालेवर**-वि. (अ.+फा.) धनाढ्य.

**ताल्लुक**-पु. (अ.) संबंध.

**ताव**-पु. (सं.) १ आंच; उष्णता. २ आवेश. ३ राग; संताप.

**ताव**-पु. (अ.) कागदाचा ताव.

**तावर**-पु.स्त्री. (सं.) १ दाह; ताप. २ ऊन्ह. ३ मूर्च्छा.

**तावरी**-स्त्री. ताप; ज्वर.

**तावल**-स्त्री. उतावळी; घाई.

**तावा**-पु. तवा.

**तावान**-पु. (फा.) नुकसान भरपाई; दंड.

**तावीज़**-पु. (अ.) ताईत.

**ताश**-पु. (अ.) १ पत्ते. २ एक प्रकारचें कापड. ३ शिवण्याच्या दोऱ्याचें पाकीट.

**ताशा**-पु. (अ.) ताशा.

**तासला**-पु. (दे.) अस्वलाच्या गळ्यांतील दोरी.

**तासा**-पु. (अ.) ताशा.

**तासीर**-पु. (अ.) प्रभाव; गुण.

**तासु**-सर्व. (सं.) त्याचा.

**तासूँ-तासों**-सर्व. त्याच्याशीं.

**ताहम**-अव्य. (फा.) तरी; तरी देखील.

**ताहि**-सर्व. (सं.) त्याला.

**ताहीं**-अव्य. (सं.) १ पर्यंत; पावेतों. २ समीप.

**तिकडी**-स्त्री. (सं.) १ तीन कड्या असलेली. २ तीन पेडी.

**तिकानी**-स्त्री. (सं.) चाकाची तिकोनी खीळ.

**तिकुरा**-पु. (सं.) पिकाचा तिसरा हिस्सा.

**तिकोन-तिकोना**-पु. १ त्रिकोण. २ सामोसा.

**तिकोन-तिकोना-तिकोनिया**–वि. त्रिकोणी.

**तिक्का**–पु. ( फा. ) मांसाचा तुकडा.

**तिक्की**–स्त्री. (सं.) तिर्री.

**तिक्ख**–वि.(सं.) १तीक्ष्ण. २चलाख; हुशार.

**तिक्त**–वि. (सं.) कडु.

**तिक्ष**–वि.( सं.) तीक्ष्ण.

**तिखाई**–स्त्री. १ तीक्ष्णता. २ तिखटपणा.

**तिखारना**–क्रि.अ. ( सं. ) त्रिवार विचारणें; बोलणें.

**तिखूँटा**–वि. (सं.) त्रिकोणी.

**तिगना**–क्रि.स.( दे. ) पाहाणें; न्याहाळणें; निरखणें.

**तिगुना**–वि. ( सं. ) तिप्पट.

**तिगूचना**–क्रि.स. तिगना पहा.

**तिग्म**–वि. (सं.) तीक्ष्ण.

**तिघरा**–पु. ( सं. ) दुधाचें मडकें.

**तिच्छ-तिच्छन**–वि. (सं. ) तीक्ष्ण.

**तिजरा**–पु. ( सं. ) तीन दिवसांनी येणारा ताप.

**तिजबाँसा**–पु. ( सं. ) गर्भारपणीं तिसऱ्या महिन्यांत करण्यांत येणारा समारंभ

**तिजहरिया**–स्त्री. (सं.) तीन प्रहर.

**तिजार**–पु. तिजरा पहा.

**तिजारत**–स्त्री. ( अ. ) व्यापार.

**तिजारी**–पु. तिजरा पहा.

**तिजिया**–पु. (सं.) तिसरें लग्न झालेला.

**तिर्डी**–स्त्री. ( सं. ) तिर्री.

**तिर्डीबिर्डी**–वि. (दे.) इतस्ततः पसरलेला.

**तित**–क्रिवि. (सं.) तेथें; तिकडे.

**तितना**–क्रिवि. ( सं. ) तितका.

**तितरबितर**–वि. ( दे. ) इतस्ततः पसरलेला; अस्ताव्यस्त.

**तितली**–स्त्री. (सं.) १ फुलपांखरूं. २ एक प्रकारचें गवत.

**तितलौआ**–पु. (सं.) **तितलौकी**–स्त्री. कडू भोपळा.

**तितिंबा**–पु. (अ.) १ थोतांड. २ शेष; अवशिष्ट भाग. ३ परिशिष्ट.

**तितिक्ष**–वि. (सं. ) क्षमाशील.

**तितिक्षा**–स्त्री. ( सं. ) १ सहिष्णुता. २ क्षांति.

**तितिम्मा**–पु. ( अ. ) तितिंबा पहा.

**तितै**–वि. (सं.) तितकें.

**तितेक**–वि. (सं.) तितका.

**तितै**–क्रिवि. (सं.) तेथेंच; त्याच ठिकाणीं.

**तितो**–वि. तितेक पहा.

**तिथि**–स्त्री. (सं.) १ तिथि. २ पंधरा.

**तिधर**-क्रिवि. ( सं. ) तेथें.

**तिन**-वि. (सं.) १ त्यानें. २ तो. ३ ते (सामान्य रूप.)

**तिन**-पु. ( सं. ) गवत काडी; घास.

**तिनकना**-क्रि.अ. ( अनु. ) चिडणें.

**तिनका**-पु. ( सं. ) वाळलेल्या गवताच्या काडीचा तुकडा.

**तिनगना**-क्रि.अ. चिडणें.

**तिनगरी**-स्त्री. ( दे. ) एक पक्वान्न.

**तिपहल-तिपहला**-वि.(सं.) तीन पदरी.

**तिनुका-तिनूका**-पु. तिनका पहा.

**तिन्ह**-सर्व. (सं.) ते.

**तिन्हें**-सर्व.(सं.) त्यांना.

**तिपल्ला**-वि. (सं.) तीन पदरी;तिहेरी.

**तिपाई**-स्त्री. ( सं. ) १ तिवई. २ तीन पायांची घडवंची.

**तिपाड**-पु. ( सं. ) त्रिकोणी.

**तिवाइ**-स्त्री.( दे. ) कणीक मळण्याची परात.

**तिबारा**-वि. ( सं. ) तिसऱ्यांदा.

**तिबारा**-पु. ( सं. ) तीन दारांची खोली वा घर.

**तिबासी**-वि. ( सं. ) तीन दिवसांचें शिळें.

**तिमंजिला**-वि. ( सं.+अ. ) तीन मजली.

**तिमाना**-क्रि.स. ( द. ) भिजविणें.

**तिमि**-पु. (सं.) १ व्हेल मासा. २ समुद्र. ३ रातांधत्व.

**तिमि**-अव्य. ( सं. ) तसें.

**तिमित**-वि. ( सं. ) १ निश्चल;स्थिर. २ आर्द्र; भिजलेला.

**तिमुदानी**-स्त्री. ( सं.+फा. ) १ तीन नद्यांचा संगम. २ जेथें तीन रस्ते फुटतात ती जागा.

**तिय**-स्त्री. ( सं. ) १ स्त्री; बाई. २ पत्नी.

**तिया**-पु. तिर्री.

**तिया**-स्त्री. तिय पहा.

**तिरकना**-क्रि.अ. (अनु.) तडकणें.

**तिरकस**-वि. ( सं. ) तिरका.

**तिरकाना**-क्रि.स. सैल सोडणें; ढिला करणें.

**तिरखा**-स्त्री. ( सं. ) तृष्णा.

**तिरखूँटा**-वि. (सं.) त्रिकोणी.

**तिरछई**-स्त्री. ( सं. ) तिरकेपणा.

**तिरछा**-वि. **तिरछौहा**-वि. ( सं. ) तिरपा.

**तिरतिराना**-क्रि.अ. (अनु.) थेंब थेंब ठिबकणें.

**तिरना**-क्रि.अ. ( सं. ) १ पोहणें. २ तरून जाणें. ३ तरंगणें.

**तिरनी**-स्त्री. नाडी ( कमरेला बांधण्याची. )

**तिरपट**-वि. (सं.) १ तिरपा; वेडा-वांकडा. २ अवघड; कठीण.

**तिरपटा**-वि. (सं.) तिरळा.

**तिरपन**-वि. त्रेपन्न.

**तिरपाल**-पु. (इं.) ताडपत्री.

**तिरमिरा**-पु. (सं.) १ तिरीमिरी. २ तवंग.

**तिरमिराना**-क्रि.अ. (सं.) डोळे दिपणें.

**तिरवाह**-पु. (सं.) नदीच्या तीरा लगतचा प्रदेश.

**तिरवाह**-क्रिवि. (सं.) नदी किना-ऱ्यानें.

**तिरश्चिन**-वि. (सं.) १ तिरका. २ कुटिल.

**तिरसठ**-वि. (सं.) त्रेसष्ट.

**तिरस्कर**-वि. (सं.) झांकणारा; पडदा टाकणारा.

**तिरस्करिणी**-स्त्री. (सं.) १ पडदा. २ अदृश्य होण्याची विद्या.

**तिरस्कार**-पु. (सं.) १ तिरस्कार. २ त्याग.

**तिरानबे**-वि. (सं.) त्र्याण्णव.

**तिरास**-पु. त्रास.

**तिरासी**-वि. (सं.) त्र्यायशीं.

**तिराहा**-पु. (सं.+फा.) तिरमुहानी पहा.

**तिरिया**-स्त्री. (सं.) स्त्री.

**तिरिछा-तिरौंछा**-वि. तिरछा पहा.

**तिल**-पु. (सं.) तीळ.

**तिलकना**-क्रि.अ. (सं.) भेगा पडणें; तडकणें.

**तिलकुट**-पु. (सं.) तिळाची वडी.

**तिलचटा**-पु. झुरळ.

**तिलचावली**-स्त्री. (सं.) तीळ घालून केलेली खिचडी.

**तिलचावली**-वि. (स्त्री.) भुरकट रंगाची दाढी.

**तिलछना**-क्रि.अ. (अनु.) बेचैन होणें.

**तिलड़ा**-वि. (सं.) तीन लडांचा.

**तिलड़ी**-स्त्री. (सं.) तीन पदरी माळ.

**तिलदानी**-स्त्री. शिंप्याची सुई दोरा कात्री इ. ठेवण्याची थैली.

**तिलपपडी-तिलपापडी**-स्त्री.(सं.) तिळाची वडी.

**तिलमिल**-स्त्री. (सं.) तिरीमिरी.

**तिलवट**-पु. तिलपापडी पहा.

**तिलवा**-पु. (सं.) तिळाचा लाडू.

**तिलशकरी**-स्त्री. (सं.) तिळाची वडी.

**तिलहन**-पु. (सं.) गळिताचीं धान्यें.

**तिलांबु**-पु. (सं.) तिलांजली.

**तिलाक़**-पु. (अ.) कार्डीमोड.

**तिलादानी**-स्त्री. तिलदानी पहा.

**तिलावा**-पु. (अ.) गस्त.

**तिलावा**-पु. (दे.) तीन रहाटांची विहीर.

**तिली**-स्त्री. (सं.) १ तीळ. २ तिल्ली पहा.

**तिलोदक**-पु. (सं.) तिलांजली.

**तिलौंछना**-क्रि.अ. (सं.) तेल चोपडणें.

**तिलौंछा**-वि. (सं.) १ तेलकट. २ स्निग्ध.

**तिलौरी**-स्त्री. (सं.) तिळाची वडी.

**तिल्ला**-पु. (अ.) १ जरीचें काम. २ जरीचा पदर.

**तिल्ली**-स्त्री. (सं.) १ प्लीहा. २ तीळ.

**तिवास**-पु. (सं.) तीन दिवस.

**तिवासी**-वि. तिबासी पहा.

**तिष्टना**-क्रि. अ. थांबणें; तिष्टणें.

**तिस**-सर्व. तो चें सामान्य रूप.

**तिसपर**-त्यानंतर.

**तिसराय**-क्रिवि. तिसऱ्यांदा.

**तिसरायत**-स्त्री. (सं.) तिसरेपणा; परकेपणा.

**तिसरैत**-पु. (सं.) १ मध्यस्त; तिसरा. २ तिसऱ्या हिश्याचा धनी. ३ तिऱ्हाईत; परका.

**तिहरा**-वि. (सं.) तिहेरी.

**तिहराना**-पु. (सं.) दुधाचें वा दह्याचें मडकें.

**तिहराना**-क्रि.स. (सं.) तिसऱ्यांदा करणें.

**तिहरी**-स्त्री. (सं.) १ तीन पदरी माला. २ तिहरा पहा.

**तिहवार**-पु. (सं.) सण.

**तिहाई**-पु. (सं.) १ तिसरा हिस्सा. २ शेताचें उत्पन्न.

**तिहायत**-पु. (सं.) तिसरा; मध्यस्त; परका.

**तिहारा-तिहारो**-सर्व. तुमचा.

**तिहाव**-पु. (सं.) १ क्रोध; कोप. २ बेबनाव; बिघाड.

**तिहूँ**-वि. (सं.) तीन्हीं; तिघेही.

**तिहैया**-पु. (सं.) तृतीयांश.

**ती**-स्त्री. (सं.) ती; स्त्री; पत्नी.

**तीअत**-स्त्री. (सं.) भाजी.

**तीकरा**-पु. (सं.) अंकुर.

**तीकुर**-पु. (सं.) पिकाचा तिसरा हिस्सा.

**तीख-तीखा**-पु. (सं.) १ तीक्ष्ण. २ तेज; प्रखर. ३ तापट; उग्र. ४ तिखट. ५ उत्तम; चांगला.

**तीज**-स्त्री. (सं.) १ तृतीया. २ भाद्रपद शुद्ध तृतीया; हरितालिका.

**तीजा**-वि. ( सं. ) तिसरा.

**तीत**-वि. ( सं. ) तीता पहा.

**तीतर**-पु. (सं.) कवडा; होला.

**तीता**-वि. ( सं. ) १ तिखट. २ कडू. ३ ओला; भिजलेला.

**तीतुरी**-स्त्री. ( सं. ) फुलपांखरूं.

**तीमारदारी**-स्त्री. (फा. ) रुग्णशुश्रुषा.

**तीय-तीया**-स्त्री. ( सं. ) १ स्त्री; नारी. २ तिरीं.

**तीर**-पु. ( सं. ) १ तीर; किनारा. २ जवळ; निकट. ३ शिसें. ४ कथील.

**तीर**-पु. (फा. ) तीर; बाण.

**तीर**-पु. जहाजाची डोलकाठी.

**तीरथ**-पु. (सं.) तीर्थ.

**तीरस्थ**-पु. (सं.) मरणासन्न व्यक्ति.

**तीरु**-पु. (सं.) शिव; महादेव.

**तीर्ण**-वि. (सं.) १ पार गेलेला; उत्तीर्ण. २ भिजलेला.

**तीली**-स्त्री. (सं.) १ लोखंडी कांब. २ काटकी. ३ ब्रश ( विणकरांचा ). ४ सूत गुंडाळण्याची टकळी.

**तीवन**-पु. ( सं. ) १ पक्कान्न. २ रसदार भाजी.

**तीहा**-पु. (सं.) १ धीर; उत्तेजन. आश्वासन. २ एक तृतीयांश; तिसरा हिस्सा.

**तुंद**-वि. (सं.) पोट.

**तुंद**-वि. (फा.) प्रचंड; मोठा.

**तुंदी**-स्त्री. (सं.) बेंबी.

**तुंदैल-तुंदैला**-वि. (सं.) ढेर पोट्या.

**तुंब-तुंबा**-पु. (सं.) १ कडू भोपळा. २ भोपळ्याचा तुंबा.

**तुंबरू**-पु. (सं.) धने.

**तुअ**-सर्व. (सं.) तुमचा; तुझा.

**तुअना**-क्रि. अ. १ टपकणें. २ कलंडणें. ३ गर्भपात होणें.

**तुअर**-पु. (सं.) तूर.

**तुई**-सर्व. तूं.

**तुक**-स्त्री. ( सं. ) १ यमक. २ कडवें.

**तुकबंदी**-स्त्री. (सं.+फा.) १ यमक जुळवणी. २ वेडीवांकडी कविता.

**तुकार**-स्त्री. ( सं. ) अरेतुरे.

**तुकारना**-क्रि.स.(सं.) अरे तुरे करणें.

**तुक्कड़**-पु. (सं.) वेडीवांकडी कविता करणारा.

**तुक्कल**-स्त्री. ( फा. ) वावडी.

**तुक्का**-पु. (फा.) १ बोथट बाण. २ टेकाड. ३ सरळ उभी वस्तु.

**तुख**-पु. (सं.) १ तूस. २ अंडयाच्या वरचें कवच.

**तुखार**-पु. ( सं. ) तुषार.

**तुख्म**-पु. ( अ. ) बीज.

**तुच**-पु. **तुचा**-स्त्री. (सं.) त्वचा; कातडें.

**तुच्छ**-वि. (सं.) १ पोकळ; निःसार. २ तुच्छ; हीन. ३ खोटा. ४ थोडा; अल्प.

**तुच्छ**-पु. (सं.) कोंडा; तूस.

**तुझ**-सर्व. ( सं. ) तुला.

**तुट**-वि. (सं.) लहान तुकडा.

**तुट्टना**-क्रि.स. क्रि.अ. ( सं. ) १ तुष्ट करणें. २ तुष्ट होणें.

**तुडवाना**-क्रि.स. ( सं. ) तोडविणें.

**तुडाई**-स्त्री. (सं.) तोडणी.

**तुडाना**-क्रि.स. (सं.)तोडविणें; तोडणें.

**तुडुम**-पु. (सं.) तुतारी; बिगुल.

**तुतरा**-वि. तोतला पहा.

**तुतराना-तुतलाना**-क्रि. अ. तोतरें बोलणें; अडखळणें.

**तुतली**-स्त्री. (वि.) तोतली पहा.

**तुतुई-तुतुही**-स्त्री. लहान झारी.

**तुदन**-पु. ( सं. ) १ छळणुक. २ पीडा; व्यथा. ३ टोचणें; बोचणें.

**तुन**-पु. ( सं. ) एक प्रकारचें अतिशय रुंद व उंच झाड याचे लांकूड सुतार कामास फार उत्तम समजतात.

**तुनक**-वि. (फा.) १ दुर्बल. २ कोमल; नाजुक. ३ हलका.

**तुनकमिज़ाज**-वि. चिडका; भांडकुदळ.

**तुनकामौज**-पु. लहान समुद्र.

**तुनतुनी**-स्त्री. (अनु.) १ तुणतुणें. २ सारंगी.

**तुनी**-स्त्री. तुन पहा.

**तुनीर**-पु. (सं.) बाणांचा भाता.

**तुन्न**-पु. (सं.) १ तुन पहा. २ चिधुक.

**तुन्न**-वि. (सं.) छिन्नविछिन्न.

**तुन्नवाय**-पु. (सं.) शिंपी.

**तुपक**-स्त्री. ( तु. ) १ लहान तोफ. २ बंदुक.

**तुफंग**-स्त्री. (तु.) हवेची बंदूक.

**तुफान**-पु. ( अ. ) तुफान.

**तुभना**-क्रि.अ. स्तब्ध होणें.

**तुम**-सर्व. ( सं. ) तुम्ही.

**तुमड़ी**-स्त्री. ( सं. ) १ वाळलेला कडू भोपळा. २ भोपळ्याची पुंगी. ३ भिक्षापात्र.

**तुमतड़ाक**-स्त्री. तूमतड़ाक पहा.

**तुमरा**-सर्व. तुम्हारा पहा.

**तुमरी**-स्त्री. तुमड़ी पहा.

**तुमुरू**-पु. धने.

**तुमुल**-पु. (सं.) १ लढाईची दंगल. २ कोलाहल.

**तुम्ह**-सर्व. तुम पहा

**तुम्हारा**-सर्व. ( सं. ) तुमचा.

**तुम्हारी**-सर्व. स्त्री. ( सं. ) तुमची.

**तुम्हें**-सर्व. (सं.) तुम्हास.

**तुरंग**-वि. ( सं. ) वेगवान.

**दुति**-स्त्री. ( सं. ) १ कांति; तेज. २ शोभा; सौंदर्य. ३ किरण.

**दुतिया**-स्त्री. ( सं. ) द्वितीया.

**दुदल**-वि. ( सं. ) द्विदल.

**दुदलाना**-क्रि.स. (अनु.) दुतकारणें.

**दुदिला**-वि. ( सं.+फा. ) दुचिता पहा.

**दुदुकारना**-क्रि.स. ( अनु. ) दुतकारणें.

**दुद्धी**-स्त्री. ( सं. ) १ एक प्रकारचें गवत. २ एक प्रकारचा वृक्ष. ३ एक वनस्पति. ४ खडूची माती.

**दुधपिठवा**-पु. ( सं. ) एक पक्वान्न.

**दुधमुख-दुधमुहाँ**-वि. दूधमुहाँ पहा.

**दुधार**-वि. ( सं. ) १ दुधाळ. २ दुधारी.

**दुधारा**-वि. ( सं. ) दुधारी.

**दुधारी**-वि.स्त्री. ( सं. ) १ दुधाळ. २ दुधारी तरवार.

**दुधिया**-वि. ( सं. ) १ दुधाच्या रंगाचा. २ दूध मिसळलेला.

**दुधिया**-स्त्री. ( सं. ) १ एक प्रकारचें गवत. २ एक प्रकारची ज्वारी. ३ खडूची माती. ४ एक पक्षी. ५ एक विष.

**दुधियाकंजई**-वि. करडा; भुरकट.

**दुधैल**-वि. ( सं. ) दुधाळ.

**दुनदा**-पु. ( सं. ) दोन नद्यांच्या संगमाचें स्थान.

**दुनरना-दुनवना**-क्रि.अ. ( सं. ) मुडपणें; दुमडणें.

**दुनाली**-वि.स्त्री. (सं.) दोन नळयांची.

**दुनियाँ**-स्त्री. (अ.) १ संसार; जगत. २ जनता; लोक.

**दुनियाइ**-वि. ( अ. ) संसारविषयक.

**दुनियाई**-स्त्री. (अ.) दुनिया; जगत.

**दुनियादार**-पु. ( फा. ) गृहस्थाश्रमी; संसारी मनुष्य.

**दुनियादार**-वि. ( फा. ) व्यवहारकुशल.

**दुनियादारी**-स्त्री. ( फा. ) १ संसाराचा पसारा. २ स्वार्थसाधन. ३ लबाडीचा व्यवहार.

**दुनियासाज**-वि. (फा.) १ स्वार्थसाधु; नाना युक्त्या योजून स्वार्थ साधणारा. २ कावेबाज.

**दुनी**-स्त्री. ( फा. ) संसार; जगत.

**दुपटा दुपट्टा**-पु. **दुपट्टी**-स्त्री. (सं.) १ दोन पदरी चादर अथवा पांघरूण. २ उपरणें; ओढणी.

**दुपहर**-स्त्री. ( सं. ) दुपार; दुपारी.

**दुपहरिया-दुपहरी**-स्त्री. (सं.) १ १ दुपार. २ एक फुल झाड.

**दुबधा**-स्त्री. ( सं. ) दुबधा.
**दुबर-दुबला**-वि. ( सं. ) दुबळा.
**दुबिध-दुबिधा**-स्त्री. दुबधा पहा.
**दुभाखी**-पु. ( सं. ) दुभाष्या.
**दुमंजिला**-वि. ( फा. ) दोन मजली.
**दुम**-स्त्री. (फा.) शेपूट.
**दुमदार**-वि. (फा.) शेपटी असलेला.
**दुमाता**-वि. ( सं. ) १ दुष्ट आई. २ सावत्र आई.
**दुरंगा-दुरंगी**-वि. ( सं.+फा. ) १ दुरंगी. २ दोन तऱ्हेचा.
**दुरंत**-वि. ( सं. ) १ अपार; मोठा. २ दुर्गम; कठीण. ३ प्रचंड; भीषण. ४ अशुभ. ५ खल; दुष्ट.
**दुरदाम**-वि. ( सं. ) कष्टसाध्य.
**दुरदाल**-पु. ( सं. ) हत्ती.
**दुरदुराना**-क्रि.स. ( सं. ) झिडकारणें; दुत्कारणें.
**दुरना**-क्रि.स. ( सं. ) १ दूर होणें. २ २ लपणें.
**दुरभेव**-पु. ( सं. ) मनोमालिन्य.
**दुरमुस**-पु. ( सं. ) धुमस.
**दुराउ**-पु. दुराव पहा.
**दुरादुरी**-स्त्री. ( सं. ) लपवालपवी.
**दुराधर्ष**-वि. ( सं. ) प्रबल.
**दुराना**-क्रि.स. ( सं. ) १ हटणें; दूर होणें. २ लपणें. ३ हटविणें; दूर करणें. ४ लपविणें; गुप्त ठेवणें.

**दुराव**-पु. (सं.) १ लपवालपवी. २ कपट.
**दुराशय**-पु. (सं.) वाईट हेतु.
**दुराशय**-वि. (सं.) खोटा; वाईट हेतुवाला.
**दुराशा-दुरासा**-स्त्री. (सं.) व्यर्थ आशा.
**दुरित**-पु. ( सं.) पाप.
**दुरित**-वि. ( सं. ) पापी.
**दुरुस्त**-वि. ( फा. ) १ दुरुस्त; ठीक. २ निर्दोष. ३ उचित; वाजवी. ४ यथार्थ.
**दुरुस्ती**-स्त्री. ( फा. ) सुधारणा; दुरुस्ती.
**दुरूह**-वि. वि. ( सं. ) कठीण; गूढ.
**दुर्ग**-वि. ( सं. ) दुर्गम; कठीण.
**दुर्ग**-पु. ( सं. ) दुर्ग; किल्ला.
**दुर्गम**-वि. ( सं. ) दुर्गम; कठीण.
**दुर्गम**-पु. ( सं. ) १ दुर्ग; किल्ला. २ वन. ३ संकटाचें स्थान.
**दुर्घटना**-स्त्री. ( सं. ) १ अशुभ घटना. २ अपघात. ३ विपत्ति; संकट.
**दुर्मुख**-वि. ( सं. ) १ कटुभाषी. २ दुर्मुख.
**दुर्रा**-पु. ( फा. ) चाबूक.

**दुर्लक्ष्य**-वि. (सं.) १ अदृश्य. २ सहज दृष्टीस न दिसणारा.

**दुर्वाद्**-पु. (सं.) १ निंदा. २ उपरोधिक स्तुति.

**दुलखना**-क्रि.स. (सं.) वारंवार सांगणें.

**दुलडी**-स्त्री. दोन लडींची माला.

**दुलत्ती**-स्त्री. (सं.) जनावरानें मागील दोन पायांनी केलेला प्रहार.

**दुलना**-क्रि. सं. डुलना पहा.

**दुलराना**-क्रि. स. लाड करणें.

**दुलराना**-क्रि. अ. लाडांत येणें.

**दुलरी**-स्त्री. दुलडी पहा.

**दुलहन**-स्त्री. (सं.) नववधु.

**दुलहा**-पु. (सं.) नवरदेव

**दुलहिया-दुलही**-स्त्री. नववधु.

**दुलहेटा**-पु. (सं.) लाडका मुलगा.

**दुलाई**-स्त्री. (सं.) दुलई.

**दुलाना**-क्रि. स. डुलाना पहा.

**दुलार**-पु. (सं.) लाड; कौतुक.

**दुलारना**-क्रि.अ. (सं.) लाड करणें.

**दुलारा**-वि. (सं.) लाडका.

**दुवन**-वि. (सं.) १ खल; दुर्जन. २ वैरी; शत्रु. ३ राक्षस.

**दुवार**-पु. (सं.) द्वार.

**दुविधा**-स्त्री. दुबधा.

**दुशवार**-वि. (फा.) १ कठीण; मुश्किल. २ दुःसह.

**दुशाला**-पु. (सं.) शालजोडी.

**दुश्चेष्टा**-स्त्री. (सं.) कुचेष्टा.

**दुश्मन**-पु. (फा.) शत्रु.

**दुसराना**-क्रि. स. दोहराना पहा.

**दुसरिहा**-वि. (सं.) १ मित्रः साथी. २ प्रतिद्वंद्वी.

**दुसार**-पु. (सं.) आरपार पाडलेलें भोक.

**दुसार**-क्रिवि. (सं.) आरपार; या टोकापासून त्या टोकापर्यंत.

**दुसेजा**-पु. (सं.) मोठा पलंग.

**दुहता**-पु. (सं.) मुलीचा मुलगा.

**दुहत्था**-वि. (सं) दोन हातांनी केलेला.

**दुहना**-क्रि.स. (सं.) धार काढणें.

**दुहनी**-स्त्री. (सं.) दुधाची चरवी.

**दुहाई**-स्त्री. (सं.) १ घोषणा. २ आरोळी.

**दुहाई**-स्त्री. (सं.) १ धार काढणें. २ धार काढण्याची मजुरी.

**दुहाग**-पु. (सं.) १ दुर्भाग्य २ वैधव्य.

**दुहागिन**-स्त्री. (सं.) विधवा.

**दुहागी**-वि. (सं.) अभागी.

**दुहाना**-क्रि.स. (सं.) धार काढविणें.

**दुहावनी**-स्त्री. (सं.) धार काढण्याची मजूरी.

**दुहेला**-वि. ( सं. ) १ दुःसाध्य; कठीण. २ दुःखी.

**दूक**-वि. ( सं. ) कुछ पहा.

**दूकान**-पु. ( फा. ) दुकान.

**दूखना**-क्रि.स. ( सं. ) दूषण देणें.

**दूज**-स्त्री. ( सं. ) द्वितीया

**दूतर**-वि. ( सं. ) दुस्तर.

**दूधमुँहा-दूधमुख**-वि. ( सं. ) तान्हा.

**दूना**-वि. ( सं. ) दुप्पट.

**दूनों**-वि. दोन्हीही.

**दूब**-स्त्री. ( सं ) दूर्वा.

**दू-बदू**-क्रिवि. ( फा. ) समोरासमोर.

**दूबरा**-वि. ( सं. ) दुबळा.

**दूभर**-वि. ( सं. ) कठीण.

**दूमना**-क्रि.अ. ( सं. ) हलणें.

**दूरंदेश**-वि. ( फा. ) दूरदर्शी.

**दूर**-क्रिवि. ( सं. ) दूर.

**दूरी**-स्त्री. ( सं. ) अंतर; दूरत्व.

**दूलन**-पु. दोलन पहा.

**दूलह दूल्हा**-पु. ( सं. ) नवरदेव.

**दूषना दूसना**-क्रि.स. ( सं. ) दूषण देणें.

**दूहना**-क्रि.स. दुहना पहा.

**दृक्**-पु. ( सं. ) छिद्र; भोंक.

**दृग**-पु. ( सं. ) १ डोळा. २ दृष्टि. ३ दोन.

**दृगमिचाव**-पु. ( सं. ) आंधळी कोशिंबीर.

**देई**-स्त्री. ( सं. ) देवी.

**देखनहारा**-पु. ( सं. ) पहाणारा.

**देखना**-क्रि.अ. ( सं. ) पाहाणें.

**देखभाल**-स्त्री. ( सं. ) १ निरीक्षण. २ देखरेख.

**देखाऊ**-वि. ( सं. ) दिखाऊ.

**देखादेखी**-स्त्री. ( सं. ) दर्शन; भेट.

**देखादेखी**-क्रिवि. ( सं. ) (दुसऱ्याचें) पाहून.

**देखाना**-क्रि स. दाखविणें.

**देखाव**-स्त्री. ( सं. ) १ दृष्टीची सीमा. २ थाटमाट.

**देखावट**-स्त्री. ( सं. ) १ बनावट; रचना २ थाटमाट.

**देखावना**-क्रि.स. ( सं. ) दाखविणें.

**देग-देगचा**-पु. ( फा. ) तपेलें.

**देन**-स्त्री. ( सं. ) दान.

**देनदार**-पु ( सं.+फा. ) ऋणी.

**देना**-क्रि. स. ( सं. ) देणें.

**देना**-पु. ( सं. ) देणें; कर्ज.

**देर**-स्त्री. **देरी**-स्त्री. ( फा. ) १ उशीर; विलंब. २ वेळ; समय.

**देवगति**-स्त्री. ( सं. ) मरणोत्तर सद्गति.

**देवर**-पु. ( सं. ) १ दीर. २ धाकटा दीर.

**देवल**-पु. ( सं. ) १ पुजारी. २ धार्मिक मनुष्य.

**देववाणी**-स्त्री. (सं.) १ संस्कृत भाषा. २ आकाशवाणी.

**देवा-देवाल**-वि ( सं. ) १ देणारा. २ ऋणी.

**देवैया**-वि. (सं.) देणारा.

**देशनिकाला**-पु. (सं.) हद्दपारी.

**देहरा**-पु. (सं.) १ देवालय. २ देह.

**देहरी-देहली**-स्त्री. ( सं. ) उंबरठा

**देहात**-पु. (फा.) गांव; खेडें.

**देहाती**-वि. (फा.) १ ग्रामीण. २ खेडूत.

**दैयत**-पु. ( सं. ) १ दैत्य. २ दाई.

**दैया**-पु. ( सं. ) दैव.

**दैव**-वि. (सं.) देवतासंबंधी.

**दैव**-पु. ( सं. ) दैव.

**दैवज्ञ**-पु. (सं.) ज्योतिषी.

**दैवत**-वि. ( सं. ) देवतासंबंधी.

**दैवत**-पु. ( सं. ) दैवत.

**दैववाणी**-स्त्री. देववाणी पहा.

**दैवागत**-वि. ( सं. ) दैवी; आकस्मिक.

**दोंचना**-क्रि.स. दाबांत टाकणें.

**दो**-वि. ( सं. ) दोन.

**दोआब**-पु. ( फा. ) दोन नद्यांमधील प्रदेश.

**दोइ**-वि. (स.) दोन.

**दोउ-दोऊ**-वि. ( सं. ) दोन्हीहि.

**दोख**-पु. ( स. ) दोष.

**दोगला**-पु. ( फा. ) १ जारज. २ ज्याचे आई व बाप भिन्न जातीचे आहेत असा.

**दोगा**-पु. १ एक प्रकारचें कापड. २ पाण्यांत भिजविलेला चुना; सफेती.

**दोच-दोचन**-स्त्री. १ दुबधा. २ कष्ट; दुःख. ३ दाब; दडपण.

**दोचना**-क्रि.स. एकादें काम करण्यास जोर देणें.

**दोचित्ता**-वि. ( सं. ) उद्विग्न चित्त.

**दोज**-स्त्री. ( सं. ) द्वितीया.

**दोजख**-पु. ( फा. ) नरक

**दोज़खी**-वि. ( फा. ) १ पापी. २ नरकसंबंधी.

**दोतला-दोतल्ला**-वि. ( सं. ) दोन मजली.

**दोदना**-क्रि.स. ( सं. ) इनकार करणें.

**दोन**-पु. ( सं. ) १ दरी. २ दुआब. ३ दोन नद्यांच्या संगमाचें स्थान. ४ सांधा.

**दोनला**-वि. ( सं. ) दुनाळी.

**दोना**-पु. ( सं. ) द्रोण.

**दोनिया-दोनी**-स्त्री. लहान द्रोण.

**दोनों**-वि. ( सं. ) उभय; दोन्ही.

**दोपलिया-दोपल्ली**-वि. दुपदरी.

**दोपलिया-दोपल्ली**-स्त्री. एक प्रकारची टोपी.

**दोपहर-दोपहरिया**-स्त्री. ( सं. ) दुपार.

**दोबल**-पु. दोष; अपराध.

**दोबारा**-क्रिवि. दुबार; दुसऱ्यांदा.

**दोमुँहा**-वि. (सं.) १ दुतोंडया. २ कपटी.

**दोरसा**-वि. (सं.) दोन प्रकारचे रस व स्वादवाला.

**दोल-दोली**-पु. ( सं. ) स्त्री. १ झोपाळा. २ पालखी; डोली.

**दोलन**-पु. ( सं. ) झोंका.

**दोषन**-पु. (सं.) दूषण.

**दोस**-पु. (सं.) दोष.

**दोसदारी**-स्त्री. (फा.) मैत्री.

**दोसाला**-वि. दोन वर्षांचा; दोन वर्षां पूर्वीचा.

**दोसूती**-स्त्री. (सं.) जाड चादर.

**दोस्त**-पु. (फा.) मित्र.

**दोस्ताना**-पु. **दोस्ती**-स्त्री. (फा.) मैत्री.

**दोहता**-पु. (सं.) मुलीचा मुलगा.

**दोहत्था**-क्रिवि. (सं.) दोन हातांनीं.

**दोहत्था**-वि. दोन हातांसहित.

**दोहद**-स्त्री. (सं.) १ डोहाळे. २ गर्भारपण.

**दोहदवती**-स्त्री. (सं.) गर्भवती.

**दोहन**-पु. (सं.) १ दूध काढणें. २ दोहनी पहा.

**दोहना**-क्रि.स. (सं.) १ दोष लावणें. २ तुच्छ ठरविणें..

**दोहनी**-स्त्री. (सं.) १ दुधाचें मडकें. २ धार काढणें.

**दोहरना**-क्रि.अ. (सं.) १ दुबार होणें. २ दुहेरी होणें.

**दोहरना**-क्रि.स. (सं.) १ दुबार करणें. २ दुहेरी करणें.

**दोहरा**-वि.पु. (सं १ दुहेरी. २ दुप्पट.

**दोहराना**-क्रि.स. (सं.) १ पुनरावृत्ती करणें. २ दुहेरी करणें.

**दोहल**-पु. (सं.) इच्छा.

**दोहलवती**-स्त्री. (सं.) गर्भवती.

**दोहा**-पु. दोहा.

**दोहाई**-स्त्री. दुहाई पहा.

**दोहाक-दोहाग**-पु. (सं.) दुर्भाग्य.

**दोहाव**-पु. ( सं. ) जमीनदाराला कुळाकडून मिळणारें दूध.

**दोहित**-पु. (सं.) मुलीचा मुलगा.

**दोह्य**-पु. (सं.) दुभती जनावरें.

**दौं**-अव्य. १ अथवा; किंवा; तर. २ कोण जाणे.

**दौंगरा**-पु. उन्हाळयांत येणारी पावसाची सर.

**दौंच**-स्त्री. दोच पहा.

**दौंचना**–क्रि. स. १ कांहींहि करून हस्तगत करणें. २ एकाद्या गोष्टीकरितां हटून बसणें.

**दौंजा**–पु. (दे.) माचण.

**दौंरी**–स्त्री. १ मळणीकरितां एकत्र बांधलेले बैल; दावण. २ मळणीच्या वेळीं बैलांना बांधावयाचें दावें. ३ झुंड.

**दौ**–स्त्री. (सं.) १ वणवा. २ संताप; आग; जळफळाट.

**दौड**–स्त्री. (सं.) १ दौड; धावणें. २ वेग. ३ गति; धांव. ४ विस्तार; लांबी. ५ धाड.

**दौडधपाड-दौडधूप**–स्त्री. (सं.) १ धांवपळ. २ उद्योग; प्रयत्न; परिश्रम.

**दौडना**–क्रि.अ. (सं.) १ धांवणें; पळणें. २ प्रयत्न करणें; धांवपळ करणें. ३ फैलावणें; पसरणें.

**दौडादौडी**–क्रिवि. (सं.) अविश्रांत; न थांबता.

**दौडादौडी**–स्त्री. धांवपळ; गडबड.

**दौडान**–स्त्री. (सं.) १ दौडणें. २ वेग. ३ फेरा; पाळी; खेप. ४ क्रम.

**दौडाना**–क्रि.स. (सं.) १ धांवविणें; पळविणें. २ पाठलाग करणें. ३ ओतणें; फैलावणें. ४ फिरविणें.

**दौन**–पु. (सं.) दमन.

**दौना**–पु. (सं.) १ दवणा. २ द्रोण.

**दौना**–क्रि.अ. (सं.) दमन करणें.

**दौर**–पु. (अ.) १ चक्कर; फेरी. २ भ्रमण; संचार. ३ प्रभाव. ४ क्रम; पाळी.

**दौर**–स्त्री. दौड पहा.

**दौरा**–पु. (अ.) १ भ्रमण; चक्कर. २ फेरी; भ्रमण. ३ दौरा.

**दौरा**–पु. (सं.) हारा.

**दौरादौर**–क्रि. (वि.) १ लागोपाठ; अविश्रांत. २ जोरानें; नेटानें.

**दौरादौरी**–स्त्री. दौडादौडी पहा.

**दौरान**–पु. (फा.) १ दौरा. २ कालचक्र. ३ फेरी; खेप; पाळी. ४ क्रम.

**दौरी**–स्त्री. (सं.) टोपली.

**दौलत**–स्त्री. (सं.) धन; संपत्ति; दौलत.

**दौलतखाना**–पु. (फा.) घर.

**दौलतमंद**–वि. (फा.) धनवान

**दौहृद**–पु. (सं.) डोहाळे.

**द्युत्**–पु. (सं.) किरण.

**द्युत**–वि. (सं.) प्रकाशमान.

**द्युनिश**–क्रिवि. (सं.) अहर्निश.

**द्वैत**–पु. (सं.) १ युग्म. २ भेदभाव. ३ दुबधा; भ्रम. ४ अज्ञान.

## ध

**धंगर**–पु. ( दे. ) गवळी.
**धंगा**–पु. ( दे. ) खोकला; ढांस.
**धंधक**–पु. (सं.) संसारांतील गुंता-गुंत.
**धंधक**–पु. (अनु.) ढोल.
**धंधकधोरी**–पु. ( सं. ) अहोरात्र कामांत चूर.
**धंधका**–पु. (अनु.) ढोल.
**धंधरक**–पु. ( सं. ) धंधक पहा.
**धँधला**–पु. ( सं. ) १ ढोंग; कपट. २ बहाणा.
**धंधलाना**–क्रिस. ( सं. ) ढाग करणें.
**धंधा**–पु. ( सं. ) धंदा.
**धंधार**–वि. ( दे. ) एकटा; एकाकी.
**धंधारी**–स्त्री. १ गोरख पंथ. २ एकांत; निर्जनता. ३ सामसुम.
**धंधाला**–स्त्री. कुटीण.
**धंधोर**–पु. ( अनु. ) १ होळी. २ ज्वाला
**धँस**–पु. ( सं. ) बुडी; डुबकी.
**धँसना**–क्रि.अ. ( सं. ) १ घुसणें; रुतणें; फसणें. २ नष्ट होणें; ध्वस्त होणें.
**धँसान**–स्त्री. ( सं. ) १ घसरडें. २ उतार; ढाळ.
**धँसाना**–क्रि.स. ( सं. ) १ घुसडणें; खुपसणें; प्रवेश करविणें. ३ दबविणें.
**धँसाव**–पु. ( सं. ) १ दलदल. २ घुसणें.
**धक**–स्त्री. (अनु.) १ हृदयाची धड-धड. २ आवेग.
**धक**–क्रिवि. (अनु.) अचानक.
**धक**–स्त्री. (दे.) ऊ
**धकधकाना**–क्रि.अ. ( अनु. ) १ धडधडणें ( छाती ). २ ( अग्नि ) भडभडणें.
**धकधकाहट**–स्त्री. ( अनु. ) १ धडकी. २ आशंका; काळजी.
**धकधकी-धकपक**–स्त्री. ( अनु. ) धडधड; धुगधुगी.
**धकपत**–क्रिवि. ( अनु. ) धडधडत्या छातीनें.
**धकपेल**–स्त्री. ( अनु. ) धक्काधक्की; लट्ठालठ्ठी.
**धका**–पु. धक्का.
**धकाधकी**–स्त्री. धकपेल पहा.
**धकाना**–क्रि.स. ( सं. ) पेटविणें; जाळणें.
**धकारा**–पु. ( अ. ) आशंका; काळजी.
**धकियाना-धकेलना**–क्रि.स. ( सं. ) धक्का देणें; ढकलणें.
**धकेलू**–वि. ढकलणारा.

**धकैत**-वि. धक्का देणारा.

**धकोना**-क्रि. स. धकियाना पहा.

**धक्क**-स्त्री. धक पहा.

**धक्कमधक्का**-पु. धक्पेल पहा.

**धक्का**-पु. (सं.) १ धक्का; आघात. २ गर्दी; खेचाखेच. ३ दुःखाचा आघात. ४ आपदा. ५ तोटा; नुकसान.

**धक्कामुक्की**-स्त्री. (सं.+फा.) गुद्दा गुद्दी; ठोसाठोसी.

**धगड़-धगड़ा**-पु. (सं.) जार; धगड.

**धगड़बाज-धगड़ी**-वि.स्त्री. (सं+फा.) कुलटा.

**धगधागना**-क्रि.अ.धडधडणें(छाती)

**धगरा**-पु. धगड पहा.

**धगुला**-पु. (दे.) हातांतील कड.

**धचकचाना**-क्रि. स. भिवविणें.

**धचकना**-क्रि अ. (अनु.) रुतणें; फसणें.

**धचका**-पु. (अनु.) धक्का; आघात.

**धज**-स्त्री. (सं.) १ सजावट; आरास; शोभा. २ ठेवण; घडण. ३ ठसका; नखरा.

**धजा**-स्त्री. (सं.) १ ध्वजा; पताका. २ चिंधी. ३ ध्वजा पहा.

**धजीला**-वि. (सं.) १ सजलेला; नटलेला. २ सुंदर; रेखीव.

**धज्जी**-स्त्री. (सं.) १ चिंधी. २ कतरण; कपटा. ३ पट्टी.

**धटिका**-स्त्री. (सं.) १ पासरी. २ चिंधी. ३ लंगोटी.

**धटी**-स्त्री. (सं.) १ चिंधी. २ लंगोटी.

**धटी**-वि. (सं.) तराजू धरणारा.

**धडंग**-वि. (सं.) नागडा; उघडा.

**धड़**-पु. (सं.) १ धड; २ खोड.

**धडक--धड़कन**-स्त्री. (अनु.) धडकी; धडधड; धाकधुक.

**धड़कना**-क्रि.अ. १ धडकी भरणें. २ धडधड आवाज होणें.

**धड़का**-पु. (अनु.) १ धडधड आवाज. २ धडकी. ३ बुजगावणें.

**धड़काना**-क्रि.स. (अनु.) १ घाबरविणें. २ धडधडाट करणें.

**धड़क्का**-पु. धडका पहा.

**धड़टूटा**-वि. (सं) १ पोंक आलेला. २ कुबडा.

**धड़ल्ला**-पु. (अनु.) १ धडाका; सपाटा. २ धूमधडाका. ३ अतिशय गर्दी; रेटारेटी.

**धडवाई**-पु. तराजू धरणारा.

**घडा**–पु. (सं.) १ वजन (लोखंडी शेर; पावशेर मण इ.). २ धडी (४ शेर अथवा ५ शेर) ३ तराजू.

**घड़ा**–पु. झुंड; समूह; जत्था.

**घड़ी**–स्त्री. (सं.) १ धडी (४ किंवा ५ शेराची). २ रेघ.

**घत**–स्त्री. (सं.) वाईट खोडी.

**घतकारना**–क्रि. (सं.) दुतकारणें.

**घता**–क्रि. (वि.) दूर केलेला; घाल-वून दिलेला.

**घतिया**–वि. (सं.) वाईट संवयी जडलेला.

**घतींगड-घतींगडा**–पु. (दे.) १ धटिंगण. २ जारज.

**घधरा-घत्तूर**–पु. (सं.) धोत्रा.

**घधरिया**–पु. (स.) ठगांची टोळी.

**घधक**–स्त्री. (अनु.) १ आगीचा भडका. २ आगीची झळ.

**घधकना**–क्रि.अ. (अनु.) आग धडकणें.

**घधकाना-घधना**–क्रि. स. (अनु.) आग भडकविणे.

**घनंतर**–पु. (सं.) धन्वंतरि.

**घनक**–पु. (सं.) १ धनुष्य. २ ओढणी.

**घनकुट्टी**–स्त्री. (सं.) १ धान्य कुटणें; कांडणं. २ मुसळ व उखळ. ३ एक प्रकारचा किडा.

**घनकुबेर**–पु. (सं.) अतिशय श्रीमंत मनुष्य.

**घनधाम**–पु. (सं.) घरदार; पैसा-अडका.

**घनपत्र**–पु. (सं.) खाते वही.

**घनपात्र**–पु. (सं.) धनवान.

**घना**–पु. (सं.) धने.

**घना-घनि**–स्त्री. (सं.) स्त्री; युवती.

**घनि**–वि. (सं.) धन्य.

**घनिया**–पु. (सं.) १ कोथिंबीर. २ २ धने.

**घनिष्ठ**–वि. (सं.) धनाढय.

**घनी**–वि. (सं.) धनवान.

**घनी**–पु. (सं.) १ धनवान. २ स्वामी; धनी; मालक. ३ पति; धनी.

**घनी**–स्त्री. (सं.) युवती; स्त्री.

**घनुआ**–पु. (सं.) १ धनुष्य. २ धनु-कली.

**घनुई**–स्त्री. (सं.) लहान धनुष्य.

**घनुकबाई**–स्त्री. (सं.) धनुर्वात.

**घनुहाई**–स्त्री. (सं.) धनुर्युद्ध.

**घप**–स्त्री. (अनु.) धप आवाज.

**घप**–पु. (अनु.) धपाटा.

**घपना**–क्रि.अ. (सं.) १ जोरानें चालणें. २ झेप टाकणें.

**धप्पा**-पु. (अनु.) १ धपाटा. २ नुकसान; तोटा.

**धप्पाड़**-पु. (अनु.) दौड.

**धबला**-पु. (दे.) १ सैल पायजमा. २ घागरा.

**धब्बा**-पु. (दे.) १ डाग. २ कलंक.

**धमक**-स्त्री. (अनु.) १ धप्प असा आवाज. २ पावलांचा आवाज. ३ हादरा. ४ आघात. ५ खड्डा.

**धमक**-पु. (अनु.) १ भाता फुंकणारा. २ लोहार.

**धमकना**-क्रि.अ. (अनु.) १ धपकन खालीं येणें. २ डोकें भणाणणें.

**धमकाना**-क्रि.स. (अनु.) १ धमकावणें. २ दटावणें.

**धमकी**-स्त्री. धमकी.

**धमक्का**-पु. धमाका पहा.

**धमगजर**-पु. (अनु.) १ उपद्रव. २ युद्ध.

**धमधूसर**-वि. (अनु.) लठ्ठ व बेढब मनुष्य.

**धमसा**-पु. (अनु.) नगारा.

**धमाका**-पु. (अनु.) १ धप्प असा मोठा आवाज. २ बंदुकीचा शब्द. ३ आघात. ४ मोठी तोफ.

**धमाचौकड़ी**-स्त्री. (अनु.) १ धांगडधिंगा; धिंगामस्ति. २ मारपीट.

**धमाधम**-क्रिवि. (अनु.) धमाधम.

**धमाधम**-स्त्री. (अनु.) मारामारी; ठोसाठोशी; उपद्रव.

**धमार-धमाल**-स्त्री. (अनु.) १ दांडगाई; धिंगामस्ती. २ गोंधळाचा गोधळ.

**धमूका**-पु. (अनु.) १ प्रहार; आघात. २ ठोसा; बुक्का.

**धरंता**-वि. (सं.) धरणारा.

**धरक**-स्त्री. धडक पहा.

**धरता**-पु. (सं.) १ ऋणी; कर्जदार. २ धारण करणारा. ३ कर्जातील सूट.

**धरधरा**-स्त्री. धडकन पहा.

**धरन**-स्त्री. (सं.) १ धरणें. २ तुळई. ३ गर्भाशयाची आधार नाडी. ४ गर्भाशय. ५ हट्ट; टेक.

**धरना**-क्रि.स. (सं.) १ धरणें. २ ठेवणें; स्थापणें. ३ जवळ ठेवणें. ४ धारण करणें; गहाण ठेवणें. ५ अनामत ठेवणें.

**धरना**-पु. (सं.) धरणें.

**धरनैत**-पु. (सं.) धरणें धरून बसणारा.

**धरसना**-क्रि.अ. (सं.) दबणें; भिणें.

**धरसना**-क्रि. स. (सं.) दाबणें; दटावणें.

**धरहर**-स्त्री. (सं.) १ धरपकड. २ मध्यस्ती करून भांडण तोडणें. ३ बचाव; रक्षण. ४ धैर्य; धीर.

**धरहरा**-पु. (सं.) मनोरा.

**धरहरना**-क्रि.अ. (अनु.) धडधड शब्द होणें.

**धराउर**-पु. धरोहर.

**धराऊ**-वि. (सं.) ठेवणींतला; चांगला; जुना.

**धराक**-पु. धड़ाक पहा.

**धराना**-क्रि.स. (सं.) १ पकडविणें; धरविणें. २ थांबविणें. ३ निश्चित करणें; ठरविणें.

**धराहर**-पु. (सं.) मनोरा.

**धरी**-स्त्री. १ चार शेरांचें माप. २ रखेली. ३ एक कर्ण भूषण.

**धरेचा-धरेला**-पु.(सं.) विवाह न करितां स्त्रीबरोबर राहणारा.

**धरेध**-स्त्री. (सं.) रखेली.

**धरैया**-पु. (सं.) धरणारा.

**धरोड धरोहर**-स्त्री अनामत ठेव.

**धरौवा**-पु. (सं.) रखेली ठेवण्याची चाल.

**धर्त्ता**-पु. (सं.) १ धारण करणारा. काम अंगावर घेणारा.

**धर्ती**-स्त्री. (सं.) धरित्री; पृथ्वी.

**धर्मदार**-स्त्री. (सं.) धर्मपत्नी.

**धर्मध्वज--धर्मध्वजी**-पु. (सं.) बुवाबाजी करणारा; पाखंडी.

**धर्मसभा**-स्त्री. (सं.) न्यायालय.

**धर्मसारी**-स्त्री. (सं.) धर्मशाळा.

**धर्मासन**-पु. (सं.) न्यायासन.

**धर्मी**-वि. (सं.) धार्मिक.

**धर्षण**-पु. (सं.) १ अनादर; अपमान. २ हल्ला; आक्रमण. ३ दमन. ४ असहनशीलता.

**धर्षणा**-स्त्री. (सं.) १ अवज्ञा; अपमान. २ दमन. ३ सतीत्वहरण.

**धर्षणी**-स्त्री. (सं.) कुलटा.

**धर्षित**-वि. (सं.) १ पराभूत. २ अपमानित.

**धवनी**-स्त्री. (सं.) लोहाराचा भाता.

**धवर**-वि. (सं.) धवल; शुभ्र.

**धवरहर-धवराहर**-पु. मनोरा.

**धवरा**-वि. (सं.) शुभ्र; ढवळा.

**धवरी**-वि (स्त्री.) १ ढवळी; शुभ्र. २ ढवळी गाय.

**धवलना**-क्रि.स. (सं.) स्वच्छ करणें.

**धवलपक्ष**-पु. (सं.) १ शुक्ल पक्ष. २ हंस.

**धवना**-क्रि.स. (सं.) धावडविणें.

**धस**-पु. १ बुडी; डुबी. २ भुरभुरीत जमीन.

**घसक**-स्त्री. (अनु.) १ जळफळाट; द्वेष. २ ठसका; खोकला.

**घसकना**-क्रि.अ. (सं.) १ रुतणें; फसणें. २ द्वेष करणें; जळफळणें.

**घसना**-क्रि.अ. (सं.) ध्वस्त होणें.

**घसाना**-क्रि.स. (सं.) खुपसणें. घुसडणें.

**घाँगड़-घाँगर**-पु. (दे.) १ एक जंगली जात. २ विहिरी खणणारी एक जात.

**घाँधना**-क्रि.स. (दे.) १ बंद करणें. २ अतिशय खाणें.

**घाँधल**-स्त्री. (अनु.) १ उपद्रव. २ कपट. ३ धांदल; घाई; उतावळी.

**घाँधलापन**-पु. (अनु.) १ पाजीपणा. २ धोकेबाजी.

**घाँधली**-वि. १ उपद्रवी; लुच्चा. २ गडबड्या; धांदरट.

**घाइ-घाई**-स्त्री. धाय पहा.

**घाऊ**-पु. (सं.) हरकारा; दूत.

**घाक**-पु. (सं.) **धाका**-स्त्री. १ धाक. २ प्रसिद्धि.

**घाड़**-स्त्री. १ डाढ़ पहा. २ दहाड़ पहा. ४ ढाड़ पहा. ४ धाड.

**घाड़ना**-क्रि. अ. १ दहाड़ना पहा. २ रागावणें.

**घाड़स**-स्त्री. ढारस पहा.

**धाड़ी**-पु. डाकू; लुटारू.

**धात** पु. (स्त्री.) धातु.

**धाता**-वि. १ पालक. २ रक्षक. ३ धारण करणारा.

**धाधना**-क्रि.स. (सं.) पाहणें.

**धाधि**-स्त्री. (सं.) ज्वाळा.

**धान**-पु. (सं.) साळ; भात.

**धानपान**-पु. (सं.) एक विवाहांतील सोहळा.

**धानपान**-वि. सडपातळ.

**धाना**-स्त्री. (सं.) १ भाजलेले तांदूळ किंवा जव; लाह्या. २ अन्न कण. ३ धने. ४ तांदूळ. ५ सातू.

**धाना**-क्रि.अ. (सं.) १ धावणें. २ प्रयत्न करणें.

**धानी**-स्त्री. (सं.) १ धारण करणारा. २ स्थान. ३ धने. ४ पोपटी रंग. ५ भाजलेले गहूं किंवा जव.

**धाप**-पु. १ एक मैल किंवा १ कोस. २ लांब रुंद मैदान. ३ शेताची लांबी रुंदी.

**धाप**-स्त्री. (सं.) संतोष; तृप्ति.

**धापना**-क्रि.अ. (सं.) १ धावणें; २ तृप्त होणें. ३ तृप्त करणें.

**धाबा**-पु. (सं.) १ गच्ची. २ खाणावळ.

**धाभाई**-पु. (सं.) दूधभाऊ.

**धामा**–पु. (सं.) जेवणाचें निमत्रण.

**धायँ**–स्त्री. ( अनु. ) धाड असा आवाज.

**धाय-धायी**–स्त्री. (सं.) दाई; धात्री.

**धार**–स्त्री. (सं.) १ धार. २ कर्ज; उधार. ३ प्रांत; प्रदेश. ४ प्रवाह.

**धार**–वि (सं.) गंभीर; खोल.

**धारस**–स्त्री. ढारस पहा.

**धारा**–पु. (सं.) १ घोडयाची चाल. २ प्रवाह; धार. ३ धारा. ४ पावसाची सर. ५ समूह. ६ सैतान. ७ उत्कर्ष. ८ चाक. ९ वाक्याची ओळ. १० रेघ. ११ शिखर. १२ कायद्याचें कलम.

**धारीदार**–वि. (सं.) रेघारेघांचे.

**धावना**–क्रि.अ. (सं.) धावणें.

**धावरा**–पु. धवरा पहा.

**धावरी**–स्त्री. धवरी पहा.

**धावा**–पु. (सं.) १ हल्ला; आक्रमण. २ धावत जाणें.

**धाह**–स्त्री.(अनु.) धाय मोकलून रडणें.

**धाही**–स्त्री. ( सं. ) दाई.

**धिंग**–स्त्री. ( सं. ) धिंगाणा; उपद्रव.

**धिंगरा**–वि. धींगरा पहा.

**धिंगा**–वि. (सं.) १ बदमाश; हलकट. २ बेशरम.

**धिंगाई**–स्त्री. (सं.) १ निर्लज्जपणा. २ धांगडधिंगा; बदमाशी.

**धिंगाधिंगी**–स्त्री. धींगाधींगी पहा.

**धिंगाना**–क्रि.अ. ( सं. ) धिंगामस्ती करणें.

**धिंगी**–स्त्री. (सं.) निर्लज्ज स्त्री.

**धिआ**–स्त्री. (सं.) १ कन्या. २ लहान मुलगी.

**धिआन**–पु. (सं.) ध्यान.

**धिकना**–क्रि.अ. (सं.) गरम होणें; तापणें.

**धिकाना**–क्रि.अ. ( सं. ) तापविणें.

**धिग**–अव्य. धिक्कार.

**धिय**–स्त्री. (सं.) कन्या.

**धिरवना**–क्रि.स. ( सं. ) धमकावणें.

**धिराना**–क्रि.स. ( सं. ) भिवविणें.

**धिराना**–क्रि.अ. ( सं. ) १ धिरावणें; गति मंद होणें. २ स्थिर होणें.

**धींग**–पु. (सं.) धट्टाकट्टा मनुष्य.

**धींग**–वि. ( सं. ) १ मजबूत; जोरदार. २ बदमाश. ३ पापी; वाममार्गी.

**धींगड़-धींगड़ा**–वि. (सं.) १ धट्टाकट्टा; पुष्ट. २ बदमाश. ३ वर्णसंकर.

**धींगधुकडी**–स्त्री. धिंगामस्ती; उपद्रव.

**धींगरा**–पु. ( सं. ) १ धट्टाकट्टा; बलिष्ट. २ बदमाश;

**धींगरी**–स्त्री. (सं.) बदमाश स्त्री.

**धींगा**-पु. (सं.) पाजी; बदमाश.

**धींगाधींगी**-स्त्री. ( सं. ) १ जबरदस्ती. २ दंगामस्ती; उपद्रव.

**धींगामुस्ती**-स्त्री. दंगामस्ती.

**धी**-स्त्री. ( स. ) १ बुद्धि; अक्कल. २ मन ३ कर्म. ४ मुलगी.

**धीआ**-स्त्री. कन्या.

**धीजना**-क्रिस. (सं.) १ ग्रहण करणें; स्वीकारणें. २ धीर धरणें. ३ प्रसन्न होणें.

**धीत**-वि (सं.) १ प्याला गेलेला. २ अनादर केला गेलेला. ३ ज्याची आराधना केली जाते असा.

**धीति**-स्त्री. ( स. ) १ पिणें. २ तहान.

**धीदा**-स्त्री. (सं.) १ कन्या; कुमारी २ लहान पुत्री.

**धीम-धीमा**-वि. (सं.) धिमा.

**धीय**-स्त्री. (सं.) १ धी पहा. २ पु. जावई.

**धीया**-स्त्री. ( सं. ) कन्या.

**धीरज**-पु.( सं.) धैर्य.

**धीरता**-स्त्री. (सं.) १ धैर्य. २ स्थिरता. ३ धीर.

**धीरा**-वि. (सं.) मंद; धिमा.

**धीरा**-पु. (सं. ) धैर्य.

**धीरावी**-स्त्री. (सं.) शिसवीचें झाड.

**धीरी**-स्त्री. डोळ्यांतील बाहुली.

**धीरे**-क्रि.वि. (सं.) १ हळूहळू; सावकाश. २ गुपचुप.

**धीवर**-पु. (सं.) १ कोळी. २ सेवक. ३ काळा मनुष्य.

**धीवरी**-स्त्री. १ कोळीण. २ मासे धरण्याचा गळ.

**धुंआँ**-पु. धूर.

**धुंगार**-स्त्री. ( सं. ) फोडणी.

**धुंगारना**-क्रि.स ( सं. ) फोडणी देणें.

**धुंगारना**-क्रि.स. ( अनु.) मारणें; पिटणें.

**धुंध**-वि. (सं.) मंद दृष्टि.

**धुंध**-स्त्री. धुंध पहा.

**धुंध**-पु.दुंद पहा.

**धुंधा**-वि. (सं.) अंधळा.

**धुंध-धुंधक**-स्त्री. ( सं. ) १ धूसरपणा ( वातावरणांतील ). २ हवेंत उडणारी धूळ. ३ डोळ्यांनी अस्पष्ट दिसणें ( रोग ).

**धुंधका**-पु. ( सं ) धुराडें.

**धुंधकार**-पु. ( सं. ) १ गडगडाट; कडकडाट. ३ अंधार.

**धुंधर**-स्त्री. (सं.) १ धूळ. २ हवेंत धूळ उडाल्यानें आलेला धूसरपणा.

**धुंधराना**-क्रि. अ. धुंधरना पहा.

**धुंधलका-धुंधला**-वि. (सं.) १ धूसर रंगाचा. २ अस्पष्ट. ३ अधूक वातावरण.

**धुंधलाई**-स्त्री. **धुंधलापन**-पु. अंधूकपणा.

**धुंधली**-स्त्री. धुंध पहा.

**धुंधुकार**-पु. (सं.) १ अंधार. २ अंधुकपणा; धूसरपणा. ३ नगाऱ्याचा ध्वनि.

**धुंधुरि-धुंधुरी**-स्त्री. (सं.) धूसरपणा; अंधुकपणा.

**धुंधुरित**-वि. (सं.) १ धूसर; अंधुक. २ दृष्टिहीन. ३ अंधुक दृष्टि असलेला.

**धुंधवाना**-क्रि.अ. (सं.) धूर होऊन जळणें; धूर निघणें.

**धुंधेरी**-स्त्री. (सं.) धुळीमुळें आलेला अंधुकपणा.

**धुंधेला**-पु. (सं.) १ पाजी; बदमाश. २ धोकेबाज.

**धुँवाँ**-पु. (सं.) धूर.

**धुँवाँकश**-पु. धुआँकश पहा.

**धुँवाँदात**-धुआँदान पहा.

**धुँवाँधार**-वि. धुआँधार पहा.

**धुआँ**-पु. (सं.) १ धूर. २ मोठा समूह. ३ चिंधी.

**धुआँकश**-पु. (सं+फा.) आगबोट.

**धुआँदान**-पु. (सं+फा.) धुराडें; चिमणी.

**धुआँधार**-वि. (सं.) १ धुरानें भरलेला. २ भव्य; भडक रंगाचा. ३ काळा; धूसर. ४ जोराचा; वेगाचा; प्रचंड.

**धुआँधार**-क्रिवि. (सं.) अतिशय जोरानें; वेगानें.

**धुआँना**-क्रि.अ. (सं.) १ धुरकटणें. २ करपणें; जळणें.

**धुआयँध**-वि. (सं.) धुरकट वासाचा.

**धुआँयँध**-स्त्री. (सं.) करपट ढेकर.

**धुआँरा**-पु. (सं.) धुराडें; चिमणी.

**धुआँस**-स्त्री. धुवाँस पहा.

**धुआँसा**-पु. (सं.) भिंती व छतावर धरलेली काजळी.

**धुआँसा**-क्रि.स. (सं.) धुरकट.

**धुकड़पुकड़**-पु. (अनु.) १ धाकधुक २ द्विधाचित्त.

**धुकड़ी**-स्त्री. बटवा; लहान थैली.

**धुकधुकी**-स्त्री. (अनु.) १ धुगधुगी. २ धाकधुक. ३ काळीज; हृदय. ४ एक गळयांतील अलंकार.

**धुकना**-क्रि. अ. १ झुकणें; लवणें. २ पडणें. ३ वेगानें तुटून पडणें.

**धुकनी**-स्त्री. धूनी पहा.

**धुकान**-स्त्री. (अनु.) गडगडाट; घोरशब्द.

**धुकाना**--क्रि. (सं.) १ झुकविणें. २ पाडणें. ३ टाकणें; झुगारणें.

**धुकार-धुकारी**-स्त्री. ( अनु. ) नगाऱ्याचा आवाज.

**धुक्कना**-क्रि. अ. धुकना पहा.

**धुक्कारना**-क्रि. ( सं. ) धुकाना पहा.

**धुगधुगी**-स्त्री. धुकधुकी पहा.

**धुज-धुजा**-पु. स्त्री. (सं.) ध्वजा; पताका.

**धुडंगी**-वि. ( सं. ) नागडा; उघडा.

**धुतकार**-स्त्री. दुतकार पहा.

**धुत्ता**-स्त्री. (सं.) धूर्तता; कपट.

**धुन**-स्त्री. (सं.) १ नाद; छंद; ध्यास. २ काळजी. ३ विचार.

**धुन**-स्त्री. (सं.) गाण्याची चाल. पदाची चाल.

**धुनकना-धुनना**-क्रि.स. (सं ) १ पिंजणें ( कापूस ). २ मारणें; चोपणें; ३ हालविणें; डोलविणें. ४ एक सारखें काम करणें.

**धुनकी**-स्त्री. (सं.) पिंजाऱ्याची धनुकली.

**धुनवाना**-क्रि.स. (सं.) पिंजविणें.

**धुना**-पु. धुनिया पहा.

**धुनि**-स्त्री. (सं.) १ नदी. २ ध्वनि.

**धुनियाँ**-पु. (सं.) पिंजारी.

**धुनिहाव**-पु. हाडांतील दुखणें.

**धुनेहा**-पु. ( सं. ) पिंजारी.

**धुपना**-क्रि.अ. (स.) धुपणें; धुतलें जाणें.

**धुपाना**-क्रि.स. ( सं. ) धूप देणें; धूप घालणें. २ ऊन्ह देणें; उन्हांत ठेवणें.

**धुपेना**-पु. (सं.) धुपाटणें.

**धुपेली**-स्त्री. (सं.) घामोळे.

**धुबला**-पु. (सं.) लहंगा; घागरा.

**धुमई**-वि. (सं.) धुरकट.

**धुमई**-पु.(सं.) धुरकट रंगाचा बैल.

**धुमरा**-वि. धूमिळ पहा.

**धुमला**-वि. ( सं. ) अंधळा

**धुमलाई**-स्त्री. ( सं. ) १ धूसरपणा. २ अंधकार.

**धुमारा**-वि. धुरकट.

**धुमिला**-वि. धूमिल.

**धुर्**-स्त्री. ( सं. ) १ धुरा; जोखड. २ भार. ३ खूंटी. ४ उच्चस्थान. ५ बोट. ६ ठिणगी. ७ भाग; अंश. ८ संपत्ति.

**धुर**-पु. (सं.) १ अक्ष. २ जोखड. उच्चस्थान. ४ भार; ओझें ५ आरंभ.

**धुर**-( अव्य. ) १ अगदीं इकडेतिकडे नाहीं; बरोबर; ठीक. २ अगदीं दूर.

**धुर**-वि. (सं.) दृढ; पक्का.
**धुरचट**-पु. अधिकता; प्रचुरता.
**धुरना**-क्रि.स. (सं.) १ मारणें; पिटणें.
**धुरमुट**-पु. दुरमुस पहा.
**धुरवा**-पु. (सं.) मेघ.
**धुरियाना**-क्रि.स. (सं.) १ धुळीनें
**धुरियाना**-क्रि.स. (सं.) १ धुळीनें माखणें. २ दोष झाकून टाकणें.
**धुरियाना**-क्रि.अ. (सं.) १ धुळीनें माखले जाणें. २ दोष लपले जाणें.
**धुरी**-पु. (सं.) १ धुरा; अक्ष. २ भार; बोजा.
**धुरियाधुरंग**-वि. (दे.) १ साथी-शिवाय गायिलें जाणारें गाणें. २ एकटा; एकाकी.
**धुरेटना**-क्रि.स. (सं.) धुळीनें माखणें.
**धुर्रा**-पु. (सं.) कण; लहान तुकडा.
**धुलना**-क्रि.अ. (सं.) धुतलें जाणें.
**धुलवाना**-क्रि.स. (सं.) धुवविणें.
**धुलाई**-स्त्री. (सं.) धुलाई.
**धुलियामिटिया**-वि. (सं.) १ ज्याच्यावर धूळ वा माती पसरलेली आहे असा. २ दाबून वा मिटवून टाकलेलें (भांडण).
**धुलेंड़ी**-स्त्री. (सं.) धुळवड.
**धुव**-पु. (सं.) १ ध्रुव. २ क्रोध; राग.

**धुवका**-पु. (सं.) गीताची पहिली ओळ.
**धुवन**-पु. (सं.) आग.
**ध्वन**-वि. (सं.) हलविणारा; चाल-विणारा.
**धवाँ**-पु. (सं.) धूर.
**धुवांकश**-पु. (सं.+फा.) आगबोट.
**धुवाँधार**-वि. क्रिवि. धुआँधार पहा.
**धुवाँरा**-पु. (सं.) धुराडें.
**धुवाना**-क्रि.स. धुलाना पहा.
**धुस्स**-पु. (सं.) १ विटा माती इ. चा ढिगारा. २ नदी कांठचा बांध.
**धुस्सा**-पु. (सं.) कांबळें.
**धूँध**-स्त्री. धुंध पहा.
**धूआँ**-पु. (सं.) धूर.
**धून**-वि. (सं.) कंपित.
**धूनक**-वि. (सं.) १ हलविणारा; चालक. २ राळ.
**धूनना**-क्रि.स. (सं.) जाळणें.
**धूना**-पु. (सं.) धूप; सुगंधी द्रव्य.
**धूणी**-स्त्री. (सं.) १ धुपाची धुरी. २ धुनी; शेकोटी.
**धूपछाँह**-स्त्री. (सं.) १ ऊन सावली. २ दोन तीन रंगाची झांक असणारें कापड.
**धूपना**-क्रि.स. (सं.) धूप जाळणें; धुपाची धुरी देणें.

**धूपना**–क्रि.अ. ( सं. ) धूप जळणें.

**धूपना**–क्रि.स. (सं.) धांवपळ करणें; दौडणें.

**धूपबत्ती**–स्त्री. (सं.) उदबत्ती.

**धूपायित–धूपित**–वि. (सं.) १ उन्हातान्हानें दमलेला व तापलेला. धुपाची धुरी दिलेला.

**धूम**–पु. (सं.) १ धूर. २ करपट ढेकर. ३ औषधी वनस्पतीचा धर. ४ धूम केतु. ५ उल्कापात.

**धूम**–स्त्री. (सं.) १ गडबड; कोलाहल. २ उपद्रव; त्रास. ३ थाटामाटाचा सोहळा. ४ गावांतील विशेष बातमी; जनरव.

**धूमक**–पु. (सं.) धूर.

**धूमकधैया**–स्त्री. ( सं. ) धुडगूस; दंगामस्ती.

**धूमज**–पु. (सं.) मेघ.

**धूमधडाका**–पु. (सं.) **धूमधाम**–स्त्री. धूमधडाका; थाटमाट; धूमधाम

**धूमधान**–पु (सं.) धूम्रपान.

**धूमपोत**–पु. (सं.) आगबोट.

**धूमप्रभा**–पु. (सं.) नरक.

**धूमर–धूमल**–वि. (सं.)१ धुरकट. २ तपकिरी.

**धूमला**–वि. (सं.) १ धुरकट. २ तपकिरी. ३ मलिन.

**धूमवान्**–वि. (सं.) धुराचा.

**धूमसार**–पु. (सं.) घराच्या भिंतीवरील काजळी.

**धूमसी**–स्त्री. (सं.) उडदाचें पीठ

**धूमिल**–वि. (सं.) १ तपकिरी. २ धूरस; अंधुक.

**धूमी**–वि. (सं.) धुरानें भरलेला.

**धूमोद्गार**–पु. (सं.) करपट; ढेकर.

**धूर**–स्त्री. (सं.) १ धूळ. २ धुर पहा.

**धूरकट**–पु. (सं.) जमीनदाराकडून कुळाला मिळणारी आगाऊ रक्कम.

**धूरडोंगर**–पु. (दे.) पशु; जनावर.

**धूरधान**–पु. (सं.) धुळीचा ढीग.

**धूरधानी**–स्त्री. (सं.) १ धूळधाण. २ बंदूक. ३ धुळीचा ढीग.

**धूरसंज्ञा**–स्त्री. (सं.) संध्याकाळ.

**धूरा**–पु. (सं.) १ धूळ. २ बुकटी; चूर्ण.

**धूरि**–स्त्री. (सं.) धूळ.

**धूर्त्त**–वि. (सं.) फसव्या; मायावी; लुच्चा.

**धूर्त्तता**–स्त्री. (सं.) लबाडी; चलाखी.

**धूल**–स्त्री. (सं.) धूळ.

**धूलधानी**–स्त्री. (सं.) धूळधाण.

**धूला**–पु. तुकडा.

**धूलिका**–स्त्री. (सं.) तुषारांचा वर्षाव.

**धूलिगुच्छक**-पु. (सं.) अबीर.

**धूवाँ**-पु. (सं.) धूर.

**धूसना**-क्रि.स. (सं.) १ मळणें; तिंबणें. २ ठांसणें.

**धूसर-धूसरा-धूसला**-वि. (सं.) १ मळकट; तपकिरी. धुळीनें माखलेला.

**धूसर**-पु. (सं.) १ मातट रंग. २ गाढव. ३ उंट. ४ कबूतर.

**धूहा**-पु. (सं.) १ ढीग. २ बुजगावणें.

**धोडीकौवा**-पु. (सं.) डोमकावळा.

**धैना**-स्त्री. (सं.) १ स्वभाव. २ संवय. ३ कामधंदा.

**धौंधो**-पु. (सं.) १ गोळा; लगदा. २ बेडोल शरीर.

**धोई**-स्त्री. १ मूगाची व उडदाची डाळ. २ अफूचें पाणी.

**धोई**-पु. गवंडी.

**धोकड़**-स्त्री. (दे.) धट्टाकट्टा.

**धोका-धोखा**-पु. १ मोळी; जुडी. २ धोका. ३ माया; मोह. ४ अज्ञान. ५ संशय; शंका. ६ चूकभूल. ७ बुजगावणें. ८ खटखट वाजणारें बुजगावणें.

**धोतर-धोती**-स्त्री. धोतर.

**धोना**-क्रि.स. (सं.) धुणें.

**धोप**-स्त्री. तरवार.

**धोब**-पु. धुलाई; धुणें.

**धोबइन-धोबन-धोबिन**-स्त्री. (सं.) धोबीण.

**धोबी**-पु. (सं.) धोबी.

**धोर**-पु. (सं.) १ निकटता; सामीप्य. २ कांठ; कड. ३ धार.

**धोरण**-पु. (सं.) १ सवारी पहा. २ घोडयाची सरपट चाल. ३ दौड.

**धोरणी**-स्त्री. (सं.) श्रेणी; परंपरा.

**धोरी**-पु. (सं.) १ भार उचलणारा. २ बैल. ३ मुख्य; प्रधान. ४ श्रेष्ठ व्यक्ती.

**धोरे**-क्रिवि. (सं.) निकट; समीप.

**धोलाना**-क्रि.स. धुलाना पहा.

**धोवती**-स्त्री. (सं.) धोतर.

**धोवन**-पु. (सं.) १ धुणें; धुलाई. २ धुकण.

**धोवा**-पु. (सं.) १ धोवन पहा. २ अर्क; पाणी.

**धोवाना**-क्रि.स.अ. (सं.) १ धुवविणें. २ धुतलें जाणें.

**धोसा**-पु. गुळाची ढेप.

**धौं**-अव्य. १ न जाणे; कोण जाणे; देव जाणे. २ अथवा; किंवा.

**धौंक**-स्त्री. (सं.) १ भात्यानें फुंकलेली हवा. २ आगीची ज्वाळ.

**धौंकना**-क्रि.स. (सं.) १ भाता फुंकणें; भाता चालविणें. २ भार टाकणें ३ दंड लादणें.

**धौंकनी**-स्त्री. १ भाता. २ फुंकणी.

**धौंकिया**-पु. (सं.) १ भाता चालविणारा. २ भांडी दुरुस्त करणारा.

**धौंकी**-स्त्री. (सं.) धौंकनी पहा.

**धौंज-धौंजन**-स्त्री. (सं.) १ धावपळ. २ व्याकुलता; घाबरघुंडी.

**धौंजना**-क्रि.स. (सं.) १ धांवपळ करणें. २ पायांनी मळणें; तुडविणें. ३ पायांनी विसकटणें; तुडविणें.

**धौंटा**-पु. (सं.) बैलाच्या डोळयाची अंधारी.

**धौंताल**-वि. (सं.) १ छांदिष्ट; नादिष्ट. २ चपळ; हुशार; चलाख. ३ धट्टाकट्टा.

**धौंधौंमार**-स्त्री. (अनु.) घाई; उतावळी.

**धौंस**-स्त्री. (सं) १ धमकी. २ धाक; दरारा. ३ फसवणूक.

**धौंसना**-क्रि.स. (सं.) १ धमकी देणें; दटावणें. २ मारणें; पिटणें.

**धौंसपट्टी**-स्त्री. (सं.) १ धमकी. २ फसवाफसवी.

**धौंसा**-पु. १ मोठा नगारा. २ सामर्थ्य; शक्ति.

**धौंसिया**-वि. (सं.) १ दमदाटी करणारा. २ नगारा वाजविणारा. ३ फसव्या.

**धौरा**-वि. (सं.) १ ढवळा; पांढरा. २ ढवळा बैल. ३ एक पक्षी.

**धौराहर**-(सं.) १ बुरूज. २ मनोरा.

**धौरी**-स्त्री. (सं.) ढवळी गाय.

**धौरे**-क्रिवि. धोरे पहा.

**धौल**-स्त्री. (अनु.) १ धपाटा. २ नुकसानीचा धक्का.

**धौल**-वि. (सं.) ढवळा; शुभ्र.

**धौल**-पु. (सं.) मनोरा; बुरूज.

**धौल**-स्त्री. (सं.) १ एक प्रकारचा ऊस. २ ज्वारीचें हिरवें ताट.

**धौलधक्कड़**-पु. (अनु.) मारामारी; दंगा.

**धौलधक्का**-पु. (अनु.) धपाटा; आघात.

**धौलधप्पड़-धौलधप्पा**-पु (अनु.) १ मारामारी; ठोसाठोसी. २ दंगा; उपद्रव.

**धौला**-वि (सं.) धवल.

**ध्यान**-पु. (सं.) ध्यान.

**ध्येय**-वि. (सं.) १ ध्यान करण्यास योग्य. २ ध्यानाचा विषय.

**ध्वन्य**-पु. (सं.) व्यंग्यार्थ.

**ध्वांत**-पु. (सं.) अंधार.

---

## न

**नँगटा**-वि. (सं.) नागडा.

**नंगधडंग**-नागडा उघडा.

**नँगपैरा**-वि. (सं.) अनवाणी.

**नंगभुनंगा**-वि. नागडा उघडा.

**नंगा**-वि (सं.) नंगा; नग्न; नागडा.

**नंगाझोरी--नंगाझोली**-स्त्री. कपडे काढून घेतलेली अंग झडती.

**नंगाबुंगा**-वि. नागडाउघडा.

**नंगाबुच्चा--नंगाबूचा**-वि. अतिशय कंगाल.

**नँगियाना**-क्रि.स. (सं.) नागविणें.

**नंद**-पु. (सं.) १ आनंद. २ परमेश्वर. ३ मुलगा. ४ नंदराजा.

**नंदना**-क्रि.अ. (सं.) आनंदित होणें; प्रसन्न होणें.

**नंदना**-स्त्री. (सं.) मुलगी.

**नंदिका**-स्त्री. (सं.) १ मातीची द्रोण. २ नंदनवन. ३ प्रतिपदा, षष्ठी व एकादशी. ४ हंसतमुख स्त्री.

**नंदित**-वि. (सं.) १ आनंदित; प्रसन्न. २ वाजणारा.

**नंदेऊ-नंदोई**-पु. (सं.) नणंदेचा पति.

**नंदोला**-पु. (सं.) मातीचा द्रोण.

**नंदोसी**-पु. नंदेऊ पहा.

**नई**-वि. (सं.) नीतिमान.

**नई**-वि.स्त्री. (सं.) नवी.

**नई**-स्त्री. (स. नदी.

**नउआ**-पु. (सं.) न्हावी.

**नउत**-वि. (सं.) वाकलेला; नत

**नउलि**-वि. (सं.) नवा; ताजा.

**नओढ़**-स्त्री. (सं.) नवविवाहित.

**नककटा**-वि. (सं.) १ नाक कापलेला. २ बदनामी झालेला. ३ निर्लज्ज.

**नकघिसनी**-स्त्री. (सं.) १ जमिनीवर नाक घासणें. २ अजीजी.

**नकचढ़ा**-वि. (सं.) चिड़का.

**नकटा**-पु. (सं.) १ नाक कापलेला. २ एक प्रकारचें गीत. ३ एक पक्षी.

**नकटा**-वि. (सं.) १ नाक कापलेला. २ निर्लज्ज. ३ अप्रतिष्ठा झालेला.

**नकतोडा**-पु. (सं.) फुशारकीचें बोलणें.

**नकद**-पु. (अ.) नगद पैसा.

**नकद**-वि. (अ.) १ नगद. २ खास.

**नकद**-क्रिवि. (सं.) रोखीनें; नगद.

**नकदी**-स्त्री (अ.) रोकड; नगद.

**नकना**-क्रि.स. १ ओलांडणें; उल्लंघणें. २ चालणें. ३ त्यागणें; सोडणें.

**नकना**-क्रि.अ. दमणें; नाकीं नव येणें.

**नकपोड़ा**-पु. (सं.) नाक.

**नकफूल**-पु. (सं.) चमकी.

**नकब**-स्त्री. (अ.) चोरानें भिंतीला पाडलेलें भोंक.

**नकबजन**-पु. (अ.) भिंतीला भोंक पाडणारा चोर.

**नकबजनी**-स्त्री. (अ.) घरफोडी.

**नकबानी**-स्त्री. (सं.) नाकीनऊ यण.

**नकबेसर**-स्त्री. (सं.) लहान नथ.

**नक़ल**-स्त्री. (अ.) १ नक्कल. २ चुटका. ३ सोंग; गमतीदार वेश. ४ अनुकरण.

**नकली**-वि. (अ.) १ नकली; बनावट. २ खोटा.

**नकश**-पु. (अ.) नक्श पहा.

**नकशा-नकसा**-पु. नक्शा पहा.

**नकशी**-वि. नक्शी पहा.

**नकसीर**-स्त्री. (सं.) गुणगुणा फुटणें.

**नकाना**-क्रि. अ. (स.) १ दमणें; नाकी नऊ येण. २ दमविण.

**नकाब**-स्त्री. पु. (अ.) तोंडावरील बुरखा.

**नकार**-पु. (सं.) नकार; इन्कार.

**नकारची**-पु. नक्कारची पहा.

**नकारना**-क्रि. अ. (सं.) नाकारणें.

**नकारा**-वि. (सं.) निरुपयोगी.

**नकारा**-पु. नक्कारा पहा.

**नकाशी नकासी**-स्त्री. (अ.) नक्षी.

**नकियाना**-क्रि.अ. क्रि.स. (सं.) १ नाकांत बोलणें. २ दमणें. ३ दमविणें.

**नकीब**-पु. (अ.) भाट.

**नकुवा**-पु. (सं.) १ नाक. २ नेढें.

**नकेल**-स्त्री. (सं.) वेसण.

**नक्का**-पु. (सं.) १ नेढें. २ एक्का. ३ कौडी.

**नक्कार**-पु. (सं.) अपमान; अवहेलना.

**नक्कारखाना**-पु. (फा.) नगारखाना.

**नक्कारा**-पु. (फा.) नगारा.

**नक्काल**-पु. (अ.) नकल्या; बहुरूपी.

**नक्काश**-पु (अ.) नक्षीकाम करणारा.

**नक्काशी**-स्त्री (सं.) नक्षी.

**नक्कू**-वि. (सं.) १ लांबनाक्या. २ अहंमन्य. ३ तिरशिंगराव.

**नक्श**-वि (अ.) कोरीव; खोदीव.

**नक्श**-पु. (अ.) छाप; ठसा.

**नक्शा**-पु. (अ.) १ चित्र; तसबीर. २ नकाशा. ३ ढब; तऱ्हा. ४ स्थिति; दशा.

**नक्शी**-वि. (अ.) नक्षीदार.

**नख**-पु. (सं.) १ नख. २ तुकडा; खंड.

**नख**-स्त्री. (फा.) १ एक प्रकारचा दोरा. २ मांजाचा दोरा.

**नखत**-पु. (सं.) नक्षत्र.

**नखतराज**-पु. (सं.) चंद्रमा.

**नखना**-क्रि. अ. क्रि. स. (सं.) १ ओलांडणें. २ ओलांडलें जाणें. ३ नष्ट करणें.

**नखर**-पु. (सं.) नख.

**नखरा-नखरा-तिल्ला**-पु. (फा.) नखरा.

**नखरीला**-वि. (फा.) नखरेल.

**नखरौट**-स्त्री. (सं.) ओरखडा.

**नख़ास**-पु. (फा.) १ गुरांचा बाजार २ बाजार.

**नखीयाना**-क्रि. अ. (सं.) ओरखाडणें.

**नखी**-पु. (सं.) १ वाघ, सिंह, चित्ता आदी पशु., २ एक सुगंधी द्रव्य.

**नखोटना**-क्रि स. (सं.) ओरखाडणें.

**नख्खास**-पु. नखास पहा.

**नग**-वि. (सं.) स्थिर; अचल.

**नग**-पु. (फा.) १ आंगठी किंवा इतर दागिन्यांतील खडा. २ नग (वस्तूंची संख्या).

**नगद**-पु. नकद पहा.

**नगधर**-पु. (सं.) श्रीकृष्ण.

**नगन**-वि. (सं.) नग्न.

**नगनी**-स्त्री. (सं.) १ वयांत न आलेली बालिका. २ मुलगी. ३ नग्न स्त्री.

**नगभू**-स्त्री. (सं.) डोंगराळ जमीन.

**नगरहा**-पु. (सं.) नगरवासी.

**नगराई**-स्त्री. (सं.) १ नागरिकता. २ चलाखी.

**नगरी**-स्त्री. (सं.) नगरी; शहर.

**नगरी**-पु. (सं.) नागरिक.

**नगरीकाक**-पु. (सं.) बगळा.

**नगाड़ा-नगारा**-पु. (फा.) नगारा.

**नगीच**-क्रिवि. (फा.) नजीक.

**नगीना**-पु. (फा.) १ आंगठी, कुडी इ. दागिन्यांतील खडा. २ दागिना. ३ एक प्रकारचें कापड.

**नगीनासाज**-पु. (फा.) दागिने घडविणारा.

**नघना**-क्रि.स. (सं.) ओलांडणें; पार करणें.

**नघाना**-क्रि.अ. (सं.) ओलांडविणें.

**नचना**-क्रि.अ. (सं.) नाचणें.

**नचना**-वि. (सं.) १ नाचणारा. २ भटक्या; नाचरा.

**नचनि**-स्त्री. (सं.) नृत्य.

**नचनी**-स्त्री. (सं.) १ नृत्तिका. २ नाचरी स्त्री.

**नचाना**-क्रि.स. (सं.) नाचावयास लावणें; नाचविणें.

**नचौहा**-वि. (सं.) नाचरा; भटक्या.

**नछत्र**-पु. (सं.) नक्षत्र.

**नछत्री**-वि. (सं.) भाग्यवान.

**नज़दीक**-वि. (फा.) नजीक; निकट.

**नज़दीकी**-स्त्री. (फा.) सामीप्य.

**नज़दीकी**-वि. (फा.) जवळचा.

**नज़दीकी**-पु. (फा.) जवळचा संबंधी

**नज़र**-स्त्री. (अ.) नजर (सर्व अर्थ मराठी प्र०)

**नज़रना**-क्रि.अ. (अ.) पाहणें.

**नज़रसानी**-स्त्री. (अ.) उजळणी; दोष इत्यादि पहाण्याकरितां पुनः निरीक्षण.

**नज़रहाया**-वि. (अ.) दृष्ट लावणारा; वाईट दृष्टीचा.

**नज़रानना**-क्रि.स. . भेट देणें; नजराणा देणें. २ नजर लावणें.

**नज़राना**-क्रि.अ. (अ.) दृष्ट लागणें.

**नज़राना**-क्रि स. (अ.) नजर लावणें.

**नज़राना**-पु. (अ.) नजराणा.

**नज़ला**-पु. (फा.) १ सर्दी; पडसें. २ डोळयांची जळजळ.

**नजाकत**-स्त्री. (फा.) नाजुकपणा.

**नजात**-स्त्री. (अ.) १ मोक्ष; मुक्ति. २ सुटका.

**नज़ारा**-पु. (अ.) १ देखावा. २ दृष्टि; नजर; प्रेमकटाक्ष.

**नजिकाना**-क्रि.स. (फा.) जवळ येणें;

**नजीक**-क्रिवि. (फा.) नजीक.

**नज़ीर**-स्त्री. (अ.) दृष्टांत; उदाहरण. दाखला;

**नजूम**-पु. (अ.) ज्योतिष विद्या.

**नजूमी**-पु. (अ.) ज्योतिषी.

**नज्ल**-पु. (अ.) सरकारी जमीन. नज़ला पहा.

**नटई**-स्त्री. १ गळा; मान. २ गळयाची घाटी.

**नटखट**-वि. (सं.) १ खट्याळ; खोडकर. २ धूर्त.

**नटखटी**-स्त्री. (सं.) पाजीपणा.

**नटचर्य्या**-स्त्री. (सं.) अभिनय.

**नटता**-स्त्री. (सं.) नटाचें काम.

**नटना**-क्रि.अ. (सं.) १ अभिनय करणें. २ नृत्य करणें. ३ नाकारणें. ४ नष्ट होणें.

**नटना**-क्रि.स. (सं.) नष्ट करणें.

**नटनि**-स्त्री. (सं.) १ नृत्य; नाच. २ इनकार.

**नटनी**-स्त्री. (सं.) १ नटाची स्त्री. २ नटी.

**नटवना**-क्रि.स. ( सं. ) अभिनय करणें.

**नटवर**-पु. (सं.) नटश्रेष्ठ.

**नटवर**-वि. (सं.) अतिशय चतुर.

**नटवा**-पु. (सं.) नट.

**नटसार-नटसारा**-स्त्री. (सं) नाट्य-शाळा.

**नटसाल**-स्त्री. (दे.) १ काट्याचें पायांत रुतून बसलेलें बारीक टोक. २ मनाला लागलेली टोचणी; पीडा.

**नटांतिका**-स्त्री. ( सं. ) लज्जा; शरम

**नटी**-स्त्री. (सं.) नटी.

**नठना**-क्रि.स. क्रि.अ. (अ.) १ नष्ट करणें. २ नष्ट होणें.

**नढ़ना**-क्रि. (सं.) १ गुंफणें. २ बांधणें.

**नतर-नतरक-नतरू**-क्रिवि. नाहीं तर; अन्यथा.

**नति**-स्त्री. (सं.) १ वाक; झुकाव. २ प्रणाम. ३ विनंति. ४ नम्रता.

**नतिनी**-स्त्री. (सं.) मुलाची मुलगी.

**नतीजा**-पु. (फा.) परिणाम.

**नतु**-क्रिवि. (सं.) नाहींतर; अन्यथा.

**नतैत**-पु. (सं.) नातेवाईक.

**नथना**-पु. (सं.) १ नाकाचा शेंडा. २ नाकाचें भोंक.

**नथना**-क्रि.अ. ( सं. ) १ गोवलें जाणें. २ छेदलें जाणें.

**नथनी**-स्त्री. (सं.) १ लहान नथ. २ वेसण. ३ लोलक.

**नदना**-क्रि.अ. (सं. हंबरणें.

**नदान**-वि. (फा.) १ बुद्धिहीन. २ लहान वयाचा.

**नदारत नदारद**-वि. (फा.) गायब; लुप्त.

**नदिया नदी**-स्त्री. (सं. नदी.

**नधना**-क्रि.अ. (सं.) १ बैल, घोडा; इ. जुंपलें जाणें. २ जुळणें.

**ननंद-ननद**-स्त्री. (सं.) नणंद.

**ननदोइ**-पु. (सं.) नणंदेचा नवरा.

**ननसार**-स्त्री. आजोळ.

**नना**-स्त्री. (सं.) १ माता. २ कन्या. ३ वाक्य.

**ननिआउर--ननिआउरा-नानि-हाल-नन्यौरा**-पु. आजोळ.

**नन्ना-नन्हा**-वि. (सं.) छोटा.

**नन्हाइ**-स्त्री. (सं.) १ लहानपण. २ अप्रतिष्ठा.

**नपाई**-स्त्री. (स.) मोजणी.

**नपाक**-वि. (सं.) अशुद्ध; अपवित्र.
**नफर**-पु. (फा.) १ नोकर. २ व्यक्ति.
**नफरत**-स्त्री. (अ.) घृणा.
**नफरी**-स्त्री. (अ.) एक दिवसाची मजुरी.
**नफ़ा**-पु. (अ.) नफा; लाभ.
**नफ़ासत**-स्त्री. (अ.) उम्दपणा.
**नफ़ीरी**-स्त्री. (फा.) सनई.
**नफ़ीस**-वि. (फा.) १ उमदा; उत्तम. २ स्वच्छ. ३ सुंदर.
**नबी**-पु. (अ.) ईश्वराचा दूत; पैगंबर.
**नबेडना**-क्रि.स. (सं.) १ निपटणें; निस्तरणें. २ निवडून घेणें (क्वचित).
**नबेड़ा नबेरा**-पु. (स.) निवाडा; न्याय.
**नबेरना**-क्रि. (सं.) नबेडना पहा.
**नब्ज़**-स्त्री. (अ.) नाडी (शरीरांतील).
**नब्बे**-वि. (सं.) नव्वद.
**नम**-वि. (फा.) ओलसर; आर्द्र.
**नमक**-पु. (फा.) १ मीठ. २ सौंदर्य.
**नमकसार**-पु. (फा.) मिठागर.
**नमकहराम**-पु. (फा.) कृतघ्न.
**नमकहलाल**-पु. (फा.) कृतज्ञ.
**नमकीन**-वि. (फा.) १ स्वादिष्ट; चविष्ट. २ खारा. ३ सुंदर.
**नमदा**-पु. (फा.) नमदा.
**नमना**-क्रि. अ. (सं.) १ नमणें; प्रणाम करणें. २ वांकणें; झुकणें.
**नमाना**-क्रि.स. (सं.) नमविणें.
**नमी**-स्त्री. (सं.) आर्द्रता.
**नमूदार**-वि. दिसणारें.
**नयना**-क्रि.अ. (सं.) १ नम्र होणें. २ झुकणें.
**नयना**-पु. (सं.) डोळा.
**नयनी**-स्त्री. (सं.) डोळ्यांतील बाहुली.
**नयनू**-पु. (सं.) १ लोणी. २ एक प्रकारची मलमल.
**नया**-वि. (सं.) नवा.
**नयाम**-पु. (फा.) तरवारीचें म्यान.
**नरई**-स्त्री. (दे.) गहूं जोंधळा इ. चें ताट.
**नरकट-नरकल-नरकस-नरकुल**-पु. (सं.) बोरू.
**नरगिस**-पु. (फा.) एक सुवासिक फूल.
**नरद**-स्त्री. (फा.) १ सोंगटी. २ एक सुवासिक फूल.
**नरदवाँ**-पु. (फा.) नळ; पन्हाळ.
**नरदा**-पु. (फा.) गटार.
**नरदारा**-पु. (सं.) १ हिजडा. २ भित्रा; भेकड.
**नरमाना**-क्रि.अ. (फा.) १ नरम करणें; मऊ करणें. २ शांत करणें. ३ नरम होणें. ४ शांत होणें.

**नरमी**-स्त्री. (फा.) मृदुता.

**नरासिंगा-नरासिंघा**-पु.तुतारीसारखें एक वाद्य; शिंग.

**नरसों**-क्रिवि. अतरसों पहा.

**नराज**-वि. (फा.) नाराज.

**नरिअरी**-स्त्री.(सं.) नारळाची करटी.

**नरिअर**-पु. (सं.) नारळ.

**नरियाना**-क्रि.अ. ( सं. ) आरडा-ओरड करणें.

**नरुवा**-पु. ( सं. ) धान्याचें ताट.

**नरों**-स्त्री. अतरसों पहा.

**नर्कट**-पु. (सं.) बोरू.

**नर्गिस**-पु. नरगिस पहा.

**नर्द**-स्त्री. (फा.) सोंगटी.

**नर्दबान**-पु. लांकडाची शिडी.

**नर्दा** पु. (फा.) गटार; नाला.

**नर्म**-वि. ( फा ) नरम; मऊ.

**नर्म**-पु. ( सं. ) थट्टा; विनोद

**नर्मठ**-पु. ( सं.) थट्टेखोर. २ उपपति. ३ स्तन.

**नर्मद**-पु. (सं.) थट्टेखोर.

**नला**-पु. ( सं. ) १ मूत्रनलिका. २ दाताचें व पायाचें पोकळ हाड.

**नलाना**-क्रिस. शेतांतील गवत वगैर काढणें.

**नली**-स्त्री. ( सं. ) नळी.

**नवना**-क्रि.अ. ( सं. ) लवणें; झुकणें.

**नवरंग**-वि.(सं.) १ सुंदर. २ नवीन प्रकारचा.

**नवल**-वि. ( सं. ) १ नवीन; नवा. २ सुंदर. ३ नवयुवक; जवान. ४ शुद्ध; स्वच्छ.

**नवला**-स्त्री. ( सं. ) तरुण स्त्री.

**नवा**-वि. (सं.) नवा.

**नवाई**-वि. सं.) नवा; नवीन.

**नवाइ**-स्त्री. (स.) विनीतता; नम्रता.

**नवाज**-वि. (फा.) कृपा करणारा.

**नवाजना**-क्रि.स. (फा.) कृपा करणें.

**नवाजिश**-स्त्री. ( फा. ) कृपा; दया.

**नवाना**-क्रि.स. ( सं. ) लवाविणें; नमविणें.

**नवारना**-क्रि.अ. १ फिरणें; चालणें. २ प्रवास करणें.

**नवासा**-पु. (सं.) मुलीचा मुलगा.

**नवासी**-वि. (सं.) एकुणनव्वद.

**नवीन**-वि. ( सं. ) नवा; नवीन.

**नवीस**-वि ( फा. ) लेखक.

**नवीसी**-स्त्री. ( फा.) लेखन.

**नवेद**-स्त्री. (सं.) १ निमंत्रण. २ निमत्रणपत्रिका.

**नवेला**-वि. (सं.) १ नवीन. २ तरुण.

**नवेली**-वि. (स.) तरुणी.

**नशा**-स्त्री. (फा) १ नशा. २ मादक पदार्थ. ३ घमेंड; गर्व; मद.

**नशाना**-क्रिअ. (सं.) नाश करणें.

**नशीला**-वि. (फा.) १ मादक. २ झिंगलेला.

**नश्तर**-पु. (फा.) शस्त्रक्रियेचा चाकू.

**नष्टा**-स्त्री. (सं.) वेश्या.

**नष्टि**-स्त्री. (सं.) नाश.

**नसंक**-वि. (सं.) निर्भय.

**नसना**-क्रि.अ. (सं.) १ नासणें; बिघडणें. २ नष्ट होणें.

**नसर**-स्त्री. (अ.) गद्य.

**नसरी**-स्त्री. (दे.) मधमाशी.

**नसल**-स्त्री. (अ.) वंश.

**नसवार**-स्त्री. (सं.) तपकीर.

**नसीठ**-पु. (दे.) अपशकुन.

**नसीनी**-स्त्री. (सं.) शिडी; जिना.

**नसीपूजा**-स्त्री. (सं.) नांगराची पूजा.

**नसीब-नसीबा**-पु. (अ.) नशीब.

**नसीम**-पु. (अ.) थंड व आल्हादकारक हवा.

**नसीला**-वि. (फा.) १ नशा केलेला. २ झिंगलेला.

**नसीहत**-स्त्री. (अ.) १ उपदेश. २ चांगला सल्ला.

**नसूडिया**-वि. अभद्र.

**नस्त**-पु. (सं.) नाव.

**नस्ता**-पु. (सं.) जनावराचें नाक.

**नहँ**-पु. १ एक प्रकारचे तांदूळ. २ नख.

**नहट्टा**-पु. (सं.) ओरखडा नखाचा.

**नहना**-क्रि.स. (सं.) जुंपणें.

**नहर**-स्त्री. (फा.) कालवा; पाट.

**नहरनी**-स्त्री. (सं.) नहरणी.

**नहरूआ-नहरूवा-नहरू**-पु. (दे.) नारू.

**नहलाई**-स्त्री. (सं.) न्हाणें.

**नहाँ**-पु. (दे.) १ चाकाचें छिद्र. २ पुढील अंगण. ३ नख.

**नहान**-पु. (सं.) स्नान.

**नहाना**-क्रि.अ. (सं.) स्नान करणें.

**नहानी**-स्त्री. (सं.) रजस्वला स्त्री; न्हाणुली.

**नहार**-वि. (सं.) अनशपोटी.

**नहारी**-स्त्री. (सं.) न्याहरी.

**नहिं-नहीं**-अव्य. नाहीं.

**नहुसत**-पु. (अ.) १ खिन्नता. २ अशुभ लक्षण.

**नाँऊँ**-पु. (सं.) नांव.

**नाँघना**-क्रिअ. (सं.) ओलांडणें.

**नाँठना**-क्रि.अ. (सं.) नष्ट होणें.

**नाँद**-स्त्री. (सं.) डोणी. २ घमेलें.

**नाँदना**-क्रि.अ. (सं.) १ गर्जणें. २ शिंकणें. ३ प्रसन्न होणें.

**नाँयँ-नाँव**-पु. ( सं. ) नांव.

**नाँयँ**-अव्य. ( सं. ) नाहीं.

**नाइत्तिफाकी**-स्त्री. ( फा. ) फूट; मतभेद.

**नाइन**-स्त्री. ( सं. ) न्हावीण.

**नाई**-स्त्री. (सं.) सदृशता; समानदशा.

**नाई**-वि. ( सं. ) समान; सदृश; तुल्य.

**नाइ-नाऊ**-पु. (सं.) न्हावी.

**नाकंद**-वि. (फा.) १ न शिकविलेला घोडा इ. २ अल्लड.

**नाकना**-क्रि. (सं.) लाँधना पहा.

**नाकबुद्धि**-वि. ( सं. ) क्षुद्रबुद्धि.

**नाका**-पु. १ नाकें. २ प्रवेशद्वार. ३ सुईचें नेढें.

**नाकाबिल**-कि. (फा.+अ.) अयोग्य.

**नाकारा-नाकिस**-वि. ( फा. ) १ निकामी; खराब. ३ सदोष.

**नाकु**-पु. (सं.) १ वारूळ. २ ढिगारा ३ पर्वत.

**नाकेदार**-पु. (सं.+फा.) नाकेदार

**नाकेदार**-बि.नेढें असलेली (सुई इ.)

**नाखना**-क्रि.स. ( सं. ) नाश करणें. २ फेकणें. ३ उल्लंघन करणें.

**नाखून**-पु. ( फा. ) नख.

**नागफल**-पु. ( सं. ) पडवळ.

**नागल**-पु. (दे. ) नांगर.

**नागवार**-वि. (फा.) १ असह्य. २ अप्रिय.

**नागहाँ**-क्रि.वि. (फा.) एकाएकी.

**नागहानी**-वि. ( फा. ) एकाएकी आलेली

**नागा**-पु. (फा.) खाडा; गैरहाजिरी.

**नागाह**-क्रिवि. (फा.) अकस्मात.

**नागुला**-पु. ( सं. ) मुंगूस.

**नाचकूद**-स्त्री. ( सं. ) १ हसणें; खिदळणें; उड्या मारणें. २ धडपड; प्रयत्न.

**नाचना**-क्रि.अ. ( सं. ) नाचणें.

**नाचीज**-वि. ( फा. ) तुच्छ

**नाज**-पु. ( सं. ) धान्य.

**नाज़**-पु. ( फा. ) १ नखरा. २ ऐट; घमेंड.

**नाज़नी**-स्त्री. ( फा. ) सुंदर स्त्री.

**नाज़यज**-वि. ( फा. ) अनुचित.

**नाजिम**-पु. ( अ. ) व्यवस्थापक.

**नाजिर**-वि. ( अ. ) देखरेख करणारा निरीक्षक.

**नाजिर**-पु. (अ.) १ प्रमुख लेखक. २ देखरेख करणारा. ३ खोजा.

**नाजुक**-वि. ( फा. ) १ नाजुक; कोमल २ पातळ. ३ सूक्ष्म.

**नाजो**-स्त्री. ( फा. ) नखरेल स्त्री.

**नाट**-पु. ( सं. ) १ नक्कल. २ नाज.

**नाटना**-क्रि.अ. (सं.) वचन न पाळणें.

**नाटा**-वि. (सं.) ठेंगणा.

**नाठ**-पु. (सं.) १ नाश २ अनस्तित्व. ३ बेवारशी संपात्ति.

**नाठना**-क्रि.स. क्रि. (अ.) १ नष्ट करणें. २ हटणें; पळणें. ३ नष्ट होणें.

**नाठा**-पु. (सं.) मागें पुढें कोणी वारस नसलेला.

**नाड़**-पु. (सं.) मान.

**नाड़ा**-पु. (सं.) १ नाड़ी; फीत. २ नाडी.

**नाड़िया**-पु. (सं.) वैद्य.

**नाड़ी**-स्त्री. (सं.) १ नाडी; शीर. २ नळी. ३ कपट.

**नात**-पु., (सं.) १ नातेवाईक. २ नातें.

**नातरू**-अव्य. (सं.) नाहींतर; अन्यथा.

**नातवाँ**-वि. (फा.) निर्बल; अशक्त.

**नाता**-पु. (सं.) नातें.

**नाताकत**-वि. (फा.) अशक्त.

**नातिन**-स्त्री. (सं.) मुलीची मुलगी.

**नाती**-पु. (सं.) नातु.

**नाते**-क्रिवि. (सं.) १ संबंधानें. २ करितां.

**नाथ**-पु. (सं.) १ नाथ; पति. २ वेसण. ३ स्वामी.

**नाथना**-क्रि. स. (सं.) १ वेसण घालणें. ३ भोक पाडून दोरीत ओवणें.

**नादना**-क्रि.स. (सं.) १ वाजणें. २ प्रफुल्लित होणें. ३ वाजविणें.

**नादान**-वि. (फा.) मूर्ख; बेअकली.

**नादार**-वि. (फा.) गरीब; निर्धन.

**नादिम**-वि. (फा.) लज्जित.

**नादिया**-पु. (सं.) १ नंदीबैल. २ नंदी.

**नादिर**-वि. (फा.) अद्भूत.

**नादिरशाही**-स्त्री. (फा.) बेबंदशाही.

**नादिहंद-नादिहंदी**-वि. (फा.) न देणारा; देण्याची प्रवृत्ति नसणारा.

**नाधना**-क्रि.स. (सं.) १ जुंपणें (घोडा; बैल इ.). २ जोडणें. ३ आरंभ करणें (एखाद्या कार्याचा). ४ ओवणें.

**नाधा**-पु. (सं.) १ जोखड. २ बैल जुंपण्याचा पट्टा. ३ मोटेचें थारोळें.

**नान**-स्त्री. (फा.) रोटी; चपाती.

**नानस**-स्त्री. आजे सासू.

**नानसरा**-पु. आजे सासरा.

**नाना**-वि. (सं.) नाना; अनेक; विविध.

**नाना**-क्रि.स. (सं.) १ नमविणें; झुकविणें. २ टाकणें; फेकणें. ३ घुमविणें.

**नाना**–पु. (अ.) पुदीना.

**नानिहाल**–पु. (दे.+सं.) आजोळ.

**नानी**–स्त्री. (दे.) आओीची आई.

**नानुकर**–पु. (सं.) नकार; इनकार.

**नान्ह-नान्हा**–वि. (सं.) १ लहान; तान्हा. २ नीच; क्षुद्र. ३ पातळ; बारीक.

**नान्हारिया**–वि. (सं.) लहान; छोटा.

**नाप**–स्त्री. (सं.) माप.

**नापजोख-नापतौल**–स्त्री. (सं.) मोजणें; मापणें.

**नापदान**–पु. (फा.) गटार; नाला.

**नापना**–क्रि स. (सं.) मापणें.

**नापसंद**–वि. (फा.) नापसंत.

**नापाक**–वि. (फा.) १ अशुद्ध; अ-पवित्र. ३ मलीन.

**नापायदार**–वि. (फा.) क्षणभंगुर; न टिकणारा.

**नापैद**–वि. (फा.) लुप्त; गडप.

**नाबदान**–पु. (फा.) गटार; नाला.

**नाबालिग**–वि. (फा.) अल्पवयी; अज्ञान.

**नाबूद**–वि. (फा.) नष्ट; ध्वस्त.

**नाम**–पु. (सं.) नांव; नाम.

**नामज़द**–वि. (फा.) १ नेमलेला; नियुक्त. २ प्रसिद्ध.

**नामदार**–वि. (फा.) प्रसिद्ध.

**नामधराई**–स्त्री. (सं.) निंदा; अप-कीर्ति

**नामाकूल**–वि. (फा.+अ.) १ अयोग्य. २ अयुक्त.

**नामित**–वि. (सं.) झुकविलेला.

**नामी**–वि. (सं.) १ नामक. २ प्रसिद्ध; नामी.

**नामीगिरामी**–वि. प्रसिद्ध; विख्यात.

**नामुनासिब**–वि. (फा.) १ अनु-चित; अयोग्य. २ न शोभणारा.

**नामुमकिन**–वि. (फा.) असंभवनीय; अशक्य.

**नामूस**–स्त्री. (फा.) अब्रु.

**नामूसी**–स्त्री. (फा.) बदनामी; निंदा.

**नायँ**–पु. (सं.) नांव.

**नायँ**–अव्य. नाहीं.

**नाय**–पु. (सं.) १ नय; नीति. २ युक्ति; उपाय. ३ नेता; पुढारी.

**नायन**–स्त्री. (सं.) न्हावीण.

**नायब**–पु. (अ.) १ (एकाद्यातर्फे काम करणारा) मुखत्यार. २ दुय्यम; सहाय्यक.

**नारंग**–पु. **नारंगी**–स्त्री. (सं.) १ संत्रे व संत्र्याचें झाड. २ नारंगी रंग.

**नार**-स्त्री. (सं.) १ गळा; मान. २ नार; स्त्री.

**नार**-पु. (सं.) १ नाळ. २ नाला. ३ दोरखंड. ४ नाडी; फीत. ५ गुरांची झुंड. ६ झुंड; समूह. ७ तान्हें वासरूं ८ प्राणी.

**नारकी**-वि. (सं.) पापी.

**नारकीट**-पु. (सं.) १ अधम मनुष्य. २ एक किडा.

**नारना**-क्रि.स. (सं.) अंदाज करणें; ताडणें.

**नारा**-पु. (सं.) १ नाडी; फीत. २ जोखडास जुंपण्याचा पट्टा. ३ नाला; ओढा.

**नाराज**-वि. (फा.) नाराज.

**नारियल**-पु. (सं.) नारळ.

**नारियली**-स्त्री. (सं.) १ नारळाचें खोबरें. २ माडी (पेय).

**नारी**-स्त्री. (सं.) १ नारी; स्त्री. २ नाडी.

**नारीतरंगक**-पु. (सं.) व्यभिचारी.

**नारू**-पु. (दे.) १ नारू. २ ऊ.

**नाल**-स्त्री. (सं.) १ नाल; कमळाचे देंठ. २ नळी. ३ नाळ. ४ मोरी;

**नाल**-पु. (अ.) १ नाल. २ दगडाची गदा. ३ जुगारी अड्डा.

**नालकी**-स्त्री. (सं.) पालखी.

**नाला**-पु (सं.) नाला; ओढा.

**नालिश**-स्त्री. (फा.) फिर्याद.

**नाली**-स्त्री. (सं.) १ नळी. २ नाला; ओढा. ३ गटार; मोरी. ४ नाडी; धमनी. ५ घडयाळ. ६ कमळ.

**नालुक**-पु. (सं.) एक सुगंधी द्रव्य.

**नालुक**-वि. (सं.) कुश.

**नालोट**-वि. बोलणें बदलणारा; खोटाडया.

**नावँ**-पु. (सं.) नांव.

**नावक**-पु. (फा.) १ तीक्ष्ण बाण. २ मधमाशीचा दंश.

**नावक**-पु. (सं.) नाविक.

**नावर-नावरि**-स्त्री. (सं.) नौका.

**नावाकिफ**-वि. (फा.) बिन माहितगार; अनभिज्ञ.

**नास**-स्त्री. (सं.) तपकीर.

**नासदान**-पु. (सं.+फा.) तपकिरीची डबी.

**नासमझ**-वि. (सं.) निर्बुद्ध; बेअक्कल.

**नासिर**-वि. (फा.) १ गद्यलेखक. २ सहाय्यक.

**नाह**-पु. (सं.) नाथ; स्वामी.

**नाहक**-क्रि.वि. (फा.) नाहक.

**नाहट**-वि. (दे.) खट्याळ; उपद्रवी.

**नाहनूद**-स्त्री. नाहीं नाहीं.

**नाहर**-पु. (सं.) १ सिंह. २ वाघ.

**नाहरू**–पु. (दे.) १ नारू. २ नाहर पहा.

**निँदँरिया**–स्त्री. ( सं. ) झोंप; निद्रा.

**निँदाँसा**–वि. ( सं. ) झोंपेस आलेला.

**निँदिया**–स्त्री. ( सं. ) निद्रा.

**निंब**–स्त्री. ( सं. ) लिंबाचें झाड.

**निंबू**–स्त्री. ( सं. ) लिंबू.

**निअर**–अव्य. ( सं. ) जवळ; निकट.

**निअर**–वि. ( सं. ) समान; तुल्य.

**निअराना**–क्रि स. (सं.) जवळ येणें; समीप येणें.

**निअराना**–क्रि.अ. ( सं.) जवळ जाणें; समीप जाणें.

**निआउ**–पु. (सं.) न्याय.

**निआन**–पु. (फा.) अंत; शेवट; परिणाम.

**निआन**–अव्य. ( फा. ) शेवटीं; अखेरीस.

**निआमत**-स्त्री. ( अ. ) उत्तम व बहुमूल्य पदार्थ.

**निकंदन**–पु. ( सं. ) नाश.

**निकनी**–स्त्री. ( सं. ) लहान तराजू.

**निकम्मा**–वि. (सं.) १ बेकार. २ कुचकामाचा.

**निकर**–पु. ( सं. ) १ समूह; २ झुंड; रास; ढीग.



**निकरना-निकलना**–क्रि.अ. ( सं. ) १ बाहेर निघणें; निघणं. २ वेगळें होणें; निराळें होणें.

**निकाज-निकाम**–वि. (सं.) निकम्मा पहा.

**निकाम**–क्रिवि. ( सं. ) व्यर्थ; विनाकारण.

**निकाम**–वि. ( सं. ) १ इच्छित; अभिलषित. २ यथेच्छ; भरपूर; खूप; अतिशय.

**निकार**–पु. ( सं. ) १ पराभव. २ अपकार. ३ अपमान; मानहानी. ४ तिरस्कार.

**निकार**–पु. ( सं. ) १ काहील. २ बाहेर पडण्याचा मार्ग. ३ बाहेर काढण्याचें काम.

**निकारण**–पु. ( सं. ) वध.

**निकारना-निकालना**–क्रि.स.(सं.) १ काढणें. २ बाहेर काढणें. ३ प्रकट करणें.

**निकास**–पु. (सं.) १ निघण्याची वा बाहेर पडण्याची क्रिया. २ निघून जाण्याचा वा बाहेर पडण्याचा मार्ग (द्वार; छिद्र इ.). ३ द्वार; दरवाजा. ४ मैदान; मोकळी जागा. ५ उगम; मूळस्थान. ६ वंशाचें मूळ; ७ संकट निवारण्याची युक्ति; उपाय. ८ निर्वाहाचा मार्ग. ९ उत्पन्न; मिळकत.

**निकासी**-स्त्री. (सं.) १ निघणें. २ जमीनदाराचा नफा. ३ प्राप्ति; लाभ. ४ विक्री; खप. ५ जकात.

**निकाह**-पु. (अ.) निका; विवाह.

**निकियाना**-क्रिस. मारलेल्या पक्षाच्या अंगावरील पिसें वा केंस उपटून बाजूला काढणें.

**निकिष्ट**-वि. (सं.) निकृष्ट.

**निकृति**-स्त्री. (सं.) १ तिरस्कार २ अपकार. ३ दैन्य. ४ नीचपणा. ५ पृथ्वी.

**निकृती**-वि. (सं.) नीच; दुष्ट.

**निकोचन**-पु. (सं.) संकुचन.

**निकोसना**-क्रि.स. (सं.) १ दांत विचकणें. २ दांत चावणें.

**निक्षा**-वि. (सं.) तहान.

**निखंड**-वि. (सं.) जरासुद्धां इकडे तिकडे नसलेलों; ठीक अगदीं बरोबर.

**निखट्टर**-वि. (सं.) कठोर हृदयी; निष्ठुर.

**निखरना**-क्रि.अ. (सं.) स्वच्छ होणें; निर्मळ होणें.

**निखरी**-स्त्री. (सं.) शिजविलेली; तुपांत तळलेली वा शिजविलेली.

**निखर्व**-वि. (सं.) १ निखर्व (दहा सहस्र कोटी). २ ठेंगू.

**निखवख**-वि. (सं.) अगदीं सर्वच्या सर्व.

**निखार**-पु. (सं.) १ निर्मलता; स्वच्छता. २ नट्टापट्टा; श्रृंगार; सजावट.

**निखारना**-क्रि.स. (सं.) १ स्वच्छ करणें; घासणें. २ पवित्र करणें; पापरहित करणें.

**निखारा**-पु. साखर तयार करण्याची काहील.

**निखालिस**-वि. (सं.+फा.) शुद्ध; निर्मळ.

**निखेध**-पु. (सं.) निषेध.

**निखोट**-वि. (सं.) १ निर्दोष; निर्मळ. २ साफ; स्पष्ट.

**निखोट**-क्रिवि. (सं.) निःसंकोचपणें; खुलेपणानें.

**निखोड़ा**-वि. कठोर; निर्दय.

**निखोरना**-क्रि.स. खरवडणें; ओरखडणें.

**निगद**-पु. (सं.) १ भाषण; कथन. २ मोठ्यानें केलेला जप.

**निगर**-पु. (सं.) १ भोजन, २ निकर पहा.

**निगर**-वि. सर्व; सारे.

**निगरण**-पु. (सं.) १ खाणें; गिळणें. २ गळा.

**निगराँ**–पु. (फा.) १ देखरेख करणारा. २ रक्षक. ३ निरीक्षक.

**निगरा**–वि. (सं.) भेसळ न केलेला उसाचा रस.

**निगराना**–क्रि.स.क्रि.अ. (सं.) १ निर्णय करणें; निस्तरणें. २ निवडून वेगळें करणें. ३ स्पष्ट करणें.

**निगरानी**–स्त्री. (फा.) देखरेख; निरीक्षण.

**निगरू**–वि. (सं.) हलका.

**निगलना**–क्रि.स. (सं.) गिळणें.

**निगह**–स्त्री. (फा.) नजर; दृष्टि.

**निगहबान**–पु. (फा.) रक्षक.

**निगहबानी**–स्त्री. (फा.) देखरेख; रखवाली.

**निगाद**–वि. (सं.) कथन; भाषण.

**निगादी**–वि. (सं.) वक्ता.

**निगार**–पु. (सं.) भक्षण.

**निगार**–पु. (फा.) वेलबुट्टी; चित्र; नक्षी.

**निगाल**–पु. (दे.) १ जंगली बांबू. २ घोड्याची मान.

**निगाली**–स्त्री. (दे.) १ बांबूची नळी. २ हुक्क्याची नळी.

**निगाह**–स्त्री. (फा.) १ दृष्टि; नजर. २ कृपादृष्टि. ३ पारख. ४ ध्यान; विचार.

**निगिभ**–वि. (सं.) अतिशय.

**निगुनि**–वि. (सं.) गुणरहित.

**निगूढ़**–वि. (सं.) अतिशय गुप्त.

**निगोड़ा**–वि. १ निर्लज्ज. २ दुष्ट; नीच. ३ दुर्दैवी; अनाथ. ४ सडाफटिंग.

**निग्रहना**–क्रि.स. (सं.) १ थांबविणें; २ पकडणें. ३ दंड करणें.

**निघटना**–क्रि. अ. समाप्त होणें.

**निघरघट**–वि. निगरगट्ट.

**निघरा**–वि. (सं.) घरदार नसलेला.

**निघाति**–स्त्री. (सं.) ऐरण.

**निघाती**–वि. (सं.) १ मारणारा; प्रहार करणारा. २ वध करणारा.

**निचला**–वि. (सं.) १ खालचा. २ निश्चल; स्थिर.

**निचाई-निचान**–स्त्री. (सं.) १ उतार; उतरण. २ हलकेपणा. कमीपणा. ३ नीचपणा.

**निचित**–वि. (सं.) १ संचित; एकत्रित. २ व्याप्त. ३ निर्मित. ४ संकीर्ण.

**निचुड़ना**–क्रि.अ. (सं.) १ दबल्यामुळे रस गळणें. २ गळणें; पाझरणें; ठिबकणें. ३ रसहीन होणें. ४ क्षीण होणें.

**निचोड़–निचोर**–पु. (सं.) १ (एखादी वस्तु पिळून निघालेला)

रस. २ सार; सत्त्व. ३ तात्पर्य; सारांश.

**निचोडना-निचोना- निचोरना**-क्रि.स. (सं.) १ पिळून रस काढणें. २ सर्वस्व हिरावून घेणें; पिळून काढणें.

**निचोल**-पु. (सं.) १ अंगावर घेण्याचें वस्त्र. २ स्त्रियांची ओढणी. ३ वस्त्र; कपडा.

**निचौहाँ**-वि. वांकलेला; झुकलेला.

**निछक्का**-पु. (सं.) एकांत समय वा स्थान.

**निछल**-वि. (सं.) निष्कपट.

**निछला**-वि. निर्मळ.

**निछान**-वि. १ निर्मळ; विशुद्ध. २ एकमात्र; केवळ.

**निछान**-क्रिवि. पूर्णपणें.

**निछावर निछावरि**-स्त्री. (सं.) १ उतारा; अंगावरून ओवाळून टाकलेली वस्तु. २ इनाम. ३ समर्पण. ४ ओवाळणी.

**निछोह-निछोही**-वि. निर्दय; निष्ठुर.

**निज**-वि. (सं.) १ आपला; स्वतःचा. २ खास; मुख्य. ३ ठीक; यथार्थ.

**निज**-अव्य. (सं.) अवश्य.

**निज़ाअ**-पु. (अ.) भांडण; तंटा.

**निज़ाम**-पु. (अ.) १ बंदोबस्त; व्यवस्था. २ क्रम. ३ पाया. ४ मौक्तिकमाळा.

**निजि**-वि (सं.) १ शुद्ध. २ स्वतःचा.

**निझरना**-क्रि.अ. (सं.) १ पूर्णपणें झडून जाणें; गळून पडणें. २ झडणें. ३ वाळून कोरडे होणें. ४ हात झाडून दोषमुक्त होणें.

**निझाना**-क्रि.अ. (दे.) आडून निरीक्षण करणें.

**निझोटना**-क्रि. (सं.) हिसकावून घेणें.

**निटोल**-पु. मोहल्ला.

**निट्ठि**-क्रिवि. नीठि पहा.

**निठल्ला**-वि. (दे.) १ आळशी; निरुद्योगी. २ बेकार.

**निठल्लू**-वि. आळशी; निरुद्योगी.

**निठाला**-पु. (दे.) १ कांहीं काम धंदा नाहीं असा वेळ; रिकामा वेळ. २ काम धंदा नाहीं असा बेकारीचा समय.

**निठुर**-वि. (सं.) निष्ठुर.

**निठौर**-पु. (सं.) १ वाईट जागा. २ वाईट अवस्था.

**निढाल**-वि. (सं.) १ थकलेला; शिथिल. २ सुस्त; उत्साहहीन.

**निढिल**-वि. १ ढिला नाहीं असा; पक्का कसलेला. २ कडक.

**नितंब**-पु. (सं.) १ कुल्ला. २ खांदा. ३ किनारा. ४ पर्वताची उतरती बाजू.

**नितंबिनी**-स्त्री. (सं.) सुंदर स्त्री.

**नित-निति**-अव्य. (सं.) नेहमी; नित्य.

**नितराम्**-अव्य. (सं.) सदासर्वदा.

**निथंब**-पु. (सं.) खांब.

**निथरना**-क्रि अ. (सं.) १ स्थिर होणें; निवळणें.

**निथार**-पु. (सं.) १ निवळी. २ निवळी काढून घेतल्यावर खालीं राहिलेला गाळ.

**निदई**-वि. (सं.) निर्दय.

**निदरना**-क्रि.स. (सं.) १ अनादर करणें. २ मात करणें.

**निदर्शन**-पु. (सं.) १ दिग्दर्शन. २ दृष्टांत; उदाहरण.

**निदलन**-पु. (सं.) निर्दालन.

**निदान**-पु. (सं.) १ कारण. २ रोगनिर्णय. ३ अंत; मृत्यु.

**निदान**-अव्य. (सं.) अखेरीस; सरते शेवटीं.

**निदेश**-पु. (सं.) १ शासन. २ आज्ञा; हुकूम. ३ कथन. ४ सामीप्य.

**निदेशी**-वि. (सं.) आज्ञा करणारा.

**निधन-निधनी**-वि. (सं.) निर्धन.

**निनरा-निनार-निनारा**-वि. (सं.) निराळा; न्यारा.

**निनान**-पु. (सं.) १ अंत २ लक्षण.

**निनान**-क्रिवि. (सं.) अंतीं; अखेरीस.

**निनान**-वि. (सं.) १ अगदीं; एकदम २ वाईट; निकृष्ट.

**निनौना**-क्रि.स. (सं.) वाकविणें; नमविणें.

**निनौरा**-पु. (सं.) आजोळ.

**निन्यारा**-वि. निनरा पहा.

**निपंग**-वि. (सं.) अपंग.

**निपजी**-स्त्री. (सं.) १ नफा; फायदा. २ उपज; उत्पत्ति.

**निपट**-अव्य. (सं.) १ अगदीं; निव्वळ. २ नितांत.

**निपटना**-क्रि. अ. निबटना पहा.

**निपटाना**-क्रि.स. निबटाना पहा.

**निपटारा**-पु. निबटारा पहा.

**निपटावा**-पु. निबटावा पहा.

**निपटेरा**-पु. निबटेरा पहा.

**निपान**-पु. (सं.) १ तलाव; खड्डा. २ विहिरीजवळ पशुपक्षांकरितां पाणी

पिण्याकरितां केलेला खड्डा. ३ दुधाचें भांडें.

**निपोड़ना**-क्रि.स. उघडणें.

**निफन**-वि. (सं.) पूर्ण; संपूर्ण.

**निफन**-क्रिवि. (सं.) पूर्णपणें; चांगल्या रीतीनें.

**निफरना**-क्रि.अ. १ छेदून आरपार निघून आणें. २ खुलणें; स्पष्ट होणें.

**निफ़ाक़**-पु. (अ.) १ शत्रुत्वः वैर. २ भेद; फूट; बिघाड.

**निफारना**-क्रि.स. (सं.) १ आरपार भोक पाडणें. २ आरपार निघून जाणें. ३ उघडणें; प्रकट करणें.

**निफोट**-वि. (सं.) उघड; स्पष्ट; साफ.

**निबंधन**-पु. (सं.) १ बंधन. २ नियम; व्यवस्था. ३ कर्तव्य. ४ हेतु; कारण. ५ गांठ. ६ सतारीची खुंटी.

**निबंधनी**-स्त्री. (सं.) १ बंधन. २ बेडी.

**निबकौरी**-स्त्री. लिंबलोणी.

**निबटना**-क्रि.अ (सं.) १ (काम पूर्ण होऊन) फ़ुरसद मिळणें. २ पुरें होणें; निपटणें. ३ निर्णय होणें; निकाल होणें. ४ चुकतें होणें. ५ निवृत्त होणें.

**निबटाना**-क्रि.स. (सं.) १ पुरें करणें; निपटून टाकणें. २ चुकतें करणें; निश्चित करणें; ठरविणें.

**निबटाव**-स्त्री. (सं.) निर्णय; फैसला.

**निबटेरा**-पु. (सं.) १ (एकाद्या कार्यांतून) सुटका २ समाप्ति; निर्णय.

**निबर-निबल**-वि. (सं.) निर्बल.

**निबरना**-क्रि.अ. (सं.) १ गळून पडणें; सुटणें. ३ मुक्त होणें; उद्धरणें. ३ फ़ुरसद मिळणें; सुटका होणें. ४ (काम) पूर्ण होणें ५ निर्णय लागणें. ६ एकमेकांपासून अलग होणें. ७ गुंतागुत उलगडणें. ८ संपणें; खतम होणें.

**निबहना**-क्रि.अ. (सं.) १ निभावणें; निर्वाह होणें.

**निबाह**-पु. (सं.) १ निर्वाह. २ निभाव.

**निबुकना**-क्रि.अ. (सं.) १ सुटका होणें; सुटणें. २ बंधन निखळणें.

**निबेड़ना-निबरना**-क्रि स. (सं.) १ बंधन सोडविणें; सुटका करणें. २ निवडणें; वेगवेगळें करणें. ३ गुंतागुंत दूर करणें. ४ निर्णय करणें; फैसला करणें. ५ पुरें करणें.

**निबेड़ा-निबरा**-पु. (सं.) १ मुक्ति; सुटका. २ निवड; छाटणी. ३ त्याग.

४ समाप्ति. ५ निर्णय; फैसला. ६ बचाव; उद्धार.

**निबौली**-स्त्री. ( सं. ) लिंबोणी.

**निभ**-पु. (सं.) प्रभा; चमक; प्रकाश.

**निभना**-क्रि.अ. ( सं. ) निभणें.

**निभरम**-वि. ( सं. ) भ्रमरहित.

**निभरम**-क्रिवि. ( सं. ) निःशंक; बेधडक.

**निभरोस**-वि. (सं. ) निराश; हताश.

**निभागा**-वि. ( सं. ) हतभागी.

**निभाना**-क्रि.स. ( सं. ) निभावणें.

**निभाव**-पु. ( सं. ) निभाव;

**निभूत**-वि. ( सं. ) व्यतीत; भूत.

**निमकी**-स्त्री. १ लिंबाचें लोणचें. २ तिखटमिठाचे शंकरपाळे.

**निमछड़ा**-पु. फुरसत.

**निमज्जक**-पु. ( सं. ) पाणबुड्या.

**निमज्जन**-पु. (सं.) स्नान.

**निमना**-वि. (सं.) १ उतरता. २ नम्र; विनीत.

**निमिख**-पु (सं.) निमिष.

**निमुहाँ**-वि. (सं.) अबोल.

**नियत**-वि. ( सं. ) १ निश्चित. २ परिमित. ३ नियोजित.

**नियति**-स्त्री. (सं.) १ नेमणूक. २ २ स्थैर्य. ३ दैव. ४ अनिवार्य गोष्ट.

**नियर-नियरे**-अव्य. ( सं. ) निकट; समीप.

**नियराई**-स्त्री. (सं.) निकटता.

**नियराना**-क्रि.अ. ( सं. ) जवळ जाणें.

**नियान**-पु. ( सं. ) अंत; परिणाम.

**नियाम**-पु. ( सं. ) नियम.

**नियामत**-स्त्री. (अ.) १ अलभ्य वस्तु. २ स्वादिष्ट भोजन. ३ धन-दौलत.

**नियारा**-वि. ( सं. ) अलग; दूर.

**नियारिया**-वि. ( सं. ) १ झारेकरी ( सोनाराच्या दुकानांतील केरकचऱ्यांतून सोनें वगैरे निवडून काढणारा ). २ चतुर मनुष्य.

**नियाव**-पु. ( सं. ) न्याय.

**नियोग**-पु. (सं.) १ नियुक्ति. २ प्रेरणा. ३ आज्ञा. ४ निश्चय.

**निरंकार**-वि. ( सं. ) निराकार.

**निरंजन**-वि. ( सं. )१ काजळाविरहित. २ दोषरहित. ३ मायामोहापासून अलिप्त.

**निरंजन**-पु. (सं. ) परमात्मा; महादेव.

**निरंजना**-स्त्री. (सं. ) पूर्णिमा.

**निरंध**-वि. ( सं. ) १ अंध. २ महामूर्ख. ३ अतिशय अंधेर. ४ अन्नाशिवाय.

**निरकेवल**-वि. (सं.) १ स्वच्छ; साफ. २ शुद्ध; निर्भेळ.

**निरचू**-वि (सं.) निश्चित; मोकळा.

**निरच्छ**-वि. (सं.) अंध.

**निरजोस**-पु. (सं.) १ निचोड़ पहा. २ निर्णय.

**निरतना**-क्रि.स. (सं.) नाचणे.

**निरधातु**-पु. (सं.) अशक्त.

**निरधार**-पु. (सं.) निर्धार; निश्चय.

**निरधारना**-क्रि.स (सं.) निर्धार करणें; ठरविणें.

**निरनै**-पु. (सं.) निर्णय.

**निरन्ना**-वि. (सं.) उपाशी.

**निरपना**-वि. (सं) १ परकयाचा. २ गैर.

**निरपाय**-वि. (सं.) अविनाशि.

**निरबंसी**-वि. (सं.) अपत्यहीन.

**निरबहना**-क्रि.अ. (सं.) निभणें.

**निरमना**-क्रि.स. (सं.) निर्मिणें.

**निरमायल**-पु. (सं.) निर्माल्य.

**निरय**-पु. (सं.) नरक.

**निरवधि**-वि. (सं.) १ अपार; बेहद्द. २ निरंतर.

**निरवसित** वि. (सं.) अस्पृश्य.

**निरवार**-पु. (सं.) १ सुटका. २ फैसला; निर्णय.

**निरशन**-पु. (सं.) उपवास.

**निरशन**-वि. (सं.) उपाशी.

**निरसंक**-वि. (सं.) निःशंक.

**निरसन**-पु. (सं.) १ फेकणें; हटविणें. २ रद्द करणें. ३ निराकरण; निरसन. ४ काढणें. ५ थुंकणें. ६ नाश. ७ वध.

**निरस्त**-वि. (सं.) १ टाकलेला; सोडलेला. २ रद्द केलेला. ३ रहित; वर्जित. ४ थुंकलेला. ५ शीघ्रतेनें उच्चारलेले (वाक्य इ.).

**निरहम्**-वि (सं.) निरहंकार.

**निरहेल**-वि. (सं.) तुच्छ; तिरस्कृत.

**निरा**-वि. (सं.) १ विशुद्ध; निखालस. २ निव्वळ; अगदीं. ३ एकमात्र केवळ.

**निराई**-स्त्री. १ गवत वेणणें. २ वेणणावळ

**निराकरण**-पु. (सं.) निराकरण.

**निराखर**-वि (सं.) १ निरक्षर. २ मौन.

**निराट**-वि. (सं.) एकटा; एकमात्र.

**निरातंक**-वि. (सं.) १ निर्भय. २ निरोग.

**निराना**-क्रि.स. (सं.) शेतांतील गवत वेणणें.

**निरापन**--**निरापुन**-वि. (सं.) दुसऱ्याचा.

**निरामय**-वि. (सं.) निरोगी.

**निरार-निरारा**-वि. (सं.) अलग; पृथक्.

**निराला**-पु. (सं.) एकांत स्थान.

**निराला**-वि. (सं.) १ विलक्षण; अद्भुत. २ अपूर्व; अनुपम. ३ एकांत; निर्जन.

**निराश**-वि (सं.) निराश

**निरास**-वि. (सं.) निराश.

**निरासन**-पु. (सं.) निरासन.

**निरिंग**-वि. (सं.) निश्चल.

**निरिच्छ**-वि. (सं.) निरिच्छ.

**निरिच्छना**-क्रि.स. (सं.) निरीक्षण करणे.

**निरीह**-वि. (सं.) १ विरक्त; उदास; निरिच्छ.

**निरुवरना**-क्रि.अ. (सं.) सुटणें; मोकळी होणें (गुंतागुंत).

**निरुवार**-पु. (सं.) १ सुटका; मोकळीक. २ विमोचन. ३ निर्णय; निश्चय. ४ निवारण.

**निरखना**-क्रि.स. (सं.) निरखून पाहणें; पाहणें.

**निरांटा**-वि. (दे.) कुरूप.

**निर्ख**-पु. (फा.) भाव; दर.

**निर्घंट**-पु. (सं.) यादी; सूची.

**निर्छल**-वि. (सं.) निष्कपट.

**निर्त**-पु. (सं.) नृत्य.

**निर्धार**-पु. (सं.) निर्धार; निश्चय.

**निर्धारना**-क्रि.स. (सं.) ठरविणें.

**निर्मायल**-पु. (सं.) निर्माल्य.

**निर्वर**-वि. (सं.) १ निर्लज्ज. २ निर्भय.

**निर्वहण**-पु. (सं.) निर्वाह.

**निर्वाद**-पु. (सं.) १ निंदा. २ बेपरवाई.

**निर्वास**-पु. (सं.) १ काढून लावणें. २ प्रवास.

**निर्वाहना**-क्रि.अ. (सं.) निर्वाह करणे.

**निर्वेद**-पु. (सं.) वैराग्य; वैताग.

**निलजई**-स्त्री. (सं.) निर्लज्जता.

**निलाम**-पु. (पो.) लिलाव.

**निवर**-वि. (सं.) निवारक.

**निवरा**-वि. स्त्री. (सं.) अविवाहित.

**निवह**-वि. (सं.) समूह.

**निवाई**-वि. (सं.) १ नवा. २ विलक्षण.

**निवाज**-वि. (फा.) कृपा करणारा.

**निवाज**-स्त्री. (फा.) नमाज.

**निवाजिश**-स्त्री. (फा.) कृपा; मेहरबानी.

**निवाड़**-स्त्री. निवार पहा.

**निवाड़**–स्त्री. (सं.) होडी.

**निवान**–पु. (सं.) १ उथळ दलदलीची जमीन. २ नळें.

**निवाना**–क्रि.स. (सं.) वांकविणें; नमविणें.

**निवार**–स्त्री. (फा.) नवार.

**निवाला**–पु. (फा.) घास; कवळ.

**निवेद**–पु. (सं.) नैवेद्य.

**निवेरना**–क्रि.स. (सं.) निबेडना पहा.

**निवेरा**–वि. १ निवडलेला. २ नवीन; अनोळखी.

**निवेश**–पु. १ विवाह. २ शिबिर. ३ प्रवेश. ४ घर.

**निशांत**–पु. (सं.) १ पहाट. २ घर.

**निशांत**–वि. (सं.) अतिशय शांत.

**निशा**–स्त्री. (सं.) १ रात्र. २ हळद.

**निशाखातिर**–स्त्री. (अ+फा.) खातरजमा; समाधान.

**निशान**–पु. (फा.) १ निशाण; चिन्ह. २ पत्ता; ठिकाणा. ३ निशाण; ध्वज. ४ लक्ष्य. ५ निशाणी.

**निशाना**–पु. (फा.) १ निशाण; चिन्ह. २ नेम.

**निशित**–पु. (सं.) लोखंड.

**निशित**–वि. (सं.) तीक्ष्ण; धारदार.

**निश्छल**–वि. (सं.) निष्कपट.

**निष्कृति**–स्त्री. (सं.) १ सुटका. २ प्रायश्चित्त.

**निष्क्रय**–पु. (सं.) वेतन. २ किंमत. ३ बदला. ४ विक्री. ५ सामर्थ्य. ६ बक्षिस.

**निष्पत्ति**–स्त्री. (सं.) १ अंत; समाप्ति. २ परिपाक; सिद्धि. ३ निश्चितता.

**निष्पीड़न**–पु. (सं.) पिळणें

**निस्संस**–वि. (सं.) क्रूर.

**निसंसना**–क्रि.अ. (सं.) श्वास घेणें.

**निसक**–वि. (सं.) अशक्त.

**निसबत**–स्त्री. (अ.) १ संबंध. २ मागणी (लग्नाकरितां). ३ तुलना.

**निसरना**–क्रि.अ. (सं.) बाहेर पडणें.

**निसवादला**–वि. (सं.) स्वादरहित.

**निसाँक**–वि. (सं.) निश्चिंत.

**निसाँस**–पु. (सं.) निश्वास.

**निसाँसा**–वि. (सं.) मृतप्राय; बेहोश.

**निसा**–स्त्री. (सं.) १ संतोष; तृप्ति. २ निशा; रात्र.

**निसा**–पु (सं) निशा.

**निसानन**–पु. (सं.) संध्याकाळ.

**निसाफ**–पु. (अ.) न्याय.

**निसार**–पु. (अ.) १ समर्पण; बलिदान. २ मोगलाईतील एक नाणें.

**निसार**-वि. (सं.) निस्सार.

**निसारना**-क्रि.स. (सं.) बाहेर काढणें.

**निसास**-पु. व वि. निसाँस पहा.

**निसिवासर**-क्रिवि. (सं.) रात्रंदिवस.

**निसीटी**-वि. (सं.) निस्सार; नीरस.

**निसेनी**-स्त्री. (सं.) श्रेणी; शिडी; जिना.

**निसोग-निसोच**-वि. (सं.) शोक-रहित; निश्चिंत.

**निसोत**-वि. (सं.) शुध्द; निर्मळ; निखालस.

**निसोधु**-स्त्री. (सं.) १ शुध्द; सावध-पणा. २ संदेश.

**निस्कचल**-वि. (सं.) शुध्द; निखा-लस.

**निस्तरना**-क्रि.अ. (सं.) स्वार होणें; मुक्त होणें.

**निस्तारना**-क्रि.अ. (सं.) सोडविणें; मुक्त करणें.

**निस्तीर्ण**-वि. (सं.) १ पार गेलेला. २ मुक्त; सुटका झालेला.

**निस्तुष**-वि. (सं.) १ तूस नसलेला. २ स्वच्छ.

**निस्पद**-वि. (सं.) स्पंदनरहित.

**निस्फ**-वि. (अ.) अर्धा.

**निस्बत**-स्त्री. निसबत पहा.

**निस्संतान**-वि (सं.) अपत्यहीन.

**निहंग**-वि. (सं.) एकाकी.

**निहंग-लाडला**-वि. (सं.) फाजिल लाडका.

**निहकाम**-वि. (सं.) निष्काम.

**निहचय**-पु. (सं.) निश्चय.

**निहफल**-वि. (सं.) निष्फळ.

**निहाँ**-वि. (फा.) गुप्त.

**निहाई**-स्त्री. एरण.

**निहाउ**-पु. घण.

**निहाका**-स्त्री. (सं.) मगर.

**निहायत**-वि. (अ.) अतिशय.

**निहायत**-स्त्री. (अ.) हद्द; सीमा.

**निहार** पु. (सं.) १ धुकें. २ दंव. ३ हिम.

**निहारना**-क्रि.स. (सं.) न्याहाळणें.

**निहाल**-नि. (फा.) पूर्णपणें; संतुष्ट; पूर्णकाम.

**निहाली**-स्त्री. (अ.) १ तक्क्या; लहान गादी. २ निहाई पहा.

**निहाव**-पु. घण.

**निहीन**-वि. (सं.) नीच; पामर.

**निहुकना-निहुडना-निहुना**-क्रि. (अ.) झुकणें.

**निहोर**-पु. निहोरा पहा.

**निहोरना**-क्रि.स. (सं.) १ प्रार्थना करणें; विनविणें. २ कृतज्ञ होणें.

**निहोरा**-पु. (सं.) १ उपकार; कृतज्ञता. २ विनंति; प्रार्थना. ३ भरोसा: आधार.

**निहोरा**-क्रिवि. (सं.) १ द्वारा. २ च्याकरितां; निमित्त.

**नींद-नींदड़ी-नींदरी**-स्त्री. (सं.) निद्रा.

**नीक**-वि. (फा.) चांगला; भला.

**नीकि**-स्त्री. (फा.) उत्तमता; भलाई.

**नीका-नीको**-वि. (फा.) उत्तम.

**नीकाश**-वि. (सं.) तुल्य; समान.

**नीके**-क्रिवि. (फा.) चांगल्या तऱ्हेनें.

**नीचट**-वि. (सं.) दृढ: पक्का.

**नीचा**-वि. (सं.) १ खालचा. २ झुकलेला. ३ नीच; क्षुद्र.

**नीचे**-क्रिवि. (सं.) खालीं; तळाशीं.

**नीजू**-स्त्री. (सं.) दोरी.

**नीझर**-पु. (सं.) निर्झर;

**नीठ-नीठि**-स्त्री. (सं.) अरुचि; अनिच्छा.

**नीठि**-क्रिवि. (सं.) १ कोणत्या ना कोणत्या प्रकारें. २ कष्टानें; मुष्किलीनें.

**नीठी**-वि.(सं.)अप्रिय;न आवडणारा.

**नीड़क**-पु. (सं.) पक्षी.

**नीत**-वि. (सं.) १ आणलेला. २ पोंचविलेला. ३ स्थापित. ४ प्राप्त. ५ गृहीत.

**नीदना**-क्रि.स. (सं.) निंदणें.

**नीधना**-वि. (सं.) निर्धन.

**नीबर**-वि. (सं.) निर्बल.

**नीवी**-स्त्री. नीवी पहा.

**नीबू**-पु (सं.) लिंबू.

**नीम**-पु. (सं.) कडुलिंब.

**नीम**-वि. (फा.) निम्मा; अर्धा.

**नीमन**-वि. (सं.) १ निरोगी; चांगला. २ दुरुस्त. ३ चांगला; सुंदर.

**नीमर**-वि. (सं.) दुर्बळ.

**नीमरज़ा**-वि. (फा.) कांहींसा आनंदी; अर्धवट; संतुष्ट.

**नीमस्तीन-नीमास्तीन**-पु (फा.) अर्ध्या बाह्यांचा अंगरखा.

**नीयत**-स्त्री. (अ.) भावना; आशय; मनीशा; नियत.

**नीरद-नीरधर**-पु. (सं.) ढग.

**नीरना**-क्रि.स. (दे.) पसरविणें.

**नीरांजन**-पु. (सं.) १ नीरांजन. २ आरती. ३ हत्यारांना साफ करण्याचें काम. ४ एक सण.

**नीरांजना**-पु. ओवाळणें; आरती; आरती करणें.

**नीरे**-क्रिवि. नियरे पहा.

**नील**-पु. (सं.) १ नीळ. २ बळ; वण. ३ कलंक. ४ मंगल घोष.

**नीला**-वि. (सं.) निळा.

**नीलाम**–पु. ( पोर्तु. ) लिलाव.

**नीवँ-नीव**–स्त्री. ( सं. ) १ घराचा पाया. २ पाया; आधार.

**नीवर**–पु. (सं.) १ भिक्षु. २ वाणी. ३ चिखल. ४ पाणी.

**नीवानास**–पु. समूळ नाश.

**नीवि-नीवी**–स्त्री. ( सं. ) १ धोतराची वा लुगडयाची गांठ. २ विजारीची नाडी. ३ साडी. ४ धोतर.

**नीहार**–पु. ( सं. ) १ धुकें. २ दंव. ३ हिमतुषार.

**नुक़ता**–पु. ( अ. ) १ अनुस्वार; बिंदु; टिंब. २ विनोद; चुटका. ३ दोष; खोडी. ४ घोडयाच्या तोंडावरील झालर.

**नुक़ताचीनी**–स्त्री. ( फा. ) छिद्रान्वेषण; दोष काढणें.

**नुकती**–स्त्री. (फा.) मोतीचूर (पक्वान्न).

**नुकस**–पु. (अ ) १ पांढरा रंग ( घोडयांचा ). २ चांदी.

**नुलाई**–स्त्री. (दे.) बेणणें; खुरपणें.

**नुकीला**–वि. ( फा. ) १ टोंकदार. २ ऐटबाज.

**नुक्कड-नुक्का**–पु. ( फा. ) १ टोंक; अग्र. २ कोपरा. ३ शेवट; टोक.

**नुक्स**–पु. ( फा. ) १ दोष; खराबी; कसर. २ तृप्ति.

**नुगदी**–स्त्री. नुकती पद्दा.

**नुचना**–क्रि.अ. (सं.) उपटलें जाणें; खरचटलें जाणें; ओरखडले जाणें.

**नुत्फा**–पु. (अ.) १ वीर्य; शुक्र. २ संतति.

**नुनखरा**–वि. खारा पदार्थ.

**नुनाई**–स्त्री (सं.) लावण्य; सौंदर्य.

**नुनेरा**–पु. (सं.) मीठागरातील नोकर.

**नुमाइश**–स्त्री. ( फा. ) १ थाटमाट; दिखाऊपणा. २ प्रदर्शन.

**नुमाइशी**–वि. ( फा. ) दिखाऊ; बेगडी.

**नुसख़ा**–पु. ( फा. ) १ चिठ्ठी. २ रोग्यास देण्याच्या औषधांची यादी.

**नून**–पु. ( सं. ) मीठ.

**नून**–वि. (सं.) कमी; अपुरें.

**नूर**–पु. ( अ. ) १ तेज; प्रकाश. २ शोभा; सौंदर्य.

**नेक**–वि. ( फा. ) १ चांगला; भला. २ शिष्ट; सज्जन. ३ प्रामाणिक.

**नेक**–क्रिवि. (फा.) थोडा; जरासा.

**नेकबख्त**–वि.( फा. ) १ भाग्यवान. २ सुशील.

**नेकी**–स्त्री. ( फा. ) भलाई; प्रामाणिकपणा.

**नेग-नेगजोगा**–पु. ( सं. ) १ विवाह प्रसंगीचे देण्याघेण्याचा हक्क. २ विवाहानिमित्त मिळणारी देणगी.

**नेगी-नेगजोगी**-लग्नांतील मानकरी.

**नेचारिया**-पु. (सं.) नास्तिक.

**नेजा-नेजाल**-पु. (फा.) भाला.

**नेटा**-पु. (सं.) १ शेंबूड. २ मेकूड.

**नेठना**-क्रि.अ. नाठना पहा.

**नेड**-क्रिवि. (सं.) निकट.

**नेत**-पु. (सं.) १ ठराव; निश्चय. २ व्यवस्था. ३ मथाणीची दोरी. ४ एक दागिना.

**नेत**-स्त्री. नीयत पहा.

**नेतली-नेती**-स्त्री. मथाणीची दोरी.

**नेनुआ-नेनुवा**-पु. (दे.) घोसाळे.

**नेम**-पु. (सं.) १ काल; समय. २ तुकडा; खंड. ३ अन्य. ४ खड्डा. ५ सायंकाळ. ६ मूळ.

**नेमि**-स्त्री. (सं.) १ चाकाचा घेर. २ विहिरीचा कठडा. ३ रहाटाची चौकट.

**नेमी**-पु. (सं.) १ नियम पाळणारा. २ कर्मठ.

**नेराना**-क्रि.अ. क्रि.स. नियराना पहा.

**नेरे**-क्रिवि. (सं.) निकट.

**नेवठा**-पु. (दे.) संभावना; अहेर.

**नेवज**-पु. (सं.) नेवैद्य.

**नेवत-नेवता**-वि. (सं.) निमंत्रण.

**नेवर**-पु. (सं.) नूपुर.

**नेवर-नेवल**-वि. (सं.) खराब.

**नेवला**-पु. (सं.) मुंगुस.

**नेवा**-पु. (सं.) १ रीति; रिवाज. २ लोकमत.

**नेवा**-वि. (सं.) १ समान; सदृश. २ मौन.

**नेवारना**-क्रि.स. (सं.) निवारणें.

**नेस**-पु. (फा.) सुळे; दांत.

**नेसुक**-वि. जरा; थोडासा; किंचित.

**नेस्त**-वि. (फा.) नसलेला.

**नेस्ती**-स्त्री. (फा.) १ अनस्तित्व. २ आळस; नाश.

**नेह**-पु. (सं.) १ स्नेह; प्रेम; प्रीति. २ तेल किंवा तूप. ३ स्निग्ध.

**नेही**-वि. (सं.) प्रेम करणारा.

**नै**-स्त्री. (सं.) १ न्याय; नीति. २ आचारविचार. ३ नदी.

**नै**-स्त्री. (फा.) १ बांबूची नळी. २ हुक्कयाची नळी. ३ बांसरी.

**नैक-नैकु**-वि. (फा.) चांगला; प्रामाणिक.

**नैकृतिक**-वि. (सं.) १ निष्ठुर. २ कटुभाषी.

**नैचा**-पु. (फा.) हुक्कयाची नळी.

**नैन**-पु. (सं.) १ नयन. २ लोणी.

**नैनसुख**-पु (सं.) तलम कापड.

**नैर**-पु. (सं.) नगर; देश.

**नैसा**-वि. (सं.) खराब.

**नैहर**-पु. (सं.) माहेर.

**नोक**–स्त्री. ( फा. ) टोंक; अग्र.

**नोकझोंक**–स्त्री. ( फा. ) थाटमाट.

**नोकना**–क्रि.अ. लालचावणें.

**नोकदार**–वि. ( फा. ) १ टोंकदार; तीक्ष्ण. २ आकर्षक. ३ छानदार.

**नोखा**–वि. ( सं. ) १ अनोळखी. २ अद्भूत.

**नोच**–स्त्री. ( सं. ) ओरखडा; बोचकारा.

**नोचखसोट**–स्त्री. ( सं. ) हिसका-हिसकी.

**नोचना**–क्रि स. ( सं. ) १ उपटणे. २ ओरखडणें; बोचकारणें. ३ हिसकावणें.

**नोन**–पु. ( सं. ) मीठ.

**नोनचा**–पु. ( सं. ) लोणचें.

**नोना**–पु. ( सं. ) १ लोणा. २ खारी-मार्ती. ३ सीताफळ.

**नोना**–वि. ( सं. ) १ खारा; खारट. २ सुंदर; लावण्ययुक्त. ३ उत्तम; चांगला.

**नोनिया**–पु. ( सं. ) मिठाचा व्यापारी.

**नोनी**–स्त्री. ( सं. ) १ खारी मार्ती. २ एक भाजी.

**नोनी**–वि.स्त्री. ( सं. ) रूपवती; सुंदर.

**नोर**–वि. ( सं. ) नवीन.

**नौ**–वि. ( सं. ) नऊ.

**नौकरानी**–स्त्री. ( फा. ) मोलकरीण.

**नौज**–अव्य. ( सं. ) ईश्वर न करो; असें न होवो.

**नौतन–नौतम**–वि. ( सं. ) नवीन; नवा.

**नौबत**–स्त्री. ( फा. ) १ पाळी. २ गति; दशा. ३ नौबत; नगारा; चौंघडा.

**नौरोज**–पु. ( फा. ) १ पारशी सण. २ सण. ३ शुभ दिवस.

**नौलक्खा–नौलखा**–वि. ( सं. ) नऊ लाखांचा; बहुमोल.

**नौशा**–पु. ( फा. ) नवरदेव.

**नौशी**–स्त्री. (फा.) वधु.

**नौसत**–पु. ( सं. ) सोळा शृंगार.

**नौसादर**–पु. ( फा. ) नवसागर.

**नौसिख – नौसिखिया**–वि. नव-शिक्या.

**न्याति**–स्त्री. ( सं. ) ज्ञाति.

**न्यार–न्यारा**–वि. ( सं. ) १ जवळ नसलेला; दूरचा. २ विलग; पृथक्. ३ भिन्न; वेगळा; निराळा. ४ अद्भुत; विलक्षण.

**न्यारे**–क्रिवि. ( सं. ) १ दूर; ( जवळ नाहीं ). २ पृथक; अलग; वेगळें.

**न्याव**–पु. ( सं. ) १ न्याय. २ उचित गोष्ट. ३ नियम.

**न्यास**–पु. ( सं. ) १ स्थापना. २ न्यास; समर्पण. ३ ठेव; अनामत. ४ संन्यास.

**न्योछावर**–स्त्री. निछावर पहा.

**न्योतना**–क्रि.स. ( सं. ) निमंत्रण करणें.

**न्योता**–पु. ( सं. ) १ निमंत्रण. २ जेवणावळ. ३ नजराणा.

**न्हाना**–क्रि.अ. ( सं. ) न्हाणें.

---

## प

**पंखड़ी-पंखुड़ी**–स्त्री. ( सं. ) पाकळी.

**पंखी**–पु. ( सं. ) १ पक्षी. २ फुलपाखरूं. ३ पाकळी.

**पँखुड़ा-पँखुरा**–पु. ( सं. ) खांदा.

**पँखेरू**–पु. ( सं. ) पांखरू.

**पंग-पंगा**–वि. ( सं. ) १ पांगळा. २ स्तब्ध.

**पँचमेल**–वि. ( सं. ) १ साधारण. २ पांच पदार्थांची मिसळ.

**पंचालिका**–स्त्री. ( सं. ) पुतळी; बाहुली.

**पंचाली**–स्त्री. ( सं. ) १ बाहुली. २ द्रौपदी. ३ एक गीत. ४ सोंगट्यांचा पट.

**पंछा**–पु. १ झाडांतील चीक किंवा पाणी. २ फोडांतून वाहणारें पाणी; लस.

**पंछाला**–पु. १ फोड. २ फोडांतील पाणी; लस.

**पंछी**–पु. ( सं. ) पक्षी.

**पंजर**–पु. ( सं. ) १ हाडांचा सापळा. २ शरीर. ३ पिंजरा.

**पंजरक**–पु ( सं. ) हारा.

**पंजरी**–स्त्री. ( सं. ) तिरडी.

**पंजा**–पु. ( सं. ) १ पांचांचा समूह. २ पंजा.

**पंजारा**–पु. ( सं. ) १ पिंजारी. २ सूत कातणारा.

**पँजीरी**–स्त्री. ( सं. ) खिरापत.

**पँजेरा**–पु. ( सं. ) डाक लावणारा.

**पंडरा**–पु. ( सं. ) १ नाला; गटार. २ पन्हाळ.

**पँडरा-पँडरू-पँडवा**–पु. म्हशीचें रेडकूं.

**पंडा**–पु. ( सं. ) १ घाटावरचा पंड्या. २ आचारी. ३ बुद्धि; ज्ञान. ४ शास्त्रज्ञान.

**पंडाल**–पु. मांडव.

**पंडाह**–पु. १ नाला. २ पन्हाळ.

**पंथकी पंथिक**–पु. ( सं. ) वाटसरू.

**पंघलाना**–क्रि.स. ( दे. ) फुस लावणें.

**पँवर-पँवरि पँवरी**–स्त्री. ( सं. ) प्रवेशद्वार; फाटक.

**पँवरना**–क्रि.अ. ( सं. ) १ पोहणें. २ थांग लावणें; पत्ता लावणें.

**पँवरिया**-पु. (सं.) १ द्वारपाल. २ देवडीवर बसून मंगल प्रसंगीं गीत गाणारा याचक.

**पँवरी**-स्त्री. (सं.) खडावा.

**पँवाडा**-पु. (सं.) १ अतिशय दीर्घ कथा. २ चऱ्हाट; बढाईखोर लंब्या चवडया बाता. ३ पोवाडा.

**पँवारना**-क्रि.स. (सं.) हटविणें; दूर करणें; फेंकणें.

**पंशाखा**-स्त्री. (सं.) मशाल.

**पंसारी**-पु. (सं.) गंधी; काष्ठौषधें विकणारा.

**पंसासार**-पु. (सं.) फाशांचा खेळ.

**पँसुरी-पँसुली**-स्त्री पसली पहा.

**पँसेरी**-स्त्री. (सं.) पांसरी.

**पइठ**-स्त्री. पैठ पहा.

**पइसना**-क्रि. अ. पैठना पहा.

**पइसार**-पु. (सं.) प्रवेश.

**पउँरि-पउँरी**-स्त्री. १ देवडी. २ पायरी. ३ खडावा.

**पकडना**-क्रि.स. (सं.) पकडणें.

**पकना**-क्रि.अ. (सं.) १ पिकणें. २ शिजणें.

**पकाई**-स्त्री. (सं.) शिजविणें

**पकाना**-क्रि.स. (सं.) १ शिजविणें. २ पिकविणें.

**पकाव**-पु. (सं.) १ शिजणें. २ पिकणे. ३ पू.

**पकौडा**-पु. **पकौडी**-स्त्री. (सं.) १ भजीं. २ वडा.

**पक्का**-वि. (सं.) पक्का (सर्व अर्थ मराठी प्र०)

**पक्खर**-स्त्री. पाखर पहा.

**पक्खर**-वि. (सं.) पक्का; मजबूत.

**पख**-पु. (सं.) १ पंधरवडा; पक्ष. २ अडचण. ३ अट; शर्त. ४ बखेडा. ५ दोष; त्रुटि.

**पखड़ी**-स्त्री. (सं.) पाकळी.

**पखरी**-स्त्री. १ पाखर पहा. २ पँखडी पहा.

**पखराना**-क्रि.अ. (सं.) धुवून घेणें.

**पखवाड़ा-पखवारा**-पु. (सं.) पंधरवडा.

**पखाउज**-पु. (सं.) पखवाज.

**पखान**-पु. (सं.) पाषाण.

**पखाना**-पु. (सं.) कथा; लोककथा.

**पखाना**-पु. (फा.) १ पायखाना. २ विष्टा; मळ.

**पखारना**-क्रि.स. (सं.) धुणें.

**पखावज**-स्त्री. (सं.) पखवाज.

**पखिया**-पु. (सं.) भांडखोर.

**पखी-पखीरी**-पु. (सं.) पक्षी.

**पखुडी-पखुरी**-स्त्री. (सं.) पाकळी.

**पखुवा**-पु. (सं.) बगल.

**पखेरू**-पु. (सं.) पाखरूं.

**पखौआ-पखौटा**-पु. ( सं. ) पंख.

**पखौड़ा-पखौरा**-पु. ( सं. ) खांद्याचें टोक.

**पग**-पु. ( सं. ) पाय.

**पगडंडी**-स्त्री. ( सं. ) पायवाट.

**पगतरी**-स्त्री. ( सं. ) पायतण.

**पगना**-क्रि.अ. ( अ. ) १ पाकणें; पाकांत मुरणें. २ अतिशय अनुरक्त होणें.

**पगनियाँ**-स्त्री. ( सं. ) पायतण.

**पगरा**-पु. ( सं. ) पाऊल.

**पगरा**-पु. ( फा. ) प्रभात.

**पगरी**-स्त्री. ( सं. ) पगडी.

**पगला**-वि. पागल.

**पगहा**-पु. ( सं. ) दावें.

**पगा**-पु. १ पटका. २ पघा पहा. ३ पगरा पहा.

**पगाना**-क्रि.स. ( सं. ) १ पाकविणें; अनुरक्त होणें.

**पगार**-पु. ( सं. ) १ आवाराची भिंत. २ तट. ३ पगार. ४ उथळ पाणी. ५ निसरडें. ६ पायांनी तिंबलेला चिखल.

**पगाह**-पु. ( फा. ) पहाट.

**पगिया**-स्त्री. ( सं. ) पगडी.

**पगुराना**-क्रि.स. ( सं. ) १ रवंथ करणें. २ पचविणें.

**पघैया**-पु. ( सं. ) फेरीवाला.

**पचकना--पचखना**-क्रि.अ. पिचकना पहा.

**पचखना**-वि. पांचमजली.

**पचड़ा**-पु. ( सं. ) १ बखेडा. २ लावणी. ३ लचांड; व्याप.

**पचना**-क्रि.अ. ( सं. ) १ पचणें. २ थकणें. ३ झिजणें.

**पचनागार**-पु. ( सं. ) पाकशाळा.

**पचपच**-स्त्री. ( अनु. ) १ चिखल. २ पचपच आवाज.

**पचपचा**-वि. ( अनु. ) पचपचीत.

**पचमेल**-वि. (सं.) पांच किंवा अनेक प्रकारांची मिसळ; मिश्रण.

**पचरा**-पु. पचड़ा पहा.

**पचलड़ी**-स्त्री. ( सं. ) पांच लडींची माळ.

**पचहरा**-वि. ( सं. ) पांच पदरी.

**पचाना**-क्रि.स. ( सं. ) १ पचविणें. २ शिजविणें.

**पचारना**-क्रि.स. ( सं. ) पाचारण करणें.

**पचाव**-पु. ( सं. ) पचन.

**पचीसी**-स्त्री. ( सं. ) पंचविशी.

**पचौर-पचौली**-पु. ( सं. ) गांवचा पुढारी.

**पचौहर**-वि ( सं. ) पांचपदरी.

**पच्चड़-पच्चर**-स्त्री. ( सं. ) पाचर.

**पच्ची**–स्त्री. (सं.) जडावाचें काम.

**पच्चीकारी**–स्त्री. (सं.) जडावाचें काम.

**पच्छ**–पु. (सं.) पक्ष.

**पछड़ना**–क्रि.अ. (सं.) १ मागें पडणें; रेंगाळणें. २ चीत होणें.

**पछताना**–क्रि.अ. (सं.) पस्तावणें.

**पछतावा**–पु. (सं.) पश्चात्ताप.

**पछवाँ-पछाँहिया**–वि. (सं.) पश्चिमेकडील.

**पछाँह**–वि. (सं.) पश्चिमेकडील प्रदेश.

**पछाड़**–स्त्री. (सं.) १ मूर्च्छा; फीट. २ आमटी.

**पछाड़ना**–क्रि.स. (सं.) १ आपटणें; पाडणें. २ धुणें ह्यापटणें.

**पछाड़ी**–स्त्री. (सं.) पिछाडी.

**पछाया**–पु. (सं.) मागील भाग; पिछाडी.

**पछाही**–वि. (सं.) पाठी मागील.

**पछिआना-पछियाना**–क्रि.स. (सं.) पाठोपाठ जाणें; पाठलाग करणें.

**पछिताप**–पु. (सं.) पश्चात्ताप.

**पछिवाँ-पछुवा**–स्त्री. (सं.) पश्चिमेकडील हवा.

**पछीत**–स्त्री. (सं.) घराची मागील बाजू वा भिंत.

**पछेड़ा**–पु. (सं.) पाठलाग.

**पछेलना**–क्रि.स. (सं.) मागें टाकणें; ओलांडून पुढें जाणें.

**पछेला**–वि. (सं.) मागचा.

**पछोवना**–क्रि.स. (सं.) पाखडणें.

**पजर**–पु. (सं.) १ पाझर. २ झरा.

**पजरना**–क्रि.अ. (सं.) जळणें.

**पजोखा**–पु. मृताबद्दलचा शोक.

**पजोड़ा**–पु. पाजी.

**पटकन**–स्त्री. (सं.) १ आपटी. २ थप्पड. ३ लाठी; काठी.

**पटकना**–क्रि.स. (सं.) १ टाकणें; पाडणें; आपटणें.

**पटकनिया--पटकनी**–स्त्री. (सं.) आपटी.

**पटका**–पु. (सं.) कमरेला बांधण्याचा रुमाल.

**पटकान**–स्त्री. (सं.) आपटी.

**पटक्कार**–पु. (सं.) १ कोष्टी. २ चित्रकार.

**पटड़ा**–पु. पटरा पहा.

**पटड़ी**–स्त्री. पटरी पहा.

**पटतर**–पु. (सं.) १ समता; तुल्यता; उपमा.

**पटतर**–वि. (सं.) सपाट; समतल.

**पटतरना**–क्रि.स. (सं.) बरोबर ठरविणें; उपमा देणें.

**पटतारना**–क्रि.स (सं.) १ शस्त्र सरसावणें. २ जमीन सपाट करणें.

**पटना**–क्रि.अ. (सं.) १ समतल होणें २ रेलचेल होणें; भरून जाणें. ३ पटणें; पसंत पडणें.

**पटनी**–स्त्री. (सं.) १ कायम भाडे-पट्टयाची जमीन. २ सामान ठेवण्याची फळी.

**पटपर**–वि. (सं.) समतल; सपाट.

**पटपर**–पु. (सं.) १ मळीची जमीन. २ उजाड प्रदेश.

**पटबीजना**–पु. (सं.) काजवा.

**पटरा**–पु. (सं.) १ लांकडाचा तक्ता; फळी. २ पाट.

**पटरी**–स्त्री. (सं.) १ फळी. २ लिहि-ण्याची पाटी. ३ फूटपाथ; पदपथ. ४ पायवाट. ५ जरीची किनार. ६ पाटली.

**पटली**–स्त्री. (सं) १ छत; छप्पर. २ पटरी पहा.

**पटवा**–पु. (सं.) १ पटवेकरी. २ तलम ताग.

**पटवाना**–क्रि.स. (सं.) १ जमीन सपाट करविणें. २ छत बनवून घेणें. ३ शिंपडविणें. ४ देणें चुकतें करणें. ५ (दु:ख) शमविणें; दूर करणें.

**पटवारी**–पु. (सं.) पटवारी; गांव-कुलकर्णी.

**पटवारी**–स्त्री. (सं.) कपडे नेस-विणारी दासी.

**पटवास**–पु. (सं.) १ तंबू. २ लेहंगा. ३ सुगंधी द्रव्य.

**पटसन**–वि. (सं.) १ तागाचें झाड; ज्यूट. २तागाचे दोरे. ३तागाचें कापड.

**पटहार**–पु. (सं.) पटवेकरी.

**पटा**–पु. (सं.) पट्टा.

**पटाई**–स्त्री. (सं.) १ जमीन सपाट करणें. २छत घालणें. ३पाणी शिंपडणें.

**पटाका-पटाखा**–पु. (अनु.) १ फटाका. २ थप्पड; फटका.

**पटाना**–क्रि.स. (सं.) १ जमीन सपाट करविणें. २ छत बनविणें. ३ कर्ज फेडणें. ४ भाव ठरविणें.

**पटाना**–क्रि.अ. (सं.) मुग्ध होऊन बसणें.

**पटाव**–पु. (सं.) १ जमीन सपाट करण्याचें काम. २ सपाट केलेली जागा; पाटणी.

**पटिआ पटिया**–स्त्री. (सं.) १ लिहिण्याची पाटी. २ लांकडाची फळी; तक्ता. ३ भांग (केसांचा). ४ पाट. ५ पाटा.

**पटी**–स्त्री. (सं.) १ कापडाची पट्टी. २ पडदा.

**पटीलना**–क्रि.अ. (सं.) १ आपल्या बाजूस करून घेणें. २ कमविणें; प्राप्त करणें. ३ फसविणें. ४ मारणें; ठोकणें. ५ पराभूत करणें. ६ यशस्वीपणें पूर्ण करणें.

**पटु**–वि. (सं.) १ पटु; निपुण. २ लबाड; धूर्त. ३ निष्ठुर. ४ निरोगी. ५ तेजस्वी. ६ प्रचंड. ७ व्यक्त; स्फुट. ८ सुंदर.

**पटुका-पटूका**–पु. (सं.) १ उपरणें. २ शेला ३ चादर.

**पटुवा**–पु. (सं.) १ ज्यूट. २ एक पालेभाजी. ३ पोपट.

**पटेबाज**–पु. (सं.+फा.) १ पट्टा खेळणारा. २ व्यभिचारी.

**पटेर**–पु. (सं.) लव्हाळा.

**पटेरा-पटेला**–पु. (सं.) १ गलबत. २ लव्हाळा. ३ पाट. ४ पाटा.

**पटेली**–स्त्री. (सं.) लहान होडी.

**पटैत**–पु. (सं.) पट्टा खेळणारा.

**पटैला**–पु. (सं.) १ अडसर. २ पटेला पहा.

**पटोर–पटोल**–पु. (सं) १ पडवळ. २ एक प्रकारचें रेशमी कापड.

**पटोरी**–स्त्री. (सं) १ रेशमी साडी. २ रेशीमकाठी धोतर.

**पट्ट**–पु. (सं.) १ पाट. २ लिहिण्याची पाटी. ३ ताम्रपट. ४ तळ; बूड. ५ पट्टी. ६ पट्टा. ७ ढाल. ८ पगडी. ९ नगर. १० चौक. ११ सिंहासन. १२ रेशीम. १३ ज्यूट.

**पट्ट**–वि. (सं.) पट्ट.

**पट्टा**–पु. (सं.) १ पट्टा सर्व मराठी प्र० २ पाट.

**पट्टी**–स्त्री. (सं.) १ लिहिण्याची पाटी. २ पाठ; धडा. ३ उपदेश. ४ पट्टी. ५ पंगत; ओळ. ६ हिस्सा; भाग.

**पट्टीदार**–पु.. (सं+फा.) पातीदार; हिस्सेदार.

**पट्टू**–पु. (सं.) एक प्रकारचें लोकरीचें कापड.

**पट्ठा**–पु. (सं.) १ जवान; तरुण. २ तालीमबाज; पठ्ठा. ३ लांब रुंद व जाडजूड पान. ४ स्नायु. ५ मोठी नस. ६ पुठ्ठा; कुल्ला.

**पट्ठापछाड़**–वि. स्त्री. अतिशय धिप्पाड स्त्री.

**पठक**–पु. (सं.) शिकणारा.

**पठनेटा**–पु. पठाणयुवक.

**पठवाना-पठाना**–क्रि.स. पाठविणें.

**पठावन**–पु. दूत; निरोप्या.

**पठावनि-पठावनी**–स्त्री. (स.) पाठवणी; रवानगी.

**पठिना**–स्त्री. (सं.) तरणी बांड स्त्री.
**पठौनी**–स्त्री. (सं.) पाठवणी; रवानगी.
**पडछती-पडछत्ती**–स्त्री. (सं.) १ माळा. २ छप्पर; वळचण.
**पडता**–पु. (सं.) किंमत; एकाद्या वस्तूला एकूण लागलेला खर्च.
**पडताल**–स्त्री. (सं.) १ पडताळा. २ तपासणी; निरीक्षण. ३ पिकाची पाहणी.
**पडती**–स्त्री. (सं.) पडीत जमीन.
**पडना**–क्रि.अ. (सं.) पडणें सर्व अर्थ मराठी प्र.
**पड़पोता**–पु. (सं.) पणतू.
**पड़वा**–पु. (सं.) पाडवा.
**पडाव**–पु. (सं.) १ मुक्काम; तळ. २ मुक्कामाची जागा.
**पडिया**–पु. (दे.) पारडी.
**पडिवा**–पु. (सं.) पाडवा.
**पडोरा**–पु. (सं.) पडवळ.
**पडोस**–पु. (सं.) शेजार.
**पडोसी-पडौसी**–पु. (सं.) शेजारी.
**पढना**–क्रि.स. (सं.) १ शिकणें. २ वाचणें. ३ घोकणें. ४ उच्चारणें.
**पढाई**–स्त्री. (सं.) १ विद्याभ्यास. २ अध्यापन. ३ शिकविण्याची कला.
**पण**–पु. (सं.) १ पण; प्रतिज्ञा. २ द्यूत. ३ किंमत; मूल्य. ४ धन; संपत्ति. ५ शुल्क. ६ व्यापाराचा माल ७ व्यवहार; व्यापार. ८ स्तुति; प्रशंसा.
**पतंग**–पु. (सं.) १ पतंग. २ पक्षी. ३ सूर्य. ४ ठिणगी.
**पतंगकुरी**–स्त्री. (सं.) चुगलखोर.
**पतंगा**–पु. (सं.) १ फुलपाखरूं. २ २ ठिणगी.
**पत**–स्त्री. (सं.) पत.
**पतझड़-पतझर-पतझल-पतझाड़-पतझार**–स्त्री.१ (सं.) शिशिरऋतु. २ दारिद्र्यावस्था.
**पतत्र**–पु. (सं.) १ पंख. २ पीस. ३ वाहन.
**पतत्रि-त्री**–पु. (सं.) पक्षी.
**पतनार**–पु. पऱ्हाळः नाला.
**पतर**–पु. (सं.) १ पान; पर्ण. २ पत्रावळ;
**पतर-पतरा**–वि. (सं.) १ पातळ; २ कृश; सडपातळ.
**पतर-पतरा**–वि. (सं.) पत्रावळ.
**पतरी**–स्त्री. (सं.) पत्रावळ.
**पतला**–वि. (सं.) पातळ.
**पतलून**–स्त्री. (इं.) पाटलोण.
**पतलो**–स्त्री. (दे.) छपराचे गवत व पाचोळा इ.

**पतवर**-क्रिवि. ( सं. ) क्रमवार; ओळीनें.

**पतवा**-पु. ( सं. ) माचण.

**पतवार-पतवाल**-स्त्री. (सं.) सुकाणु.

**पतवारी**-स्त्री. ( सं. ) १ उसाचें शेत. २ सुकाणु.

**पता**-पु. ( सं. ) १ पत्ता; ठिकाण. २ तपास; शोध. ३ माहिती; ४ रहस्य; गूढ.

**पताई**-स्त्री. ( सं. ) पालापाचोळा.

**पताका**-स्त्री. ( सं. ) पताका; ध्वज.

**पतार-पताल**-पु. (सं.) १ पातळ. २ घनदाट अरण्य.

**पतारी**-स्त्री. ( दे. ) एक पक्षी.

**पतावर**-पु. ( सं. ) सुकलेलीं पानें.

**पतिआना**-क्रि.स. ( सं. ) विश्वास टाकणें.

**पतिआर**-पु. विश्वास.

**पतितव्य**-वि. ( सं. ) पडणारा.

**पतिदेवा**-स्त्री. ( सं. ) पतिव्रता.

**पतीजना-पतीनना**-क्रि. अ. पतिआना पहा.

**पतीर**-स्त्री. (सं.) ओळ; पंगत.

**पतील-ला**-वि. पतला पहा.

**पतीली**-स्त्री. ( सं. ) १ पातेलें. २ २ पितळ वा तांब्याचा गुंड.

**पतुकी**-स्त्री. ( सं. ) मडकें.

**पतुरिया**-स्त्री. ( सं. ) वेश्या.

**पतुली**-स्त्री. ( सं. ) मनगटावर बांधण्याचा एक दागिना.

**पतोखा**-पु. ( सं. ) द्रोण.

**पतोखी**-स्त्री. ( सं. ) १ द्रोण. २ पानांची छत्री.

**पतोह-पतोहू**-स्त्री. सून.

**पत्तर**-पु. ( सं. ) १ पत्रा. २ पत्रावळ.

**पत्तल**-स्त्री. ( सं. ) पत्रावळ.

**पत्ता**-पु. ( सं. ) १ पान; पर्ण. २ पत्रा. ३ पत्ता ( खेळण्याचा ).

**पत्ता**-वि. ( सं. ) अतिशय हलका.

**पत्ती**-स्त्री. ( सं. ) २ लहान पान. २ पाती; हिस्सा. ३ पाकळी. ४ भांग.

**पत्तीदार**-पु. ( सं.+फा. ) पातीदार.

**पत्थर**-पु. ( सं. ) पत्थर; दगड.

**पत्थरचटा**-वि. १ कृपण. २ कूपमंडूक.

**पत्र**-पु. (सं.) पत्र सर्व अर्थ मराठी प्र.

**पत्रा**-पु. ( सं. ) १ पंचांग. २ बेगड; वर्ख.

**पथरना**-क्रि.स. ( सं. ) धार लावणें.

**पथराना**-क्रि.अ. ( सं. ) १ सुकून दगड बनणें. २ टवटवी जाणें. ३ स्तब्ध होणें; जड होणें.

**पथरी**-स्त्री. (सं.) १ दगडी. २ मूतखडा. ३ चकमकीचा दगड. ४ धारेचा दगड. ५ कुरुंदाचा दगड. ६ एक वृक्ष.

**पथरीला**-वि. (सं.) खडकाळ.

**पथरौटी**-स्त्री. (सं.) दगडाची कुंडी; दगडी.

**पथिकाश्रय**-पु. (सं.) धर्मशाळा.

**पथेरा**-पु. (सं.) कुंभार.

**पथौरा**-पु. (सं.) गोवऱ्या करण्याची जागा.

**पदर**-पु. (दे.) १ एक वृक्ष. २ दवडीवाल्याची बसण्याची जागा.

**पदात-पदाति**-पु. १ पायीं चालणारा. २ पायदळ शिपाई.

**पदारिका**-स्त्री. (सं.) पायदळ सेना.

**पदाना**-क्रि.स. (सं.) १ पादविणें. २ पदविणें.

**पदार**-पु. (सं.) पायधूळ.

**पदिक**-पु. (सं.) १ पायदळ. २ ताईत. ३ हिरा. ४ रात्र. ५ पदक.

**पदी**-पु (सं.) पायदळ शिपाई.

**पधरना**-क्रि.अ. (सं.) आगमन होणें; येणें.

**पधराना**-क्रि.स. (सं.) आदरपूर्वक घेऊन जाणें; सन्मानानें बसविणें.

**पधारना**-क्रि.अ. (सं.) १ जाणें; गमन करणें. २ येणें; येऊन पोहोचणें.

**पधारना**-क्रि.स. (सं.) सन्मानपूर्वक बसविणें.

**पन**-पु. (सं.) पण; प्रतिज्ञा.

**पनकपडा**-पु. (सं.) जखमेवर बांधण्याची ओली पट्टी.

**पनघट**-पु. (सं.) पाणवठा; नदीचा घाट.

**पनडुब्बा**-पु. (सं.) १ पाणबुड्या. २ पाण्यांतील भूत. ३ पाणबुड्या पक्षी.

**पनडुब्बी**-स्त्री. (सं.) पाणबुडी बोट.

**पनपना**-क्रि.अ. (सं.) १ टवटवीत होणें; प्रकृति पुन्हा सुधारणें.

**पनपनाहट**-स्त्री. (अनु.) फणफण आवाज.

**पनबट्टा**-पु विडयाच्या पानांचा डबा.

**पनवाड़ी-पनवारी**-स्त्री. (सं.) पानमळा.

**पनवाड़ी-पनवारी**-पु (सं.) पानपट्टीवाला; तांबोळी.

**पनवारा**-पु. (सं.) १ पत्रावळ. २ एक ताटभर जेवण.

**पनसल्ला**-स्त्री. (सं.) पाणपोई.

**पनसार**-स्त्री. (सं.) पाणपोई.

**पनसारी**-पु. पंसारी पहा.

**पनहरा**-पु (सं.) पाणक्या.

**पनहा**-पु. (सं.) १ पन्हा; रुंदी. २ मर्म; तात्पर्य. ३ चोरीचा तपास लावणारा. ४ चोरी सांपडविण्याचें बक्षीस.

**पनहारा**–पु. ( सं. ) पाणक्या.

**पनहियाभद्र**–पु. ( सं. ) खेटरपूजा

**पनही**–पु. ( सं. ) जोडा; पादत्राण.

**पना**–पु. (सं.) पन्हें (कैरी वा चिंचेचें).

**पनाती**–पु. ( सं. ) पणतू.

**पनारा-पनाला**–पु. परनाला पहा.

**पनासना**–क्रि.स. ( सं. ) पोसणें.

**पनाह**–स्त्री. ( फा.) १ बचाव; रक्षण. २ आश्रय किंवा रक्षण मिळण्याचें ठिकाण.

**पनियाँ**–पु. ( सं.) १ पाण्यांत राहणारा. २ पाणी मिसळलेला. ३ पाण्यांत होणारा. ४ पाण्याशीं संबंध असलेला.

**पनिहा**–वि. (सं.) १ पाण्यांत राहणारा. २ पाणचट; पाणी मिसळलेला. ३ पाण्यासंबंधी.

**पनहार**–पु. ( सं. ) पाणक्या.

**पनीर**–पु.(फा.) १ नासविलेलें दूध. २ चक्का.

**पनीरी**–स्त्री. ( दे. ) १ झाडांचीं रोपें २ रोपांचें अळें.

**पनीला**–वि. ( सं. ) पाणचट; जलयुक्त;

**पनुआँ**–पु. काहिलीला चिकटलेल्या गुळाचें सरबत.

**पनुआँ**–वि. पाणचट.

**पनेथी**–जाड रोटी.

**पनेरी**–स्त्री. पनीरी पहा.

**पनेरी**–पु.पानपट्टीवाला;पानें विकणारा.

**पनैला**–पु. १ अस्तराचें कॅनव्हास. २ मेणकापड.

**पनौटी**–स्त्री. ( सं. ) पानदान.

**पन्ना**–पु. (सं.) १ पाचू. २ वर्ख.

**पन्नी**–स्त्री. १ बंगड २ एक खाद्य पदार्थ. ३ एक प्रकारचें गवत.

**पपटा**–पु. ( दे. ) १ पपडा पहा. २ पाल.

**पपडा**–पु. ( सं. ) १ ढलपा. २ पापुद्रा.

**पपडियाना**–क्रिअ. ( सं. ) १ पापुद्रा. २ पापुद्रे सुटणें; पोपडा येणें.

**पपडी पपरी**–स्त्री. ( सं. ) १ खपली. २ पोपडा. ३ पापडी. ४ ढलपी.

**पपनी**–स्त्री. ( सं. ) पापणीचे केंस.

**पपहा**–पु. ( दे. ) १ पिकावरील किडा. २ धान्यांतील किडा.

**पपिहरा-पपिहा-पपीहा**–पु ( दे.) चातक.

**पपीता**–पु. ( दे. ) पोपयी.

**पपैया**–पु. १ पोपयी. २ शिट्टी. ३ आंब्याचें रोपटें.

**पपोटा**–पु. ( सं. ) पापणी.

**पपोलना**–क्रि.अ. चघळणें.

**पयार-ल**–पु. ( सं. ) कडबा.

**परंच**-अव्य. ( सं. ) १ आणखी. २ तरीही. ३ परंतु.

**परंदा**-पु. ( फा. ) पक्षी. २ होडी.

**परंपर-परंपरा**-पु. ( सं. ) १ परंपरा. २ हिंसा; वध.

**पर**-अव्य. ( सं. ) १ पण; परंतु. २ पश्चात; नंतर.

**पर** वि. ( सं. ) १ अन्य; पर. २ मित्र. ३ श्रेष्ठ.

**पर**-पु. ( फा. ) पंख.

**परई**-स्त्री. ( सं. ) परळ.

**परकटा**-वि. ( फा.+सं. ) पंख कापलेला.

**परकना**-क्रि.अ. ( सं ) १ परिचित होणें; मिळून जाणें. २ चट लागणें; संवय होणें.

**परकसना**-क्रि.अ. ( सं. ) १ प्रकाशणें. २ प्रकटणें.

**परकार**-पु. ( फा. ) १ कंपास. २ प्रकार.

**परकाल**-पु. ( फा. ) कंपास.

**परकाला**-पु. ( सं. ) १ शिडी; जिना. २ चौकट; प्रवेशद्वार. ३ उंबरा.

**परकाला**-पु. ( फा. ) १ खंड; तुकडा. २ कांचेचा तुकडा. ३ ठिणगी.

**परकास**-पु. ( सं. ) प्रकाश.

**परकोटा**-पु. १ तट. २ बांध. ३ ३ आवाराची भिंत.

**परखना**-क्रि.स. ( सं. ) १ पारखणें. २ मार्गप्रतीक्षा करणें.

**परखाना**-क्रि.स.(सं.)पारख करविणें.

**परखरी**-स्त्री. पखडी पहा.

**परखैय्या**-पु. ( सं. ) पारख करणारा.

**परग**-पु. ( सं. ) पाऊल.

**परगसना**-क्रि.अ. ( सं. ) प्रकाशणें; प्रकट होणें.

**परचइ-परचै**-स्त्री. ( सं. ) परिचय.

**परचना**-क्रि.अ. ( सं. ) १ दाट परिचय होणें. २ सोकावणें.

**परचा**-पु. १ कागदाचा तुकडा. २ चिठ्ठी; पत्र. ३ प्रश्नपत्रिका; पेपर.

**परचा**-पु. ( सं. ) १परिचय. २ पारख; परीक्षा. ३ प्रमाण.

**परचा**-पु. ( दे. ) पुजारी.

**परचाना**-क्रि.स. ( सं. ) १ दाट परिचय करणें. २ सवकाविणें.

**परचार**-पु. ( सं. ) प्रचार.

**परचून**-पु. ( सं. ) १ शिधा. २ किराणा जिन्नस.

**परचूनी**-पु. ( सं. ) किराणा माल विकणारा.

**परचे-परचै**-पु. परिचय.

**परछंद**-वि. ( सं. ) पराधीन.

**परछत्ती**-स्त्री ( सं. ) १ माळा. २ गवताचें छप्पर.

**परछन**–स्त्री. ( सं. ) वरातीनंतर वरास ओवाळणें.

**परछा**–पु. १ मोठें तपेलें. २ कढई. ३ मातीचें भांडें. ४ खिंडार; फट; पोकळी; विरळता ( कांहीं वस्तू गळाल्यामुळें). ५ विरळपणा. ६ समाप्ति; फैसला; निकाल.

**परछाईं**–स्त्री. ( सं. ) पडछाया; प्रतिबिंब.

**परजन-परिजन**–पु. परिजन; परिवार

**परजना**–क्रि.अ. ( सं. ) १ जळणें. २ क्रुद्ध होणें.

**परजात**–पु. ( सं. ) १ कोकिळ. २ परजात; दुसरी जात.

**परजाता**–पु. ( सं. ) पारिजातक.

**परजाय**–पु. ( सं. ) १ पर्याय. २ क्रम; परंपरा. ३ मोका; ओघ; संधि. ४ प्रकार; तऱ्हा.

**परणना**–क्रि.स. ( सं. ) विवाह करणें.

**परतः**–अव्य. ( सं. ) पश्चात; नंतर.

**परत**–स्त्री. ( सं. ) १ थर; लेप. २ घडी. ३ पापुद्रा.

**परतच्छ**–वि. ( सं. ) प्रत्यक्ष.

**परतल**–पु. ( सं. ) घोड्याच्या पाठीवरील गोणी.

**परताल**–स्त्री. पडताल पहा.

**परती**–स्त्री. ( सं. ) १ पडीत जमीन. २ वारवण्याची चादर.

**परतीत**–स्त्री. १ ( सं. ) प्रतीति; विश्वास. २ प्रसन्नता.

**परतेजना**–क्रि.स. ( सं. ) त्यागणें.

**परतोली**–स्त्री. ( सं. ) गल्ली.

**परत्र**–क्रिवि. ( सं. ) १ दुसऱ्या जागीं. २ परलोकीं.

**परदा**–पु. ( सं. ) पडदा.

**परदाज़**–पु. ( फा. ) सजावट.

**परदादा**–पु. ( फा. ) पणजोबा.

**परन**–स्त्री. ( सं. ) १ पण: प्रतिज्ञा. २ पान; पर्ण.

**परन**–स्त्री. ( सं. ) संवय; खोड.

**परनाना**–पु. ( सं. ) पणजोबा.

**परनाम**–पु. ( सं. ) प्रणाम.

**परनाली**–स्त्री. ( सं. ) मोरी; गटार.

**परनि**–स्त्री. संवय; खोड.

**परनी**–स्त्री. ( सं. ) बेगड.

**परनौत**–स्त्री. ( सं. ) प्रणाम.

**परपंच**–पु. ( सं. ) प्रपंच.

**परपंचक-परपंची**–वि. लबाड; धूर्त; कपटी.

**परपट**–पु. ( सं. ) सपाटमैदान.

**परपराना**–क्रि.अ. ( दे. ) झोंबणें; तिखट लागणें.

**परपराहट**–स्त्री. ( दे. ) चुणचुण; आग.

**परपाजा**–पु. ( सं. ) प्रपितामह.

**परपार**–पु. ( सं. ) पैलतीर.

**परपूठा**-वि. (सं.) पक्का.

**परबस**-वि. (सं.) परवश.

**परबी**-स्त्री. (सं.) पर्वकाल.

**परबोधना**-क्रि.स. (सं.) १ जागे करणें. २ उपदेश करणें. ३ सांत्वन करणें.

**परमा**-स्त्री (सं.) शोभा; सौंदर्य.

**परमा**-पु. (सं.) प्रमेह; परमा.

**परमाह**-पु. (सं.) शुभदिन.

**परला**-वि. (सं.) पलीकडील.

**परवरदिगार**-पु. (फा.) १ पालनकर्ता. २ ईश्वर.

**परवरिश**-स्त्री. (फा.) पालनपोषण.

**परवल**-पु. (सं.) १ पडवळ. २ तोंडल्यासारखी एक फळभाजी.

**परवस्ती** स्त्री. (फा.) पालनपोषण.

**परवा**-पु. (सं) मातीचें भांडे.

**परवा**-स्त्री. (सं.) प्रतिपदा; पाडवा.

**परवा**-स्त्री. (फा.) परवा; फिकीर.

**परवान**-पु. (सं.) प्रमाण.

**परवाना**-पु. (फा.) १ परवाना. २ पतंग (किडा).

**परवाह**-स्त्री. (फा.) परवा; फिकीर.

**परवीन**-वि. (सं.) प्रवीण.

**परवेख**-पु (सं.) चंद्राभोवतींचें खळें.

**परश-परस**-पु. (सं.) १ परीस. २ स्पर्श.

**परसन**-पु.(सं.) स्पर्श करणें; शिवणें.

**परसन**-वि. (सं.) प्रसन्न.

**परसना**-क्रि.स. (सं.) १ स्पर्श करणें; शिवणें. २ (भोजनाचें पदार्थ) वाढणें.

**परसा**-पु. (सं.) १ परशु. २ एक वेळचें जेवणाचें पान.

**परसाल**-अव्य. (सं.+फा.) १ गतवर्षी. २ पुढील वर्षी.

**परसु**-पु. (सं.) परशु.

**परसों**-अव्य. (सं.) परवां.

**परहेज**-पु. (फा.) १ पथ्य. २ संयम.

**परहेजगार**-पु. (फा.) १ संयमी. २ पथ्य करणारा.

**परहेलना**-क्रि.स. (सं.) तिरस्कार; अवहेलना.

**परांचा**-पु. (फा.) १ फळी. २ पहाड; परांची.

**परांज-परांजन**-पु. १ तेलाचा घाणा. २ सुरीचें पातें. ३ फेंस.

**परांठा**-पु. (सं.) तुपावर भाजलेली पोळी.

**परागना**-क्रि.अ. (अनु.) अनुरक्त होणें.

**पराना**-क्रि.अ. (सं.) पळणें.

**पराया-परार**-वि (सं.) १ परका. २ दुसऱ्याचा.

**परावन**-पु. ( सं. ) प्रयाण; पलायन.

**परावर**-वि. ( सं. ) १ सर्वश्रेष्ठ. २ मागला पुढला; इकडला तिकडला; जवळचा दूरचा.

**परास्त**-वि. ( सं. ) पराजित.

**परिंदा**-पु. (फा. ) पक्षी.

**परिखना**-क्रि.स. ( सं. ) १ पारखणें; परीक्षा करणें. २ प्रतीक्षा करणें; वाट पहाणें.

**परिखा**-स्त्री. ( सं. ) खंदक.

**परिगत**-वि. ( सं. ) १ गत. २ मृत. ३ विस्मृत. ४ ज्ञात. ५ प्राप्त. ६ वेष्टित.

**परिगृह्या**-स्त्री. ( सं. ) पत्नी.

**परिजप्त**-वि. ( सं. ) मुग्ध; मोहित.

**परिजा**-स्त्री. ( सं. ) उगमस्थान.

**परिज्ञप्ति**-स्त्री. ( सं. ) १ बातचीत. २ ओळख.

**परिणाह**-पु. ( सं. ) १ विस्तार. २ दीर्घश्वास.

**परिदर्शन**-पु. ( सं. ) सूक्ष्म अवलोकन; पाहणें.

**परिदान**-पु. ( सं. ) परत देणें.

**परिदाप**-पु. (सं. ) सुगंध.

**परिदेव**-पु. ( सं. ) विलाप.

**परिधन**-पु. धोतर; पंचा इ.

**परिधान**-पु. ( सं. ) नेसणें; वस्त्र.

**परिनिष्ठा**-स्त्री. ( सं. ) पराकाष्ठा.

**परिबोधन**-पु. ( सं. ) जाणीव; समज. सूचना.

**परिभक्ष**-वि. (सं. ) पैसे खाऊ.

**परिभव-परिभाव**-पु. ( सं. ) अपमान; अनादर.

**परिभावन परिभावना**-पु. ( सं. ) १ मीलन; संयोग. २ चिंता.

**परिभाषक**-वि. ( सं. ) निंदक.

**परिभाषण**-वि. (सं. ) १ निंदाव्यंजक भाषण. २ भाषण. ३ नियम; कायदा.

**परिभाषा**-स्त्री. ( सं. ) १ व्याख्या. २ निरनिराळ्या शास्त्रांची विशिष्ट भाषा; परिभाषा. ३ निंदा.

**परिभाषी**-पु. (सं. ) बोलणारा.

**परिभ्रंश**-पु. ( सं. ) १ पतन; च्युति; स्खलन. २ पलायन.

**परिभ्रम**-पु. ( सं. ) १ भ्रमण; फिरणें; २ भ्रम; भ्रांति.

**परिमंथर**-वि. अतिशय धिम्मा.

**परिमन्यु**-वि. (सं.) क्रोधायमान.

**परिमर**-पु. ( सं. ) वायु.

**परिमाण**-पु. ( सं. ) १ परिमाण. २ विस्तार; घेर.

**परिमाता**-पु. ( सं. ) मोजणारा.

**परिमार्गन**-पु. ( सं.) शोधणें.

**परिमितकथा**-वि. ( सं. ) मोजकें बोलणारा.

**परिमूढ**–वि. (सं.) १ व्याकूळ. २ क्षोभित. ३ विचलित.

**परिमोष**–पु. (सं.) चोरी.

**परिमोहन**–पु. (सं.) वशीकरण.

**परियत्त**–वि. (सं.) परिवेष्टित.

**परिरंभ-परिरंभण**–पु. आलिंगन.

**परिरथ्या**–पु. (सं.) मोठा रस्ता.

**परिरोध**–वि. (सं.) अडकाठी.

**परिलंघ-परिलंघन**–पु. (सं.) उडी मारणें; ओलांडणें.

**परिलिखन**–पु. (सं.) घासून गुळगुळीत करणें.

**परिलिखित**–वि. (सं.) परिवेष्टित; रेखांकित.

**परिलेख**–पु. (सं.) १ आराखडा; स्केच. २ चित्र. ३ कुंचली; ब्रश. ४ वर्णन; उल्लेख.

**परिलेखना**–क्रि स. (सं.) समजणें; मानणें.

**परिलोप**–पु. (सं.) नाश; हानि.

**परिवदन**–पु. (सं.) निंदा.

**परिवा**–पु (सं.) पाडवा.

**परिवाद**–पु. (सं) १ निंदा; प्रवाद. २ नखी.

**परिवादक**–पु. (सं.) १ निंदक. २ सतारिया

**परिवास**–पु. (सं.) १ मुक्काम. २ घर. ३ सुगंध.

**परिवीत-परिवृत**–वि. (सं.) वेष्टिलेला; झांकलेला.

**परिवृत-त्त**–वि. (सं.) वेष्टिलेला; झांकलेला.

**परिस्तान**–पु. (फा.) अप्सरांचें राहण्याचें स्थान.

**परीजाद**–वि. (फा.) अतिशय सुंदर.

**परीभाव**–पु. परिभाव पहा.

**परीरु**–वि. (फा.) अत्यंत सुंदर; सुस्वरूप.

**परीशान**–वि. (फा.) हैराण; त्रस्त.

**परुआ**–पु. (दे.) अपमानाचा बदला.

**परुस**–वि. (सं.) परुष; कठोर.

**परे**–अव्य. (सं.) १ पलीकडे. २ वेगळा; अलग. ३ नंतर. ४ याहिपेक्षां (जास्त).

**परेई**–स्त्री. (सं.) पारव्याची मादी.

**परेखना**–क्रि.स. (सं.) पारखणें.

**परेखा**–स्त्री. (सं.) परीक्षा.

**परेग**–स्त्री. (सं.) १ कांटा; कुसळ. २ लोखंडाची खीळ.

**परेर**–पु. (सं.) आकाश.

**परेवा**–पु. (सं.) १ पारवा. २ कबूतर. ३ संदेशवाहक.

**परेशान**–वि. (फा.) उद्विग्न; त्रस्त.

**परों**–क्रिवि. (सं.) परवां.

**परोना**–क्रि.स. पिरोना पहा.

**परोरना**–क्रि.स. मंतरणें.

**परोस**–पु. पडोस पहा.

**परोसना**–क्रि.स. जेवण वाढणें; वाढणें.

**परोसा**–पु. ( सं. ) एक ताटभर अन्न.

**परोसी**–पु. पडोसी पहा.

**परोसैया**–पु. ( सं. ) वाढपी.

**परोहन**–पु. ( सं ) वाहन

**परोहा**–पु. ( दे. ) मोट.

**पर्कार-पकोल**–पु. परकार पहा.

**पर्चा**–पु. परचा पहा.

**पर्त**–परत पहा.

**पर्दनी**–स्त्री. ( सं. ) धोतर.

**पर्यय**–पु. ( सं. ) विपर्यय.

**पर्यवरोध**–पु. ( सं. ) बाधा; विघ्न.

**पर्यास**–पु. ( सं. ) १ पतन. २ नाश. ३ वध.

**पर्वणी**–स्त्री. ( सं. ) १ पौर्णिमा. २ एक नेत्र रोग.

**पर्वती**–वि. ( सं. ) पर्वतासंबंधी.

**पर्वरिश**–स्त्री. ( फा. ) पालनपोषण.

**पर्वा-पर्वाह**–स्त्री. ( फा. ) पर्वा.

**पर्हेज**–पु. ( फा. ) पथ्य.

**पलंगडी**–स्त्री. ( सं. ) लहान पलंग.

**पलंगतोड़**–वि. ( सं. ) आळशी.

**पलंगतोड**–पु. एक औषधी वनस्पती.

**पल**–पु. ( सं. ) १ पळ. २ पापणी. ३ मांस.

**पलई**–स्त्री. १ कोवळी फांदी; डहाळी. २ अंकुर. ३ झाडाचा शेंडा.

**पलक**–स्त्री. ( सं. ) १ पाकळी. २ क्षण; निमिष.

**पलकदरिया-याव-पलकनेवाज**–वि. ( सं.+फा. ) दानशूर.

**पलका**–पु. ( सं. ) पलंग.

**पलटना**–क्रि.अ. ( सं. ) १ पालटणें; २ उलटणें; उपडें होणें. परतणें; परत फिरणें.

**पलटा**–पु. ( सं. ) १ बदला. २ उलथणें. ३ पलटा ( संगीतांतील; कुस्तींतील पेंच ).

**पलटे**–क्रिवि. ( सं. ) ऐवजीं; बद्दल.

**पलड़ा**–पु. ( सं. ) तराजूचें पारडें.

**पलथी**–स्त्री. ( स. ) एक प्रकारचें आसन; स्वस्तिकासन.

**पलना**–क्रि.अ. १ ( सं. ) पालनपोषण होणें; वाढणें. २ खाऊनपिऊन पुष्ट होणें.

**पलनाना**–क्रि.स. घोड्यावर जीन घालून स्वारीस तयार करणें.

**पलवा-पलवान**–पु. १ उसाच्या शेंड्याकडील भाग. २ ऊसाचें वाढें. एक प्रकारचें गवत.

**पलवाना**–क्रि.स. ( सं. ) पालन करविणें.

**पलवारी**–पु. ( सं. ) नावाडी.

**पलवाल**-वि. ( सं. ) धष्टपुष्ट.

**पलवैया**-पु. ( सं. ) पालक.

**पलहना**-क्रि.अ. ( सं. ) पल्लवित होणें; टवटवणें.

**पलहा**-पु. ( सं. ) पल्लव; अंकुर.

**पला**-पु. ( सं. ) १ पारडें. २ पदर. तेलाची पळी.

**पलान**-पु. ( सं. ) जीन; माकण.

**पलाना**-क्रि.अ. क्रि.स. १ पळणें. २ पळविणें; पिटाळणें.

**पलानी**-स्त्री. ( सं. ) १ छप्पर. २ पलान पहा.

**पलाश-स**-पु. ( सं. ) पळस.

**पली**-स्त्री. ( सं. ) पळी.

**पलीत**-पु. ( फा. ) भूत; प्रेत; सैतान.

**पलीत**-वि. ( फा. ) सैतान; दुष्ट.

**पलीता**-पु. ( फा. ) पलीता.

**पलीद**-वि. ( फा. ) १ अपवित्र; घाणेरडा. २ नीच.

**पलीद**-पु. ( फा. ) भूत; प्रेत.

**पलुआ**-वि ( सं. ) पाळीव.

**पलुहना**-क्रि.स. ( सं. ) पल्लवित होणें; टवटवणें.

**पलेडना**-क्रि.स. ( सं. ) ढकलणें.

**पलेथन-पलोथन**-पु. ( सं. ) पिठी; सारण.

**पलोटना**-क्रि.स. ( सं. ) १ पाय चुरणें; सेवा करणें. २ उलथें करणें; पलटणें.

**पलोटना**-क्रि.अ. ( सं. ) तडफडणें.

**पल्ला**-क्रिवि. ( सं. ) दूर; लांब.

**पल्ला**-पु. ( सं. ) १ पदर. २ अंतर; पल्ला. ३ कवाड; झडप. ४ पल्ला ( माप ). ५ पारडें. ६ कात्रीचें पातें.

**पल्लेदार**-पु. ( सं.+फा. ) धान्य वाहणारा. २ धान्य मोजणारा.

**पवनी**-स्त्री. ( सं. ) बलुतेदार.

**पवाई**-स्त्री. ( सं. ) १ जात्याची तळी. २ जोडा.

**पवाना**-क्रि.स. ( सं. ) भोजन करविणें.

**पवेरना**-क्रि.स. बी पेरणें.

**पवेरा**-पु. पेरणी.

**पशम-पश्म**-स्त्री. ( फा. ) १ उंची लोंकर. २ तुच्छ वस्तु.

**पशमीना-पश्मीना**-पु. ( फा. ) लोंकर; लोकरीचें कापड.

**पश्त**-पु. खांब.

**पश्ता**-पु. ( फा. ) किनारा; तट.

**पसारना**-क्रि.स. ( सं. ) धुणें.

**पसंगा**-पु. ( फा. ) पासंग.

**पसंगा**-वि. ( फा. ) अल्प.

**पसंद**-वि. ( फा. ) पसंत.

**बाहाँजोरी**–क्रिवि. ( सं. ) हाताला हात मिळवून.
**बाहिज**–वि. ( सं. ) वरवरचा; बाहेरील.
**बाही**–स्त्री. ( सं. ) बाँह पहा.
**बिंग**–पु. ( सं. ) टोमणा; व्यंगोक्ति.
**बिंजन**–पु. ( सं. ) खाद्यपदार्थ.
**बिंद**–पु. ( सं. ) १ बिंदु. २ दोन भिवयांमधील जागा. ३ बिंदी.
**बिंदा**–पु. ( सं. ) १ कपाळावरील टिळा. २ टिळा.
**बिंदी**–स्त्री. ( सं. ) १ बिंदु; शून्य. २ टिकली.
**बिंधना**–क्रि.अ. ( सं. ) १ भोंक पडणें. २ फसणें; अडकणें.
**बिंधिया**–पु. ( सं. ) मोत्यांना भोकें पाडणारा.
**बि**–वि. ( सं. ) दोन.
**बिआना**–क्रि.स. ( सं. ) विणें.
**बिआहना**–क्रि.स. ब्याहना पहा.
**बिकना**–क्रि.अ. ( सं. ) विक्री होणें.
**बिकरार**–वि. (फा.) विक्राळ.
**बिकलाना**–क्रि.अ. व्याकूळ होणें.
**बिकवाना**–क्रि.अ. ( सं. ) विकविणें.
**बिकाऊ**–वि. ( सं. ) विकाऊ.
**बिकाना**–क्रि.अ. बिकना पहा.
**बिकार**–पु. विकार; विकृति.

**बिक्री**–स्त्री. ( सं. ) विक्री.
**बिकरू**–वि. ( सं. ) विकाऊ.
**बिख**–पु. ( सं. ) विष.
**बिखरना**–क्रि. अ. विखुरणें.
**बिगड़ना**–क्रि.अ. ( सं. ) १ बिघडणें. २ रागावणें.
**बिगड़ेदिल**–वि. ( सं. + फा. ) १ चिडखोर. २ बिघडलेला; वाम मार्गाला गेलेला.
**बिगड़ैल**–वि. ( सं. ) १ हट्टी. २ बिगडेदिल पहा.
**बिगर** वि. ( अ. ) विना; बिगर.
**बिगरना**–क्रि.अ. बिगडना पहा.
**बिगराइल–बिगरायल**–वि. ( सं. ) बिगडैल पहा.
**बिगसना**–क्रि. अ. ( सं. ) विकसणें.
**बिगहा**–पु. बिघा
**बिगाड**–पु. ( सं. ) बिघाड.
**बिगाना**–वि. ( फा. ) १ दुसऱ्याचा. २ अपरिचित; नवखा.
**बिगार**–पु. बिघाड.
**बिगार–बिगारि**–स्त्री. बेगार पहा.
**बिगारी**–पु. स्त्री. बेगारी पहा.
**बिगास**–पु. ( सं. ) विकास.
**बिगुन**–वि. ( सं. ) निर्गुण.
**बिगुरचिन–बिगुर्चन–बिगूचन**–स्त्री. ( सं. ) १ किंकर्तव्य मूढावस्था. २ अडचण; कठिणता.

**बिगूचना-बिगूतना**-क्रि.अ. (सं.) १ बुचकळयांत पडणें. २ दबणें; पकडले जाणें.

**बिगूचना**-क्रि.स. (सं.) दाबणें; आवळणें.

**बिगोना**-क्रि.स. (सं.) १ नाश करणें; बिघडविणें. २ लपविणें; दूर करणें. ३ त्रासविणें. ४ भ्रमांत पाडणें; बहकावणें. ५ व्यतीत करणें; घालविणें.

**बिग्रह**-पु. (सं.) १ शरीर. २ कलह. ३ विभाग.

**बिघटना**-क्रि.स. (सं.) बिघडविणें.

**बिघन**-पु. (सं.) विघ्न.

**बिच**-क्रिवि. बीच पहा.

**बिचकाना**-क्रि.अ. (अनु.) तोंड विचकणें.

**बिचरना**-क्रि.अ. (सं.) १ फिरणें. २ प्रवास करणें.

**बिचला**-वि. (सं.) मधला.

**बिचलाना**-क्रि.स. (सं.) १ विचलित करणें. २ विस्कटणें.

**बिचवान-नी**-पु. (सं.) मध्यस्थ.

**बिचरना**-क्रि.अ. (सं.) १ विचार करणें. २ विचारणें.

**बिचारा**-वि. बिचारा.

**बिचारी**-पु. (सं.) विचारी.

**बिचाल**-पु. (सं.) १ अलग करणें. २ फरक; अंतर.

**बिचेत**-वि. (सं.) निचेष्ट; बेशुद्ध.

**बिच्छू**-पु. **बिच्छी**-स्त्री. (सं.) विंचू.

**बिछना**-क्रि.अ. (सं.) पसरलें जाणे.

**बिछलना**-क्रि अ. (सं.) घसरणें; सरकणें.

**बिछवाना**-क्रि.स. (सं.) पसरविणें; अंथरणें.

**बिछान**-पु. (सं.) बिछाना.

**बिछाना**-क्रि. स.(सं.)पसरणें; अंथरणें.

**बिछावन**-पु. (सं.) बिछाना.

**बिछुआ-बिछुवा**-पु. (सं.) १ बिचवा. २ जोडवी. ३ करगोटा. ४ गवताची पेंढी.

**बिछुडन - बिछुरनि**-स्त्री. (सं.) वियोग; विरह.

**बिछुडना-बिछुरना**-क्रि.स. (सं.) वियोग होणें.

**बिछुरता - बिछूना - बिछोई**-पु. (सं.) विरही.

**बिछोडा - बिछोय - बिछोह** -पु. (सं.) विरह; वियोग.

**बिछाना**-पु. (सं.) बिछाना; अंथरुण.

**बिज़न**–पु. ( फा. )सरसहा कत्तल.

**बिजन**–पु. ( सं. ) पंखा.

**बिजन**–पु. (सं.) एकांत.

**बिजन**–वि. ( सं. ) एकाकी; एकटा.

**बिजली**–स्त्री.(सं.) १ वीज. २ अंब्याच्या कोयींतील गर. ३ एक अलंकार.

**बिजली**–वि. (सं.) १चंचल. २ चमकदार.

**बिजाती**–वि.(सं.) १ विजातीय. २ जातिबहिष्कृत.

**बिजान**–पु. अज्ञान.

**बिजायठ**–पु. (सं. ) बाजूबंद.

**बिजार**–पु. ( दे. ) १ सांड. २ बैल.

**बिजुरी**–स्त्री. ( सं. ) वीज.

**बिजूका-खा**–पु.(दे.) १ बुजगावणें. २ कपट; धोका.

**बिजोग**–पु. ( सं. ) वियोग.

**बिजोरा**–वि. ( सं.+फा. ) कमजोर.

**बिज्जु-बिज्जुल**–स्त्री. (सं. ) वीज.

**बिज्जुल**–पु. ( सं. ) त्वचा; साल.

**बिज्जू**–पु. (सं. ) ऊद; रानमांजर.

**बिझुकाना**–क्रि. अ. ( सं.) १ भडकणें; रागावणें. २ भिणें. ३ वाकडें होणें; तिरपे होणें.

**बिझुकाना**–क्रि.अ. ( सं. ) १ भडकविणें; चिडविणें. २ भिवविणें.

**बिट**–पु. ( सं. ) १ वाणी; वैश्य. २ पक्षांची विष्टा.

**बिटरना**–क्रि.अ. (दे.) १ मळणें. २ गढूळ होणें. ३ विरघळणें.

**बिटिनिया-बिटिया**–स्त्री. ( सं. ) मुलगी.

**बिठलाना-बिठाना**–क्रि.स. ( सं. ) बसविणें.

**बिडंब**–पु. ( सं. ) आडंबर; देखावा.

**बिडर**–वि. (सं. ) विस्कटलेला; विखुरलेला.

**बिडर**–वि. ( सं. ) निडर; निर्भय.

**बिडरना**–क्रि अ. (सं.) १ विस्कळित होणें. २ बिचकणें; बुझणें.

**बिडराना**–क्रि.स. (सं. ) १ विस्कटणें; उधळून टाकणें. २ पळवून लावणें.

**बिडवना**–क्रि.स. ( सं. ) तोडणें.

**बिडारना**–क्रि.स. (सं. ) भेवडावून पळवून लावणें.

**बिढ़ता**–पु. (सं.) फायदा; नफा.

**बिढ़वना-बिढ़ाना**–क्रि.स. (सं.) १ कमविणें; मिळविणें. २ संचय करणें.

**बित**–पु. ( सं. ) १ वित्त; धन. २ सामर्थ्य. ३ आकार; बांधा.

**बितताना**–क्रि. अ. व्याकूळ होणें; त्रासणें.

**बितताना**-क्रि. स. सतावणें.

**बितना**-पु. वीत.

**बितवना--बिताना--बितावना**-क्रि.स. ( सं. ) ( वेळ ) घालविणें; व्यतीत करणें.

**बितीतना**-क्रि.अ. (सं.) व्यतीत होणें.

**बितीतना**-क्रि. स. बितवना पहा.

**बितु-बित्त**-पु. ( सं. ) १ वित्त; धन. २ सामर्थ्य; ऐपत.

**बित्ता**-पु. वीत.

**बिथकना**-क्रि.अ. ( सं. ) १ थकणें; आश्चर्यचकित होणें. २ मोहून जाणें.

**बिथरना-बिथुरना**-क्रि.अ. ( सं. ) विखुरणें.

**बिथित**-वि. (सं.) दुःखित; व्यथित.

**बिदकना**-क्रि.स. ( सं. ) १ फाटणें; विदीर्ण होणें. २ जख्मी होणें. ३ भडकणें.

**बिदकाना**-क्रि.स. ( सं. ) १ फाडणें. २ कापणें; चिरणें. ३ जखमी करणें.

**बिदर**-पु. (सं.) विदर्भ देश.

**बिदरन**-स्त्री. ( सं. ) भेग; फट.

**बिदरन**-वि. ( सं. ) विदीर्ण करणारा.

**बिदा**-स्त्री. (अ.) १ प्रस्थान; प्रयाण. २ निरोप; जाण्याची अनुज्ञा.

**बिदाई**-स्त्री. ( अ. ) १ प्रयाण. २ जाण्याची अनुज्ञा. ३ प्रयाणप्रसंगी दिलेली भेट; बक्षिशी.

**बिदारना**-क्रि.अ. (सं.) विदीर्ण करणें.

**बिदुराना**-क्रि.अ. ( सं. ) हंसणें; स्मित करणें.

**बिदुरानी**-स्त्री. ( सं. ) मंद; स्मित.

**बिदून**-अव्य. ( फा. ) खेरीज.

**बिदूषना**-क्रिवि. ( सं. ) १ दोष लावणें. २ बिघडविणें; खराब करणें.

**बिदेस**-पु. (सं.) विदेश.

**बिदोख**-पु. ( सं. ) वैर; वैमनस्य.

**बिद्दत**-स्त्री. ( अ. ) १ चांगल्या कामांत बिब्बा घालणारें बोलणें किंवा कृत्य. २ दोष; खराबी. ३ कष्ट; त्रास ४ विपत्ति. ५ जुलूम.

**बिधँसना**-क्रि.स. ( सं. ) विध्वंस करणें.

**बिध**-स्त्री. (सं.) १ प्रकार; तऱ्हा. २ ब्रह्मा. ३ जमाखर्च.

**बिधना**-पु. ( सं. ) ब्रह्मदेव.

**बिधना**-क्रि.अ. (सं.) विंधना पहा.

**बिन**-अव्य. ( सं. ) विना; शिवाय.

**बिनई**-पु. ( सं. ) १ विनंति करणारा. २ नम्र.

**बिनउ**-पु. ( सं. ) विनय.

**बिनति-ती**-स्त्री. (सं.) विनंती.

**बिनन**-स्त्री. (सं.) १ निवड; वेचणी. २ निवडून काढलेले खडे पाकड इ. ३ वीण (कपडयाची). ४ विणणें.

**बिनना**-क्रि.स. (सं.) १ निवडणें. २ छाटून अलग करणें. ३ विणणें.

**बिनवना**- क्रि.स. (सं.) विनवणें.

**बिनशना-बिनसना**-क्रि.स. क्रि. अ. (सं.) १ नष्ट करणें. २ नष्ट होणें.

**बिना**-अव्य. (सं.) विना; शिवाय.

**बिनाई**-स्त्री. (सं.) १ निवड. २ निवडणें. ३ निवडण्याची मजूरी. ४ विणणें. ५ विणण्याची मजुरी. ६ वीण.

**बिनाना**-क्रि. (सं.) बुनाना पहा.

**बिनानी**-स्त्री. (सं.) अज्ञानी.

**बिनानी**-स्त्री. (सं.) मनन.

**बिनावट**-स्त्री. (सं.) बुनावट पहा.

**बिनि-नु**-अव्य. (सं.) विना; शिवाय.

**बिनूठा**-वि. (सं.) अनोखा पहा.

**बिनै**-पु. (सं.) विनय.

**बिनौला**-पु. सरकी.

**बिपच्छ**-पु. (सं.) विपक्ष; शत्रु.

**बिपच्छ**-पु. (सं.) १ नाराज; अ-प्रसन्न. २ प्रतिकूल.

**बिपत-द**-स्त्री. (सं.) विपत्ति.

**बिपर**-पु. (सं.) ब्राह्मण.

**बिफर**-पु. (सं.) विफल.

**बिफरना**-क्रि.स. (सं.) १ बंड पुकारणें. २ नाराज होणें.

**बिबछना**-क्रिअ. (सं.) १ विरोधी होणें. २ फसणें; अडकणें.

**बिबरन**-वि. (सं.) १ रंग खराब झालेला. २ चेहरा उतरलेला; बिवर्ण.

**बिबरन**-पु. (सं.) विवरण.

**बिबस**-वि. (सं.) १ विवश; लाचार. २ पराधीन.

**बिबस**-क्रिवि. (सं.) निरुपायानें.

**बिबहार**-पु. (सं.) व्यवहार.

**बिबाई**-स्त्री. (सं.) तळपाय फुट-ण्याचा रोग.

**बिबाकी**-स्त्री. (अ.) बेबाकी; बाकी न राहणें.

**बिबि**-वि. (सं.) दोन.

**बिमन**-वि. (सं.) विमनस्क.

**बिमौरा**-पु. (सं.) वारूळ.

**बिय**-वि. (सं.) १ दोन; युग्म. २ दुसरा.

**बिय-बिया**-पु. (सं.) बीज.

**बियहुता**-वि. (सं.) विवाहित.

**बिया**-वि. (सं.) अन्य; दुसरा.

**बियाज**-पु. (सं.) व्याज.

**बियाधा**-पु. ( सं. ) पारधी.

**बियाधि**-स्त्री. (सं.) व्याधि.

**बियान**-पु. (सं.) वीणें; प्रसवणें.

**बियाना**-क्रि.स. ( सं. ) वीणें.

**बियाबान**-पु. (फा.) उजाड जंगल.

**बियारी-रू-लू**-स्त्री. (सं.) रात्रीचें जेवण.

**बियाह**-पु. (सं.) विवाह.

**बियो**-पु. मुलाचा मुलगा.

**बिरंग**-वि. ( सं. ) १ रंगीबेरंगी. २ बिन रंगाचा.

**बिरंज**-पु. ( फा. ) १ तांदूळ. २ भात.

**बिरंजी**-स्त्री. लोखंडी चूक.

**बिरछ**- पु. (सं.) वृक्ष.

**बिरछिक-छीक**-स्त्री. वृच्छिक.

**बिरझना**-क्रि.स. (सं.) रागावणें.

**बिरतंत-तांत**-पु. (सं. ) वृत्तान्त.

**बिरताना**-क्रि.स. (सं.) विभागणें; वाटणें.

**बिरतिया**-पु. (सं.) विवाहाचे पूर्वी वधू पक्षासंबंधी माहिती काढणारा.

**बिरथा**-वि. (सं. ) वृथा.

**बिरद**-पु. (सं. ) १ यश; कीर्ति; मोठेपणा. २ विरद पेहा.

**बिरदैत**-पु.(सं.) १ अतिशय प्रसिद्ध वीर, योद्धा. २ दानशूर मनुष्य.

**बिरदैत**-वि. (सं. ) नामी; प्रसिद्ध.

**बिरध**-वि. (सं. ) वृद्ध.

**बिरमना**-क्रि.अ. (सं. ) १ राहणें; थांबणें. २ आराम करणें; सुस्तावणें. ३ रमणें.

**बिरमाना**-क्रि.स. ( सं. ) १ थांबविणें; राहून घेणें. २ रमविणें. ३ व्यतीत करणें.

**बिरला**-वि. (सं.) विरळा.

**बिरवा**-पु. (सं.) १ वृक्ष. २ झुडुप. चणा: घाटा.

**बिरवाही**-स्त्री. ( सं. ) झाडांचा ताटवा.

**बिरसन**-पु. जहर; विष.

**बिरही**-वि. (सं.) विरही.

**बिरादर**-पु. ( फा. ) भाऊ.

**बिरादरी**-स्त्री. (फा.) १ बंधुत्व. २ जातीय समाज.

**बिरान-ना**-वि. (फा. ) १ दुसरा. २ दुसऱ्याचा.

**बिराना**-क्रि.स. ( अनु. ) तोंड वांकडे करून चिडविणें.

**बिरावना**-क्रि.स. ( अनु.) वेडावणें; चिडविणें.

**बिरास**-पु. (सं.) विलास.

**बिरियाँ**-स्त्री. (सं. ) १ समय; वेळ. २ वेळ; पाळी.

**बिरिया**–स्त्री. ( सं. ) एक कर्णभूषण.

**बिरी**–स्त्री. (सं.) १ विडी. २ विडा.

**बिरूझना**–क्रि.अ. ( सं. ) रागावणें; संतापणें.

**बिलंगी**–स्त्री. ( दे. ) अलगनी पहा.

**बिलंब**–वि. (फा. ) १ उंच. २ मोठा. ३ विफल झालेला.

**बिल**–पु. ( सं. ) बीळ.

**बिलकुल**–क्रिवि. ( फा. ) १ पुरे-पुर; सर्व. २ अथपासून इतिपर्यंत. ३ अगदीं; बिलकुल.

**बिलखना**–क्रि.अ. ( सं. ) १ विलाप करणें. २ दु:खी होणें. ३ संकुचित होणें; सुरकुतणें.

**बिलखाना**–क्रि.स. ( सं. ) रडविणें; दु:खी करणें.

**बिलग**–वि. ( सं. ) विलग; अलग.

**बिलगाना**–क्रि.अ. क्रि.स. ( सं. ) १ अलग होणें. २ अलग करणें.

**बिलटी**- स्त्री. ( इं. ) रेल्वे पार्सलाची रसीद.

**बिलनी**–स्त्री. (सं.) १ कुंभार माशी. २ रांजणवाडी.

**बिलपना**–क्रि.अ. (सं. ) विलाप करणें.

**बिलफ़ेल**–क्रिवि. ( फा. ) यावेळीं; आतां.

**बिलबिलाना**–क्रि.अ. ( अनु. ) १ वळवळणें. २ आक्रोश करणें; विलाप करणें. ३ भुकेनें व्याकूळ होणें.

**बिलम**–पु. ( सं. ) विलंब.

**बिलमना**–क्रि. अ. ( सं. ) १ विलंब करणें. २ थांबणें. ३ प्रेमबद्ध होणें.

**बिलगाना**–क्रि.स. ( सं. ) थांबवून धरणें.

**बिललाना**–क्रि.अ. (सं. ) १ विलाप करणें. २ दु:खानें बडबडणें.

**बिलवाना**–क्रि.स. ( सं. ) १ नष्ट करणें. २ नष्ट करविणें. ३ लपविणें.

**बिलसना**–क्रि.अ. ( सं. ) विलसणें.

**बिलसाना**–क्रि.स. ( सं. ) भोगणें; विलास करणें.

**बिलसाना**–क्रि.स. ( सं. ) १ उप-भोग घेणें. २उपभोग घ्यावयास लावणें.

**बिलस्त**–पु. बालिश्त पहा.

**बिलहरा**–पु.(सं. ) विडे ठेवण्याचा डबा.

**बिला**–अव्य. (अ. ) विना; शिवाय.

**बिलाई**–स्त्री. ( सं. ) १ मांजर. २ विहिरींत सोडण्याचा गळ. ३ दाराची खिट्टी.

**बिलाना**–क्रि. अ.(सं. ) १ नष्ट होणें. २ लपणें.

**बिलार**–पु. ( सं. ) मांजर.

**बिलासना**-क्रि.स. (सं.)उपभोगणें.

**बिलिया**-स्त्री. (सं.) लहान कटोरा.

**बिलैया**-स्त्री. (सं.) १ मांजर. २ किसणी.

**बिलान**-वि. (सं.) १ कुरूप. २ आळणी.

**बिलोड़ना**-क्रि.स. (सं.) १ घुसळणें. २ अस्ताव्यस्त करणें.

**बिलोना- बिलोवना**-वि. (सं.) घुसळणें. २ ढाळणें; पाडणें.

**बिलोलना**-क्रि.अ. (सं.) हलणें; डोलणें.

**बिल्ला**-पु. (सं.) १ बिल्ला. २ बोका.

**बिल्ली**-स्त्री. (सं.) मांजरी.

**बिल्लार-ल्लूर-बिल्लौर**-पु.(सं.) १ स्फटिक. २ अतिशय उत्तम आरसा.

**बिवराना**-क्रि.स. (सं.) गुंतागुंत सोडविणें; केस विंचरणें.

**बिसंच**-पु. (सं.) १ संचयाचा आभाव; बेपर्वाई. २ बाधा; कार्याची हानि. ३ भय.

**बिसंभर**-पु. (सं.) विश्वंभर.

**बिसंभर - बिसंभार**-वि. (सं.) शुद्ध बुद्ध विसरलेला.

**बिस**-पु. (सं.) विष.

**बिसखपरा-बिसखापर**-पु. (सं.) घोरपडीसारखा एक प्राणी; बिसर्प.

**बिसतरना**-क्रि.अ. (सं.) विस्तारणें; फैलावणें.

**बिसन**-पु. (सं.) व्यसन.

**बिसनी**-वि. (सं.) व्यसनी.

**बिसमउ-बिसमव**-पु.(सं.)विस्मय.

**बिसमिल**-वि. (फा.) घायाळ.

**बिसमिल्ला(ह)**-पु. (फा.) कार्यारंभापूर्वी ईश्वराचें स्मरण.

**बिसरना**-क्रि.अ. (सं.) विसरणें.

**बिसरात**-पु. (सं.) खेचर.

**बिसराम**-पु. (सं.) विश्राम.

**बिसवार**-पु (सं.) न्हाण्याची धोकटी.

**बिसवासिनि**-वि. स्त्री. (सं.) १ विश्वासू. २ विश्वासघातकी.

**बिसवासी**-वि. (सं.) १ विश्वासू. २ अविश्वासू.

**बिससना**-क्रि.स. (सं.) १ विश्वास ठेवणें. २ वध करणें. ३ शरीराचे तुकडे करणें.

**बिसहना**-क्रि.स. (सं.) खरीदणें.

**बिसहर**-पु. (सं.) सर्प.

**बिसहरू**-पु. (सं.) खरेदी करणारा.

**बिसाँयँध**-स्त्री. (सं.) सडक्या मासळीचा वास.

**बिसात**-स्त्री. ( अ. ) १ ऐपत; ऐश्वर्य. २ मांडवल. ३ सामर्थ्य; बिशाद. ४ सोंगटयांचा पट. ५ सतरंजी, चटई इ.

**बिसाती**-पु. ( अ. ) १ रस्त्यावर बसून माल विकणारा. २ किरकोळ दुकानदार.

**बिसाना**-क्रि.अ. ( सं. ) १ अधिकार चालणें; काबूंत असणें. ३ विषारी असणें.

**बिसारना**-क्रि. अ. ( सं. ) विसरणें.

**बिसारा**-वि. ( सं. ) विषारी.

**बिसास**-पु. (सं. ) विश्वास.

**बिसासिनि- सिन- बिसासी**-- वि. स्त्री. ( सं. ) अविश्वासू स्त्री.

**बिसाह**-पु. ( सं. ) खरेदी.

**बिसाहना**-क्रि.स. ( सं. ) १ खरेदी करणें. २ जाणून बुझुन मार्ग घेणें.

**बिसाहना - बिसाहा**-पु. **बिसाहनी**-स्त्री. ( सं. ) १ सौदा. २ खरेदी करण्याच्या वस्तू.

**बिसियर**-वि. (सं. ) विषारी.

**बिसुनना**-क्रि.अ. खाताना वस्तु नाकाला लागणें.

**बिसूरना**-क्रि.अ. ( सं. ) खेद करणें.

**बिसूरना**-स्त्री. ( सं. ) खेद; चिंता.

**बिसेख**-वि. ( सं. ) विशेष.

**बिसेखना**-क्रि. स. ( सं. ) १ विस्तारानें वर्णन करणें. २ निश्चित करणें; निर्णय करणें.

**बिसेसर**-पु. ( सं. ) विश्वेश्वर.

**बिस्तर - बिस्तरा**-पु. ( सं. ) १ बिस्तरा; अंथरुण. २ विस्तार.

**बिस्तुइया**-स्त्री. ( सं. ) पाल.

**बिस्वा**-पु. ( सं. ) एक बिघ्याचा एक विसांश भाग.

**बिस्वादार**-वि. (सं.+फा. ) १ हिस्सेदार. २ जमीनदार.

**बिहंडना**-क्रि.स. ( सं. ) १ तुकडे करणें; तोडणें. २ ठार करणें.

**बिहँसना-बिहँसाना**-क्रि.अ. (सं.) हंसणें.

**बिहतर**-वि. (फा.) अतिशय चांगला.

**बिहबल**-वि. ( सं. ) व्याकूळ.

**बिहरना**-क्रि.अ. ( सं. ) विहरणें; फिरणें.

**बिहरना**-क्रि.स. ( सं. ) फाटणें.

**बिहान**-पु. ( सं. ) प्रातःकाल.

**बिहान**-क्रिवि. उद्यां.

**बिहाना**-क्रि.स.(सं. )सोडणें; त्यागणें.

**बिहाना**-क्रि.अ. ( सं. ) गुजरणें; व्यतीत होणें.

**बिहाल**-वि. ( सं. ) व्याकूळ.

**बिहिश्त**-स्त्री. ( फा. ) स्वर्ग.

**बिही**–पु. ( फा. ) पेरुसारखें एक फळ.

**बिहीन-बिहून**–वि. ( सं. ) विहिन; रहित.

**बिहोरना**–क्रि. अ. ( सं. ) अलग होणें; वियोग होणें;

**बींड-डा**–पु. ( सं. ) १ गवताची चुंबळ. २ गोल आकाराची लहान चटई. ३ मोळी. ४ पिंड.

**बींडी**–स्त्री. (सं.) १ सुताची गुंडाळी. २ चुंबळ.

**बींधना**–क्रि.अ. ( सं. ) १ छिद्र पाडणें. २ फसणें; अडकणें.

**बींधना**–क्रि.स. ( सं. ) भोंक पाडणें.

**बी**–स्त्री. ( फा. ) बीबी; पत्नी.

**बीका**–वि. ( सं. ) वांकडा.

**बीख**–पु. ( सं. ) १ पाऊल. २ विष.

**बीघा**–पु. ( सं. ) बिघा.

**बीच**–पु. ( सं. ) १ मध्य. २ भेद; फरक. ३ अंतर; अवकाश; जागा.

**बीच**–क्रिवि. ( सं. ) दरम्यान; मध्यें.

**बीच**–स्त्री. (सं.) लहान तरंग.

**बीचु**–पु. ( सं. ) १ मोका. २ अंतर; फरक.

**बीचोबीच**–क्रिवि. ( सं. ) मधोमध.

**बीछना**–क्रि.स. ( सं. ) १ वेचून काढणें. २ निवडून पारखणें.

**बीछी**–स्त्री. ( सं. ) विंचू.

**बीछू**–पु. (सं.) १ विंचू. २ बिचवा.

**बीजक**–पु. ( सं. ) १ यादी; सूची. २ मालाचा आंकडा; बील. ३ बीज. ४ कबिराचा एक पद्यसंग्रह.

**बीजन**–पु. ( सं. ) पंखा.

**बीजा**–वि. ( सं. ) दुसरा.

**बीजा**–पु. ( सं. ) बीज.

**बीजी**–स्त्री. ( सं. ) १ कोय. २ गीर.

**बीजी**–वि. ( सं. ) मधला.

**बीजु-बीजुरी**–स्त्री. ( सं. ) वीज.

**बीजू**–वि. ( सं. ) बीपासून झालेला ( कलमी नाहीं ).

**बीझना**–क्रि.अ. ( सं. ) लिप्त होणें; अडकणें.

**बीझा**–पु. ( सं. ) निर्जनस्थान.

**बीट**–स्त्री. ( सं. ) १ पक्षांची विष्ठा. २ गू. ३ कामटी अगर पट्टी.

**बीडा**–पु. ( सं. ) विडा.

**बीडिया**–वि. (सं.) विडा उचलणारा पुढारी.

**बीड-बीडी**–स्त्री. ( सं. ) १ विडी. २ विडा. ३ गड्डी. ४ मशेरी.

**बीतना**–क्रि.अ. (सं.) १ व्यतीत होणें; गुजरणें. २ दूर होणें. ३ घटणें.

**बीता**–पु. बित्ता पहा.

**बीन**–स्त्री. ( सं. ) बीन; वीणा.

**बीनना**-क्रि.स. ( सं. ) १ वेचणें; निवडणें. २ बींधना पहा. ३ विणणें.

**बीबी**-स्त्री. (फा.) १ कुलीन स्त्री. २ पत्नी. ३ कुमारी.

**बीमा**-पु. (फा.) विमा.

**बीमार**-वि. ( फा. ) रोगी.

**बीमारदार**-पु. ( फा. ) रोग्याची शुश्रुषा करणारा.

**बीमारी**-स्त्री. ( फा. )१ रोग; आजार. २ वाईट खोड.

**बीय-बीया**-वि. दुसरा.

**बीर**-पु. ( सं. ) भाऊ.

**बीर**-वि. ( सं. ) वीर.

**बीर**-स्त्री. ( सं. ) १ सखी; मैत्रीण. २ एक कर्णभूषण. ३ कुरण. ४ चरणावळ.

**बीरज**-पु. ( सं. ) वीर्य; शक्ति.

**बीरन**-पु. ( सं. ) भाऊ.

**बीरबहूटी**-स्त्री. ( सं. ) पावसाळी किडा; इंद्रगोप; मृग.

**बीरा**-पु. ( सं. ) १ विडा. २ देवाचा प्रसाद.

**बीरी**-स्त्री. ( सं. ) १ विडा. २ एक कर्णभूषण.

**बील**-वि. ( सं. ) १ पोकळ. २ खोलगट जमीन.

**बीवी**-स्त्री. ( फा. ) बीबी पहा.

**बीसना**-क्रि.स. ( सं. ) सोंगटयांचा पट पसरणें.

**बीसवाँ**-वि. ( सं. ) विसांवा.

**बीसी**-स्त्री. ( सं. ) १ विसांचा समूह. २ जमीनीचें माप.

**बीह**-वि. ( सं. ) वीस.

**बीहड़**-वि. ( सं. ) १ खडबडीत; उंचसखल. २ विषम; पृथक; विलग.

**बुंद**-वि. ( सं. ) थोडासा.

**बुंद**-पु. (सं.)थेंब.

**बुंदकी**-स्त्री. ( सं. ) १ लहान टिकली. २ ठिपका; डाग.

**बुंदवान**-पु. ( सं. ) लहान लहान थेंबांचा पाऊस.

**बुंदा**-पु. ( सं. ) १ कानांतील लोलक. २ कपाळावर लावण्याची टिकली. ३ कपाळावर गोंदलेला टिळा.

**बुँदिया**-स्त्री. ( सं. ) बूँदी पहा.

**बुंदोरी**-स्त्री. ( सं. ) एक मिठाई.

**बुआ**-स्त्री. ( फा. ) १आत्या. २ वडील बहीण.

**बुकचा**-पु. (तु. ) बोचकें.

**बुकची**-स्त्री. ( तु. ) १ लहान गाठोडें. २ शिंप्याची सुईदोरा ठेवण्याची थैली. ३ बकुची पहा.

**बुकनी**-स्त्री. ( दे. ) १ बुक्की; पूड. २ पाचक चूर्ण. ३ रंगाची पूड.

**बुकवा**-पु. (दे.) १ उटणें. २ बुक्का.

**बुकस**-पु. (सं.) भंगी.

**बुका**-पु. बुक्का.

**बुकुन**-पु. (दे.) १ भुकटी; पूड. २ पाचक चूर्ण.

**बुक्का**-पु. (दे.) १ बुक्का. २ मौक्तिक भस्म.

**बुक्का**-पु. (सं.) १ हृदय. २ रक्त. ३ बकरी. ४ एक वाद्य.

**बुखार**-पु. (अ.) १ वाफ; बाष्प. २ ज्वर; ताप. ३ दुःख क्रोधादिकांचा आवेग. बुकचा पहा.

**बुगदर**-पु. (दे.) मच्छर; ढांस.

**बुगदा**-पु. (फा.) कसायाचा सुरा.

**बुगियल**-पु. (दे.) कुरण.

**बुचका**-पु. बुकचा पहा.

**बुज़कसाब**-पु. (फा.) कसाई.

**बुजदिल**-वि. (फा.) भित्रा; भीरु.

**बुजनी**-स्त्री. (दे.) एक कर्णभूषण.

**बुजुर्ग**-वि. (फा.) १ वृद्ध; मोठा. २ पाजी; दुष्ट.

**बुजुर्ग**-पु. (फा.) पूर्वज; बापजादा.

**बुजुर्गी**-स्त्री. (फा.) मोठेपणा.

**बुझना**-क्रि.अ. १ विझणें. २ तापलेली वस्तु थंड होणें. ३ मंदावणें. (उत्साह शक्ति इ).

**बुट**-स्त्री. बूटी पहा.

**बुटना**-क्रि.अ. पळ काढणें.

**बुडकी**-स्त्री. (अनु.) डुब्बी; गोता.

**बुडना**-क्रि.अ. बूडना पहा.

**बुडबुडाना**-क्रि.अ. (अनु.) क्रोधानें बडबडणें.

**बुडाना**-क्रि.स. (अनु.) बुडविणें.

**बुड्ढा-बुढवा**-वि. (सं.) बुड्ढा.

**बुढाई**-स्त्री. **बुढापा**-पु. वृद्धावस्था.

**बुत-बुत्त**-पु. (फा.) १ मूर्ती. २ प्रियकर.

**बुतना**-क्रि.अ. विझणें.

**बुतपरस्त**-पु. (फा.) मूर्तिपूजक.

**बुदबुद**-पु. (सं.) बुडबुडा.

**बुधि**-स्त्री. (सं.) बुद्धि.

**बुनना**-क्रि.स. (सं.) विणणें.

**बुनाई**-स्त्री. (सं.) १ वीण. २ विणण्याची मजूरी.

**बुनावट**-स्त्री. (सं.) वीण; विणीचा प्रकार.

**बुनियाद**-स्त्री. (फा.) १ मूळ. २ पाया. ३ वास्तविकता.

**बुबुकना**-क्रि.अ. **बुबुकारी**-स्त्री. ओक्साबोक्शी रडणें.

**बुभूषा**-स्त्री. (सं.) यशाची इच्छा.

**बुयाम**-पु. (?) काचेची उभी बरणी.

**बुरकना**-क्रि.स. (अनु.) शिंपडणें; पिसकारणें.

**बुरका**–पु. (अ.) १ बुरखा. २ गर्भ वेष्टण.

**बुरा**–वि. (सं.) वाईट; खराब.

**बुराई**–स्त्री. (सं.) १ वाईटपणा. २ दोष; दुर्गुण. ३ निंदा.

**बुरादा**–पु. (फा.) १ लाकडाचा भुस्सा. २ चूर्ण; चुरा.

**बुर्ज**–पु. (अ.) १ बुरूज. २ घुमट. ३ फुगा. ४ राशिचक्र.

**बुर्द**–स्त्री. (फा.) १ नफा; वरची मिळकत. २ पैज. ३ बुर्जी (बुद्धि-बळांतील).

**बुलंद**–वि. (फा.) १ उंच. २ भारी; उत्तुंग.

**बुलंदी**–स्त्री. (फा.) उंची.

**बुलबुल**–स्त्री. (फा.) बुलबुल पक्षी.

**बुलबुला**–पु. (सं.) बुडबुडा,

**बुलाना**–क्रि.स. (सं.) १ बोलविणें. २ बोलावयास लावणें.

**बुलावा**–पु. (सं.) बोलावणें; निमंत्रण.

**बुस**–पु. (सं.) भुरकट; कोंडा.

**बुहारना**–क्रि.स. (सं.) झाडणें.

**बुहारा**–पु. (सं.) झाडू; खराटा.

**बुहारी**–स्त्री. (सं.) केरसुणी; झाडू.

**बूँद**–स्त्री. (सं.) थेंब; बिंदु.

**बूँदा**–पु. (सं.) १ मोठा ठिपका. २ २ मोठी टिकली. ३ जाड मोती.

**बूँदाबांदी**–स्त्री. (सं.) थोडासा पाऊस.

**बूँदी**–स्त्री. (सं.) १ बुंदी; लाडवाच्या कळ्या. २ पावसाचा थेंब.

**बू**–स्त्री. (फा.) १ वास; गंध. २ दुर्गंध.

**बूआ**–स्त्री. (फा.) १ आत्याबाई. २ मोठी बहीण.

**बूक**–पु. चिमूट.

**बूकना**–क्रिस. (सं.) १ चूर्ण करणें. २ बढाईखोर बाता करणें.

**बूका**–पु. (दे.) बुक्का.

**बूगा**–पु. (दे.) भुसा; भुगा.

**बूच**–पु. बूच.

**बूचड़**–पु. (इं.) कसाई.

**बूचा**–वि. (सं.) १ कान कापलेला. २ विद्रुप. ३ बुच्चा; भुंडा.

**बूजन**–पु. (फा.) वानर.

**बूजना**–क्रि. स. फसविणें.

**बूझ-बूझन**–स्त्री. (सं.) १ बुद्धि; समज; अक्कल. २ कोडें.

**बूझना**–क्रि.स. (सं.) १ समजणें; जाणणें. २ प्रश्न करणें.

**बूट**–पु. (सं.) १ हरभऱ्याचें झाड. २ घाटा; हरभऱ्याचा दाणा. ३ वृक्ष; झाड.

**बूटा**–पु. (सं.) १ झाड. २ वेलबुट्टी.

**बूटी**-स्त्री. ( सं. ) १ वनस्पति. २ जडी बुट्टी. ३ भांग. ४ कापडावरील बुट्टे. ५ पत्त्यावरील ठिपके.

**बूड-बूडन**-क्रि.स. (अनु.) मनुष्य बुडण्याइतकी खोली.

**बूडना**-क्रि.अ. (अनु. ) बुडणें.

**बूड़ा**-पु. (अनु. ) चूर.

**बूढ़ा**-पु. ( सं. ) बुड्ढा.

**बूढ़**-पु. लाल रंग.

**बूत-ता**-पु. ( सं. ) बल; पराक्रम.

**बूरा**-पु. ( सं. ) १ भुक्की. २ शुद्ध न केलेली साखर. ३ शुद्ध केलेली साखर.

**बूरी**-स्त्री. ( दे. ) बुरशी.

**बेंग**-पु. ( सं. ) बेडूक.

**बेंट-ठ**-स्त्री. ( दे. ) हत्याराची मूठ; दस्ता.

**बेंड**-पु. ( दे. ) १ वळूबकरा. २ रोख रक्कम. ३ मुक्काम; तळ.

**बेंड**-स्त्री. टेकण; आधार.

**बेंडा**-पु. अडसर.

**बेंडा**-वि. १ आडवा; तिरपा. २ कठिण; वेडावाकडा.

**बेंढ**-पु. वाऱ्याची दिशा दाखविणारें यंत्र.

**बेंत**-पु. (सं.) १ वेत. २ वेताची छडी.

**बेंदली**-स्त्री. (सं. ) टिकली.

**बेंदा**-पु. (सं.) १ टिळा. २ टिकली. ३ बिंदी.

**बेंदी**-स्त्री. ( सं. ) १ टिकली; बिंदी; २ शून्य.

**बेंवड़ा**-पु. अडसर.

**बेंवताना**-क्रि. स. बेतविणें ( कपडा ).

**बे**-अव्य. ( फा. ) विना; खेरीज.

**बे**-अव्य. (सं.) अरे; ए.

**बेअकल**-वि. ( फा. ) अक्कलशून्य.

**बेअदब**-वि. (फा. ) धृष्ट; बेअदबी.

**बेआब**-वि. ( फा. ) १ ज्याच्यांत पाणी नाहीं असा. २ ज्याची प्रतिष्ठा नाहीं असा.

**बेआबरू**-वि. (फा.) अप्रतिष्ठित.

**बेइंसाफ़ी**-स्त्री. ( फा. ) अन्याय.

**बेइज्जत**-वि. (फा. ) १ अप्रतिष्ठित. २ अपमानित.

**बेइंतहा**-वि. ( फा. ) अमर्याद.

**बेउज्र**-वि. (फा.+अ. ) हरकत न घेणारा.

**बेक़दर**-वि. ( फा. ) अप्रतिष्ठित.

**बेक़रार**-वि. (फा.) व्याकूळ; घाबरा.

**बेकल**-वि. ( सं. ) विकल.

**बेकली**-स्त्री. ( सं. ) १ विकलावस्था. २ स्त्रियांचा एक रोग.

**बेकस**-वि. (फा.) १ असाहाय्य. २ गरीब; दीन. ३ अनाथ.

**बेकहा**-वि. (फा.) मनमानेल तसा वागणारा; बेछूट.

**बेकानूनी**-वि. (फा.) बेकायदा.

**बेकाम-बेकार**-वि. (फा.+सं.) १ बेकार. २ निरुपयोगी.

**बेकसूर**-वि. (फा.+अ.) निरपराध.

**बेख़**-स्त्री. (फा.) मूळ.

**बेख**-पु. (सं.) १ वेश. २ नक्कल; वेश.

**बेखटके**-क्रिवि. (फा.+अनु.) निः-संकोचपणें.

**बेख़ता**-वि. (फा.+अ.) १ निरपराध; २ अचूक.

**बेखबर**-वि. (फा.) १ अजाण. २ बेशुद्ध. ३ निष्काळजी.

**बेखौफ**-वि. (फा.) निर्भय; धीट.

**बेग**-पु. (सं.) वेग.

**बेग**-पु. (इं.) बॅग.

**बेगडी**-पु. (दे.) १ हिऱ्यांना पैलू पाडणारा. २ दागिने बनविणारा.

**बेगम**-स्त्री. (तु.) राणी.

**बेगमी**-वि. (तु.) १ बेगमेसंबंधी. २ उत्तम; उमदा.

**बेगर**-क्रिवि. बगैर पहा.

**बेगरज़**-वि. (फा.+अ.) बेपर्वा; बे-फिकीर.

**बेग़रज़**-क्रिवि. व्यर्थ.

**बेगाना**-वि. (फा.) १ परकीय. २ अजाण; बिन माहीतगार.

**बेगार**-स्त्री. (फा.) वेठ; बिगार.

**बेगारी**-स्त्री. (फा.) वेठ.

**बेगि**-क्रिवि. (सं.) बिगी बिगी.

**बेगुनाह**-वि. (फा.) निरपराधी.

**बेगुनी**-स्त्री. (दे.) सुरई.

**बेचक**-पु. (सं.) विक्रेता.

**बेचना**-क्रि.स. (सं.) विकणें.

**बेचारा**-वि. (फा.) बिचारा.

**बेचिराग़**-वि. (फा.+अ.) बेचिराख.

**बेजड़**-वि. (फा.+सं.) ज्याला कांहीं आधार नाहीं असा.

**बेज़बान**-वि. (फा.+सं.) १ गरीब; दीन. २ मुका.

**बेजा**-वि. (फा.) १ अनुचित. २ खराब.

**बेजान**-वि. (फा.) १ निर्जिव; निर्बल. २ मेलेला. ३ कोमेजलेला.

**बेजाब्ता**-वि. (फा.+अ.) बेकायदा.

**बेजार**-वि. (फा.) बेजार; बैचेन.

**बेजोड**-वि. (फा. + सं.) १ बिन सांध्याचा; अखंड. २ बेजोड; अनुपम.

**बेझा**-पु. (सं.) लक्ष्य; निशाण.

**बेटकी**-स्त्री. (सं.) बेटी; कन्या.

**बेटला-बेटवा-बेटा-बेटौना-बेट्टा**-पु. (सं.) पुत्र; बेटा.

**बेठन**-पु. (सं.) वेष्टण.

**बेठिकाने**-क्रिवि. (फा.+सं.) १ अस्थानी; व्यर्थ. २ स्थानभ्रष्ट.

**बेब**-पु. (सं.) १ झाडाभोवती घातलेला गडगा वा कुंपण. २ नगद पैसा.

**बेडना**-क्रि.स. (सं.) झाडांचे भोवती कुंपण किंवा गडगा घालणें.

**बेडा**-पु. (सं.) १ तराफा. २ जहाजांचा काफला. ३ होडी; नाव. ४ झुंड.

**बेडा**-वि. (सं.) १ आडवा. २ कठिण; मुष्किल.

**बेड़िन-बेडिनी**-स्त्री. नर्तकी; कलावंतीण.

**बेड़ी**-स्त्री (सं.) १ बेडी. २ पाणी उपसण्याची टोपली. ३ साप चावलेल्या ठिकाणी डागणें. ४ होडी. ५ तराफा.

**बेढंग-बेढंगा**-वि. १ अशिष्ट; चालरीत न जाणणारा. २ बेढब; बेडौल. ३ कुरुप.

**बेढ**-पु. १ नाश. २ कोंब फुटलेलें बी.

**बेढई**-स्त्री. (सं.) कचोरी.

**बेढन**-पु. (सं.) वेष्टण.

**बेढना**-क्रि.स. (सं.) १ कुंपण घालणें. २ गुरें वळणें.

**बेढब**-वि. बेढब.

**बेढ़ा**-पु. (सं.) १ सलकडें. २ वेढें; परसाव.

**बेढाना**-क्रि.स. (सं.) वेढविणें.

**बेत**-पु. (सं.) वेत.

**बेतकल्लुफ़**-वि. (फा.+अ.) मनमोकळा; निःसंकोचि.

**बेतकल्लुफ़ी**-स्त्री. सरळपणा; साधेपणा.

**बेतकसीर**-वि. (फा.अ.) निरपराध.

**बेतना**-क्रि.अ. (सं.) कळणें; जाणीव होणें.

**बेतमीज़**-वि. (फा.+अ.) उद्धट; असभ्य; निर्लज्ज

**बेतरह**-क्रिवि. (फा.+अ.) १ वाईट तऱ्हेनें. २ विलक्षणपणें.

**बेतरह**-वि. (फा.+अ.) अधिक; पुष्कळ.

**बेतरीक़ा**-वि. (फा.+अ.) अनुचित; बेकायदा.

**बेतरीका**-क्रिवि. अनुचित प्रकारें.

**बेतहाशा**-क्रिवि. (फा.अ.) १ अतिशय वेगानें. २ अतिशय घाबरेपणानें. ३ विचार न करितां; बेधडक.

**बेताब**-वि. (अ.) १ दुर्बल; कमजोर. २ विकल; बेचैन.

**बेतार**–वि. ( फा+सं. ) बिनतारी.

**बेताल**–पु. ( सं. ) १ बेताळ. २ भाट.

**बेतुका**–वि. (फा.+सं.) १ विसंगत; विजोड. २ बेढब.

**बेतौर**–वि. व क्रिवि. बेतरह पहा.

**बेदखल**–वि. ( फा. ) अधिकारच्युत.

**बेदम**–वि. ( फा. ) १ मुडदा. २ अर्धमेला. ३ जर्जर; निकामी झालेला.

**बेदर्द**–वि. ( फा. ) निष्ठुर.

**बेदाग**–वि. ( फा. ) १ स्वच्छ. २ निर्दोष; शुद्ध. ३ निरपराध; निष्कलंक.

**बेदाना**–पु. (फा.) १ काबूली डाळिंब. २ दारुहळद. ३ बुंदीच्या गोड कळ्या. ४ बिहिदाना नामक फळाचें बी.

**बेदाना**–वि. (फा.) मूर्ख.

**बेदाम**–पु. ( फा. ) बदाम.

**बेदाम**–क्रिवि. फुकटचा; मोफतचा.

**बेधड़क**–क्रिवि. ( फा. + अनु. ) बेधडक.

**बेधना**–क्रि.स. ( सं. ) १ भोंक पाडणें. २ जखम करणें.

**बेधर्म**–वि. ( सं. ) धर्मभ्रष्ट.

**बेन**–पु. ( सं. ) १ वेणु; मुरली. २ गारुडयाची पुंगी. ३ बांबू. ४ एक वृक्ष.

**बेनउर–बर**–पु. बिनौला पहा.

**बेनज़ीर**–वि. ( फा.+सं ) अद्वितीय; अनुपम.

**बेना**–पु. ( सं. ) १ बांबूच्या कामट्यांचा पंखा. २ खस; वाळा. ३ बांबू.

**बेनिमून**–वि. ( फा. ) अनुपम; अद्वितीय.

**बेनी**–स्त्री. ( सं. ) १ वेणी. २ त्रिवेणी संगम. ३ दाराची बिनी.

**बेनु**–पु. ( सं. ) १ वेणु; मुरली. २ बांबू.

**बेनौटी**–वि. कपाशी रंगाचा.

**बेनौरा**–पु. बिनौला पहा.

**बेनौरी**–स्त्री. पावसांतील गारेचा तुकडा.

**बेपरद**–वि. ( फा. ) १ अनावृत्त. २ नंगा.

**बेपरवा–वाह**–वि. ( फा. ) १ बेपर्वा; बेफिकीर. २ उदार

**बेपाइ**–वि. ( फा.+सं. ) घाबरलेला; निरुपाय झालेला.

**बेपार**–पु. ( दे. ) एक वृक्ष.

**बेपार**–पु. ( सं. ) व्यापार.

**बेपीर**–वि. ( फा.+सं. ) निर्दय.

**बेपेंदी**–वि. ( सं. ) बिनबुडाचा.

**बेबस**–वि. ( सं. ) १ लाचार. २ पराधीन.

**बेबसी**-स्त्री. ( सं. ) पराधीनता.

**बेबाक**-वि. ( फा. ) चुकता; बेबाक.

**बेबुनियाद**-वि. ( फा. ) निराधार.

**बेभाव**-क्रिवि. ( फा.+सं. ) बेहिशोब.

**बेमरम्मत**-वि. ( फा. ) नादुरुस्त.

**बेमारी**-स्त्री.( फा. ) बीमारी; आजार.

**बेमुनासिब**-वि. ( फा. ) अनुचित.

**बेमौका**-वि. ( फा. ) अवेळीचा; अयोग्य वेळीं.

**बेर**-पु.( सं. ) बोर व बोराचें झाड.

**बेर**-पु. स्त्री. ( सं. ) १ वेळ; उशीर. २ पाळी; खेप; वेळ.

**बेरस**-वि. (फा+सं. ) नीरस.

**बेरहड्डी**-स्त्री. ( सं. ) नडगी.

**बेरहम**-वि. ( फा. ) निर्दय.

**बेरा**-पु. ( सं. ) १ वेळ; समय. २ प्रातःकाल.

**बेरा**-पु. ( सं. ) बेडा पहा.

**बेरा**-पु. ( इं. ) बेअरर; चपराशी.

**बेरादरी**-स्त्री. बिरादरी पहा.

**बेराम**-वि. बीमार पहा.

**बेरिआ-बेरियाँ**-स्त्री. समय; वेळ.

**बेरी**-स्त्री. ( सं. ) १ एक लता. २ बेर पहा. ३ बेडी. ४ वैरा.

**बेरुई**-स्त्री. ( दे. ) वेश्या.

**बेरुख**-वि. ( फा. ) १ बेमुर्वतखोर; ऐनवेळी मागे पडणारा. २ नाराज; क्रुद्ध.

**बेरोक**-क्रिवि. ( फा.+सं. ) निर्वेधपणें.

**बेरौनक**-वि. ( फा. ) उदास.

**बेलंद**-वि. ( फा. ) बुलंद पहा.

**बेल**-पु. ( सं. ) बेलाचें झाड व फळ.

**बेल**-स्त्री. ( सं. ) १ वेल; लता. २ वंशवेल. ३ मंगलप्रसंगी न्हावी धोबी इ. ना मिळणारी बिदागी. ४ वेल-बुट्टी. ५ वल्हे.

**बेल**-पु. ( फा. ) १ कुदळ. २ सडके-वर मारलेली रेघ. ३ लांब खुरपें. ४ बेला पहा.

**बेलक**-पु. ( फा. ) फावडें.

**बेलकी**-पु. (दे.) गुराखी.

**बेलचा**-पु. ( फा. ) १ कुदळ. २ खुरपें.

**बेलडी**-स्त्री. लता; वेल.

**बेलन**-पु.( सं. ) १ खडी दाबण्याचा रूळ. २ रोलर. ३ लाटणें.

**बेलना**-पु. ( सं. ) लाटणें.

**बेलना**-क्रि.स. ( सं. ) १ ( पोळ्या ) लाटणें. २ नष्ट करणें. ३ अंगावर जोरानें गमतीखातर पाणी उडविणें.

**बेलपत्ती-पात-पत्र**-पु. ( सं. ) बिल्वपत्र.

**बेलसना**-क्रि.अ.( सं. ) विलास करणें.

**बेलहरा**-पु.( सं ) लावलेलें विडे ठेव-ण्याचा डबा.

**बेला**-पु.( सं. ) १ मोगरा. २ एक दागिना. ३ लाट; लहर. ४ तेल मापण्याचा कातड्याचा बुधला. ५ समुद्रकिनारा. ६ वेळ; समय.

**बेलाग**-वि. ( फा. + सं. ) १ अगदी अलग; दुसऱ्या कशाचाही संबंध नसलेला. २ खरा; साफ.

**बेलिया**-स्त्री. ( सं. ) लहान कटोरा.

**बेलौस**-वि. ( फा. ) १ सच्चा; खरा. २ बेमुर्वतखोर ( क्वचित ).

**बेवकूफ**-वि. (फा.) निर्बुद्ध; मूर्ख.

**बेवक्त**-क्रिवि. ( फा. ) अवेळीं.

**बेवफ़ा**-वि. ( फा. ) १ कृतघ्न. २ दु:शील.

**बेवरा**-पु. (सं.) विवरण.

**बेवरेबाज़ी**-स्त्री. (सं.+फा. ) लबाडी.

**बेवरेवार**-वि. (सं.) तपशीलवार.

**बेवहरिया**-पु. ( सं. ) १ सावकार. २ मुनीम.

**बेवा**-स्त्री. (फा.) विधवा.

**बेवान**-पु. ( सं. ) विमान.

**बेश**-पु. ( सं. ) वेश.

**बेशऊर**-वि. (फा.+अ ) मूर्ख; बेअक्कल.

**बेशक**-क्रिवि. ( फा.+सं. ) बेलाशक.

**बेशक़ीमत**-वि.( फा.+अ. ) बहुमूल्य.

**बेशी**-स्त्री. ( फा. ) १ अधिकता. २ फायदा.

**बेशुमार**-वि. ( फा. ) बेसुमार.

**बेसंदर**-पु. (सं.) अग्नि.

**बेसँभर**-वि. ( फा.+सं. ) बेहोश.

**बेसन**-पु. ( दे. ) बेसन; डाळीचें पीठ.

**बेसनी**-वि. (दे.) बेसनाचा.

**बेसबब**-वि. ( फा. ) अकारण.

**बेसबरा**-वि. ( फा. ) अधीर.

**बेसरा**-वि. ( फा. ) निराश्रित.

**बेसरा**-पु. एक शिकारी पक्षी.

**बेसरोसामान**-वि. ( फा. ) कंगाल.

**बेसवा-बेसा**-स्त्री. ( सं. ) वेसवा; वेश्या.

**बेसा**-पु. (सं. ) वेश.

**बेसारा**-वि.(सं.) बसविणारा; स्थापक.

**बेसाहना**-क्रि.अ. ( दे. ) १ खरीदणें. २ पाठीमागें लचांड लाऊन घेणें.

**बेसाहा**-पु. ( दे. ) खरेदी केलेलें सामान; सौदा.

**बेसिलसिले**-क्रिवि. ( फा. ) अव्यवस्थितपणें.

**बेसी**-स्त्री. बेशी पहा.

**बेहंगम**-वि. ( सं. ) १ कुरुप. २ बेढब.

**बेहँसना**-क्रि. अ. ( सं. ) १ खोखो हसणें. २ हसणें.

**बेह**-पु. ( सं. ) भोंक; छिद्र.

**बेहड**-वि. व पु. बीहड पहा.

**बेहतर**-वि. ( फा. ) अति उत्तम.

**बेहतर**-अव्य. ( फा. ) छान; उत्तम.
**बेहद्**-वि. ( फा. ) बेहद्द.
**बेहन**-पु. ( सं. ) पेरण्याचें धान्य.
**बेहना**-पु. ( दे. ) पिंजारी.
**बेहया**-वि. ( फा. ) निर्लज्ज.
**बेहर**-वि. ( दे. ) १ स्थावर. २ अलग; भिन्न.
**बेहर**-स्त्री. ( सं. ) विहीर.
**बेहरना**-क्रि.अ. तडकणें; चीर पडणें.
**बेहरा**-वि. ( सं. ) १ पृथक्: अलग. २ भिन्न.
**बेहरा**-पु. ( दे. ) १ चाऱ्याचें गवत. २ गवताची विणलेली नथीची डबी.
**बेहरी**-स्त्री. १ जमा झालेली वर्गणी. २ वर्गणी.
**बेहला**-पु. ( इं. ) व्हायोलिन.
**बेहान**-क्रिवि. ( सं. ) उद्यां.
**बेहाल**-वि. ( फा. ) व्याकूळ; बेचैन.
**बेहिसाब**-क्रिवि.(फा.+अ.) बेहिशोब.
**बेहुनरा**-वि. ( फा. ) १ कलाहीन; मूर्ख. २ न शिकविलेलें अस्वल.
**बेहुरमत**-वि. ( फा. ) अप्रतिष्ठित.
**बेहूदगी**-स्त्री. ( फा. ) असभ्यता.
**बेहून**-क्रिवि. विना; रहित.
**बेहैफ़**-वि. ( फा. ) बेफिकीर.
**बेहोश**-वि. ( फा. ) मूर्च्छित; बेशुद्ध.
**बैंगन**-पु. ( सं. ) वांगें.
**बैंगनी-बैंजनी**-स्त्री. ( सं. ) बैंगणी.
**बैंड**-स्त्री. ( इं. ) १ झुंड. २ बँड-वाल्यांचा ताफा.
**बैंडा**-वि. बेंढा पहा.
**बै**-स्त्री. ( सं. ) वय.
**बै**-स्त्री. ( अ. ) विक्री.
**बैकल**-वि. ( सं. ) वेडा; पागल.
**बैखानस**-पु. ( सं. ) तपस्वी.
**बैग**-स्त्री. ( इं. ) १ ब्याग. २ थैली; पिशवी.
**बैगन**-पु. ( सं. ) वांगे.
**बैगना**-पु. ( सं. ) वांग्याची भजी.
**बैजंती**-स्त्री. ( सं. ) वैजयंती वृक्ष.
**बैज**-पु. ( इं. ) बॅज; बिल्ला.
**बैजई**-वि. ( अ. ) फिकट निळा.
**बैजा**-पु. ( अ. ) १ अंडें. २ आंत पाणी असलेला फोड.
**बैठ**-पु. ( सं. ) कर.
**बैठक**-स्त्री. ( सं. ) बैठक सर्व अर्थ मराठीप्रमाणें.
**बैठका**-पु. ( सं. ) बैठकीची खोली.
**बैठकी**-स्त्री. ( सं. ) १ बैठक (व्यायामाचा प्रकार). २ बैठक; आधार. ३ बैठकीची जागा. ४ बैठक; बसण्याची ढब.
**बैठन-बैठनि**-स्त्री. ( सं. ) १ बसणें. २ बैठक; आसन.

**बैठना**-क्रि.अ. (सं.) १ खर्च होणें; २ गूळ चिघळणें. २ भात मऊ होणें. ४ एकाद्या घरीं जाऊन पडणें. ५ अंडी उबविणें. ६ अस्त होणें. ७ बसणें; इतर अर्थ मराठीप्रमाणें.

**बैठावाँ**-वि. ( सं.) बैठा; दबलेला.

**बैठवाना**-क्रि.स. ( सं.) १ बसविणें. २ रोपें लावणें.

**बैठा**-पु. (सं.) मोठा चमचा; कावि-लथा.

**बैठाना-बैठारना-बैठालना**-क्रि. स. ( सं. ) बसविणें.

**बैठना**-क्रि.स. (सं.) १ बंद करणें. २ गुरांना कोंडून ठेवणें.

**बैण**-पु. ( सं. ) बुरूड.

**बैत**-पु. ( अ. ) पद्य; श्लोक.

**बैताल**-पु. ( सं.) वेताळ.

**बैद**-पु. ( सं. ) वैद्य.

**बैदई**-स्त्री. वैद्यकी.

**बैन**-पु. ( सं. ) १ वचन; बोलणें. २ २ घरांत मृत्यु झाल्यावर रडतांना म्हटलें जाणारे शोकसूचक वाक्य.

**बैना**-पु. ( सं. ) १ विवाहप्रसंगी वाटण्याची मिठाई. २ बेंदा पहा.

**बैना**-क्रि.स. ( सं. ) पेरणें.

**बैपार**-पु. ( सं. ) व्यापार.

**बैयर**-स्त्री. ( सं.) बाई; स्त्री.

**बैर**-पु. ( सं. ) १ वैर. २ द्वेष; मत्सर. ३ बोर.

**बैर-बैरा**-पु. (दे.) पाभर.

**बैरख**-पु. (तु.) सैन्याचा ध्वज.

**बैरा**-पु. (दे. ) विटांचे तुकडे व रोडेराडे इ.

**बैरा**-पु. (इं.) हुजऱ्या; बेअरर.

**बैराखी**-स्त्री. (सं.) एक बाहुभूषण.

**बैराग**-पु. ( सं. ) वैराग्य.

**बैरागी**-पु. ( सं.) वैरागी.

**बैरी**-वि. ( सं. ) वैरी; शत्रु.

**बैषानस**-पु. ( सं. ) तपस्वी; वैखानस.

**बैसंदर**-पु. ( सं. ) अग्नि.

**बैस**-पु. ( सं.) १ वय; आयु. २ तारुण्य; यौवन. ३ वैश्य.

**बैसना**-क्रि.अ. ( सं.) बसणें.

**बैसर**-स्त्री. विणकराची फणी.

**बैसाख**-पु. (सं.) वैशाख.

**बैसाखी**-स्त्री. ( फा.) कुबडी.

**बैसारना**-क्रि.स. ( सं.) बसविणें.

**बैसिक**-पु. (सं.) १ वेश्येवर प्रेम करणारा. २ विषयी पुरुष.

**बैहर**-वि. ( सं.) भयंकर; क्रोधी.

**बैहर**-स्त्री. ( सं. ) वायु.

**बोंगना**-पु. (सं.) बोगोणें ( पितळेचें भांडें ).

**बोंडरी**-स्त्री. (सं.) बेंबी.

**बोंडी**–स्त्री. बौंडी पहा.

**बौआई**–स्त्री. (सं.) १ पेरणी. २ पेरण्याची मजूरी.

**बोक–बोकरा**–पु. (सं.) बकरा.

**बोकरी**–स्त्री. (सं.) बकरी.

**बोकला**–पु. (सं.) १ झाडाची साल. २ टरफल; साल.

**बोखार**–पु. बुखार पहा.

**बौजा**–स्त्री. (फा.) एक मद्य.

**बोझ–बोझा**–पु. बोजा.

**बोझना**–क्रि. स. ओझें लादणें.

**बोटा**–पु. (सं.) १ लाकडाचा ओंडका. २ कापलेला तुकडा.

**बोटी**–स्त्री. (सं.) मांसाचा तुकडा.

**बोडरी**–स्त्री. (सं.) बेंबी.

**बोडल**–स्त्री (दे.) एक पक्षी.

**बोडा**–पु. (दे.) १ अजगर. २ चवळीची शेंग.

**बोडी**–स्त्री. १ दमडी. २ अल्पधन. बौंडी पहा.

**बोत**–पु. घोडयांची एक जात.

**बोतल**–स्त्री. (इं.) बाटली.

**बोतलिया–बोतली**–वि. काळसर हिरवा.

**बोदर**–स्त्री. (दे.) छडी; शिमटी.

**बोदा**–वि. (सं.) १ मूर्ख; आडाणी; मठ्ठ. २ भुसभुशीत; ठिसूळ.

**बोध**–पु. (सं.) १ बोध; जाणीव. २ धीर.

**बोधन**–पु. (सं.) १ समजाविणें; जाणीव करून देणें. २ जागविणें. ३ उद्दीपन. ४ मंत्रजागर. ५ नंदादीप दाखविणें.

**बोधना**–क्रि.स. (सं.) १ समजाविणें. २ ज्ञान देणें.

**बोना**–क्रि.स. (सं.) १ पेरणें. २ पसरणें; विखुरणें.

**बोबा**–पु. (दे.) १ स्तन. २ घरांतील सामानसुमान. ३ गाठोडें.

**बोय**–स्त्री. (फा.) १ गंध; वास. २ सुगंध.

**बोर**–पु. बुडविण्याची क्रिया; बुडविणें; बुचकळी.

**बोर**–पु. (सं.) १ घुंगुर. २ डोक्यावर घालण्याचा टोप (दागिना). ३ खड्डा.

**बोरका**–पु. दऊत.

**बोरना**–क्रि.स. बुडविणें; बुचकळणें.

**बोरसी**–स्त्री. (सं.) मातीची शेगडी.

**बोरा**–पु. (सं.) १ पोतें. २ घुंगुर.

**बोरिया–बोरी**–स्त्री. (सं.) लहान पोतें.

**बोरिया**–स्त्री. (फा.) चटई; बिस्तरा.

**बोल**–पु. (सं.) १ बोल. २ व्यंगार्थी बोलणें. ३ संख्या. ४ अंतरा.

**बोलचाल**–स्त्री. ( सं. ) १ संभाषण; बोलणें; चालणें; मैत्री. २ व्यवहाराची भाषा.

**बोलता**–पु. ( सं. ) १ आत्मा. २ प्राण. ३ मनुष्य. ४ हुक्का.

**बोलता**–वि. ( सं. ) बडबडया; बोलका.

**बोलती**–स्त्री. ( सं. ) वाचा; वाणी.

**बोलना**–क्रि.अ. क्रि.स. बोलणें.

**बोलबाला**–पु. एक वृक्ष.

**बोलवाना**–क्रि.स. १ बोलाविणें. २ बोलविणें.

**बोलाना**–क्रि.स. बुलाना पहा.

**बोलावा**–पु. ( सं. ) निमंत्रण.

**बोली**–स्त्री. ( सं. ) बोली.

**बोवना**–क्रि.स. ( सं. ) पेरणें.

**बोह**–स्त्री. ( सं. ) डुब्बी.

**बोहनी**–स्त्री. ( सं. ) बोहनी.

**बोहारना**–क्रि.स. बुहारना पहा.

**बोहारी**–स्त्री. झाडू.

**बोहित**–स्त्री. ( सं. ) नाव; होडी.

**बौंड**–स्त्री. ( सं. ) १ वेलीची फांदी. २ वेल.

**बौंडना**–क्रि.अ. ( सं. ) वेलीप्रमाणें वाढणें; पसरणें.

**बौंडर**–पु. ( सं. ) चक्रीवादळ.

**बौंडी**–स्त्री. ( सं. ) १ दोडे फळ; कच्चें फळ. २ शेंग.

**बौआना**–क्रि.अ. ( सं. ) १ स्वप्नांत बोलणें. २ बरळणें.

**बौखल**–वि. ( सं. ) वेडा.

**बौखा**–पु. ( सं. ) वाऱ्याचा प्रचंड झोत.

**बौछाड–बौछार**–स्त्री. ( सं. ) १ पाण्याचे तुषार. २ वर्षाव.

**बौड़हा**–वि. ( सं. ) वेडा.

**बौता**–पु. ( सं. ) जहाजांना मार्ग दर्शविण्यासाठीं पाण्यांत सोडलेले ओंडकें वा पिपें.

**बौना**–पु. ( सं. ) बुटका मनुष्य.

**बौर**–पु. ( सं. ) आंब्याचा मोहोर.

**बौरई–बौराई**–स्त्री. ( सं. ) वेडेपणा

**बौरना**–क्रि.अ. ( सं. ) मोहोरणें.

**बौरहा**–वि. ( सं. ) वेडा.

**बौरा**–वि. ( सं. ) १ वेडा; विक्षिप्त. २ भोळा; मूर्ख. ३ मुका.

**बौराना**–क्रि.अ. ( सं. ) १ वेडे होणें. २ उन्मत्त होणें.

**बौराना**–क्रि.स. ( सं. ) वेडे करणें.

**बौराह**–वि. ( सं. ) वेडा.

**बौरी**–स्त्री. ( सं. ) वेडी.

**बौहर**–स्त्री. ( सं. ) १ वधू. २ पत्नी.

**ब्यवहर**–पु. ( सं. ) कर्ज.

**ब्यवहरिया**–पु. ( सं. ) सावकार.

**ब्यवहार**-पु. ( सं. ) व्यवहार.

**ब्याज**-पु. ( सं. ) व्याज.

**ब्याना**-क्रि.स. ( सं. ) पैदा करणें; उत्पन्न करणें.

**ब्याना**-क्रि.अ. (सं.) वीणें; प्रसवणें.

**ब्यारी**-स्त्री. **ब्यालु**-पु. ( सं. ) रात्रीचें जेवण.

**ब्याह**-पु. (सं.) विवाह.

**ब्याहता**-वि. ( सं. ) विवाहित.

**ब्याहता**-पु. (सं.) पति.

**ब्याहना**-क्रि.स. ( सं. ) विवाह करणें.

**ब्योंचना**-क्रि.अ. (सं. ) मुरगळणें; लचकणें.

**ब्योंची**-स्त्री. ( सं. ) ओकारी.

**ब्योंत**-पु. (सं. ) १ व्यवस्था. २ तऱ्हा; ढब; रीत. ३ युक्ति; उपाय. ४ तयारी. ५ संधी; अवसर. ६ साधन वा सामग्री. ७ कपडा बेतणें. ८ विवरण.

**ब्योंतना**-क्रि.स. ( सं. ) कपडा बेतणें. २ मारणें; कापून काढणें.

**ब्योपार**-पु. ( सं. ) व्यापार.

**ब्योरना**-कि.स. ( सं. ) १ केसांचा गुंता सोडविणें. २ गुंता सोडविणें.

**ब्योरा**-पु. ( सं. ) १ विवरण; तपशील. २ वृत्त; वृत्तान्त; समाचार.

**ब्योहर**-पु. ( सं. ) देण्यायेण्याचा व्यवहार.

**ब्योहरा-ब्योहरिया**-पु. ( सं. ) सावकार.

**ब्रज**-पु. ( सं. ) गोकुळ.

**ब्रजना**-क्रि.अ. ( सं. ) जाणें.

**ब्रह्मजन्म**-पु. ( सं. ) उपनयन संस्कार.

**ब्रह्मजीवी**-वि. ( सं. ) पौरोहित्य करून उपजीविका करणारा.

**ब्रह्मण्य**-वि. ( सं. ) १ ब्रह्मसंबंधी. २ ब्राह्मणनिष्ठ.

**ब्रह्मदंड**-पु. ( सं. ) १ ब्रह्मचाऱ्याचा दंड. २ केतु. ३ ब्राह्मणाचा शाप.

**ब्रह्मदाता**-पु.(सं.) वेद शिकविणारा.

**ब्रह्मदान**-पु. (सं.)वेद शिकविणें.

**ब्रह्मदैत्य**-पु. ( सं. ) ब्रह्मराक्षस.

**ब्रह्मदोष**-पु. ( सं. ) ब्रह्महत्या.

**ब्रह्मद्रव**-पु. ( सं. ) गंगाजल.

**ब्रह्मभोज**-पु. ( सं. ) ब्राह्मण भोजन.

**ब्रह्मयज्ञ**-पु. ( सं. )वेदाध्ययन.

**ब्रह्मलेख**-स्त्री. भाग्यरेषा; विधिलिखित.

**ब्रह्मवध्या**-स्त्री. ब्रह्महत्या.

**ब्रह्मवादी**-वि. ( सं. ) अद्वैतवादी.

**ब्रीडना**-क्रि.अ. ( सं. ) लज्जित होणें.

## भ

**भँइस**-स्त्री (सं.) म्हैस..

**भंकार**-पु. (अनु.) विकट हास्य.

**भँकारी**-स्त्री. (सं.) १ भणभण करणारा एक किडा २ डांस.

**भंग**-पु. (सं.) १ लाट; लहर. २ पराजय. ३ खंड; तुकडा. ४ कौटिल्य. ५ रोग. ६ गमन. ७ प्रवाह. ८ भय. ९ विध्वंस. १० अडचण; बाधा. ११ वाकणें. १२ अर्धांग वायु. १३ भंग; तुटणें.

**भंग**-स्त्री. (सं.) भांग (गांज्या).

**भंगड़**-वि. (सं.) भांग पिणारा; भंगड; गांजेकस.

**भंगना**-क्रि.अ. (सं.) १ भंगणें; तुटणें. २ हरणें; दबणें.

**भंगना**-क्रि.स. (सं.) १ तोडणें. २ दबविणें.

**भँगरा**-पु. (सं.) १ एक जाडेंभरडें कापड. २ भृंगराज; माका.

**भंगराज**-पु. (सं.) एक पक्षी.

**भंगा**-स्त्री. भाँग पहा.

**भंगार**-पु. (सं.) १ डबकें. २ केरकचरा; भंगार.

**भंगारी**-स्त्री. (सं.) डांस.

**भंगी**-पु. (सं.) १ नाशवंत. २ भांग करणारा. ३ वेलबुट्टी; नक्षी वगैरे. ४ भंगी.

**भंगी**-वि. (सं) भांग पिणारा.

**भंगुर**-वि. (सं.) १ भंगुर; नाशवंत. २ कुटिल; वांकडा.

**भंगुर**-पु. (सं.) नदीचें वांकण.

**भँगेडी**-वि. (सं.) भांग पिणारा.

**भँगेला**-पु. (सं.) एक प्रकारचें जाड कापड.

**भंजना**-क्रि अ. (सं.) १ भंगणें. २ पैशांची मोड होणें. ३ दोरी वळली जाणें. ४ कागदाला घडया पडणें.

**भंजना**-क्रि.स. (सं.) तोडणें.

**भंटा**-पु. (सं.) वांगें.

**भंड**-वि. (सं.) १ धूर्त; पाखंडी. २ अश्लील शब्द बोलणारा; मवाली.

**भंडताल**-पु. (सं.) नृत्य गायनाचा एक प्रकार.

**भंडना**-क्रि.स. (सं.) १ नुकसान करणें. २ तोडणें. ३ अपकीर्ति करणें.

**भँडफोड़**-पु. (सं.) १ मातीच्या भांडयांची मोडतोड. २ रहस्यभेद.

**भँडभाँड**-पु. (सं.) एक कांटेरी झुडुप.

**भँडरिया**-पु. ज्योतिष सांगणारी एक जात.

**भँडरिया**-वि. १ ढोंगी; पाखंडी. २ धूर्त; लुच्चा.

**भँडसार-साल**-स्त्री. ( सं. )धान्याचें कोठार.

**भंडा**-पु. ( सं. ) १ भांडें. २रहस्य. ३ भारी दगड हटविण्याचा वासा; तरफ.

**भंडाना**-क्रि.स. ( सं. ) १ भंडावून सोडणें. २ वस्तूंची उलथापालथ तोडफोड करणें.

**भंडार**-पु.( सं. ) १ भांडार. २ कोठार. ३ पाकशाळा. ४ पोट; उदर. ५ अग्नेय. ६ साधूंचें जेवण.

**भंडारा**-पु. ( सं. ) १ भंडार पहा. २ समूह; झुंड. ३ साधूंना वाढलेलें जेवण. ४ पोट.

**भंडारी**-स्त्री. ( सं. ) १ लहान कोठडी. २ खजिना.

**भंडारी**-पु. ( सं. ) १ कोशाध्यक्ष. २ आचारी. ३ वस्त्रागाराचा मुख्य.

**भंडेरिया**-पु. भँडरिया पहा.

**भँडौआ**-पु. ( सं. ) १ भाटांचें गीत. २ विनोदी कविता.

**भँभरना**-क्रि. अ. ( सं. ) भयभीत होणें.

**भँभा**-पु. ( सं.)बीळ; भोंक.

**भँभाना**-क्रि. अ. (अनु. ) हंबरणें.

**भँभीरी**-स्त्री. (अनु.) एक पक्षी.

**भँभेरि**-स्त्री. (सं. ) भय.

**भँमर-रा**-पु. ( सं. ) १ मोठी मधमाशी. २ गांधील माशी.

**भँवना**-क्रि.अ. ( सं. ) फिरणें.

**भँवर**-पु. ( सं. ) १ भ्रमर; भुंगा. २ खदक; खड्डा. ३ पाण्यांतील भोवरा.

**भँवरकली**-स्त्री. ( सं. ) कोणत्याहि बाजूस फिरुं शकेल अशी सांखळीची कडी.

**भँवरजाल**-पु. ( सं. ) संसारपाश.

**भँवरभीक**-स्त्री. ( सं. ) हिंडून मिळविलेली भीक.

**भँवरा**-पु. भौंरा पहा.

**भँवरी**-स्त्री. ( सं. ) १ पाण्यांतील भोवरा. २ भोवरी. ३ भाँवर पहा. ४ फेरीवाल्याचा धंदा. ५ फेरी; गस्त. ६ प्रदक्षिणा.

**भँवना**-क्रि. स. ( सं. ) १ फिरविणें. २ भ्रमांत टाकणें.

**भँवरा**-वि. ( सं. ) फिरणारा.

**भंसना**-क्रि.अ. ( सं. ) १ रंगणें. २ पाण्यांत टाकलें जाणें.

**भइया**-पु. ( सं. ) १ भाऊ. २ एक आदरसूचक शब्द.

**भउजाई**-स्त्री. ( सं. ) भावजय.

**भकटाना-साना**-क्रि. अ. ( सं. ) आंबणें; नासणें.

**भकडना**–क्रि.अ. भगरना पहा.

**भकराँध**–स्त्री. कुजलेल्या धान्याची दुर्गंधी.

**भकसा**–वि. (सं.) आंबलेला; सडलेला ( खाद्य पदार्थ ).

**भकाऊँ**–पु. ( अनु. ) बागुलबोआ.

**भकुआ-वा**–वि. ( सं. ) मूर्ख.

**भकुआना**–क्रि.अ. ( सं. ) घाबरणें; भांबावणें.

**भकुआना**–क्रि.स. ( सं. ) १ घाबरविणें. २ मूर्ख बनविणें.

**भकोसना**–क्रि.स. ( सं. ) १ भसाभसा खाणें. २ खाणें.

**भक्किका**–स्त्री. ( सं. ) एक किडा.

**भख**–पु. ( सं. ) भक्ष्य; आहार.

**भखना**–क्रि.स. ( सं. ) १ खाणें. २ गिळणें.

**भगई**–स्त्री. ( सं. ) लंगोटी.

**भगत**–वि. ( सं. ) भक्त.

**भगत**–पु. ( सं. ) १ वैष्णवपंथी साधु. २ राजपुतान्यांतील एक जात ( मुली वेश्यावृत्ति करितात ). ३ होळींतील एक सोंग. ४ भूत काढणारा मांत्रिक. ५ वेश्येच्या गाण्याला साथ करणारा.

**भगतिया**–पु. ( सं. ) राजपुतान्यांतील एक जात; पुरुष गाणें बजावणें करितात व स्त्रिया वेश्यावृत्ति करितात.

**भगदर**–स्त्री. ( सं. ) पळापळ.

**भगना**–क्रि.अ. पळणें.

**भगना**–पु. ( सं. ) भाचा.

**भगनी**–स्त्री. ( सं. ) बहीण.

**भगर**–पु. १ ढोंग; बतावणी. २ सडलेलें ( कुजलेलें ) धान्य.

**भगरना**–क्रि.अ. कुजणें; सडणें.

**भगल**–पु. ( दे. ) १ ढोंग; कपट. २ जादू; हातचलाखी.

**भगली**–पु. ( दे. ) १ ढोंगी. २ जादूगार.

**भगाना**–क्रि.स. ( सं. ) १ पळवून लावणें; पळविणें. २ दूर करणें.

**भगाना**–क्रिअ. ( सं. ) पळणें; दूर होणें.

**भगाल**–पु. ( सं. ) मनुष्याच्या डोक्याची कवटी.

**भगाली**–पु. (सं.) महादेव.

**भगेडू-लू-भगोडा-भगोहाँ**–वि. ( सं. ) १ पळालेला. २ पळपुट्या; भितरा.

**भगौहाँ**–वि. ( सं. ) भगवा.

**भग्गुल-भग्गू**–वि. ( सं. ) भगोडा पहा.

**भग्नी**–स्त्री. ( सं. ) भगिनी.

**भचक**–स्त्री. ( सं. ) लंगडेपणा.

**भचकना**–क्रि.अ. ( सं. ) १ आश्चर्य-चकित होणें. २ लंगडणें.

**भच्छ**–पु. ( सं. ) भक्ष्य.

**भजक**–पु. ( सं. ) १ भजक. २ विभाग करणारा.

**भजन**–पु.(सं. ) १ भाग; खंड. २ सेवा; पूजा. ३ भजन.

**भजना**–क्रि.अ. (सं. ) १ पळणें. २ पोहोचणें.

**भजाना**–क्रि.अ. क्रि.स. ( सं.) १ पळणें. २ पळविणें.

**भजिआउर**–स्त्री. (सं. ) तांदूळ दही तूप मीठ घालून केलेला भात.

**भज्य**–वि. ( सं. ) १ विभागण्यास योग्य. २ भजनीय.

**भटकटाई-कटैया**–स्त्री. ( सं. ) एक वनस्पति.

**भटकना**–क्रि.अ. ( सं. ) १ भटकणें. २ रस्ता चुकणें. ३ भ्रमांत पडणें.

**भटधर्मा**–वि. ( सं. ) धर्मयोद्धा.

**भटभेरा**–पु. ( सं. ) १ द्वंद्वयुद्ध. २ धक्का; ठोकर. ३ आकस्मिक भेट.

**भटा**–पु. ( सं. ) वांगें.

**भटियारा**–पु. भठियारा पहा.

**भट्ट** स्त्री. ( सं. ) १ स्त्रियांकरितां एक आदरसूचक संबोधन. २ सखी; मैत्रीण. ३ प्रिय व्यक्ति.

**भटोट**–पु. ( सं. ) ठग.

**भटैया**–स्त्री. भटकटैया पहा.

**भटोला**–वि. (सं.) भाटासंबंधी.

**भट्टी-ट्ठी**–स्त्री. ( सं. ) भट्टी.

**भठियाना**–क्रि.अ. ( सं. ) ओहोटी लागणें.

**भठियारा**–पु. ( सं. ) सराईचा व्यव-स्थापक.

**भठियाल**–पु. ( सं. ) ओहोटी.

**भठुली**–स्त्री. ( सं. ) लहान भट्टी.

**भडंबा**–पु. ( सं. ) पोकळ देखावा; अवडंबर.

**भड़क**–स्त्री. ( अनु. ) १ दिखाऊ; चटकदार. २ चमक

**भड़कदार**–वि. ( अनु.+अ. ) १ भडक; चमकदार. २ रुबाबदार.

**भड़कना**–क्रिअ. (अनु.) १ आग भडकणें. २ क्रुद्ध होणें; भडकणें. ३ ( घोडा ) बुजणें.

**भड़भड़**–स्त्री. ( अनु. ) १ भडभड आवाज. २ गर्दी; जनसमूह. २ व्यर्थ बडबड.

**भड़भाड़िया**–वि. ( अनु.) बडबड्या; गप्पीदास.

**भड़भूँजा**–पु. ( सं. ) भडभुंजा.

**भड़वा**–पु. भडुआ पहा.

**भड़डार**–स्त्री. ( सं.) खाण्याचे पदार्थ ठेवण्याचें कपाट.

**भड़ाल**–पु. ( सं. ) योद्धा.

**भड़िहा**–पु. ( सं. ) चोर.

**भड़िहाई**–क्रिवि. ( सं. ) लपूनछपून.

**भड़ी**–स्त्री. (सं.) हरबऱ्याच्या झाडावर चढविणें.

**भडुआ**–पु. ( सं. ) वेश्येचा दलाल; भडवा.

**भणना**–क्रि.अ. ( सं. ) बोलणें.

**भतरौड़**–पु. उंच स्थान. २ शिखर. ३ मथुरेजवळचें एक स्थळ.

**भतवान**–पु. ( सं. ) विवाहांतील एक चाल.

**भतार**–पु; ( सं. ) भ्रतार; पति.

**भतीज़ा**–पु. ( सं. ) पुतण्या.

**भतुला**–पु. ( दे. ) गाकर; बाटी.

**भत्ता**–पु. ( सं. ) भत्ता.

**भदई**–वि. ( सं. ) भाद्रपदसंबंधी.

**भदभद**–वि. (अनु.) १ अतिशय लठ्ठ. २ कुरूप.

**भदूदा**–वि. ( अनु. ) कुरूप.

**भदेस-भदेसिल**–वि. ( अनु. ) कुरूप.

**भदैला-भदौहा**–वि. ( सं. ) भाद्रपदांत होणारा.

**भद्र**–वि ( सं. ) १ सभ्य; सुशिक्षित. २ कल्याणकारी. ३ श्रेष्ठ. ४ साधु.

**भद्र**–पु. ( सं. ) १ कल्याण; क्षेमकुशल. २ मुंडण.

**भद्रता**–स्त्री. ( सं. ) सभ्यता.

**भद्री**–वि. ( सं. ) भाग्यवान.

**भनक**–स्त्री. ( सं. ) १ धीमा आवाज. २ उडती गप्प.

**भनकना-भनना**–क्रि.स. ( सं. ) बोलणें.

**भनभनाहट**–स्त्री. (अनु.) भणभण आवाज.

**भबका-भभका**–पु. ( सं. ) अत्तर किंवा दारू गाळण्याचें यंत्र.

**भभक**–स्त्री. (अनु.) उसळी.

**भभकना**–क्रि.अ. (अनु.) १ उसळूनवर येणें. २ प्रज्वलित होणें; भडकणें.

**भभकी**–स्त्री. (अनु.) पोकळ धमकी.

**भब्भड-भभ्भड**–स्त्री. ( अनु. ) गर्दी; समुदाय.

**भभरना**–क्रि.अ. १ भयभीत होणें. २ भ्रमांत पडणें.

**भभूका**–पु. ( अनु. ) ज्वाला.

**भभूत**–स्त्री. ( सं. ) भस्म.

**भयचक**–वि. भौचक पहा.

**भया**–वि. ( सं. ) झालें.

**भयान**–वि. ( सं. ) भयाण; भयानक.

**भयाना**-क्रि.अ.क्रि.स. १ भिणें. २ भिवविणें.

**भरंत**-स्त्री. ( सं. ) भ्रम; संदेह.

**भर**-वि. ( सं. ) भर.

**भर**-क्रिवि. ( सं. ) द्वारा; कडून.

**भर**-पु. ( सं. ) भार.

**भरकना**-क्रि. अ. भडकणें.

**भरट**-पु. ( सं. ) १ कुमार. २ सेवक; नोकर.

**भरण**-पु. ( सं. ) १ पालनपोषण. २ भरणी नक्षत्र. ३ वेतन.

**भरता**-पु. ( दे. ) भरीत.

**भरता-भरतार**-पु. ( सं. ) पति; भ्रतार.

**भरती**-स्त्री. ( सं. ) भरती सर्व अर्थ मराठी प्र०

**भरना**-क्रि.स. क्रि.अ. ( सं. ) भरणें.

**भरना**-पु. ( सं. ) लांच.

**भरनि**-स्त्री. ( सं. ) पोषाख.

**भरपाई**-क्रिवि. ( सं. ) पूर्णपणें.

**भरपाई**-स्त्री. ( सं. ) भरपाई; पूर्ण वसूली.

**भरभराना**-क्रि. अ. (अनु. ) रोमांच उठणें; घाबरणें.

**भरभूँजा**-पु. ( सं. ) भडभुंजा.

**भरभेंटा**-पु. ( सं. ) युध्द; सामना.

**भरम**-पु. ( सं. ) १ भ्रम. २ रहस्य.

**भरमना**-क्रि.अ. ( सं. ) १ भ्रमण करणें. २ भटकणें. ३ धोक्यांत पडणें.

**भरमाना**-क्रि.स. क्रि.अ. ( सं. ) १ भुलविणें; बहकाविणें. २ भटकविणें. ३ चकित होणें; संशयांत पडणें.

**भरमार**-स्त्री. ( सं. ) विपुलता.

**भरराना**-क्रि.अ. (अनु. ) १ तुटून पडणें. २ एकदम कोसळणें.

**भरवाई**-स्त्री. ( सं. ) भरण्याचें काम.

**भरसक**-क्रिवि. ( सं. ) यथाशक्ति.

**भरसन**-स्त्री. ( सं. ) निर्भर्त्सना; कान उघाडणी.

**भरहराना**-क्रि.अ. भरभराना पहा.

**भराई**-स्त्री. ( सं ) भरण्याचें काम.

**भरापूरा**-वि. ( सं ) संपन्न.

**भरिया**-वि. ( सं. ) १ भरणारा; पूर्ण करणारा. २ ऋण फेडणारा.

**भरिया**-वि. ( सं. ) धातूचे ओतकाम करणारा.

**भरी**-स्त्री. ( सं. ) एक रुपया भाराचें वजन.

**भरु**-पु. ( सं. ) भार; ओझें.

**भरैया**-वि. ( सं. ) १ पालनकर्ता; पालक. २ भरणारा.

**भरोसा**-पु. ( सं. ) भरंवसा.

**भरौती**-स्त्री. ( सं. ) पावती.

**भरौना**-वि. ( सं. ) वजनदार; भारी.

**भर्जन**-पु. (सं.) भट्टीवर भाजलेले खाद्य पदार्थ.

**भर्त्सन**-स्त्री. (सं.) १ निर्भर्त्सना; निंदा. २ दटावणी.

**भर्म**-पु. (सं.) भ्रम.

**भर्मन**-पु. (सं.) भ्रमण.

**भर्रा**-पु. (अनु.) पक्षांचें उडणें.

**भर्सन**-स्त्री. भर्त्सन पहा.

**भल**-पु. (सं.) वध; हत्या. २ दान. ३ निरुपण.

**भलटी**-स्त्री. हँसिया पहा.

**भलमनसत—भलमनसाहत—भलमनसी**-स्त्री. (सं.) सज्जनता; भलेपणा.

**भला**-वि. (सं.) भला; चांगला.

**भला**-पु. (सं.) १ कुशल; कल्याण. २ फायदा.

**भला**-अव्य. (सं.) बरें; असो.

**भले**-क्रिवि. (सं.) चांगल्या तऱ्हेनें.

**भले**-अव्य. (सं.) वाहवा; भले.

**भलेरा**-पु. भला पहा.

**भवँ**-स्त्री. भौंह पहा.

**भवंग-गा**-पु. (सं.) साप.

**भवँर**-पु. (सं.) भँवर पहा.

**भवत**-वि. (सं.) आपला.

**भव**-पु. (सं.) १ जन्म; उत्पत्ति. २ मेघ. ३ कुशल. ४ संसार; दुनिया. ५ सत्ता. ६ प्राप्ति. ७ कारण; हेतु. ८ शिव. ९ भय.

**भव**-वि. (सं.) १ शुभ. २ जन्मलेला.

**भवत्**-पु. (सं.) १ भूमि. २ विष्णु.

**भवत्**-वि. (सं.) मान्यवर; पूज्य.

**भवना**-क्रि.अ. (सं.) फिरणें.

**भवनी**-स्त्री. (सं.) भार्या; गृहिणी.

**भवबंधन**-पु. (सं.) संसारपाश.

**भवभंजन**-पु. (सं.) १ ईश्वर. २ संसाराचा नाश करणारा; काळ.

**भवसंभव**-वि. (सं.) सांसारिक.

**भवाँ**-स्त्री. (सं.) फेरी; चक्कर.

**भवीला**-वि. (सं.) भावपूर्ण.

**भव्य**-वि. (सं.) १ भव्य; सुंदर. २ शुभ. ३ खरा; सच्चा. ४ लायक. ५ भविष्यकालीन. ६ श्रेष्ठ; मोठा. ७ प्रसन्न.

**भष**-पु. (सं.) भोजन; आहार.

**भसन**-पु. (सं.) भुंगा.

**भसना**-क्रि.अ. (बंगाली) १ तरंगणें; २ डुबणें.

**भसान**-पु. (बंगाली) मूर्तिविसर्जन.

**भसाना**-क्रि.स. पाण्यांत सोडणें; पाण्यांत लोटणें.

**भसुंड**-पु. (सं.) हत्ती.

**भसुर**-पु. (सं.) मोठा दीर.

**भहराना**-क्रि.अ. ( अनु. ) १ तुटून पडणें. २ कोसळणें. ३ घसरून पडणें. ४ जोमानें कामास लागणें.

**भहूँ**-स्त्री. भौंह पहा.

**भाँऊँ**-पु. ( सं. ) भाव; अभिप्राय.

**भाँउर-रि**-स्त्री. भाँवर पहा.

**भाँग**-स्त्री. ( सं. ) भांग ( पेय ).

**भाँज**-स्त्री. ( सं. ) १ घडी घालणें; मुडपणें. २ मोड दिल्याबद्दलचा वटाव. ३ फिरविणें.

**भाँजना**-क्रि.स. ( सं. ) घडी घालणें; मुडपणें. २ जोडी फिरविणें. ३ वीण घालणें; वळणें.

**भाँजी**-स्त्री. ( सं. ) मोडता घालणारें बोलणें.

**भाँट**-पु.(सं.) भाट.

**भाँटा**-पु. ( सं. ) वांगें.

**भाँड**-पु.(सं.) १ विदूषक; नकल्या. २ विनोद; थट्टा मस्करी. ३ बेशरम; नंगा. ४ सत्यनाश. ५ भांडें. ६ भेद. ७ उपद्रव; गडबड. ८ भाड पहा.

**भाँड़ना**-क्रि.अ. ( सं. ) भटकणें.

**भाँड़ना**-क्रि.स. ( सं. ) १ कोणाची तरी निंदा करीत फिरणें. २ बिघडविणें; नाश करणें.

**भाँड़ा**-पु. ( सं. ) भांडें.

**भांडागार**-पु. ( सं. ) भांडार.

**भांडिल**-पु. ( सं. ) न्हावी.

**भाँत-भाँति**-स्त्री. ( सं. ) १ प्रकार; तऱ्हा. २ रीति; पद्धति.

**भाँपना**-क्रि.स.१ ताडणें; अजमावणें; ओळखणें. २ पाहणें.

**भाँबी**-पु. चांभार.

**भाँयँभाँयँ**-पु. ( अनु. ) अगदी एकांत स्थळीं कानांत होणारा आवाज.

**भाँरी**-स्त्री. भाँवरा पहा.

**भाँवता**-पु. भावता पहा.

**भाँवना**-क्रि.स. ( सं. ) खोदून कोरून घासून सुंदर बनविणें.

**भाँवर**-स्त्री. ( सं. ) १ फेरी; चक्कर; फेरफटका. २ सप्तपदीच्या वेळची प्रदक्षिणा.

**भाँवर**-पु. भौंरा पहा.

**भा**-स्त्री. ( सं. ) १ वीज. २ किरण. ३ शोभा; चमक; दीप्ति.

**भा**-अव्य. ( सं. ) पाहिजेतर; किंवा; अथवा.

**भाइ**-पु. ( सं. ) १ प्रेम; प्रीति. २ स्वभाव. ३ विचार.

**भाइ**-स्त्री. ( सं. ) १ प्रकार; तऱ्हा. २ चालचालणूक.

**भाइप**-पु.( सं. ) १ स्नेहसंबंध. २ आप्तसंबंध.

**माने**-पु. (अ.) अर्थ; मतलब; आशय.

**मानों**-अव्य. ( सं. ) जणुकाय; जणु.

**माप**-पु. ( सं. ) माप.

**मापना**-क्रि.स. ( सं. ) मापणें.

**मापना**-क्रि.अ. ( सं. ) माजणें; मातणें. .

**माफकत-माफिकत**-स्त्री. ( अ. ) १ अनुकूलता. २ मैत्री; भेळ.

**माफिक**-वि. ( अ. ) १ अनुसार; प्रमाणें. २ योग्य.

**माफी**-स्त्री. ( अ. ) १ माफी; क्षमा. २ सारा माफ असलेली जमीन.

**माम**-पु. ( सं. ) १ मीपणा; अहंकार. २ ममता. ३ शक्ति.

**मामता**-स्त्री. ( सं. ) १ ममता; प्रेम २ आपलेपणा; आत्मीयता.

**मामलत-मामलात**-पु. ( अ. ) १ मामला. २ भानगड.

**मामला-मामिला**-पु. ( अ. ) १ व्यापार; कामधंदा. २ परस्पर; व्यवहार देणें घेणें इ. ३ विषय; ४ करार ५ झगडा. ६ मुख्य विषय.

**मामा**-पु. ( सं. ) मामा.

**मामा**-स्त्री. ( फा. ) १ आई; माता. २ स्वयंपाकीणबाई. ३ म्हातारी स्त्री. ४ मोलकरीण; दासी.

**मामी**-स्त्री. ( सं. ) आपल्या दोषांकडे दुर्लक्ष करणें.

**मामूँ**-पु. मामा (मुसलमानांत म्हणतात ).

**मामूल**-पु. ( अ. ) १ खोड; संवय. २ रीति; रिवाज. २ शिरस्त्याप्रमाणें मिळणारें द्रव्य.

**मामूली**-वि. (अ.) १ नियमित. २ सामान्य; साधारण; मामूली.

**मायक**-पु. ( सं. ) मायावी; जादूगार.

**मायक-मायका**-पु. ( सं. ) माहेर.

**मायनी**-स्त्री. ( सं. ) मायाविनी.

**मायल**-वि. ( फा. ) १ झुकलेला; प्रवृत्त. २ मिश्रित.

**माया**-स्त्री. ( सं. ) जागा; अंतर. या अर्थाखेरीज सर्व अर्थ मराठी मायाप्रमाणें.

**मायाकार-मायाजीवी**-पु. (सं.) जादूगार.

**मायावी**-पु. ( सं. ) १ मायावी. २ मांजर. ३ परमात्मा.

**मायी**-पु. ( सं. ) १ ईश्वर. २ माया करणारा. ३ जादूगार.

**मायी**-स्त्री. ( सं.) माई.

**मायूस**-वि. ( फा. ) निराश.

**मार**–पु. ( सं. ) १ कामदेव. २ विघ्न. ३ विष. ४ धोत्रा.

**मार**–स्त्री. ( सं. ) १ मार; युद्ध; लढाई. ३ मारामारी. ४ माला.

**मारका**–पु. ( इं. ) चिन्ह; मार्क.

**मारका**–पु. ( अ. ) १ युद्धक्षेत्र. २ लढाई. ३ महत्त्वपूर्ण घटना; महत्त्वाचें काम.

**मारकीन**–स्त्री. ( इं. ) एक जाडेंभरडें कापड.

**मारग**–पु. ( सं. ) मार्ग.

**मारगन**–पु. ( सं. ) १ भिकारी. २ बाण; तीर.

**मारना**–क्रि.स. ( सं. ) १ मारणें. २ गुप्त राखणें; लपविणें. ३ धातूचें भस्म तयार करणें.

**मारपेंच**–पु. ( सं. ) गोत्यांत आण-ण्याचे डावपेंच.

**मारा**–वि. ( सं. ) मारला गेलेला.

**मारामार**–क्रिवि. ( सं. ) अत्यंत शीघ्रतेनें.

**मारामार**–स्त्री. ( सं. ) मारामारी.

**मारि**–स्त्री. ( सं. ) मारणें; वध करणें. २ मरी पहा.

**मारी**–स्त्री. ( सं. ) साथीचा रोग.

**मारू**–स्त्री. ( सं. ) मार.

**मारू**–पु. ( सं. ) १ एक रोग. २ मोठा डंका. ३ मारवाडचा रहिवाशी.

**मारू**–वि. ( सं. ) १ मारणारा. २ हृदयवेधक.

**मारे**–अव्य. ( सं. ) कारणानें; योगें; मुळें.

**मार्का**–पु. ( इं. ) शिक्का; खूण; मार्क ( Mark ).

**मार्गण**–पु. ( सं. ) १ शोधणें. २ प्रेम. ३ याचक.

**माल**–पु. ( सं. ) १ क्षेत्र. २ कपट. ३ जंगल. ४ मल्ल.

**माल**–स्त्री. ( सं. ) १ माला; हार. २ चरख्याची धाव. ३ ओळ; पंगत.

**माल**–पु. ( अ. ) १ माल. २ कर रूपानें मिळणारें धन. ३ सुग्रास भोजन. ४ पीक.

**मालखाना**–पु. ( फा. ) मालाचें गुदाम.

**मालगोदाम**–( फा.+इं. ) १ मालाचें गुदाम. २ मालधक्का.

**मालती**–स्त्री. ( सं. ) १ मालतीचा वेल. २ मालतीवृत्त. ३ युवती. ४ चांदणें. ५ रात्र.

**मालदार**–वि. ( फा. ) धनवान.

**मालन**–स्त्री. ( सं. ) माळीण.

**मालामाल**-वि. ( फा. ) संपन्न; धनधान्यानें समृद्ध.

**मालिक**-पु. ( सं. ) १ माळी. २ धोबी. ३ एक पक्षी

**मालिक**-पु. ( अ. ) १ मालक. २ पति. ३ ईश्वर.

**मालिकाना**-स्त्री. (फा. ) १ मालकी. २ स्वामित्वाबद्दलचा कर.

**मालिकाना**-क्रि.वि. (फा. ) मालकाप्रमाणें.

**मालिकी**-स्त्री. मालकी.

**मालियत**-स्त्री. ( अ. ) १ किंमत. २ धन संपत्ति. ३ किंमती माल.

**मालिश**-स्त्री. ( फा. ) मालीश.

**माली**-पु. ( सं. ) माळी.

**माली**-वि. ( सं. ) माला धारण करणारा.

**माली**-वि. ( फा. ) आर्थिक; धनासंबंधी.

**मालिदा**-पु. ( फा. ) १ मलिदा पहा. २ एक उंची लोकरीचें कापड.

**मालूम**-वि. (अ.) ज्ञात; माहितीचा.

**माल्य**-पु. (सं. ) १ फूल. २ माला.

**माल्यवंत-वान् -माल्यवत्** - वि. मालाधारी.

**माल्यवती**-वि. माला धारण करणारी.

**मावत**-पु. ( सं. ) माहूत.

**मावस**-स्त्री. ( सं. ) अमावास्या.

**मावा**-पु. (सं. ) १ पेज. २ सत्व; निष्कर्ष. ३ गव्हाचें दूध. ४ प्रकृति. ५ खवा; मावा. ६ अंड्यांतील पिवळा बलक. ७ सामान; मसाला. ८ हिऱ्याची बुकटी.

**मावासी**-स्त्री. गढी; लहान किल्ला.

**माशा**-पु. (सं. ) १ मासा ( १/१२ तोळा ). २ महाशय; भला माणूस. ३ बंगाली मनुष्य.

**माशी**-पु. (सं. ) १ हिरवट काळा रंग. २ जमीनीचें माप २४० चौ. वार.

**माशी**-वि. (सं. ) हिरवट काळा.

**माशूक**-पु. ( अ. ) प्रेमपात्र.

**माष**-पु. १ उडीद. २ मासा. ३ शरीरावरील तीळ.

**माष**-वि. ( सं. ) मूर्ख.

**माषक**-पु. ( सं. ) १ उडीद. २ मासा ( १/१२ तोळा ).

**मास्**-पु. ( सं. ) १ चंद्रमा. २ मास; महिना.

**मास**-पु. ( सं. ) १ मास; महिना. २ मांस.

**मासा**-पु. ( सं. ) माशा पहा.

**मासी**-स्त्री. ( सं. ) मावशी.

**मासीन-मास्य**-वि. ( सं. ) एक महिन्याचा.

**माईं**–अव्य. मध्यें.

**माह**–पु. ( सं. ) १ माघ महिना. २ उडीद.

**माह**–पु. ( फा. ) महिना; मास.

**माहत**–स्त्री. ( सं. ) महत्त्व.

**माहताब**–पु. **माहताबी**–स्त्री. महताब; महताबी पहा.

**माहर–माहिर**–वि. तत्त्वज्ञ; तज्ञ; माहितगार.

**माहवार**–क्रिवि. ( फा. ) प्रतिमास.

**माहवार–माहवारी**–वि. मासिक.

**महावार**–पु. ( फा. ) मासिक वेतन.

**माहाँ**–अव्य. मध्यें.

**माहिं–हीं**–अव्य. आंत; मध्यें.

**माहियत**–स्त्री ( अ. ) १ तत्त्व. २ प्रकृति. ३ विवरण.

**माहियाना**–वि. व पु. माहवार पहा.

**माहिर**–पु. ( सं. ) इंद्र.

**माहिर**–वि. माहर पहा.

**माहिला**–पु. ( अ. ) नावाडी.

**माही**–स्त्री. ( फा. ) मासळी; मांस.

**माहीगीर**–पु. ( फा. ) कोळी.

**माहीपुश्त**–वि. ( फा. ) मध्यें जाड व टोकांना बारीक असा.

**माहुर**–पु. ( सं. ) विष.

**माहुं–माहों**–स्त्री. ( दे. ) पिकावरील कीड.

**माहेताबा**–पु. ( फा. ) चिलीम ओढणारा.

**मिंगनी**–स्त्री. लेंडी.

**मिंगी**–स्त्री. बीच्या आंतील गर.

**मिंड़ाई**–स्त्री. १ मळण्याची क्रिया. २ कपडा रंगविण्याची एक पद्धति.

**मिंहदी**–स्त्री. (सं.) मेंदी.

**मिआद**–मीआद पहा.

**मिआन**–वि. व पु. मियाना पहा.

**मिकदार**–स्त्री. (अ.) परिमाण; मान; प्रमाण.

**मिकनातीस**–पु. ( फा. ) लोहचुंबक दगड.

**मिचकना**–क्रि.स. मिचकणें.

**मिचकाना**–क्रि.स. मिचकावणें.

**मिचलाना**–क्रि.अ.मळमळणें;ओकारी येणें.

**मिचौलना**–मीचना पहा.

**मिछा**–वि. ( सं. ) मिथ्या.

**मिजराब**–स्त्री. ( अ. ) नखी.

**मिज़ाज**–पु. ( अ. ) १ स्वभाव. २ गुणधर्म. ३तब्येत; प्रकृति. ४ मिजास; घमेंड.

**मिजाज–शरीफ. मिजाज–आली**–(अ.) आपण कुशल अहांत ना ?

**मिज़ाज़दार**–वि. ( फा. ) मिजासखोर; घमेंडखोर.

**मिजाजपुरसी**–स्त्री. (फा.) कुशल विचारणें.

**मिटना**–क्रि.अ. (सं.) १ रद्द होणें. २ नष्ट होणें; न राहणें. ३ खराब होणें. ४ पुसून जाणें.

**मिटिया**–स्त्री. (सं.) मडकें (दूध वगैरे ठेवण्याचें).

**मिटिया**–वि. (सं.) मातीचा.

**मिटियाना**–क्रि.अ. (सं.) मातीनें घासणें.

**मिटियाफूस**–वि. अतिशय; कमजोर; फुसका.

**मिटियामहल**–पु. (सं+फा.) झोंपडी.

**मिट्टी**–स्त्री. (सं.) १ माती; धूळ. २ राख. ३ शरीर. ४ मृत शरीर. ५ मांस. ६ शरीराची घडण. ७ जमीन; पृथ्वी.

**मिट्टीका तेल**–पु. (सं.) घासलेट.

**मिट्टीखारिया**–स्त्री. खड़िया पहा.

**मिठ्ठा**–वि. (सं.) गोड.

**मिठ्ठी**–स्त्री. (सं.) पापा; चुंबन. (लहान मुलांचें).

**मिठ्ठू**–पु. (सं.) १ गोड बोलणारा. २ पोपट.

**मिठ्ठू**–वि. (सं.) १ अबोल; घुम्या. २ मधुरभाषी.

**मिट्टू-मिट्ठो**–स्त्री. (सं.) माती.

**मिठलोना**–वि. (सं.) कमी मीठ असलेला.

**मिठाई**–स्त्री. (सं.) १ माधुर्य. २ मिठाई. ३ चांगली गोष्ट.

**मिठास**–स्त्री. (सं.) माधुर्य.

**मिठौरी**–स्त्री. (सं.) डाळ किंवा उडदाच्या पिठाची वडी.

**मिडाई**–स्त्री. मिंडाई पहा.

**मिताई**–स्त्री. (सं.) मित्रता.

**मित्तर**–पु. (सं.) १ खेळांतील पुढारी; कर्णधार. २ मित्र.

**मिथु**–वि. (सं.) मिथ्या.

**मिनती**–स्त्री. (सं.) विनंति.

**मिनमिना**–वि. (अनु.) १ नाकांत बोलणारा. २ चिडका. ३ सुस्त; मट्ठ.

**मिनमिनाना**–क्रि. अ. (अनु.) १ नाकांत बोलणें. २ सुस्तपणें काम करणें.

**मिन्नत**–स्त्री. (अ.) १ प्रार्थना; निवेदन. २ दीनता. ३ कृतज्ञता.

**मिमियाना**–क्रि.अ. (अनु.) बकरी सारखें ओरडणें.

**मियाँ**–पु. (फा.) १ स्वामी; मालक; २ पति. ३ महाशय; मिया. ४ शिक्षक. ५ मुसलमान.

**मियान**-स्त्री. म्यान.

**मियान**-पु. (फा.) मधला भाग; मधला हिस्सा.

**मियाना**-वि. (फा.) मध्यम आकाराचा.

**मिरग**-पु. मृग.

**मिरगी-मिर्गी**-स्त्री. (सं.) अपस्मार रोग.

**मिरज़ई**-स्त्री. (फा.) एक प्रकारचा अंगरखा.

**मिरजा**-बि. (फा.) १ अमीरी. २ सरदारी; नेतृत्व. ३ घमेंड. ४ मिरज़ई पहा.

**मिरजामिजाज**-वि. (फा.) नाजुक मनाचा.

**मिरिच**-स्त्री. (सं.) मिर्च पहा.

**मिर्च**-स्त्री. (सं.) १ मिरची. २ काळीमिरी.

**मिलक**-स्त्री. (फा.) १ जमीनजुमला. २ धनवान; अमीर.

**मिलनसार**-वि. (सं.) मिळूनमिसळून वागणारा.

**मिलना**-क्रि.स. (सं.) मिळणें.

**मिलनी**-स्त्री. (सं.) १ विवाहांतील एक विधि. २ मीलन.

**मिलवाना**-क्रि.स. (सं.) भेटविणें.

**मिलाई**-स्त्री. (सं.) १ मिश्रण. २ विवाहांतील एक रीति. ३ धर्मांतरिताचा शुद्धिकरण विधि. ४ मिळविणें: मिसळणें.

**मिलान**-पु. (सं.) १ तुलना. २ तपासणी. ३ पडताळून पाहणें.

**मिलाना**-क्रि.स. (सं.) १ मिसळणें. २ जोडणें. ३ तुलना करणें. ४ मुळाशीं पडताळून पाहणें. ५ समेट करणें. ६ सुरांत लावणें.

**मिलाप**-पु. (सं.) मिलाफ.

**मिलावट**-स्त्री. (सं.) १ मिश्रण; मेळ. २ भेसळ.

**मिलिक**-स्त्री. (अ.) १ जमीनदार. २ जहागीर.

**मिलोना**-क्रि.स. (सं.) १ मिलाना पहा. २ दूध काढणें.

**मिलौनी**-स्त्री. (सं.) मिलाई पहा.

**मिल्क**-पु. (अ.) १ इनाम जमीन; जहागीर. २ अधिकार; मालकी. ३ धनसंपत्ति. ४ जमीनदारी.

**मिल्कियत**-स्त्री. (अ.) जमीनदारी. २ इनाम जमीन. ३ मिळकत. ४ धनसंपत्ति.

**मिल्की**-पु. (अ.) १ इनामदार. २ जमीनदार.

**मिल्लत**–स्त्री. ( सं. ) १ घसट; मैत्री. २ मनमिळाऊपणा. ३ जनसमूह.

**मिल्लत**–स्त्री. ( अ. ) संप्रदाय; पंथ.

**मिशी**–स्त्री. (सं.) १ बडीशेप. २ मेथी. ३ दर्भ. ४ एक सुगंधी वनस्पती.

**मिश्री**–पु. ( सं. ) मिश्रण करणारा.

**मिश्री**–स्त्री. ( सं. ) मिसरी पहा.

**मिष**–पु. ( सं. ) १ मिष; बहाणा. २ कपट. ३ दर्शन. ४ सिंचन. ५ जळफळाट. ६ स्पर्धा.

**मिस**–पु. ( सं. ) मिष पहा.

**मिस्**–पु. ( फा. ) तांबें.

**मिसकीन**–वि. ( अ. ) १ दुर्बल;दीन. २ निर्धन. ३ साधा भोळा.

**मिसरा**–पु. ( अ. ) कवितेचा चरण.

**मिसरी-मिसिरी**–स्त्री. १ मिसर देशाचा रहिवाशी. २ खडीसाखर.

**मिसरोटी**–स्त्री. अनेक धान्यांचीं पिठें मिसळून केलेली रोटी.

**मिसाल**–स्त्री. ( अ ) १ उपमा. २ २ उदाहरण. ३ म्हण; लोकोक्ति.

**मिसि-सी**–स्त्री. ( सं. ) मिशी पहा.

**मिसिल**–वि. ( अ. ) समान; तुल्य.

**मिसिल**–स्त्री. ( अ. ) १ एखाद्या विषयाचे वा खटल्याचे कागदपत्र. २ पुस्तकाचे फॉर्मस.

**मिसिली**–वि.(अ.) गुन्ह्याबद्दल कोर्टात शिक्षा झालेला.

**मिस्कला**–पु. ( अ. ) धार लावण्याचें यंत्र.

**मिस्कीन**–वि. मिसकीन पहा.

**मिस्तर**–पु. ( इं. ) १ प्लॅस्टर ठोकण्याची ठोकणी. २ निळीच्या गोळया करण्याचें यंत्र. ३ मेहतर पहा.

**मिस्तरी**–पु. ( इं. ) मेस्तरी; कुशलकारागीर ( सुतार, लोहार, गवंडी वगैरे ).

**मिस्र**–पु. ( अ. ) मिसर देश.

**मिस्रा**–पु. मिसरा पहा.

**मिस्री**–स्त्री. मिसरी पहा.

**मिस्ल**–वि. ( अ. ) समान; तुल्य; बरोबर.

**मिस्सा**–पु.अनेक प्रकारचीं पिठें मिसळून केलेली रोटी.

**मिस्सी**–स्त्री. ( फा. ) १ दातवण; मशेरी. २ वेश्यांमधील एक विधि.

**मिहतर**–पु. मेहतर पहा.

**मिहनत**–स्त्री. मेहनत पहा.

**मिहमान**–पु. मेहमान पहा.

**मिहर**–स्त्री. मेहर पहा.

**मिहानी**–स्त्री. मथानी पहा.

**मिहिका**–स्त्री. ( सं. ) १ गारा. २ धुकें. ३ कापूर.

**मिहीन**–वि. महीन पहा.

**मींगनी**–स्त्री. मेंगनी पहा.

**मींगी**-स्त्री. (सं.) बीच्या आंतील गर.

**मींजना**-क्रि.स. (सं.) १ चोळणें. २ मळणें. ३ कुस्करणें; चुरणें.

**मींडना**-क्रि स. (सं.) मळणें; कणीक तिंबणें.

**मीआद**-स्त्री. (अ.) १ मुदत; अवधि. कैदेची मुदत.

**मीआदी**-वि. (अ.) १ मुदतीचा. २ कैद भोगलेला.

**मीचना**-क्रि. स. (सं.) (डोळे) मिटणें.

**मीचु**-स्त्री. (सं.) मृत्यु.

**मीजा**-स्त्री. (अ.) १ अनुकूलता. २ स्वभाव. ३ अनुमति; सम्मति.

**मीजान**-स्त्री. (अ.) १ तराजू. २ बेरीज. ३ मीजा पहा.

**मीटना**-क्रि.अ. (सं.) मीचना पहा.

**मीठा**-वि. (सं.) १ गोड. २ स्वादिष्ट. ३ धिम्मा; सुस्त. ४ साधारण; मध्यम ५ नामर्द; नपुंसक. ६ सुस्वभावी. ७ प्रिय; रुचकर.

**मीठाआलू**-पु. (सं.) रताळें.

**मीठाजीरा**-पु. (सं.) १ काळें जिरें. २ बडीशेप.

**मीठातेल**-पु. (सं.) गोडें तेल.

**मीठानीबू**-पु. (सं.) पपनस.

**मीठापानी**-पु. (सं.) सोडालेमन.

**मीठाबरस-मीठासाल**-पु. मुलीचें तेरावें किंवा अठरावें वर्ष.

**मीठछुरी**-स्त्री. (सं.) १ कपटी मित्र. २ कपटी; कुटील.

**मीठीमार**-स्त्री. (सं.) मुकामार.

**मीना**-पु. (सं.) १ रंगीबेरंगी काच. २ नीलमणी. ३ किमया. ४ मिन्याचें काम. ५ दारूची सुरई.

**मीनामारी**- स्त्री. (फा.) मिन्याचें काम. २ नक्षी काम; कलाकसुरीचें काम.

**मीनार—मीनारा**—स्त्री. (अ.) मीनार; स्तंभ.

**मीर**-पु. (फा.) १ सरदार. २ पुढारी; नेता. ३ आचार्य. ४ सरदाराचा मुलगा.

**मीरजाई**-स्त्री. (फा.) १ अमीरी; सरदारी. २ घमेंड; अभिमान.

**मीरमजलिस**-पु. (फा.) सभापति; अध्यक्ष.

**मीरास**-स्त्री. (अ.) मरणानंतर वारसास मिळणारी संपत्ति.

**मील**-पु. (इं.) मैल.

**मीलन**-पु. (सं.) १ मिटणें; बंद करणें. २ संकुचित करणें.

**मीलित**-वि. ( सं. ) १ बंद केलेला; मिटलेला. २ आकसलेला; संकुचित झालेला.

**मुँगरा**-पु. (सं.) १ लांकडी हातोडा. २ बुंदीच्या खाऱ्या कळ्या.

**मुँगौरी**-स्त्री. ( सं. ) मुगाची वडी.

**मुंज**-पु. ( सं. ) मूँज पहा.

**मुंड**-पु. ( सं. ) मुंडकें.

**मुंड**-वि. ( सं. ) १ टक्कल पडलेला. २ नीच; अधम.

**मुंड़चिरा**-पु. ( सं. ) १ डोकें, नाक, डोळे इ. स इजा करून घेऊन भीक मागणारा. २ हुज्जतखोर.

**मुंडना**-क्रि.अ. (सं.) १ मुंडण होणें; लुटलें जाणें. ३ फसणें.

**मुंडा**-वि. ( सं. )१ तुळतुळीत हजामत केलेला. २ संन्यास घेतलेला. ३ शिंग तुटलेलें ( जनावर ).

**मुंडाई**-स्त्री. ( सं. ) मुंडण; हजामत.

**मुंडासा**-पु. ( सं. ) मुंडासें.

**मुँडिया**-स्त्री. ( सं. ) मुंडकें.

**मुँडिया**-पु. ( सं. ) संन्यासी.

**मुंडी**-स्त्री. (सं.) १ बोडकी; विधवा. २ एक पादत्राण.

**मुंडी**-पु. ( सं. ) १ मुंडण केलेला. २ न्हावी. ३ संन्यासी.

**मुंडेर-मुँढेरी**-स्त्री. (सं.) १ मुंडेरा पहा. २ बांध.

**मुंडेरा**-पु. (सं.) १ पक्का बांधलेला बांध. २ मधून मधून जास्त उंच असलेली गच्चीची भिंत; वरवंडी.

**मुंडो**-स्त्री. ( सं. ) बोडकी; विधवा.

**मुंडोका**-रांडेचा; रांडेच्या ( शिवी ).

**मुंतकिल**-वि. ( अ. ) एका जागेवरून दुसऱ्या जागीं गेलेला.

**मुंतज़िम**-पु. ( अ. ) व्यवस्था करणारा.

**मुंतज़िर**-वि. ( अ. ) वाट पाहणारा; प्रतीक्षा करणारा.

**मुंदना**-क्रि.अ. ( सं. ) १ बंद होणें; झांकलें जाणें. २ लुप्त होणें. ३ भोक बुझणें.

**मुंदरा**-पु. ( सं. ) १ एक कर्ण भूषण. २ संन्याशाच्या कानांतील कुंडल.

**मुंदरी**-स्त्री. ( सं. ) अंगठी.

**मुंशी**-पु. (अ.) १ लेखक. २ वळणदार अक्षर काढणारा. ३ कारकून.

**मुंसरिम**-पु. ( अ. ) १ व्यवस्था करणारा. ३ हेड क्लार्क.

**मुंसिफ़**-पु. ( अ. ) मुन्सफ.

**मुंह**-पु. ( सं. ) तोंड.

**मुंहअखरी**-वि. ( सं. ) शाब्दिक; तोंडी.

**मुँहचटौवल**-स्त्री. (सं.) १ चुंबन. २ बकवाद.

**मुँहचोर**-पु. (सं.) तोंड लपविणारा.

**मुँहछुआई**-स्त्री. (सं.) वरवरचें बोलणें.

**मुँहछुट**-वि. (सं.) फाटक्या तोंडाचा; फटकळ.

**मुँहजोर**-वि. (सं.+फा) १ वाचाळ. २ फटकळ. ३ उच्छृंखल; आडदांड.

**मुँहदिखलाई**-**मुँहदिखाई**-स्त्री. (सं.) १ लग्नांतील एक रीति. २ सुनमुख. ३ सुनमुखाच्या वेळचें धन वगैरे.

**मुँहदेखा**-वि. (सं.) १ तोंड देखला; २ नेहमी आज्ञेची वाट पहात बसणारा.

**मुँहपडा**-पु. (सं.) प्रसिद्ध; सर्वांच्या तोंडी असणारा.

**मुँहफट**-वि. (सं.) फटकळ.

**मुँहबोला**-वि. (सं.) मानलेला (नातेवाईक).

**मुँहभराई**-स्त्री. (सं.) तोंड दाबणें; लांच देणें.

**मुँहमाँगा**-वि. (सं.) इच्छेनुरुप.

**मुँहामुँह**-क्रिवि. (सं.) सांडोसांड. काठोकाठ.

**मुँहासा**-पु. (सं.) वयांत आल्याबर तोंडावर उठणारे मुरमाचे फोड.

**मुअत्तल**-वि. (अ.) १ काम धंदा नसलेला; रिकामा. २ कामावरून दूर केलेला.

**मुअ़म्मा**-पु. (अ.) १ रहस्य. २ कोडें. ३ डावपेचाचें बोलणें.

**मुअ़ल्लिम**-पु. (अ.) शिक्षक.

**मुआ़फ़**-वि. (अ.) माफ.

**मुआ़फ़कत**-स्त्री. (अ.) १ सदृशता २ मैत्री.

**मुआ़फ़िक**-वि. (अ.) १ विरुद्ध नसलेला; अनुकूल. २ सदृश; समान. ३ अगदीं बरोबर; कमी नाहीं व जास्तही नाहीं; माफक. ४ इच्छेनुसार.

**मुआ़फ़िकत**-स्त्री. (अ.) १ अनुरूपता. २ अनुकूलता. ३ मैत्री.

**मुआ़फ़ी**-स्त्री. (अ.) माफी.

**मुआ़मला**-पु. मामला पहा.

**मुआ़यना**-पु. (अ.) निरीक्षण.

**मुआ़लिज**-पु. (अ.) इलाज करणारा.

**मुआ़लिजा**-पु. (अ.) इलाज.

**मुआ़वज़ा**-पु. (अ.) १ बदला. २ नुकसान भरपाई.

**मुआहिदा**–पु. (अ.) दृढनिश्चय; करार.

**मुकटा**–पु. (दे.) मुकटा.

**मुकता**–वि. (सं.) अतिशय; भरपूर.

**मुकत्ता**–वि. (अ.) १ सभ्य; शिष्ट. २ कापून कोरून चांगल्या रीतीनें बनविलेला.

**मुकद्‌मा–मुकद्दमा**–पु. (अ.) मुकदमा; दावा.

**मुकद्दम**–वि. (अ.) १ प्राचीन. २ सर्वश्रेष्ठ. ३ आवश्यक.

**मुकद्दम**–पु. (अ.) मुकादम; पुढारी

**मुकद्दर**–पु. (अ.) प्रारब्ध; भाग्य.

**मुकद्दस**–वि. (अ.) पवित्र; शुद्ध.

**मुकना**–पु. (सं.) १ लहान दातांचा हत्ती. २ मिशा नसलेला पुरुष.

**मुकना**–क्रि.अ. (सं.) १ मुक्त होणें; सुटणें. २ संपणें.

**मुकम्मल**–वि. (अ.) तयार; पूरा केलेला.

**मुकरना**–क्रिअ. (सं.) नाकारणें (केलेली किंवा सांगितलेली गोष्ट).

**मुकरना**–पु. (सं.) नाकारणारा; बोलणें बदलणारा.

**मुकरनी–मुकरी**–स्त्री. एक काव्य प्रकार.

**मुकर्रर**–क्रिवि. (अ.) १ दोनदां; फिरून. २ अवश्य.

**मुकर्रर**–वि. (अ.) १ निश्चित; ठरलेला. २ नियुक्त..

**मुकर्ररी**–स्त्री. (अ.) १ नियुक्ति. २ २ कर (Tax). ३ पगार; नेमणूक.

**मुकव्वी**–वि. (अ.) बलवर्द्धक.

**मुकाबला**–पु. (अ.) १ समोरासमोर. २ लढाई. ३ विरोध. ४ तुलना. ५ समानता; बरोबरी.

**मुकाबिल**–क्रिवि. (अ.) समोर; सम्मुख.

**मुकाबिल**–वि. (अ.) १ समोरचा. २ समान; बरोबरीचा.

**मुकाबिल**–पु. (अ.) १ प्रतिद्वंद्वी. २ शत्रु.

**मुक़ाम**–पु. (अ.) १ मुक्काम. २ घर; निवासस्थान. ४ मोका.

**मुकियाना**–क्रि.स. (सं.) १ बुक्या मारणें. २ कणीक तिंबणें.

**मुक्का**-पु. (सं.) बुक्का.

**मुक्की**–पु. (सं.) १ बुक्की. २ मुष्टियुद्ध. ३ कणीक तिंबणें. ४ अंगावर हळुहळु बुक्क्या मारणें.

**मुक्केबाजी**–स्त्री. गुद्दागुद्दी.

**मुख़्तार**–पु. (अ.) १ मुखत्यार; प्रतिनिधि. २ वकील.

**मुखबंध-मुखबंधन**-पु (सं.) प्रस्तावना.

**मुखबिर**-पु. (अ.) दूत; संदेशवाहक.

**मुखर**-वि. (सं.) १ कटुभाषी. २ बकवादी. ३ अग्रणी; मुख्य.

**मुखर**-पु. (सं.) १ कावळा. २ शंख.

**मुखस्त**-वि. (सं.) तोंडपाठ.

**मुखातिब**-वि. (फा.) ज्याच्याशीं बोलणें होतें तो.

**मुखोपक्षक**-पु. (सं.) दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणारा; परावलंबी.

**मुख़ालिफ़**-वि. (अ.) १ विरोधक. २ शत्रु. ३ प्रतिद्वंद्वि.

**मुखिया**-पु. (सं.) मुख्य; पुढारी.

**मुख्तलिफ़**-वि. (अ.) १ पृथक; अलग. २ अनेक प्रकारचा.

**मुख्तसर**-वि. (अ.) १ संक्षिप्त. २ छोटा. २ अल्प; थोडा.

**मुग़ल**-पु. (फा.) मोगल.

**मुगलानी**-स्त्री. (फा.) १ मोगल स्त्री. २ कपडे शिवणारी स्त्री. ३ दासी.

**मुचंगड़**-वि. जाडजूड पण बेढब.

**मुच्चा**-पु. (दे.) मांसाचा लचका.

**मुछंदर**-पु. (सं.) १ मोठया मिशा असणारा. २ कुरूप व मूर्ख. ३ उंदीर.

**मुछियल**-वि. (सं.) मिशावाला.

**मुज़रा**-पु. (अ.) १ जारी केलेला. २ कापून घेतलेली रक्कम. ३ अभिवादन; मुजरा. ४ वेश्येचें गाणें.

**मुज़रिम**-वि. (अ.) अपराधी.

**मुजावर**-पु. (अ.) मुसलमान पुजारी.

**मुज़िर**-वि. (अ.) हानिकारक.

**मुझे**-सर्व. (सं.) मला.

**मुटकना**-वि. छोटा पण सुंदर.

**मुटका**-पु. रेशमी धोतर; मुकटा.

**मुटाई**-स्त्री. (सं.) १ जाडेपणा; स्थूलता. २ पुष्टि. ३ घमेंड; मोठेपणा.

**मुटाना**-क्रि.अ. (सं.) १ लठ्ठ होणें. २ अहंमन्य होणें.

**मुटासा**-वि. (सं.) श्रीमंतीनें ताठरलेला व माजलेला.

**मुटिया**-पु. (सं.) हमाल; मजूर.

**मुट्ठा**-पु. (सं.) १ हातांत मावेल एवढया गवताची जुडी. २ मूठभर वस्तु. ३ मुठींत मावणाऱ्या वस्तूंचा जुडगा. ४ हत्याराची मूठ.

**मुट्ठी-मुठी**-स्त्री. (सं.) १ मूठ. २ रिंगणें.

**मुठभेड़**-स्त्री. (सं.) १ टक्कर. २ लढाई; सामना.

**मुठिका**-स्त्री. (सं.) १ मूठ. २ बुक्का; गुद्दा.

**मुठिया**-स्त्री. ( सं. ) १ हत्याराची मूठ. २ छत्री काठी इ.ची मूठ.

**मुठुकी**-स्त्री.(सं.)रिंगणें.

**मुड़क**-स्त्री. मुरक पहा.

**मुड़ना**-क्रि. अ. ( सं. ) १ लवणें; वाकणें; मुडपणें. २ वळणें. ३ परत फिरणें. ४ मुंडना पहा.

**मुड़ला**-वि. ( सं. ) डोक्यावर केंस नसलेला.

**मुड़वाना**-क्रि.स. ( सं. ) १ मुंडन करविणें. २ वळविणें. ३ वाकविणें.

**मुडवारी**-स्त्री. ( सं. ) १ वरवंडी. २ उसें. ३ डोक्याकडचा भाग.

**मुड़हर**-पु. (सं. ) १ साडीचा डोक्यावरील पदर. २ डोक्याचा पुढील भाग.

**मुडाना**-क्रि.स. ( सं. ) मुंडण करणें.

**मुडिया**-पु. ( सं. ) मुंडण केलेला ( संन्याशी ).

**मुडेरा**-पु. मुँडेरा पहा.

**मुतअल्लिक**-क्रिवि. ( अ. ) विषयीं; संबंधी.

**मुतका**-पु. १ कठडा. २ खांब. ३ मीनार.

**मुतफ़न्नी**-त्रि. ( अ. ) धोकेबाज.

**मुतफर्रिक़**-वि. (सं. ) १ भिन्न भिन्न. २ अनेक प्रकारचा.

**मुतबन्ना**-पु. ( सं ) दत्तकपुत्र.

**मुतमौबल**-वि. ( अ. ) धनाढ्य.

**मुतलक़**-क्रिवि. ( अ. ) जरा देखील; थोडा सुद्धां. २ सर्वच्या सर्व.

**मुतलक़**-वि. ( अ. )अगदीं;निव्वळ.

**मुतवफ़ा**-वि. ( अ. )स्वर्गीय.

**मुतवल्ली**-पु. ( अ. ) अज्ञानाचा पालक.

**मुतसद्दी**-पु. (अ.) १ लेखक. २ दिवाण. ३ व्यवस्थापक. ४ कारकून.

**मुतासिरी**-स्त्री. (सं.) मोत्यांची कंठी.

**मुताबिक़**-क्रिवि. (अ.) अनुसार.

**मुताबिक**-वि. (अ.)अनुकूल.

**मुतालबा**-पु. ( अ. ) मिळावयाचें बाकी राहिलेलें धन.

**मुताह**-पु.( अ. ) शिया मुसलमानांतील तात्पुरता विवाह.

**मुताही**-वि.(अ.) १ मुताह झालेला, झालेली. २ रखेली ( स्त्री ).

**मुतिलाडू**-पु. ( सं. ) मोतीचुराचे लाडू.

**मुतेहरा**-स्त्री. (सं.) एक प्रकारच्या बांगडया.

**मुत्तफ़िक़**-वि. ( अ. ) सहमत.

**मुत्तसिल**-वि. ( अ. ) निकट; जवळ.

**मुत्तसिल**-क्रिवि. लागोपाठ; एकसारखा.

**मुदगर**-पु. ( सं. ) मुद्गल.

**मुदरा**-पु. ( दे. ) एक मादक पेय.

**मुदर्रिस**-पु. ( अ. ) अध्यापक.

**मुदा**-अव्य. ( अ. ) १ तात्पर्य असें कीं. २ परंतु.

**मुदा**-पु. ( सं. ) आनंद.

**मुदाम**-क्रिवि. ( फा. ) १ सदा; नेहमी. २ निरंतर. ३ हुबेहुब.

**मुदामी**-वि. ( फा. ) सार्वकालिक.

**मुदिर**-पु. ( फा. ) १ मेघ. २ कामुक.

**मुद्गर**-पु. ( सं. ) १ मुद्गल. २ गदा. ३ मोगरा.

**मुद्दआ**-पु. ( अ. ) मुद्दा; तात्पर्य.

**मुद्दई**-पु. ( अ. ) १ दावा लावणारा; वादी. २ वैरी.

**मुद्दत**-स्त्री. ( अ. ) १ मुदत; अवधी. २ बरेच दिवसांचा काल.

**मुद्दअलेह - मुद्दालेह**-पु. ( अ. ) प्रतिवादी.

**मुद्रणा**-स्त्री. ( सं. ) अंगठी.

**मुद्रा**-स्त्री. ( सं. ) मुद्रा सर्व अर्थ मराठीप्रमाणें.

**मुधा**-क्रिवि. ( सं. ) वृथा; व्यर्थ.

**मुधा**-वि. ( सं. ) १ निष्प्रयोजन. २ असत्य.

**मुधा**-पु. ( सं. ) मिथ्या; असत्य.

**मुनक्का**-पु. (अ.) मनुका.

**मुनरी**-स्त्री. मुँदरी पहा.

**मुनादी**-स्त्री. ( अ. ) दवंडी.

**मुनाफा**-पु. ( अ. ) फायदा; नफा.

**मुनरा**-पु. ( अ. ) मीनार.

**मुनासिब**-वि. ( अ. ) उचित;योग्य.

**मुनीब-म**-पु. ( अ. ) १ मुनीम; कारकून. २ नायब; सहाय्यक.

**मुन्ना-मुन्नूँ**-पु. ( दे. ) लहान बालक.

**मुफ़सिद**-वि. ( अ. ) भांडखोर.

**मुफ़स्सल**-वि. ( अ. ) सविस्तर.

**मुफ़स्सल**-पु. शहराच्या आसपासचीं गांवें.

**मुफ़ीद**-वि. ( अ. ) लाभदायक;फायदेशीर.

**मुफ्त**-वि. ( अ. ) मोफत; विनामूल्य.

**मुफ्ती**-पु. ( अ. ) मुसलमानी धर्मशास्त्र जाणणारा शास्त्री.

**मुफ्ती**-वि. ( अ. ) फुकट मिळालेला.

**मुबतिला**-वि. ( अ. ) ग्रस्त.

**मुबादिला**-पु. ( अ. ) बदला.

**मुबारक**-वि. ( अ. ) शुभ; मंगलकारक.

**मुबारकबाद**-पु. ( अ. ) धन्यवाद; अभिनंदन.

**मुबारकबादी-मुबारकी**-स्त्री. (अ.) १ अभिनंदन. २ स्वागतपर गीत.

**मुबालिग़ा**–पु. (अ.) अतिशय शेफारून केलेलें बोलणें.

**मुबाहिसा**–पु. ( अ. ) वादविवाद; चर्चा.

**मुमकिन**–वि. (अ.) संभवनीय; शक्य.

**मुरंडा**–पु. (दे.) गव्हाची गुडदाणी.

**मुरंडा–मुरंदा**–वि. (दे.) शुष्क; सुखलेला.

**मुर**–पु. (सं.) वेष्टण.

**मुर**–अव्य. ( सं. ) फिरून; दुसऱ्यांदा.

**मुरकना**–क्रि.अ. (सं.) मुरकणें; मुरडणें. २ फिरणें. ३ परत फिरणें. ४ मुरगळणें. ५ विनष्ट होणें.

**मुरका**–पु. (दे.) १ मोठा सुंदर हत्ती. २ मेंढपाळांची जेवणावळ.

**मुरगा**–पु. ( फा. ) १ कोंबडा. २ पक्षी.

**मुरगाबी**–पु. ( फा. ) पाणकोंबडा.

**मुरचंग**–पु. तोंडानें वाजविण्याचें एक वाद्य.

**मुरचा**–पु. मोरचा पहा.

**मुरछना**–क्रि.अ. ( सं.) १ शिथिल होणें. २ बेशुद्ध होणें.

**मुरज**–पु. ( सं. ) मृदंग.

**मुरझाना**–क्रि.अ. ( सं. ) १ कोमेजणें. सुस्त होणें. २ उदास होणें.

**मुरड**–पु. गर्व; अहंकार.

**मुरडकी**–स्त्री. मरोड़ पहा.

**मुरदर**–पु. ( सं. ) श्रीकृष्ण.

**मुरदा**–पु. ( फा. ) मुडदा.

**मुरदा**–वि. ( फा. ) १ मृत. २ दुर्बल. ३ कोमेजलेला.

**मुरदार**–वि. ( फा. ) १ मृत. २ अपवित्र. ३ निर्जिव; चामट.

**मुरदार**–पु. ( फा. ) मेलेलें जनावर.

**मुरना**–क्रि. अ. मुड़ना पहा.

**मुरपरैना**–पु. फेरीवाल्याचें गाठोडें.

**मुरब्बा**–पु. ( अ. ) १ मुरंबा. २ समभुज चतुष्कोण. ३ वर्गफल.

**मुरब्बी**–पु. ( अ. ) १ पालन करणारा. २ रक्षक; आश्रयदाता. ३ सहाय्यक; मदतनीस.

**मुरमुराना**–क्रि.अ. ( अनु. ) १ पीळ पडून तुटणें; चूरचूर होणें. २ टणक वस्तु फुटताना आवाज होणें.

**मुरारिया**–स्त्री. मूर्री दहा.

**मुरलिका–मुरालिया**–स्त्री. ( सं. ) मुरली.

**मुरव्वत**–स्त्री. मुरौवत पहा.

**मुरशिद**–पु. ( अ. ) १ गुरु; मार्गदर्शक. २ मोठा; पूज्य. ३ धूर्त; वस्ताद.

**मुरस्सा**–वि. ( अ. ) जडावाचा.

**मुरस्साकारी**–स्त्री. ( अ. ) जडावाचें काम.

**मुरहा**–वि. (सं.) १ मूळ नक्षत्रावर जन्मलेला. २ अनाथ; पोरका. ३ उपद्रवी; खोडकर.

**मुरहा**–पु. ( सं. ) श्रीकृष्ण.

**मुराड़ा**–पु. ( दे. ) कोलीत.

**मुराद्**–स्त्री. (अ.) १ अभिलाषा; इच्छा. २ आशय; मतलब.

**मुराना**–क्रि.स. ( अनु. ) चघळणें.

**मुराफा**–पु. ( अ. ) १ अपील(Appeal ). २ निवेदन.

**मुरार**–पु. ( सं. ) कमलनाल.

**मुरार-रि-री**–पु. ( सं. ) मुरारी; श्रीकृष्ण.

**मुरासा**–पु. (सं.) १ कर्णफूल. २ मुंडासें.

**मुरीद्**–पु. ( अ. ) १ शिष्य. २ अनुयायी.

**मुरुआ**–पु. ( दे. ) पायाचा घोटा.

**मुरुख**–वि. ( सं. ) मूर्ख.

**मुरुछना**–क्रि.अ. ( सं. ) मूर्च्छित पडणें.

**मुरुझना**–क्रि.अ. ( सं. ) कोमेजणें.

**मुरौवत**–स्त्री. ( अ. ) १ लाज; संकोच; मुरवत. २ माणुसकी.

**मुर्ग़**–पु. ( फा. ) कोंबडा.

**मुर्ग़ाबी**–पु. पाणकोंबडा.

**मुर्दनी**–स्त्री. ( फा. ) १ प्रेतकळा. २ प्रेतयात्रेबरोबर जाणें. ३ प्रेतयात्रा.

**मुर्दा**–पु. ( फा. ) मुडदा; प्रेत.

**मुर्रा**–पु. (सं.) १ पोटांतील मुर्डा. २ मुरूड शेंग.

**मुर्री**–स्त्री. ( सं. ) १ पीळ देऊन दोन दोऱ्या एकत्र गांठविण्याची पद्धति. २ निरी. ३ कापडाची वात. ४ पीळ. ५ सुरकुति.

**मुर्रीदार**–वि. ( सं.+फा. ) पीळदार.

**मुर्शिद**–पु. मुरशीद पहा

**मुलकना**–क्रि.अ. ( सं. ) स्मित करणें.

**मुलकी**–वि. ( अ. ) १ मुल्की पहा. २ देशी.

**मुलज़िम**–वि. ( अ. ) अपराधी.

**मुलतवी**–वि. ( अ. ) स्थगित.

**मुलना**–पु. ( अ. ) मुल्ला.

**मुलमची**–पु. ( अ. ) मुलामा करणारा.

**मुलम्मा**–पु. ( अ. ) मुलामा.

**मुलम्मा**–वि. (अ.) मुलामा दिलेला.

**मुलहा**–वि. मुरहा पहा.

**मुलाँ**–पु. ( अ. ) मुल्ला; मौलवी.

**मुलाकत**–स्त्री. ( अ. ) १ मुलाखत; भेट. २ मैत्री; मिलाफ.

**मुलाकाती**-वि. ( अ. ) परिचित.

**मुलाजिम**-पु. ( अ. ) १ हजर राहणारा; उपस्थित राहणारा. २ नोकर.

**मुलाजिमत**-स्त्री. ( अ. ) चाकरी.

**मुलाम-मुलायम**-वि. ( अ. ) १ १ नरम; मऊ. २ मंद; धीमा. ३ नाजुक; सुकुमार. ४ मृदु ( स्वभाव).

**मुलायमत-मुलायामियत-मुलायमी**-स्त्री. ( अ. ) १ मृदुता. २ सुकुमारता. ३ नाजुकता.

**मुलाहज़ा**-पु. ( अ. ) १ निरीक्षण. २ संकोच; भीड; मुरवत. ३ विचार.

**मुलेठी**-स्त्री. ( सं. ) जेष्ठीमध.

**मुल्क**-पु. ( अ. ) १ मुलुख. २ संसार; जगत.

**मुल्की**-वि. (अ. ) १ शासनासंबंधी; २ मुलुखासंबंधी; देशी.

**मुल्तवी**-वि. ( अ. ) स्थगित.

**मुवक्किल**-पु. ( अ. ) अशील.

**मुवना**-क्रि.अ. ( सं. ) मरणें.

**मुवाना**-क्रि.अ. ( सं. ) मारणें; प्राण घेणें.

**मुशफ़िक़**-वि. ( अ. ) १ दयाळू. २ मित्र.

**मुश्क**-पु. ( फा.) १ कस्तुरी. २ गंध; वास.

**मुश्क**-स्त्री. ( फा. ) बाहू ; दंड.

**मुश्किल**-वि. (अ.) कठिण; मुश्किल.

**मुश्किल**-स्त्री. ( अ. ) १ कठिणता. २ संकट.

**मुश्की**-वि. (फा.) १ कस्तुरी रंगाचा; काळा. २ कस्तुरी मिश्रित.

**मुश्की**-पु. ( फा. ) काळाभोर घोडा.

**मुश्त**-पु. (फा.) मूठ.

**मुश्तहिर**-वि. ( अ. ) जाहीर.

**मुश्ताक़**-वि. ( अ. ) १ इच्छा धरणारा. २ प्रेमी.

**मुषुर**-स्त्री.स. ( सं. ) गुंजारव.

**मुसक**-पु. मुश्क पहा.

**मुसकनी**-स्त्री. ( सं. ) स्मित हंसणें.

**मुसकनिया**-स्त्री. मुसकान पहा.

**मुसकराना**-क्रि.अ. ( सं.) स्मित करणे;

**मुसकराहट**-स्त्री. ( सं. ) मंदहास्य; स्मित.

**मुसका**-पु. ( दे. ) बैलाच्या तोंडावर बांधण्याची जाळी.

**मुसकान-मुसकानी—मुसकिराहट—मुसकुराहट—मुसक्यान**-स्त्री. ( सं. ) मंदस्मित.

**मुसन्ना**-पु. (अ.) नक्कल; कॉपी.

**मुसन्निफ़**-पु. ( अ. ) ग्रंथकर्ता.

**मुसमुंद-मुसमुंध**-वि. (दे.) ध्वस्त; नष्ट.

**मुसम्मा**-वि. पु. **मुसम्मात**-वि. स्त्री. ( अ. ) नामक.

**मुसम्मात**-स्त्री. ( अ. ) स्त्री.

**मुसरिया**-स्त्री. ( सं. ) उंदराचें पिलूं.

**मुसल्लम**-वि. (फा.) सबंध; अख्खा.

**मुसल्लम-मुसल्ला**-पु. ( फा. ) मुसलमान.

**मुसल्ला**-पु. ( अ. ) नमाज पढण्याची चटई.

**मुसव्विर**-पु. ( अ. ) चित्रकार.

**मुसाफिर**-पु. ( अ.) प्रवासी; वाटसरु.

**मुसाफिरी**-स्त्री. ( अ. ) प्रवास.

**मुसाइब**-पु. ( अ. ) राजे किंवा श्रीमंत लोक यांचे बरोबर नेहमी असणारा कारभारी.

**मुसीबत**-स्त्री. ( अ. ) १ संकट; मुसीबत. २ कष्ट.

**मुस्की-मुसक्यान**-स्त्री. मुसकराहट पहा.

**मुस्की**-वि. मुश्की पहा.

**मुस्टंडा**-वि ( सं. )१ धष्टपुष्ट;मोताद. २ बदमाश.

**मुस्त-मुस्तक**-पु. ( सं. ) नागरमोथा.

**मुस्तकिल**-वि. (अ.) १ अटळ; स्थिर. २ पक्का. मजबूत. ३ स्थायी.

**मुस्तनद**-वि. (अ. ) प्रामाणिक.

**मुस्तैद**-वि. ( अ. ) १ तत्पर; सिद्ध; तयार. २ हुशार; तरतरीत.

**मुस्तैदी**-स्त्री. ( अ. ) १ तत्परता; तयारी. २ हुशारी.

**मुहकम**-वि. (अ.) पक्का; दृढ.

**मुहकमा**-पु. (अ. ) विभाग; खातें.

**मुहताज**-वि. (अ.) १ गरजू. २ दरिद्री. ३ आश्रित.

**मुहब्बत**-स्त्री. (अ. ) १ प्रेम; प्रीति. २ मैत्री.

**मुहर**-स्त्री. ( अ. ) मोहर पहा.

**मुहरा**-पु. ( सं. ) १ दर्शनी भाग. २ निशाण; लक्ष्य. ३ तोंडाचा भाग. ४ बुद्धिबळांतील मोहरा.

**मुहरी**-स्त्री. १ मोरी पहा. २ मोहरी पहा.

**मुहर्रम**-पु. (अ.) मोहरमचा महिना

**मुहर्रमी**-वि. ( अ. ) १ मोहरमसंबंधी. २ उदास; दुःखी.

**मुहर्रिर**-पु. ( अ. ) कारकून.

**मुहलत**-स्त्री. मोहलत पहा.

**मुहल्ला**-पु. महल्ला पहा.

**मुहसिल**-वि. (अ.) वसुली करणारा.

**मुहस्सिल**-पु. (अ. ) प्यादा; शिपाई.

**मुहाफ़िज़**-वि. (अ.) रक्षण करणारा; संरक्षक.

**मुहाल**-वि. ( अ. ) १ अशक्य; असंभाव्य. २ कठिण; दुःसाध्य.

**मुहाल**-पु. महाल व मोहल्ला पहा.

**मुहाला**-पु. ( सं. ) हत्तीच्या दातांना बसविलेली पितळी वसवी.

**मुहावरा**-पु. ( अ. ) १ म्हण; वाक्संप्रदाय. २ संवय; अभ्यास.

**मुहासिब**-पु. ( अ. ) १ गणिती. २ हिशेब तपासनीस.

**मुहासिबा**-पु. ( अ.) १ हिशेब. २ हिशेब तपासणी.

**मुहासिरा**-पु. (अ.) वेढा; घेरा.

**मुहासिल**-पु. ( अ.) १ उत्पन्न; आय. २ नफा.

**मुहिम-मुहिम**-स्त्री. (अ.) १ अवघड वा जोखमीचें काम. २ मोहीम; युद्ध. ३ आक्रमण; चढाई.

**मुहिर**-पु. (स.) कामदेव.

**मुहिर**-वि. (सं.) जडबुद्धि; मूर्ख.

**मूँग**-स्त्री.पु. ( सं. ) मूग.

**मूँगफली**-स्त्री. ( सं. ) भुइमूग व भुईमुगाची शेंग.

**मूँगा**-पु. ( सं. ) पोंवळें; प्रवाळ.

**मूँगिया**-वि. ( सं. ) हिरवट रंगाचा; मुगासारखा.

**मूँछ**-स्त्री. (सं. ) मिशी.

**मूँछी**-स्त्री. ( दे. ) शेव घातलेली कढी.

**मूँज**-स्त्री. ( सं. ) दर्भ; एक गवत.

**मूँड**-पु. ( सं. ) कपाळ; डोकें.

**मूँडकटा**-पु. ( सं. ) धोकेबाज; गळेकापू.

**मूँडना**-क्रि.स. ( सं. ) १ केस कापणें. २ ठगविणें. ३ शिष्य बनविणें.

**मूँडी**-स्त्री. ( सं. ) डोकें; कपाळ.

**मूँदना**-क्रि.स. (सं.) झाकणें.

**मूकना**-क्रि.स. ( सं. ) १ त्यागणें; सोडणें; दूर करणें. २ बंधन हटविणें. ३ मुक्त करणें.

**मूका**-पु. ( सं. ) १ भिंतींतील भोंक. २ झरोका. ३ ठोसा; बुक्का.

**मूकिमा**-स्त्री. ( सं. ) मूकता.

**मूखना**-क्रि.स. चोरून नेणें.

**मूज़ी**-पु. ( अ. ) खल; दुर्जन.

**मूठ**-स्त्री. ( सं. ) मूठ सर्व अर्थ मराठीप्रमाणें.

**मूठना**-क्रि.अ. ( सं. ) नष्ट होणें; नाहीसें होणें; मरणें.

**मूठा**-पु. ( सं. ) गवताची पेंढी.

**मूठी**-पु. (सं.) मुट्ठी पहा.

**मूर**-पु. ( सं. ) १ मूळ. २ जडीबुट्टी. ३ भांडवल; मुद्दल.

**मूरख**-वि. ( सं. ) मूर्ख.

**मूरचा**-पु. (फा. ) १ गंज; तांब. २ आरशावरील मळ. ३ खंदक. ४

किल्ल्यावरील मारा करण्याची जागा. ५ किल्यावरील लढणारी सेना.

**मूरि-मूरी**-स्त्री. ( सं. ) मुळी.

**मूर्ति**-स्त्री. ( सं. ) १ कठीणपणा; भरीवपणा. २ मूर्ति.

**मूल**-पु. ( सं. ) मूळ.

**मूल**-वि. ( सं. ) मुख्य; प्रधान.

**मूस-सा**-पु. ( सं. ) उंदीर.

**मेंगनी**-स्त्री. लेंडी.

**मकदार**-पु. ( अ. ) मिकदार पहा.

**मेख**-पु. ( सं. ) मेष.

**मेख**-स्त्री. ( फा. ) १ मेख; खुंटी. २ पाचर.

**मेचक**-स्त्री. ( सं. ) १ अंधकार. २ सुरमा. ३ धूर. ४ मेघ. ५ काळेंमीठ.

**मेचक**-वि. ( सं. ) काळा.

**मेज़**-पु. ( फा. ) मेज; टेबल.

**मेज़बान**-पु. ( फा. ) आतिथ्य करणारा; यजमान.

**मेजा**-पु. ( सं. ) बेडूक.

**मेटक-मेठनहार-रा**-पु. ( सं. ) मिटविणारा; नाशक;

**मेटना**-क्रि.स. (सं.) १ घासून साफ करणें. २ दूर करणें; राहूं न देणें. ३ नष्ट करणें.

**मेटिया-मेटी**-स्त्री. ( सं. ) मडकें.

**मेदुवा**-वि. ( सं. ) कृतघ्न.

**मेठ**-पु. ( सं. ) माहुत.

**मेड़**-पु. ( सं. ) १ मातीचा बांध. २ २ दोन शेतांमधील पाऊल वाट. ३ उंच लाट.

**मेडक**-पु. बेडूक

**मेड़रा**-पु. (सं.) **मेड़री**-स्त्री. गोल वस्तूचा कांठ.

**मेड़िया**-स्त्री. ( सं. ) १ मंडप. २ मढी.

**मेढक**-पु. ( सं. ) बेडूक.

**मेढ़ा**-पु. ( सं. ) मेंढा.

**मेढी**-स्त्री. ( सं. ) तीन पेडी वेणी.

**मेढ़ू**-पु. ( सं. ) १ लिंग; शिश्न. २ मेंढा.

**मेदा**-स्त्री. ( सं. ) एक औषधी.

**मेदा**-पु. ( अ. ) पक्वाशय.

**मेदुर**-वि. ( सं. ) स्निग्ध.

**मेधिर**-वि. ( सं. ) बुद्धिमान.

**मेनाद**-पु. १ बकरा. २ मांजर. ३ मोर.

**मेम**-स्त्री. ( इं. ) १ मडम. २ पत्त्यांतील राणी.

**मेमना**-पु. १ कोकरूं. २ घोड्याची एक जात.

**मेमार**-पु. ( अ. ) गवंडी.

**मेर-मेल**-पु. ( सं. ) मेळ.

**मेलक**-पु. ( सं. ) १ संग; सहवास. २ मेळावा. ३ मलिन.

**मेलन**-पु. (सं.) १ मीलन. २ जमाव.
**मेलना**-क्रि. स. (सं.) १ मिसळणें; मिळविणें. २ टाकणें. ३ धारण करणें.
**मेलना**-क्रि.अ. (सं.) एकत्र होणें; जुळणें.
**मेला**-पु. (सं.) १ मेळावा. २ जत्रा.
**मेला**-स्त्री. (सं.) १ मेळावा. २ मीलन; मिलाफ ३ अंजन. ४ शाई.
**मेलाठेला**-पु. गर्दी व रेटारेटी.
**मेली**-पु. (सं.) दाट मैत्री असलेला.
**मेली**-वि. (सं.) मिळून मिसळून वागणारा.
**मेल्हना**-क्रि.अ. १ त्रासामुळें या कुशीवरुन त्या कुशीवर होणें; तळमळणें. २ अळंटळं करणें.
**मेव**-पु. (दे.) एक लुटारू जात.
**मेवा**-पु. (फा.) सुकामेवा.
**मेवासा**-पु. १ किल्ला. २ घर.
**मेवासी**-पु. १ घरांत रहाणारा; घराचा मालक. २ किल्ल्यांत रहाणारा.
**मेहँदी**-स्त्री. (सं.) मेंदी.
**मेह**-पु. (सं.) १ प्रमेहरोग. २ मूत्रस्राव. ३ मेघ. ४ पाऊस.
**मेहतर**-पु. (फा.) १ श्रेष्ठ; मोठा. २ भंगी.
**मेहनत**-स्त्री. (फा.) मिहनत; श्रम.
**मेहनताना**-पु. (फा.) मजुरी.
**मेहना**-स्त्री (सं.) स्त्री; महिला.
**मेहमान**-पु. (फा.) पाहुणा.
**मेहमानदारी**-स्त्री. (फा.) आतिथ्य.
**मेहमानी**-स्त्री. (फा.) १ आतिथ्य. २ पाहुणचार घेणें.
**मेहर**-स्त्री. (फा.) कृपा; मेहरबानी.
**मेहरा**-पु. (सं.) हिजडा.
**मेहराब**-स्त्री. (अ.) महिरप.
**मेहरारू**-स्त्री. (सं.) स्त्री; महिला.
**मेहरिया—मेहरी**—स्त्री. १ स्त्री; महिला. २ पत्नी.
**मैं**-अव्य. (सं.) आंत.
**मैं**-सर्व. (सं.) मी.
**मै**-क्रिवि. (सं.) सह; बरोबर.
**मैका**-पु. (सं.) माहेर.
**मैगल**-पु. (सं.) मस्त हत्ती.
**मैगल**-वि. (सं.) मस्तावलेला.
**मैजल**-स्त्री. (अ.) १ मजल. २ सफर; यात्रा.
**मैत्रक**-पु. (सं.) मित्रता.
**मैदान**-पु. (फा.) १ मैदान. २ विस्तार; लांबीरुंदी.
**मैन**-पु. (सं.) १ मदन. २ मेण.
**मैमंत**-वि. (सं.) १ मदोन्मत्त. २ घमेंडखोर.
**मैया**-स्त्री. (सं.) आई.

**मैयत**–स्त्री. (फा.) १ मृत्यु. २ प्रेत.

**मैलंद**–पु. भ्रमर.

**मैल**–वि. (सं.) मलिन.

**मैल**–स्त्री. (सं.) १ मळ; घाण. २ दोष; विकार.

**मैलखोरा**–वि. मळखाऊ.

**मैलखोरा**–पु. १ गंजीफ्राक, मलमलीचा सदरा इ. आंतून घालण्याचे कपडे. २ साबण.

**मैला**–वि. (सं.) १ मळलेला. २ दोषयुक्त. ३ दुर्गंधी सुटलेला.

**मैला**–पु. (सं.) विष्ठा; गू. २ केरकचरा. ३ मळ.

**मैलाकुचैला**–वि. (सं.) १ मळकट; घाणेरडा. २ मळकट कपडे घालणारा; घामट.

**मैहर**–पु. १तुपाची बेरी. २ नैहर पहा.

**मोंगरा**–पु. (सं.) १ लांकडी हातोडा. २ मोगरा.

**मोंछ**–स्त्री. (सं.) मिशी.

**मोंढा**–पु. (सं.) १ वेत वा बांबूचें गोल आसन. २ खांद्याचें टोक.

**मो**–सर्व. माझा.

**मोकना**–क्रि.स. (सं.) १ सोडणें; त्यागणें. २ फेकणें; टाकणें.

**मोकल**–वि. (सं.) मोकळा; सुटा; स्वतंत्र.

**मोकला**–वि. (सं.) १ खूप रुंद. २ मोकळा; स्वछंद.

**मोका**–पु. १ मोका. २ झरोका.

**मोख**–पु. (सं.) मोक्ष.

**मोखा**–पु. (सं.) झरोका.

**मोघ**–वि. (सं.) व्यर्थ; निष्फळ.

**मोच**–स्त्री. (सं.) शीर चमकणें; नस उतरणें; लचकणें.

**मोचा**–पु. (सं.) केळें.

**मोचाट**–पु. (सं.) १ केळें. २ केळीचा गाभा.

**मोची**–पु. (सं.) चांभार.

**मोछ**–स्त्री. (सं.) मिशी.

**मोछ**–पु. (सं.) मोक्ष.

**मोट**–स्त्री. मोटळी.

**मोट**–पु. पाण्याची मोट.

**मोट**–वि. १ मोठा; जाडा. २ स्वस्त अल्पमोली.

**मोटन**–पु. (सं.) १ वायु; हवा. २ दळणें. ३ मळणें; रगडणें.

**मोटरी**–स्त्री. मोटळी; गठडी.

**मोटा**–वि. (सं.) १ जाडा; जाड. २ रवाळ. ३ कमी प्रतीचा; जाडा भरडा. ४ बेडौल. ५ साधारण मानापेक्षा अधिक. ६ घमेंडी.

**मोटा**–पु. गाठोडें; ओझें.

**मोटाई**–स्त्री. (सं.) १ लठ्ठपणा. २ २ खोडसाळपणा; पाजीपणा.

**मोटाना**-क्रि.अ. ( सं. ) १ लट्ठ होणें; फुगणें; २ घमेंड करणें. ३ श्रीमंत होणें.

**मोटिया**-पु. १ जाडेंभरडें कापड. २ हमाल; मजूर.

**मोड**-पु. (सं.) १ रस्त्याचें वळण; वाकण. २ बांक; वक्रता.

**मोडना**-क्रि.स. ( सं. ) वाकविणें; मुडपणें; वळविणें.

**मोड़ा**-पु. (सं.) मुलगा.

**मोड़ी**-स्त्री. (सं.) मुलगी.

**मोतबर**-वि. (फा.) विश्वासघात.

**मोतिया**-वि. ( सं. ) मोगरा.

**मोतिया**-वि. ( सं. ) १ मोत्याच्या रंगाचा २ मोत्यांसारखा.

**मोतीझिरा**-पु. कांजिण्या.

**मोतीबिल**-पु. (सं.) मोतिया; मोगरा.

**मोतीसिरी**-स्त्री. ( सं. ) मोत्यांची माळ.

**मोथरा**-वि. बोथट.

**मोदी**-पु. ( सं. ) धान्य व किराणा व्यापारी.

**मोदीखाना**-पु. (सं+फा.) धान्याचें गोदाम.

**मोघू**-वि. ( सं. ) मूर्ख.

**मोन-मोना**-पु. ( सं. ) गवताचा पेटारा.

**मोना**-क्रि. (सं.) भिजविणें.

**मोनिया**-स्त्री. (सं.) गवताची लहान पेटी.

**मोम**-पु. (फा.) मेण.

**मोमजामा**-पु. (फा.) मेणकापड.

**मोमना**-वि. (फा.) अतिशय कोमल मेणासारखा.

**मोमिन**-पु. (फा.) १ कर्मठ मुसलमान. २ विणकरांची एक जात.

**मोमियाई**-स्त्री. (फा.) १ कृत्रिम शिलाजित. २ एक मलम.

**मोमी**-वि. (फा.) मेणाचा; मेणासारखा.

**मोयन**-पु. कणकेंत घालण्याचें मोहन.

**मोरचा**- पु. (फा.) १ गंज; तांबेरा. २ आरशावरील मळ. ३ खंदक. ४ किल्ल्यावरून लढणारी सेना. ५ मार्‍याची जागा.

**मोरछड़-ल**-पु. (सं.) मोर पिसांची चवरी.

**मोरछली**-स्त्री. ( सं ) १ बकुळीचें झाड. २ चवरी वारणारा.

**मोरछाँह**-पु. मोरछल पहा.

**मोरजुटना**-पु. एक अलंकार.

**मोरन-म**-स्त्री. (सं.) १ मोडणें. २ दह्याची शिकरण.

**मोरना**–क्रि.स. (सं.) १ मोडणें. २ दही घुसळून लोणी काढणें.

**मोरनी**–स्त्री. (सं.) लांडोरें.

**मोरवा**–पु. (सं.) मोर.

**मोरा**–सर्व. माझा.

**मोराना**–क्रि.स. १ फिरविणें; घुमविणें. २ पिरगाळणें.

**मोरी**–स्त्री. १ मोरी. २ नाली; गटार; ३ लांडोर.

**मोर्चा**–पु. मोरचा पहा.

**मोल**–पु. (सं.) १ मोल; किंमत. २ वाढवून सांगितलेली किंमत.

**मोलाई**–स्त्री. (सं.) मूल्य ठरविणें.

**मोहड़ा**–पु. (सं.) १ भांडयाचें तोंड. २ दर्शनी भाग. ३ मुख.

**मोहताज**–वि. (अ.) १ निर्धन; मोताद. २ इच्छुक.

**मोहब्बत**–स्त्री. (फा.) १ प्रेम; प्रीति २ मैत्री.

**मोहर**–स्त्री. (फा.) मोहोर.

**मोहरा**–पु. (सं.) १ भांडयाचें तोंड. २ मोहरा; दर्शनी भाग. ३ जनावरांच्या तोंडावर बांधण्याची जाळी. ४ सैन्याची पुढची बाजू. ५ चोळीचा बंद.

**मोहरा**–पु. (फा.) १ बुद्धीबळांतील मोहरें. २ मातीचा सांचा. ३ एक प्रकारची इस्त्री. ४ एक विष.

**मोहरी**–स्त्री. (सं.) १ भांडयाचें तोंड. २ विजारीचे पाय. ३ मोरी.

**मोहर्रिर**–पु. (अ.) लेखक; कारकून.

**मोहलत**–स्त्री. (अ.) १ फुरसद. २ अवधि; मुदत.

**मोहार**–पु. (सं.) १ द्वार. २ पुढचा भाग; मोहरा. ३ मधमाशींचें पोळें. ४ भुंगा.

**मोहारनी**–स्त्री. (सं.) उजळणी म्हणणें.

**मोहाल**–पु. (अ.) १ मोठें गांव किंवा अनेक गांवांचा एक महाल. २ मधमाशींचें पोळें. ३ एक मधमाशी.

**मोहिं**–सर्व. (सं.) मला.

**मौड़ा**–पु. (सं.) १ मुलगा. २ मोहड़ा पहा.

**मौका**–पु. (फा.) १ मोका; संधि. २ स्थान; जागा. ३ समय; अवसर.

**मौकूफ़**–वि. (अ.) १ स्थगित. २ नोकरीकरून दूर केलेला. ३ रद्द केलेला. ४ अवलंबित; अवलंबून.

**मौखर**–पु. (सं.) तोंडाळ; मुखर.

**मौगा**– वि. (सं.) १ मूर्ख. २ हिजडा.

**मौज**-स्त्री. (अ.) १ तरंग; लाट. २ मौज; मजा.

**मौज़ा**-पु. (अ.) गांव.

**मौज़ी**-वि. (अ.) १ आनंदी; प्रसन्नचित्त. २ मजेंत राहणारा.

**मौजूद**-वि. (अ.) हजर; उपस्थित.

**मौजूदा**-वि. (अ.) वर्तमानकालीन; प्रस्तुतचा.

**मौत**-स्त्री. (अ.) मृत्यु.

**मौताद्**-स्त्री. (अ.) औषधाची निश्चित मात्रा.

**मौना**-पु. (सं.) १ तूप वा तेल ठेवण्याचें भांडें. २ धान्य ठेवण्याचा गवताचा पेटारा वा हारा.

**मौर**-पु. (सं.) १ विवाहप्रसंगी नवरदेवानें घालण्याचें शिरोभूषण. २ शिरोमणी; श्रेष्ठ. ३ वृक्षाची मोहोर. ४ गळयाच्या मागील भाग; मान.

**मौरना**-क्रि.स. (सं.) मोहोरणें.

**मौरसिरी-मौलसिरी-मौसली**-स्त्री. (सं.) बकुळी.

**मौरी**-स्त्री. (सं.) वधूच्या डोक्यावर घालण्याचें शिरोभूषण.

**मौरूसी**-वि. (अ.) वडिलोपार्जित.

**मौसर**-वि. (अ.) १ सहज मिळणारा. २ उपलब्ध.

**मौसा**-पु. (सं.) मावशीचा पति.

**मौसिम**-पु. (अ.) १ मोसम. २ योग्य वेळ.

**मौसियाउत--मौसियायत**---

**मौसेरा**-वि. (सं.) मावस.

**मौसी**-स्त्री. (सं.) मावशी.

**मौसूफ़**-वि. (अ.) १ प्रशंसित. २ उल्लेखित.

**मौसूम**-वि. (अ.) नामक.

**म्यान**-पु. (फा.) म्यान.

**म्याना**-क्रि.स. (फा.) म्यानांत ठेवणें.

---

## य

**यंत्रणा**-स्त्री. (सं.) १ क्लेश; यातना. २ वेदना; पीडा.

**यकक़लम**-क्रिवि. (फा.) १ लेखणीच्या एका फटकाऱ्यांत. २ एकदम; एकाएकी.

**यकता**-वि. (अ.) अद्वितीय.

**यक-बयक**-क्रिवि. (फा.) एकदम; एकाएकी.

**यकबारगी**-क्रिवि. अचानक; एकाएकी.

**यकसाँ**-वि. (फा.) सारखा; समान.

**यकायक**-क्रिवि. (फा.) एकाएकी.

**यकीन**-पु. (अ.) विश्वास; भरंवसा.

**यक़ीनन्**-क्रिवि. (अ.) अवश्य; बेलाशक; जरुर.

**यक़ीनी**-वि. ( अ. ) निश्चित; ठरा-विक.

**यगाना**-वि. ( फा. ) १ नातेवाईक. २ एकटा. ३ अनुपम; अद्वितीय.

**यगाना**-पु. ( फा. ) १ भाईबंद. २ परममित्र.

**यग्य**-पु.( सं. ) यज्ञ.

**यच्छ**-पु.(सं.)यक्ष.

**यतीम**-पु. ( अ.)पोरका;अनाथ.

**यह**-सर्व. ( सं. ) हा; हीं; हें.

**यहाँ-याँ**-क्रिवि. ( सं. ) येथें.

**या**-अव्य. ( फा. ) अथवा; वा.

**याकूत**-पु. ( अ. ) लाल रत्न.

**याज**-पु. ( सं. ) धान्य.

**यातायात**-पु. (सं. ) येजा; जाणें-येणें; दळणवळण.

**यातु**-पु. ( सं. ) १ येणारा. २ पथिक. ३ राक्षस. ४ काल; समय. ५ हवा. कष्ट. ७ हिंसा.

**याद**-स्त्री. ( फा. ) स्मरण; स्मृति.

**यादगार**-स्त्री. ( फा. ) स्मारक.

**याददास्त**-स्त्री. ( फा. ) १ स्मरण-शक्ति. २ स्मरणार्थ लिहिलेला लेख.

**यानी-ने**-अव्य. ( अ. ) १ तात्पर्य हें कीं. २ अर्थात् म्हणजे.

**याबू**-पु. (फा.)तट्टू.

**यार**-पु. (फा.) मित्र; दोस्त.

**याराना**-पु. ( फा. ) १ मित्रता. २ स्त्रीपुरुषांतील अनुचित प्रेमसंबंध.

**याराना**-वि. ( फा. ) मित्राप्रमाणें.

**यारी**-स्त्री. (फा.) याराना पहा.

**याल**-स्त्री. (तु.) आयाळ.

**याहि-ही**-सर्व. ( सं. ) याला.

**यूँ**-अव्य. ( सं. ) असें; अशा तऱ्हेनें.

**यूत**-पु. ( सं. ) मिश्रण.

**ये**-सर्व. (सं.) हे; हे सर्व.

**येई**-सर्व ( सं. ) हाच.

**येऊ**-सर्व. ( सं. ) हाही.

**यों**-अव्य. ( सं. ) असें; अशा तऱ्हेनें.

**योंही**-अव्य. ( सं. ) १ याच प्रकारें. २ असेंच; व्यर्थ. ३ उगाच; सहज.

**यौतक-यौतुक**-पु. ( सं. ) लग्नांत मिळणारा अहेर.

---

## र

**रंक**-वि. (सं.) १ रंक; दरिद्री. २ कृपण. ३ सुस्त.

**रंग**-पु. (सं.) १ कथिल; वंग. २ नृत्य व गायन ३ नाटकगृह. ४ युद्धभूमि. ५ रंग; वर्ण. ६ यौवन. ७ शोभा; सौंदर्य. ८ प्रभाव. ९ धाक. १० क्रीडा; खेळ इ. ११ युद्ध. १२ मौज. १३ दशा;

हालत. १४ अद्‌भुत चमत्कार. १५ कृपा; दया. १६ प्रेम. १७ ढब; ढंग. १८ प्रकार; तऱ्हा.

**रंगत**-स्त्री. (सं.) १ रंग. २ मजा; आनंद. ३ अवस्था; दशा.

**रंगना**-क्रि.स. (सं.) १ रंगविणें. २ अनुकूल करणें; बनविणें. ३ प्रेमांत अडकविणें.

**रंगना**-क्रि.स. (सं.) अनुरक्त होणें.

**रंगबिरंग-गा**-क्रि.अ. (अ.) १ रंगीबेरंगी. २ तऱ्हतऱ्हेचा.

**रंगभरिया**-पु. (सं.) चित्रकार; रंगारी.

**रंगभूति**-स्त्री. (सं.) कोजागिरी पौर्णिमा.

**रंगमार**-पु. (सं.) पत्त्यांचा एक खेळ.

**रंगरली**-स्त्री. (सं.) खेळ; क्रीडा; मौज.

**रंगरसिया**-पु. (सं.) भोगविलासी.

**रंगरेज़**-पु. (फा.) कपडे रंगविणारा.

**रगरेली**-स्त्री. रंगरली पहा.

**रंगसाज़**-पु. (फा.) १ रंगारी. २ रंग तयार करणारा.

**रंगाना**-क्रि.स. (सं.) रंगवून घेणें.

**रंगावतारक—रंगावतारी**-- पु. (सं.) नट.

**रँगिया**-पु. (सं.) १ कपडे रंगविणारा. २ रंगारी.

**रंगी**-वि. (सं.) आनंदी; रंगेल.

**रंगीन**-वि. (फा.) १ रंगीत. २ २ रंगेल. ३ मजेदार; चमत्कृति पूर्ण.

**रंगीला**-वि. (फा.) १ रंगेल. २ सुंदर; देखणा. ३ प्रेमी.

**रंच-रंचक**-वि. (सं.) थोडा; अल्प.

**रंज**-पु. (फा.) १ दुःख; खेद. २ शोक.

**रंजक**-पु. (सं.) १ रंगसाज व रंगरेज पहा. ३ बिब्बा. ३ मेंदी.

**रंजक**-वि. (सं.) रंजविणारा; हांसविणारा.

**रंजक**-स्त्री. १ तोडयाच्या बंदुकीची दारू. २ गांज्याचा दम. ३ एकाद्याल्या भडकविण्यासाठीं सांगितलेली गोष्ट. ४ तोंडाला रुचि आणणारें चूर्ण.

**रंजना**-क्रि. स. १ प्रसन्न करणें. २ भजणें; स्मरणें. ३ रंगविणें.

**रंजिश, रंजीदगी**-स्त्री. (फा.) १ दुःख; खेद. २ बेबनाव. ३ वैमनस्य; वैर.

**रंडापा**-पु. (सं.) वैधव्य.

**रंडुआ-वा-रँडोरा**-पु. (सं.) विधुर.

**रंता**–वि. ( सं. ) अनुरक्त.

**रंद्**–पु. ( सं. ) १ झरोका. २ तटाला तोफेसाठीं ठेवलेलीं भोकें.

**रंदा**–पु. ( सं. ) रंधा.

**रंधक**–पु. ( सं. ) १ आचारी. २ नाशक.

**रंधन**–पु. (सं.) १ रांधणें; शिजविणें. ३ नष्ट करणें.

**रंभ**–पु. ( सं. ) १ बांबू. २ एक प्रकारचा बाण. ३ भारी आवाज.

**रंभा**–स्त्री. ( सं. ) रंभा. सर्व अर्थ मराठी प्र.

**रंभा**–पु. ( सं. ) पहार.

**रंभान**–क्रि. अ. ( सं. ) हंबरणें.

**रंभोरू**–वि. ( सं. ) १ केळीप्रमाणें मांडया असलेली स्त्री. २ सुंदर; रूपवान.

**रँहचटा**–वि. ( सं. ) मनोरथ पूर्तीची तळमळ लागलेला.

**रअय्यत–रइअत**–स्त्री. (अ.) रयत; प्रजा.

**रइकौ**–क्रिवि. जरासुद्धा.

**रइनि**–स्त्री. ( सं. ) रात्र.

**रई**–स्त्री. ( सं. ) १ रवी. २ रवा. ३ चूर्ण; राई एवढे तुकडे.

**रई**–वि. स्त्री. ( सं. ) १ अनुरक्त. २ युक्त; सहित. ३ बुडलेली; लिप्त.

**रईस**–पु. ( अ. ) १ प्रांताधिकारी. २ श्रीमान; धनिक जमीनदार;

**रउताई**–पु. ( सं. ) स्वामित्व.

**रउरे**–सर्व. ( सं. ) आपण; महाराज ( आदरार्थी ).

**रऐयत**–स्त्री. ( सं. ) प्रजा.

**रकछ**–पु. ( सं. ) पानांचीं भजीं.

**रकत**–पु. ( सं. ) रक्त.

**रक़बा**–पु. ( .अ. ) क्षेत्रफळ.

**रक़म**–स्त्री. ( अ. ) १ लिहिणें. २ २ छाप; मोहोर. ३ संपत्ति; धन-दौलत. ३ दागिना. ५ धनवान. ६ धूर्त; ७ सुंदरी. ८ कराचा दर. ९ प्रकार तऱ्हा.

**रकाब**–स्त्री. ( अ. ) १ रिकीब. २ थाळी; तबक.

**रकाबदार**–पु. ( फा. ) १ हलवाई. २ आचारी. ३ साईस.

**रकाबा**–पु. ( फा. ) परात; मोठें तबक.

**रकाबी–रकेबी**–स्त्री. ( फा. ) १ १ तबक. २ ताटली; बशी.

**रक़ीक़**–वि. ( अ. ) १ द्रव; तरल. २ कोमल; नरम.

**रक़ीब**–पु. ( अ. ) दुसरा प्रियकर.

**रक्षा**–स्त्री. (सं.) १ रक्षण; बचाव. २ राख; भस्म. ३ गळयांत बांधण्याचा गंडा.

**रख-खा**-स्त्री. ( सं. ) कुरण.

**रखना**-क्रि.अ. ( सं. ) ठेवणें.

**रखनी**-स्त्री. ( सं. ) रखेली.

**रखवाई-रखवाली-रखाई**-स्त्री. ( सं. ) रखवाली.

**रखाना**-क्रि.स. ( सं. ) ठेववून घेणें.

**रखाना**-क्रि.अ. ( सं. ) रखवाली करणें.

**रखिया-रखैया**-पु. (सं.) १ रक्षक. २ ठेवणारा.

**रखियाना**-क्रि.स. ( सं. ) राखेनें भांडीं घासणें.

**रखेडिया**-पु. ( सं. ) भोंदू साधू.

**रखौंडी-रखौनी**-स्त्री. (सं.) राखी.

**रखौत-ना**-पु. ( सं. ) कुरण.

**रग**-स्त्री. (फा.) १ शरीरांतील नस. २ पानावरील शिरा.

**रगड़**-स्त्री. (सं.)१रगडणें; घर्षण. २ घट्टा; वण. ३ भांडण. ४ भारी श्रम.

**रगड़ना**-क्रिस. ( सं. ) १ रगडणें; घासणें. २ वाटणें. ३ अति जलद व नेटानें काम करणें. ४ बेजार करणें.

**रगडना**-क्रि.अ (सं.) अत्यंत श्रम करणे.

**रगड़ा**-पु. (सं.) १ घर्षण. २ अत्यंत परिश्रम. ३ दीर्घकाल चाललेला झगडा.

**रगड़ी**-वि. ( सं. ) भांडखोर.

**रगपट्टा**-पु.१ शरीराचीं विविध अंगें. २.कोणत्याहि विषयांतील सूक्ष्म भेद.

**रग़बत**-स्त्री. ( अ. ) १ इच्छा. २ प्रवृत्ति; रुचि.

**रगरेशा**-पु. ( फा. ) १ पानाच्या शिरा. २ शरीरांतील अंगोपांगे. ३ कोणत्याही विषयाचीं अंगोपांगें.

**रगवाना**-क्रि.स. ( दे. ) चूप करणें; शांत करणें.

**रगी-रगीला**-पु. ( फा. ) १ रगेल; हट्टी. २ पाजी.

**रगेदना**-क्रि स. ( सं. ) पिटाळणें; पळवून लावणें.

**रचना**-स्त्री. ( सं. ) रचना.

**रचना**-क्रि.स. ( सं. ) १ रचणें. २ रंगविणें.

**रजना**-क्रि.अ. (अनु.) १ अनुरक्त होणें. २ रंगणें.

**रजवाड़ा**-पु. ( सं. ) १ राज्य. २ राजा.

**रज़ाइ**-स्त्री.(अ.)१ मर्जी; इच्छा. २ सुट्टी;रजा. ३ आज्ञा; हुकुम. ४स्वीकृति.

**रजाइ**-स्त्री.( अ. ) १ आज्ञा; हुकुम. २ रजा.

**रजाई**-स्त्री.( सं. ) १ रजई. २ राजेपणा.

**रजाना**-क्रि.स. १ राज्य सुखाचा उपभोग देणें. २ अतिशय सुख देणें.

**रज़ामंद**-वि.(फा.) राजी; सहमत.

**रज़ाय-रज़ायस-सु**-स्त्री. (अ.) १ हुकूम; आज्ञा. २ मर्जी; इच्छा.

**रज़ील**-वि. (अ.) नीच; हलक्या जातीचा.

**रट-रटन**-स्त्री. (सं.) घोकंपट्टी; घोकणें.

**रटना-रढना**-क्रि.स.(सं.) १ घोकणें; पाठ करणें. २ वारंवार उच्चार करणें. ३ वारंवार वाजणें.

**रठ**-वि. शुष्क; वाळलेला.

**रणखेत**-पु. (सं.) रणक्षेत्र.

**रणरण**-पु. (सं.) १ व्याकुलता. २ दुःख; पश्चात्ताप.

**रतजगा**-पु. (सं.) उत्सवाप्रीत्यर्थ जाग्रण.

**रतनार-रा--रतनालिया**--वि. (सं.) लालसर.

**रतनारीच**-पु. (सं.) १ कामदेव. २ कुत्रा. ३ लंपट; बदचालीचा.

**रता**-स्त्री. बुरशी.

**रताना**-क्रि.स. क्रि.अ. १ रत होणें. २ मन आकर्षून घेणें.

**रतायनी**-स्त्री. (सं.) वेश्या.

**रति**-स्त्री. (सं.) १ कामदेवाची स्त्री. २ मैथुन. ३ प्रीति. ४ शोभा. ५ भाग्य. ६ रहस्य. ७ रती; गुंज. ८ रात्र.

**रतिक**-क्रिवि. (सं.) रत्तीभर; किंचित.

**रतिगर**-क्रिवि. (सं.) पहाटे.

**रतिनाह**-पु. (सं.) रतिनाथ; कामदेव.

**रतियाना**-क्रि.अ. (सं.) प्रेम करणें; अनुरक्त होणें.

**रतिवंत**-वि. (सं.) सुंदर.

**रतिवल्ली**-स्त्री. (सं.) प्रेम; प्रीति.

**रती**-स्त्री. (सं.) १ रती; मैथुन. २ कामदेवाची स्त्री. ३ सौंदर्य. ४ गुंज; रत्ती.

**रतोपल**-पु. (सं.) १ लालकमळ. २ मेरू. ३ लाल सुरमा.

**रतौंधी**-स्त्री. (सं.) रातांधळेपणा.

**रत्ती**-स्त्री. (सं.) १ रत्ती; गुंज. २ शोभा; सौंदर्य.

**रथी**-स्त्री. (सं.) १ तिरडी. २ शवपेटी.

**रदबदल**-क्रिवि. (फा.) परिवर्तन; उलटापालट; अदलाबदल.

**रद्द**-वि. (फा.) १ रद्द. २ खराब; निकामी.

**रद्दा**-पु. (दे.) एकावर एक रचलेल्या वस्तूंचा थर.

**रद्दी**-वि. (फा.) रद्दी; निरुपयोगी; खराब.

**रद्दी**-स्त्री. (फा.) रद्दी.

**रन**-पु. (सं.) १ युद्ध. २ रान; वन. ३ सरोवर. ४ लहान समुद्र.

**रनना**-क्रि. अ. (सं.) वाजणें; निनादणें.

**रनबका-रनबाँकुरा-रनवादी-रनी**-पु. योद्धा; वीर.

**रनवास-रनिवास**-पु. (सं.) राणीवसा; जनानखाना.

**रनित**-वि. (सं.) वाजणारा; निनादणारा.

**रपट**-स्त्री. (सं.) अभ्यास; संवय.

**रपट**-स्त्री. (सं.) २ उतार. २ घसरघुंडी. ३ रपेट; दौड; फेरफटका.

**रपट**-पु. (इं.) रिपोर्ट. (Report)

**रपटना**-क्रि.अ. (सं.) १ घसरणें. २ जल्दीनें चाळणें.

**रपटना**-क्रि.स. (सं.) जल्दीनें काम उरकणें.

**रपट्टा**-पु. (सं.) १ घसरणें. २ रपेट; दौड. ३ थप्पड; रपाटा.

**रफते-रफते**-क्रिवि. रफ्ता पहा.

**रफ़ल**-स्त्री. (इं.) गरम पांघरूण.

**रफ़ा**-वि. (अ.) १ पुरा केलेला; हाता वेगळा केलेला. २ निवारण केलेला; शांत केलेला (तंटा, भांडण इ.)

**रफ़ीक़**-पु. (अ.) १ मित्र. २ सहाय्यक.

**रफू**-पु. (अ.) रफू.

**रफूचक्कर**-वि. (अ.) बेपत्ता.

**रफ्त**-वि. (फा.) भूतकालीन.

**रफ्तनी**-स्त्री. (फा.) १ निर्गत. २ मालाची निर्गत.

**रफ्तार**-स्त्री. (फा.) चाल; गति.

**रफ्ता-रफ्ता**-क्रि. वि. (फा.) धीरेधीरे; क्रमक्रमानें.

**रब**-पु. (अ.) ईश्वर.

**रबड़**-पु. (इं.) रबर.

**रबडना**-क्रिस. (सं.) १ ढवळणें. २ घुमविणें.

**रबडना**-क्रि.अ. (सं.) फिरणें.

**रबडी**-स्त्री. (सं.) बासुंदी.

**रबदा**-पु. (सं.) १ थकवा. २ चिखल.

**रबाब**-पु. (अ.) एक तंतुवाद्य.

**रबी**-स्त्री. (अ.) १ वसंत ऋतु. २ रबीचें पीक.

**रब्त**-पु. (फा.) १ अभ्यास; संवय. २ घनिष्टसंबंध.

**रमक**-पु. ( सं. ) १ प्रेमी. २ उपपति.

**रमक**-स्त्री. (सं.) १ झोका. २ तरंग.

**रमक**-स्त्री. (अ.) १ मरण समयींचा श्वास. २ थोडा अंश. ३ नशेचा अंमल.

**रमकना**-क्रि.अ. (सं.) १ झोपाळया वर झोके घेणें. २ तोऱ्यांत चालणें.

**रमचा**-पु. चमचा.

**रमझोल-ला**-पु. नुपूर.

**रमता**-वि. (सं.) भटक्या.

**रमना**-क्रि.अ. ( सं. ) रमणें.

**रमना**-पु. ( सं. ) १ कुरण. २ घेरा. ३ बाग. ४ रमणीय स्थान.

**रमल**-पु. (अ.) फाशांच्या सहाय्यानें वर्तविलें जाणारें भविष्य.

**रमना**-क्रि.स. ( सं. ) १ रमविणें. २ थोपविणें. ३ लावणें; जोडणें.

**रमूज़**-स्त्री. ( अ. ) १ कटाक्ष. २ खूण; इषारा. २ कूट वाक्य. ३ श्लेष. ४ गुप्त रहस्य.

**रमैया**-पु. (सं.) १ राम. २ ईश्वर.

**रम्माल**-पु. ( अ. ) रमल सांगणारा.

**रम्हाना**-क्रि.अ. ( सं. ) हंबरणें.

**रय**-पु.( सं.) १रज; धूळ.२ वेग;गति.

**रयना**-क्रि.अ. ( सं. ) १ रंगांत बुडविणें. २ अनुरक्त होणें. ३ जुळणें; संयुक्त होणें.

**रयनि**-स्त्री. ( सं. ) रात्र.

**रयासत**-स्त्री. रियासत.

**रय्यत**-स्त्री. ( अ. ) रयत.

**ररकना**-क्रि.अ. ( अनु. ) ठुसठुसणें; ठणकणें.

**ररना**-क्रि.अ. ( सं. ) पाठ करणें; घोकणें.

**ररिहा**-पु. (सं.) १ घोकणारा २ २ एक पक्षी. ३ एक सारखें मागणारा; वटवट करणारा.

**ररी**-वि. ( सं. ) भांडखोर.

**ररी**-पु. ( सं. ) १ एकसारखें मागणारा. २ नीच.

**रलना**-क्रि. अ. मिसळणें.

**रलाना**-क्रि.स. ( सं. ) मिसळणें.

**रली**-स्त्री. ( सं. ) १ क्रीडा; खेळ. २ प्रसन्नता; आनंद.

**रल्ल**-पु. हल्ला.

**रवकना**-क्रि.अ. ( सं. ) १ जोरानें पुढें पळणें. ५ उसळणें.

**रवन**-पु. ( सं. ) पति; स्वामी.

**रवन**-वि. ( सं. ) रमणारा; खेळणारा.

**रवनि-नी**-स्त्री. ( सं. ) १ रमणी. २ पत्नी.

**रवन्ना**-पु. (फा.) १ स्त्रियांचा नोकर. २ मालाचा आंकडा. ३ परवाना पत्र; रसीद. ४ रवाना पहा.

**रवाँ**-वि. (फा.) १ वाहणारा; प्रवाहित. २ जारी; चालू. ३ पाठ केलेला; अभ्यस्त. ४ धारदार. ५ रवाना पहा.

**रवा**-पु. (सं.) १ रवा; लहान कण. २ रवा; सोजी. ३ दारुचा कण.

**रवा**-वि. (फा.) १ उचित; वाजवी. २ प्रचलित; चालू.

**रवाज**-स्त्री. (फा.) रीतिरिवाज.

**रवादार**-वि. (फा.) १ संबंध ठेवणारा. २ शुभचिंतक.

**रवादार**-वि. (सं.) रवाळ.

**रवाना**-वि (फा.) रवाना; पाठविलेला.

**रवानी**-स्त्री. (फा.) प्रवाह.

**रवायत**-स्त्री. (अ.) १ कहाणी. २ म्हण; उक्ति.

**रवारवी**-स्त्री. (फा.) १ घाई. २ पळापळ.

**रविश**-स्त्री. (फा.) १ गति; चाल. रीति; पद्धति. २ बागेंतील पाऊलवाट.

**रवैया**-पु. (फा.) १ चाल; रीति. २ पद्धति. ढंग.

**रश्क**-पु. (फा.) १ मत्सर. २ लज्जा

**रसद**-वि. (सं.) १ सुखद. २ स्वादिष्ट.

**रसद**-स्त्री. (फा.) १ वांटा; हिस्सा. २ धान्य. ३ सैन्याची रसद; अन्न पुरवठा.

**रसना**-स्त्री. (सं.) १ जीभ. २ दोरी. ३ लगाम.

**रसना**-क्रि. अ. (सं.) १ ठिबकणें; झिरपणें. २ प्रफुल्लित होणें. ३ तन्मय होणें. ४ स्वाद घेणें. ५ अनुरक्त होणें.

**रसभीना**-वि. १ आनंदांत मग्न. २ आर्द्र.

**रसमसा**-वि. (सं.) १ आनंदांत मग्न. २ ओला; घामानें भिजलेला.

**रसमि**-स्त्री. (सं.) १ किरण; रश्मि. ३ प्रकाश; चमक.

**रसरा**-पु. **रसरी**-स्त्री. दोरी.

**रसवाद**-पु. (सं.) १ रसिक बोलणें. २ विनोदी संवाद. ३ बकवाद.

**रसिया**-पु. (सं.) १ रसिक. २ एक होळीचें गीत.

**रसीद**-स्त्री. (फा.) १ पावती. २ थांगपत्ता.

**रसीला**-वि. (सं.) १ रसदार. २ स्वादिष्ट. ३ रसिक. ४ रंगेल. ५ सुंदर; छबेला.

**रसूम**-पु. (अ.) १ नियम; कायदा. २ रीतिरिवाज.

**रसूल**-पु. (अ.) १ ईश्वराचा दूत. २ पैगंबर.

**लोचना**-क्रि स. ( सं. ) १ प्रकाशित करणें. २ रुचि उत्पन्न करणें. ३ अभिलाषा करणें.

**लोचना**-क्रि.अ. (सं.) १ शोभित होणें. २ इच्छिणें.

**लोचना**-पु. ( सं. ) न्हावी.

**लोटन**-पु. ( सं. ) १ एक प्रकारचा नांगर. २ एक कबूतर. ३ रस्त्यावरील धुळीचे कण.

**लोटना**-क्रि.अ. (सं.) १ लोळणें. २ झोपणें २ या कुशीवरून त्या कुशीवर होणें; तडफडणें. ४ चकीत होणें.

**लोटपटा**-पु. (सं.) १ विवाहांतील एक प्रथा. २ खेळामध्यें बाजू बदलणें.

**लोटिया-लोटी**-स्त्री. लोटी.

**लोडना**-क्रि.स. ( सं. ) आवश्यकता असणें.

**लोढ़कना**-क्रि.अ. लुढकना पहा.

**लोढ़ना**-क्रि.स. (सं.) १ तोडणें; खुडणें. २ कापसांतील सरकी काढणें.

**लोढा**-पु. ( सं. ) वरवंटा.

**लोढिया**-स्त्री. लहान वरवंटा.

**लोण**-पु. लोन पहा.

**लोथ-थि**-स्त्री. ( सं. ) शव; प्रेत.

**लोथडा**- पु. ( सं. ) मांसाचा तुकडा.

**लोथारी**-स्त्री. (सं.) उथळ पाण्यांत नाव चालविणें;

**लोद्-ध**-स्त्री. ( सं. ) एक वृक्ष.

**लोन**-पु. (सं.) १ मीठ. २ लावण्य.

**लोनहरामी**-वि. (सं.+अ.) निमकहराम.

**लोना**-वि. ( सं. ) १ खारट. २ सुंदर. ३ तिखट मिठाचा; चमचमीत.

**लोना**-वि. (सं. ) १ लोणा. २ हरभऱ्याची आंब.

**लोना**-क्रि.स. (सं.) पिकाची कापणी.

**लोनाई**-स्त्री. (सं.) लावण्य.

**लोनिया**-पु. ( सं. ) मीठ तयार करणारी जात; लोणारी.

**लोनी**-स्त्री. (सं.) १ एक पालेभाजी २ आंब; खाटी. ३ एक क्षारयुक्त माती. ४ लोना पहा.

**लोपाक--लोपायक**--पु. सियार पहा.

**लोबान**-पु. (अ.) एक वृक्षाचा सुगंधित डीक.

**लोबिया**-पु. ( सं. ) एक फळ.

**लोबियाकंजई**-पु. दाट हिरवा रंग.

**लोभाना**-क्रि.स. क्रि.अ. १ मोहून टाकणें. २ मोहून जाणें.

**लोमडी--लोमरी**--स्त्री. (सं.) कोल्हा.

**लोय**-पु. (सं.) १ लोक. २ डोळा.

**लोय**-अव्य. लौं पहा.

**लोयन**-पु. (सं.) लोचन; डोळा.

**लोर**-वि. (सं.) १ चंचल. २ उत्सुक.

**लोर**-पु. (सं.) अश्रु.

**लोरना**-क्रि.अ. (सं.) १ चंचल होणें. २ लपलपणें. ३ लपेटणें ४ झुकणें. ५ लोळणें.

**लोरी**-स्त्री. अंगाई गीत; ओवी.

**लोल**-वि. (सं.) १ हालता झुलता. २ चंचल. ३ परिवर्तनशील. ४ क्षणीक. ५ उत्सुक; उत्कंठित.

**लोलक**-पु. (सं.) लोलक.

**लोलकी**-स्त्री. (सं.) कानाची पाळी;

**लोलना**-क्रि.अ. (सं.) हलणें; डुलणें.

**लोला**-स्त्री. (सं.) जीभ.

**लोला**-पु. (सं.) एक खेळणें.

**लोवा**-स्त्री. (सं.) लोमडी पहा.

**लोवा**-पु. (सं.) एक पक्षी.

**लोहँडा**-पु. (सं.) १ अन्न शिजविण्याचें लोखंडी भांडें. २ सतेलें.

**लोहा**-पु. (सं.) लोखंड.

**लोहाना**-क्रि.अ. (सं.) लोखंडाचा वास लागणें; कळकणें.

**लोहिया**-पु. (सं.) १ लोखंडाचा व्यापारी. २ एक व्यापारी जात. ३ लाल रंगाचा बैल. ४ लोखंडाची गोळी.

**लोहू**-पु. (सं.) रक्त.

**लौं**-अव्य. (सं.) पर्यंत.

**लौंकना**-क्रि.अ. (सं.) १ दिसणें. २ चमकणें. ३ डोळे दिपणें.

**लौंग**-पु. (सं.) लवंग.

**लौंडा**-पु. १ मुलगा. २ सुरूप मुलगा.

**लौंडापन**-पु. बालपण.

**लौंडी**-स्त्री. दासी.

**लौंद**-पु. अधिक मास.

**लौंदा**-पु लोंदा पहा.

**लौंन**-पु. १ लवण. २ लौंद पहा.

**लौ**-स्त्री. (सं.) आगीची ज्वाला. २ दिव्याची ज्योत. ३ आवड; गोडी. ४ चित्तवृत्ति. ५ आशा. ६ इच्छा.

**लौआ-लौवा-लौका-लौकी**-पु. (सं.) दूधभोपळा.

**लौज**-पु. (अ.) १ बदाम. २ बदामाची बर्फी.

**लौटना**-क्रि. (सं.) १ परतणें; माघारें येणें. २ मागें वळणें.

**लौटना**-क्रि.स. (सं.) उलटणें; फिरविणें; पलटणें.

**लौट-पौट**-स्त्री. १ दोनही बाजूस एक प्रकारची छपाई. २ उलटणें; पालटणें.

**लौटफेर**-पु. इकडचें तिकडे व तिकडचें इकडे; परिवर्तन; फेरबदल.

**लौटाना**-१ परत देणें; परत करणें. २ उलटें सुलटें करणें; उघड करणें.

**लौन**-पु. ( सं. ) लवण.

**लौनहार**-पु. ( सं. ) शेत कापणारा.

**लौना-लौमना**-पु. ( सं. ) १ पायबंद. २ जळण. ३ कापणी.

**लौना**-वि. ( सं. ) लावण्य युक्त; सुंदर.

**लौनी**-स्त्री. ( सं. ) १ कापणी. २ गवताची पेंढी. ३ लोणी.

**लौह**-स्त्री. ( अ. ) १ लाकडी तक्ता. २ लाकडाची पाटी. ३ फळा. ४ पुस्तकाचें मुखपृष्ठ.

**ल्याना-ल्यावना**-क्रि. ( स.) लाना पहा

---

## व

**वंक**-वि. ( सं. ) वांकडा; वक्र.

**वंकट**-वि. ( सं. ) १ वांकडा; कुटिल. २ बिकट; दुर्गम.

**वंकिम**-वि. ( सं. ) झुकलेला; वांकलेला

**वंग**-पु. ( सं. ) १ बंगालदेश. २ कथिल. ३ वंगभस्म.

**वंगज**-पु. ( सं. ) १ शेंदूर. २ पितळ -वि. बंगाली.

**वंगण**-पु. ( सं. ) वांगें.

**वंचक**-वि. ( सं. ) १ धूर्त; ठक. २ खल; लबाड.

**वंट**-पु. ( सं. ) १ भाग; वांटा. २ हत्याराची मूठ ३ लांडा; भुंडा. ४ अविवाहित पुरुष.

**वंटक**-पु. ( सं. ) भाग; वांटा.

**वंटक**-वि. ( सं. ) वाटणारा; विभागणारा.

**वंठ**-वि. ( सं. ) लंगडा; लुळा; भुंडा.

**वंडर**-पु. (सं.) १ कंजूष. २ अंत:पूर रक्षक

**वंदनमाला**-स्त्री. ( सं.) **वंदनवार**-मंगलप्रसंगीं घराच्या दाराला वा मांडवाभोंवती लाविलेली माला.

**वंदना**-स्त्री. ( सं. ) १ स्तुति; २ प्रणाम.

**वंदी**-पु. ( सं. ) बंदी.

**वंश**-पु. ( सं. ) १ बांबू. २ पाठीचा कणा. ३ नाकाचें हाड. ४ बांसरी. ५ हाताचें वगैरे लांब हाड. ६ जात; कुल. ७ संतान. ८ घराणें.

**वंशधर**-पु. ( सं. ) वंशज; संतति.

**वंशी**-स्त्री. (सं.) बांसरी; मुरली.

**वंशीधर**-पु. ( सं. ) श्रीकृष्ण.

**वंशीवट**-पु. ( सं. ) वृंदावनांतील वडाचें झाड ज्याखालीं कृष्ण बांसरी वाजवीत असे.

**व**-पु ( सं. ) १ वायु. २ बाण. ३ वरुण. ४ बाहु. ५ कल्याण. ६ समुद्र. ७ वस्त्र. ८ वंदन.

**वक**-पु. ( सं. ) १ बगळा. २ बकुळीचें झाड. ३ एक दैत्य.

**वकवृत्ति**-स्त्री. ( सं. ) कपट.

**वकालत**-स्त्री. ( अ ) १ दूतकर्म. २ दुसऱ्याकरितां बोलणें. ३ वकीलीचा धंदा.

**वकालतनामा**-पु. ( अ. ) वकिलाचें अधिकारपत्र.

**वकुल**-पु. ( सं. ) बकुल.

**वक्त**-पु. ( सं. ) १ समय; वेळ. २ अवसर; संधि. ३ अवकाश; फुरसत.

**वक्तव्य**-वि. ( सं. ) १ बोलण्यासारखें. -पु. (सं.) १ बोलणें; वचन. २ बोलण्याची गोष्ट.

**वक्तृता**-स्त्री. ( सं. ) १ वाक्पटुता. २ व्याख्यान; ३ कथन; भाषण.

**वक्तृत्व**-पु. (सं.) १ वक्तव्य. २ व्याख्यान. ३ कथन.

**वक्त्र**-पु. ( सं. ) १ तोंड. २ एकछंद.

**वक्फ**-पु. (अ.) १ धमार्थ संपत्ति. २ दान; धर्म.

**वगैरह**-अव्य. ( अ. ) इत्यादि; आदि.

**वचा**-स्त्री. ( सं. ) मैना.

**वच्छ**-पु. ( सं. ) ऊर; छाती; वक्ष.

**वजन**-पु. ( अ. ) १ भार; बोज। २ तोल. ३ मान; मर्यादा; गौरव.

**वजनी**-वि. ( अ. ) जड; भारी.

**वजह**-स्त्री. ( अ. ) कारण; हेतु.

**वजा**-स्त्री. ( अ. ) १ बनावट; रचना. २ आकार; घाट. ३ दशा; अवस्था ४ रीत. ५ कापून घेतलेला.

**वजादार**-वि. ( अ. ) तऱ्हेदार; उत्तम घडणीचा.

**वजीफा**-पु. (अ.) १ छात्र, संन्यासी, विद्वान यांस मिळणारी वृत्ति २ जप.

**वजीर**-पु. ( अ. ) १ प्रधान; मंत्रि. २ बुद्धिबळांतील मोहरें.

**वजीरी**-स्त्री. ( अ. ) मंत्रिपद. -पु. घोड्याची एक जात.

**वजू**-पु. ( अ. ) स्नान; हातपाय धुणें.

**वजूद**-( मु. ) ( अ. ) १ आस्तित्व. २ देह. ३ सृष्टि ४ प्रकट होणें.

**वज्र** पु. ( सं ) १ इंद्राचें शस्त्र. २ वीज. ३ हिरा. ४ पोलाद. ५ भाला. -वि. १ कठिण २ दारुण; कठोर.

**वज्रलेप**-पु. ( सं. ) सांधण्याचा मसाला.

**वज्रसार**-पु. ( सं. ) हिरा.

**वज्री**-पु. ( सं. ) इंद्र.

**वटक**-पु. ( सं. ) १ वडी. २ वडा

**वटिका-वटी**-स्त्री. ( सं. ) गोळी; वडी.

**वटु**-पु. ( सं. ) १ बटु; बालक. २ ब्रह्मचारी.

**वटुक**-पु. ( सं. ) १ बालक. २ ब्रह्मचारी. ३ एक भैरव.

**वठर**-वि. ( सं. ) १ मूर्ख. २ लुच्चा. ३ मंद.

**वतंस**-पु. अवतंस पहा.

**वतन**-पु. ( अ. ) जन्मभूमि.

**वतीरा**-पु. ( सं. ) १ रीति; ढंग २ चालरीत ३ संवय; खोड.

**वत्**-पु. ( सं. ) समान; तुल्य.

**वत्सनाभ**-पु. ( सं. ) बचनाग.

**वदन**-पु. ( सं ) १ मुख; तोंड. २ समोरचा भाग. ३ कथन.

**वदान्य**-वि. ( सं. ) १ उदार. २ मधुरभाषणी.

**वदि**-पु. ( सं. ) क्षय पक्ष.

**वदुसाना**-क्रिस. ( सं. ) दोष देणें.

**वधक**-पु. ( सं. ) १ घातक; हिंसक. २ व्याध. ३ मृत्यु.

**वधू**-स्त्री. ( सं. ) १ नवविवाहित स्त्री. २ पत्नी; भार्या. ३ सून.

**वधूटी**-स्त्री. ( सं. ) वधू पहा.

**वधूत**-पु. ( सं. ) अवधूत पहा.

**वनज**-पु. ( सं. ) १ अरण्यांत उत्पन्न झालेला. २ कमल.

**वनमाला**-स्त्री. ( सं. ) १ रानांतील फुलांची माळ. २ कृष्णाची माळ.

**वनमाली**-पु. ( सं ) श्रीकृष्ण.

**वनरुह**-पु. ( सं. ) कमल.

**वनलक्ष्मी**-स्त्री. ( सं. ) वनश्री; अरण्याची शोभा.

**वनस्थली**-स्त्री. ( सं ) वनभूमि.

**वनी**-स्त्री. ( सं. ) लहान वन.

**वपन**-पु. ( सं. ) पेरणी.

**वपा**-स्त्री. ( सं. ) १ मेद; चरबी. २ वारूळ.

**वफा**-स्त्री. ( अ. ) १ वचनपूर्ति. ३ निर्वाह; पूर्णता. ३ सुशीलता.

**वफात**-स्त्री ( अ. ) मृत्यु.

**वफादार**-वि. ( अ. ) वचन पूर्ण करणारा; सच्चा; इमानी.

**वबा**-स्त्री. ( अ. ) सांसर्गिक रोग; सांथ.

**वबाल**-पु. ( अ. ) १ वजन; ओझें. २ आपत्ति. ३ पापाचें फळ.

**वमि**-स्त्री. ( सं. ) ओकबोक; ओकारीचें दुखणें.

**वयं**-सर्व. ( सं. ) आम्ही.

**वयःक्रम**–पु. ( सं. ) अवस्था; वय.

**वयःसंधि**–स्त्री. ( सं. ) बाल्य व तारुण्य यांचा संधिकाल.

**वरंच**–अव्य. ( सं ) १ तथापि. २ परंतु.

**वर**–पु. ( सं. ) १ देवाजवळ मागितलेला मनोरथ. २ देवतेनें दिलेली सिद्धि. ३ पति. –वि. श्रेष्ठ; उत्तम.

**वरक**–पु. ( सं. ) १ पत्र. २ पृष्ठ; पान. ३ सोन्याचांदीचा पातळ पत्रा; वर्ख.

**वरज**–वि. ( सं. ) मोठा; ज्येष्ठ.

**वरजिश**–स्त्री. ( फा. ) व्यायाम.

**वरण**–पु. ( सं. ) १ निवड. २ यज्ञ वगैरेमध्यें होता वगैरेची निवड. ३ मंगल कार्यांत निवडलेल्या होत्यास वगैरे दिलेलें दान. ४ वराची निवड. ५ सत्कार; पूजन.

**वरणी**–स्त्री. वरण पहा.

**वरद**–वि. (सं.) वर देणारा; वरदाता. वरदानी.

**वरदान**–पु. ( सं. ) १ वर देणें. २ फलाचा लाभ.

**वरदी**–स्त्री. ( अ. ) गणवेश.

**वरन्**–अव्य. ( सं. ) तथापि.

**वरना**–पु. ( सं. ) उंट.

**वरना**–अव्य. ( अ. ) नाहींतर.

**वरम**–पु. ( सं. ) वर्म पहा.

**वरयात्रा**–स्त्री. ( सं. ) वरघोडा.

**वरही**–पु. ( सं. ) वर्ही पहा.

**वरटकी**–स्त्री. ( सं. ) कवडी.

**वरानना**–स्त्री. ( सं. ) सुंदर स्त्री.

**वराहमिहिर**–पु. ( सं. ) एक ज्योतिषःशास्त्रज्ञ.

**वरिष्ठ**–वि. ( सं. ) श्रेष्ठ; पूजनीय.

**वर्ग**–पु. (सं.) १ जाति; कोटि; श्रेणी. २ समानधर्मी वस्तूंचा समूह. ३ वर्णसमूह. ४ परिच्छेद; प्रकरण. ५ समानअंकांचा गुणाकार.

**वर्गफळ**–पु. ( सं. ) समान अंकांच्या गुणाकाराचें फल.

**वर्गमूळ**–पु. ( सं. ) वर्गमूळ.

**वर्गलाना**–क्रिस. ( फा. ) १ उत्तेजन देणें; उठावणी करणें. २ फूस देणें; बहकाविणें.

**वर्जन**–पु. ( सं. ) १ त्याग; सोडणें. २ मनाई; निषेध.

**वर्जित**–वि. (सं.) १ त्यक्त; सोडलेलें. २ निषिद्ध.

**वर्ज्य**–वि. ( सं. ) १ त्याज्य; सोडण्यास योग्य. २ निषिद्ध.

**वर्णसंकर**–पु. ( सं. ) १ मिश्रवर्णसंयोग. २ व्यभिचारज संतति.

**वर्त्तन**–पु. १ व्यवहार; आचरण. २ व्यवसाय; वृत्ति. ३ फिरविणें. ४ परिवर्तन; फेरफार. ५ स्थापना; ठेवणें. ६ खलबत्त्यानें कुटणें. ७ पात्र; भांडें.

**वर्त्तमान**–वि. (सं.) १ चालू. २ उपस्थित; विद्यमान. ३ आधुनिक. –पु. १ चालूकाळ. २ वृत्तांत; समाचार ३ चालू व्यवहार.

**वर्त्ति**–स्त्री. (सं.) १ वात. २ अंजन. ३ गोळी; वडी.

**वर्त्तिका**–स्त्री. (सं.) १ वात. २शलाका; सळई.

**वर्त्तित**–वि. ( सं.)१संपादित केलेलें. २ चालविलेलें; जारी केलेलें.

**वर्त्ती**–वि. (सं.) १ वर्तनशील; वागणारा. २ स्थित; राहणारा.

**वर्त्तुल**–वि. (सं.) वाटोळा.

**वर्त्म**–पु. (सं.) १ मार्ग. २ किनारा. ३ पापणी. ४ आधार.

**वर्दी**–स्त्री. (फा.) वरदी पहा.

**वर्द्धमान**–पु. १ एक वर्ण वृत्त. २ महावीर.

**वर्द्धित**–वि. ( सं. ) १ वाढलेला. २ पूर्ण. ३ कापलेला; तासलेला.

**वर्म**–पु. (सं.) १ कवच. २ घर.

**वर्मा**–पु. (सं.) क्षत्रियांची उपाधि.

**वर्य्य**–वि. (सं.) श्रेष्ठ.

**वर्वर**–पु. (सं.) १ बर्बर देश. २ बर्वर देशांतील असंस्कृत लोक. ३ पामर; नीच.

**वर्ष**–पु. (सं.) १ वृष्टि; वर्षाव. २ संवत्सर; साल. ३ एक द्वीप. ४ मेघ.

**वर्षगांठ**–स्त्री. (सं.) वाढदिवस.

**वर्षण**–पु. (सं.) वृष्टि; वर्षाव.

**वर्ही**–पु. (सं.) मोर.

**वल**–पु. (सं.) १ मेघ. २ एक असुर.

**वलन**–पु. (सं.) विचलन.

**वलभी**–स्त्री. (सं.) १ घराच्या वरील राहुटी. २ घराचा माथा. ३ एक जुनें शहर.

**वलवला**–पु. (अ.) आवेश.

**वलाहक**–पु. (सं.) १ मेघ. २ पर्वत. ३ एक असुर.

**वलि**–पु. (सं.) १ रेषा; रेघ. २ वळी; सुरकुती. ३ बलि. ४ एक दैत्य.

**वलित**–वि. (सं.) १ सुरकुतलेला; वळी पडलेला. २ वांकवलेला; ३ वेष्टित; वेढलेला. ४ लागलेला; लपटलेला. ५ युक्त; सहित.

**वली**–स्त्री. (सं.) १ सुरकुती; वळी. २ रांग; ओळ. ३ रेघ; रेषा.

**वली**-पु. (अ.) १ मालक; स्वामी. २ अधिकारी; शासक. ३ साधू.

**वलद्**-पु. (अ.) पुत्र.

**वलिद्यत**-स्त्री. (अ.) बापाचें नांव.

**वल्लभा**-स्त्री. (सं.) प्रिय स्त्री.

**वल्लभी**-स्त्री. (सं.) वलभी पहा.

**वश**-पु. (सं.) १ इच्छा. २ अधिकार; काबू. ३ शक्तीचा विस्तार. ४ प्रभुत्व.

**वशवर्त्ती**-वि. (सं.) अधीन; ताब्यांत.

**वशानुग**-वि. (सं.) वशीभूत.

**वशिता**-स्त्री. (सं.) १ अधीनता; ताबेदारी. २ मोहून जाण्याची क्रिया.

**वशित्व**-पु. (सं.) १ वश्यता. २ एक सिद्धी

**वशी**-वि. (सं.) १ विकार ताब्यांत ठेवणारा. २ अधीन.

**वश्यता**-स्त्री. (सं.) अधीनता.

**वसंत**-पु. (सं.) १ पहिला ऋतु. २ देवींचा रोग. ३ एक राग.

**वसंतदूत**-पु. (सं.) १ आम्रवृक्ष. २ कोकिळा. ३ चैत्र.

**वसंतदूती**-स्त्री. (सं.) १ कोकिळा. २ माधवी लता.

**वसंतपंचमी**-स्त्री. (सं.) माघ शुद्ध पंचमी.

**वसंती**-पु. (सं.) बसंती पहा.

**वसंतोत्सव**-पु. **वसंतयात्रा**-(सं.) १ वसंतपंचमी पासून सुरू होणारा उत्सव. २ होळीचा सण.

**वसअत**-स्त्री. (अ.) १ विस्तार. २ मावण्याचा अवकाश. ३ रुंदी. ४ सामर्थ्य; शक्ति.

**वसन**-पु. (सं.) १ वस्त्र. २ आवरण; झांकण. ३ निवास; वसती.

**वसमा**-पु. (अ) १ कलप. २ लेप. ३ एक प्रकारचें छापलेलें कापड.

**वसवास**-पु. (अ.) १ भ्रम; संशय. २ प्रलोभन; मोह.

**वसह**-पु. (सं.) बैल; वसू.

**वसा**-स्त्री. (सं.) १ मेद. २ चरबी.

**वसीका**-पु. (अ.) १ पर धार्मियांकडून कर म्हणून रक्कम घेण्याची पद्धत. २ व्याज मिळण्याकरितां खजिन्यांत ठेवलेली अशी रक्कम. ३ अशा रकमेवरील व्याज; वृत्ति. ४ वक्फचा करार नामा.

**वसीयत**-**वसीयतनामा**-पु. (अ.) मृत्युपत्र.

**वसीला**-पु. (अ.) १ संबंध. २ सहाय्य; आश्रय. ३ काम तडीस नेण्याचा मार्ग.

**वसुंधरा**-स्त्री. (सं.) पृथ्वी.

**वसुदा-वसुधा**-स्त्री. (सं.) पृथ्वी.

**वसुधारा**-स्त्री. (सं.) १ जैनांची एक देवी. २ अलका; कुबेरनगरी.

**वसुमती**-स्त्री. (सं.) १ पृथ्वी. २ एक वृत्त.

**वसूल**-वि. (अ.) १ प्राप्त; मिळालेला. २ वसूल झालेला; लब्ध.

**वसूल**-पु. उसूल पहा.

**वसूली**-स्त्री. (अ.) प्राप्ति; वसूली.

**वस्ति**-स्त्री. (सं.) १ मूत्राशय; बस्ती. २ पिचकारी.

**वस्तुनिर्देश**-पु. (सं.) मंगलाचरणांत कथेचा उल्लेख.

**वस्तुवाद**-पु. (सं.) न्याय, वैशेषिक तात्त्विक सिद्धांत.

**वस्फ़**-पु. (अ.) १ प्रशंसा; स्तुति. २ गुण. ३ विशेषता.

**वस्ल**-पु. (अ.) १ दोन वस्तूंचें मीलन. २ संयोग; मिलाफ.

**वह**-सर्व (सं.) १ तो. २ तृतीय पुरुष.

**वहम**-पु. (अ.) १ मिथ्या धारणा; चुकीची समजूत. २ भ्रम. ३ संदेह; खोटा संशय.

**वहमी**-वि. (अ.) संशयखोर; शंकेखोर.

**वहशत**-स्त्री. (अ.) १ असभ्यता; रानटीपणा; अज्ञाणीपणा. ३ वेडेपणा. ४ अधीरता. ५ उदासीनता. ६ भित्रेपणा.

**वहशी**-वि. (अ.) १ रानटी; जंगली. २ असभ्य. ३ पाळीव नव्हे तो. ४ भटकणारा.

**वहाँ**-अव्य. (सं.) तेथें.

**वहा**-स्त्री. (सं.) नदी.

**वहाबी**-पु. (अ.) १ अबदूल वहाबचा संप्रदाय. २ या संप्रदायाचा अनुयायी.

**वहि**-अव्य. (सं.) बाहेरील; बाहेरचा.

**वहित्र**-पु. (सं.) जहाज; नाव.

**वहिरंग**-पु. (सं.) १ बहिरंग. २ बाहेरील; दूरचा मनुष्य. -वि. बाहेरचा.

**वहीं**-अव्य. (सं.) तेथें; त्याठिकाणीं.

**वही**-सर्व. (सं.) १ तोच; पूर्वोक्त व्यक्ति. २ निर्दिष्ट व्यक्ति.

**वा**-अव्य. (सं.) अथवा-सर्व-मी.

**वाइ**-सर्व. वांहि पहा.

**वाइदा**-पु. (सं.) वादा पहा.

**वाकई**-वि. (अ.) वास्तव; खरें. -अव्य. खरोखर; यथार्थतः.

**वाक़फियत**-स्त्री. (अ.) १ ज्ञान. २ परिचय.

**वाकया**-पु. (अ.) १ घटना. २ वृत्तांत; वार्ता.

**वाका**-वि. (अ.) १ होणारें. २ स्थित; उभा.

**वाकिफ**-वि. (अ.) १ जाणता; ज्ञाता. अनुभवी; जाणणारा.

**वाकिफयत**-स्त्री. (सं.) ज्ञान.

**वाक्सिद्धि**-स्त्री. (सं.) बोलल्याप्रमाणें घडून येणारी शक्ति.

**वागीश**-पु. (सं.) १ बृहस्पति. २ ब्रह्मा. ३ कवि.

**वाग्दंड**-पु. (सं.) शाब्दिक शिक्षा; धाकदपट.

**वाग्दान**-पु. (सं.) वाङ्निश्चय.

**वाग्देवी**-स्त्री. (सं.) सरस्वती.

**वाग्मी**-पु. (सं.) १ वक्ता. २ पंडित. ३ बृहस्पति.

**वाग्विलास**-पु. (सं.) आनंदपूर्ण संभाषण.

**वाङ्मय**-वि. (सं.) १ वचनसंबधी. २ वाचेनें केलेलें. -पु. साहित्य.

**वाङ्मुख**-पु. (सं.) उपन्यास; गद्य काव्य.

**वाचक**-वि. (सं.) सूचक. -पु. १ नाम; संकेत. २ वाचणारा. ३ बोलणारा.

**वाचन**-पु. (सं.) १ वाचणें; पढणें. २ सांगणें. ३ प्रतिपादन.

**वाचाबध्द**-वि. (सं.) प्रतिज्ञाबद्ध; शब्दानें गुंतलेला.

**वाचाल**-वि. (सं.) १ वाचाट: बडबड्या. २ वाक्पटु.

**वाचिक**-वि. (सं.) १ बोलणाऱ्यासंबंधी. २ वाणीनें केलेलें.

**वाची**-वि. (सं.) सूचक.

**वाच्य**-वि. (सं.) १ सांगण्यासारखें. २ अभिधेय; बोलून दाखविण्यासारखें. -पु. (सं.) वाच्यार्थ; अभिधेयार्थ.

**वाच्यार्थ**-पु. (सं.) मूळशब्दार्थ.

**वाच्यावाच्य**-पु. (सं.) बोलण्या न बोलण्यासारखी गोष्ट; बरीवाईट गोष्ट.

**वाज**-पु. (अ.) १ उपदेश; शिक्षण. २ धार्मिक उपदेश; कथन.

**वाजपेई-वाजपेयी**-पु. (सं.) १ वाजपेय यज्ञ केलेला. २ ब्राह्मणांतील एक नांव. ३ अत्यंत कुलीन पुरुष.

**वाजपेय**-पु. (सं.) एक यज्ञ.

**वाजिब-वाजिबी**-वि. (अ.) योग्य; उचित.

**वाजी**-पु. (सं.) १ घोडा. २ नासलेल्या दुधाचें पाणी.

**वाट**-पु. (सं.) मार्ग; रस्ता.

**वाड़वाग्नि**-स्त्री. (सं.) १ समुद्रांतील आग. २ समुद्री आग.

**वाण**-पु. (सं.) तीर: बाण.

**वाणावली**-स्त्री. (सं.) १ बाणांची रांग. २ बाणांचा वर्षाव.

**वाणी**-स्त्री. (सं.) १ सरस्वती. २ वचन; शब्द. ३ वाक्शक्ती. ४ जीभ.

**वातजात**-पु. (सं.) हनूमान.

**वातायन**-पु. (सं.) १ खिडकी. २ रामायणांतील एक प्रदेश.

**वातुल**-वि. (सं.) १ वातुळ २ अंगात वारें आलेला.

**वातुळ**-पु. (सं.) उन्मत्त.

**वातोर्मी**-पु. (सं.) एक वर्णवृत्त.

**वाद**-पु. (सं.) भांडण. वाद सर्व अर्थ मराठी प्रमाणें.

**वादक**-पु. (सं.) १ वाजविणारा. २ वक्ता. ३ शास्त्रार्थ करणारा.

**वादरायण**-पु. (सं.) व्यास; बादरायण.

**वादा**-पु. (अ.) १ वचन; प्रतिज्ञा; करार; वायदा. २ विवक्षित क्षण व घडी.

**वादानुवाद**-पु. (सं.) वादविवाद.

**वादी**-पु. (सं.) १ वक्ता; बोलणारा. २ फिर्यादी. ३ पक्ष अथवा प्रस्ताव मांडणारा.

**वापस**-वि. (फा.) परत.

**वापसी**-वि. (फा.) परत आलेला. -स्त्री. प्रत्यावर्तन; परत येणें.

**वाम**-वि. (सं.) १ डावा. २ प्रतिकूल; विरुद्ध. ३ वांकडा. ४ दुष्ट. -पु. १ कामदेव. २ वामदेव; रुद्र. ३ वरुण; ४ धन. ५ एक वर्णवृत्त.

**वामकी**-स्त्री. (सं.) जादूगारांची देवता.

**वामदेव**-पु. (अ.) १ शिव. २ एक वैदिक ऋषि.

**वामन**-वि. (सं.) १ ठेंगू मनुष्य. २ लहान; आंखूड. पु. १ विष्णूचा अवतार. २ शिव. ३ एक दिग्गज.

**वाममार्ग**-पु. (सं.) तांत्रिकमत.

**वामा**-स्त्री. (सं.) १ स्त्री. २ दुर्गा. ३ एकवृत्त.

**वामावर्त**-वि.(सं.)१ डावी प्रदक्षिणा. २ डाव्याबाजूस भोवरा असलेला.

**वायव्य**-वि. (सं.) वायुसंबंधी. -पु. पश्चिमोत्तर दिशा. २ एक अस्त्र; वायुअस्त्र.

**वायुकोण**-पु. (सं.) पश्चिमोत्तर दिशा; वायव्य.

**वायुलोक**-पु. (सं.) १ सप्तलोकांतील एक लोक. २ आकाश.

**वारंवार**- अव्य. (सं.) बारंबार पहा.

**वार**-पु. (सं.) १ दार. २ अडथळा; रुकावट. ३ आवरण. ४ आवृत्ति;

वेळा. ५ क्षण. ६ आठवड्यांतील दिवस.

**वार**-पु. ( सं. ) आघात.

**वारण**-पु. ( सं. ) १ निषेध. २ बाधा; रोध. ३ कवच. ४ छप्पयचा एक भेद.

**वारतिय**-स्त्री. (सं.) वेश्या.

**वारद**-पु. ( सं. ) मेघ.

**वारदात**-स्त्री. ( अ. ) १ दुर्घटना. २ मारपीट; दंगा.

**वारन**-स्त्री. ( सं. ) बली; ओवाळून टाकलेली वस्तु.

**वारना**-क्रि.स. ( सं. ) ओवाळून टाकणें. -पु. ओवाळणी; उत्सर्ग.

**वारपार**-पु. ( सं. ) १ पूर्ण विस्तार; या काठापासून त्या काठापर्यंत. २ अंत. -अव्य. १ या काठापासून त्या काठापर्यंत. २ या बाजूपासून त्या बाजूपर्यंत; आरपार.

**वारफेर**-पु. ( सं. ) १ बली. २ ओवाळून टाकलेली वस्तु.

**वारमुखी**-स्त्री. ( सं. ) वेश्या.

**वारांनिधि**-पु. ( सं. ) समुद्र.

**वारा**-पु. ( सं. ) १ खर्चांत बचत. २ लाभ; फायदा. ३ पैलतीर. -वि. १ स्वस्त; किफायती. २ ज्यानें स्वतःचें बलिदान केलें असा.

**वारान्यारा**-पु. (सं.) १ निश्चय; निर्णय. ३ झगड्याचा निकाल.

**वाराह**-पु. ( सं. ) वराह.

**वाराही**-स्त्री. (सं.) १ आठ मातृकांतील एक. २ एक योगिनी.

**वाराहीकंद**-पु. (सं.) एक मोठा कंद; डुक्करकंद.

**वारिज**-पु. (सं.) १ कमल. २ शंख. ३ शिंपला. ४ कवडी. ५ सोनें.

**वारित**-वि. ( सं. ) निवारित.

**वारिधि**-पु.( सं. ) समुद्र.

**वारियां**-स्त्री. (सं.) बलिदान; आत्मसमर्पण.

**वारिवर्त**-पु. ( सं.) मेघ.

**वारिस**-पु. ( अ. ) उत्तराधिकारी; वारस.

**वारींद्र**-पु. ( सं. ) समुद्र.

**वारीफेरी**-स्त्री. (सं.) दृष्ट काढण्यासाठीं ओवाळणी.

**वारुणी**-स्त्री. ( सं. ) १ मदिरा. २ वरुणानी. ३ उपनिषद् विद्या. ४ पश्चिम दिशा. ५ एक पर्व.

**वारेंद्र**-पु. (सं.) एक प्रदेश; राजशाही जिल्हा.

**वार्त्ता**-स्त्री. ( सं.) १ बातमी. २ संवाद; वृत्तान्त. ३ विषय. ४ संभाषण. ५ वाणिज्य.

**वार्त्तालाप**-पु. ( सं. ) संभाषण.

**वार्त्तिक**-पु. ( सं. ) भाष्य; टीका.

**वार्द्धक्य**-पु. ( सं. ) १ वृद्धपण. २ वाढ.

**वाला**-स्त्री. ( सं. ) उपजाति वृत्त.

**वाला**-प्रत्यय. संबंधसूचक प्रत्यय.

**वालिद**-पु. ( अ. ) पिता; बाप.

**वालिदा**-स्त्री. ( अ. ) माता.

**वावैला**-पु. ( अ. ) १ विलाप; रडणें. २ आरडाओरड.

**वाष्प**-पु. ( सं. ) १ बाष्प. २ अश्रु.

**वासंतिक**-पु. ( सं. ) १ विदूषक. २ नर्तक. -वि. वसंतसंबंधी.

**वासंती**-स्त्री. ( सं. ) १ माधवी लता. २ जुई. ३ मदनोत्सव. ४ दुर्गा. ५ एक वृत्त.

**वास**-पु. (सं.) १ निवास; राहणें. २ घर. ३ सुगंध.

**वासक**-पु. ( सं. ) अडुळसा.

**वासकसज्जा**-स्त्री. ( सं. ) एक नायिकेचा प्रकार.

**वासन**-पु. (सं.) १ सुगंधित करणें. २ वस्त्र. ३ वास.

**वासव**-पु. ( सं. ) इंद्र.

**वासित**-पु. वि. ( सं. ) १ सुगंधित केलेला. २ वस्त्रानें आच्छादलेला. ३ शिळा.

**वासिता**-स्त्री. (सं.) १स्त्री. २ आर्येचा एक भेद.

**वासिल**-वि. ( अ. ) १ पोहोंचलेला; प्राप्त. २ वसूल झालेला.

**वासी**-पु. ( सं. ) राहणारा.

**वास्तव्य**-पु. ( सं. ) वस्ती; निवास. -वि. राहण्यायोग्य.

**वास्ता**-पु. ( अ. ) संबंध.

**वास्तु**-पु. ( सं. ) १ घराची जागा. २ घर. ३ इमारत.

**वास्ते**-अव्य. ( अ. ) १ निमित्त; करितां; साठीं. २ हेतु; सबब.

**वाह**-अव्य. ( अ. ) १ धन्य. २ आश्चर्यसूचक शब्द. ३ घृणा दाखविणारा शब्द.

**वाहवाही**-स्त्री. ( फा. ) प्रशंसा; स्तुति.

**वाहिनी**-स्त्री. ( सं. ) १ सेना. २ २ सैन्याचा एक प्रकार.

**वाहियात**-वि. ( अ. ) १ व्यर्थ. २ वाईट.

**वाही**-वि- ('अ. ) १ सुस्त; ढिला. २ निकामी. ३ मूर्ख. ४ उगाच भटकणारा. ५ उद्धट.

**वाही-तबाही**-वि. ( अ. ) १ निरुपयोगी. २ उलटसुलट. ३ व्यर्थ; शेंडाबुडखा नसलेला. ४ रिकामटेकडा;

–स्त्री. असंबद्ध बोलणें; परस्पर गालिप्रदान.

**वाह्य**–वि. ( सं. ) बाहेरचा; अलग.

**वाह्यांतर**–वि. ( सं. ) आंतबाहेर; अन्तर्बाह्य.

**वाह्येंद्रिय**–स्त्री. ( सं. ) पांच ज्ञानेंद्रियें.

**विंजन**–पु. व्यंजन.

**विंद**–पु. वृंद व बिंदु पहा.

**विंदक**–पु. ( सं. ) १ मिळविणारा; प्राप्त करणारा. २ ज्ञाता.

**विंदु**–पु. ( सं. ) १ जलकण; बिंदु. २ टिकली. ३ अनुस्वार. ४ शून्य. ५ थेंब. ६ लहान तुकडा.

**विंदुर**–पु. ( सं. ) टिकली.

**विंध-विंध्य-विंध्यकूट**–पु. (सं.) विंध्य पर्वत. –वि. उप. ( सं. ) १ विशेष. २ विरूपता; ३ निषेध.

**विकंकत**–पु. ( सं. ) एक वृक्ष; किंकिणी.

**विकट**–वि. ( सं. ) १ विशाल. २ भयंकर. ३ वांकडा. ४ कठिण. ५ दुर्गम. ६ दुःसाध्य.

**विकर**–पु. ( सं. ) १ रोग; व्याधि. २ तलवारीचा हात.

**विकरार-विकराल**–वि. ( सं. ) भयंकर.

**विकर्षण**–पु. ( सं. ) १ आकर्षण. २ आकर्षणशास्त्र.

**विकल**–वि. (सं.) १ विव्हल; व्याकुळ. २ कलाहीन. ३ अपूर्ण.

**विकलाना**–क्रि.अ. ( सं. ) व्याकुळ होणें; घाबरणें.

**विकल्प**–पु. (सं.) १ भ्रम; भ्रांति. २ विचार. ३ एक चित्तवृत्ति. ४ एक अलंकार. ५ समाधि प्रकार. ६ दोहोंपैकीं वाटेल तो घेण्याचा प्रकार.

**विकसना**–क्रि. अ. विकसणें.

**विकाश-विकास**–पु. ( सं. ) १ १ प्रकाश; २ प्रसार. ३ एक अलंकार. ४ उन्नति होणें. ५ उत्क्रांतिवाद.

**विकासना**–क्रि.अ. ( सं. ) विकास होणें.

**विकिर**–पु. ( सं. ) पक्षी; चिमणी.

**विकीर्ण**–वि. ( सं. ) १ पसरलेला. २ प्रसिद्ध.

**विकुंठ**–पु. ( सं. ) वैकुंठ.

**विकृत**–वि. (सं.) १ विकार झालेला. २ कुरूप; वाईट. ३ अस्वाभाविक; असाधारण.

**विकृष्ट**–वि.( सं. ) आकृष्ट; खेंचलेला.

**विक्रम**–पु. ( सं. ) १ विष्णु. २ पराक्रम. ३ बल. ४ गति. ५ विक्रमादित्य. –वि. श्रेष्ठ; उत्तम.

**विक्रमी**-पु. (सं.) १ पराक्रमी. २ विष्णु. -वि. विक्रमासंबंधी.

**विक्रांत**-पु. (सं.) १ वैक्रांत मणि. २ शूर; वीर. ३ एक संधि.

**विक्षिप्त**-वि. (सं.) १ फेंकलेला. २ वेडा. ३ विकल; व्याकुळ. -पु. योगांतील चित्ताची एक अवस्था.

**विक्षेप**-पु. (सं.) १ फेंकणें; टाकणें. २ हलविणें. ३ खेंचणें; धनुष्यास गुण चढविणें. ४ मन इकडे तिकडे भटकणें. ५ एक अस्त्र. ६ विघ्न; बाधा.

**विक्षोभ**-पु. (सं.) चंचलता; उद्विग्नता.

**विखान**-पु. (सं.) शिंग; विषाण.

**विगंध**-वि. (सं.) १ वासरहित. २ दुर्गंधियुक्त; घाणेरा.

**विगत**-वि. (सं.) १ गेलेला. २ अखेरचा; अंतींचा. ३ रहित; विहीन.

**विगर्हणा**-स्त्री. (सं.) निंदा; निर्भर्त्सना.

**विगलित**-वि. (सं.) १ गळलेला. २ शिथिल, ढिला. ३ बिघडलेला.

**विगुण**-वि. (सं.) निर्गुण; गुणरहित.

**विग्रह**-पु. (सं.) १ दूर करणें. २ विभाग. ३ समासांतील शब्द वेगळे करणें. ४ कलह; भांडण ५ युद्ध. ६ आकृति. ७ शरीर. ८ मूर्ति.

**विग्रही**-पु. (सं.) १ तंटा करणारा. २ युद्ध करणारा.

**विघटन**-पु. (सं.) १ तोडफोड. २ नष्ट करणें; नाश.

**विघटिका**-स्त्री. (सं.) घटकेचा २३ वा अंश.

**विचक्षण-विचच्छन**-वि. (सं.) १ चमकणारा. २ निपुण. ३ पंडित; विद्वान. ४ बुद्धिमान.

**विचरण-विचरन**-पु. (सं.) १ चालणें. २ फिरणें; पर्यटन करणें.

**विचरना**-क्रि अ. (सं.) फिरणें; चालणें.

**विचल**-वि. (सं.) १ अस्थिर. २ स्थानांतरित.

**विचलता**-स्त्री. (सं.) १ चंचलता. २ घाबरणें.

**विचलना**-क्रिअ. (सं.) १ सरणें; दूर होणें. २ अधीर होणें; घाबरणें. ३ संकल्प अथवा प्रतिज्ञा न पाळणें.

**विचलाना**-क्रिस. (सं.) विचलित करणें.

**विचलित**-वि. (सं.) १ अस्थिर; चंचल. २ प्रतिज्ञा मोडलेला.

**विचार**-पु. (सं.) १ मनांतील व्यापार. २ भावना. ३ खटला चालणें व त्याचा निकाल होणें.

**विचारक**-पु. ( सं. ) १ विचार करणारा. २ न्यायकर्ता.

**विचारणा**-स्त्री. ( सं. ) विचार करण्याची क्रिया.

**विचारणीय**-वि. ( सं. ) १ विचार करण्यासारखें. २ संदिग्ध.

**विचारणा**-क्रिअ. ( सं. ) १ विचार करणें. २ विचारणें; पुसणें. ३ शोधणें; पत्ता लावणें.

**विचारपति**-पु. ( सं. ) न्यायाधीश.

**विचारवान्-विचारशील**-विचार करण्याची शक्ति असलेला.

**विचारालय**-पु. ( सं. ) न्यायालय.

**विचारी**-पु. ( सं. ) विचार करणारा.

**विचार्य्य**-वि. ( सं. ) विचारणीय पहा.

**विचिकित्सा**-स्त्री. ( सं. ) संशय; शक.

**विचित्र**-वि. (सं.) १ अनेक रंगांचा. २ अद्भुत; विलक्षण. ३ विस्मित करणारा. -पु. ( सं. ) एक अलंकार.

**विचित्रता**-स्त्री. ( सं. ) १ रंगीबेरंगी असण्याचा गुण. २ विलक्षणता.

**विच्छित्ति**-स्त्री. ( सं. ) १ विच्छेद. २ त्रुटि; कमतरता. ३ चित्रविचित्र रंग. ४ कवितेंतील यति.

**विच्छिन्न**-वि. ( सं. ) १ छेदलेला; विभक्त. २ वेगळा; अलग.-पु. योगांतील एक अवस्था.

**विछलना**-क्रिअ. फिसलना पहा.

**विछोई**-पु. वियोगी पहा.

**विछोह**-पु. ( सं. ) वियोग.

**विजन**-वि. ( सं. ) एकांत.

**विजन-विजना**-पु. पंखा.

**विजया**-स्त्री. ( सं. ) १ दुर्गा. २ भांग. ३ कृष्णाची माळ. ४ एक छंद. ५ एक वृत्त. ६ दसरा.

**विजात**-वि. ( सं. ) वर्ण संकर.

**विजानु**-पु. (सं.) तरवारीचा एक हात.

**विजारत**-स्त्री. ( अ. ) वजीरी; मंत्रिपद.

**विजित**-पु. ( सं. ) १ जिंकलेला. २ जित देश.

**विजोर**-वि. ( फा. ) कमजोर.

**विजोहा-विज्जोहा**-पु. (सं.) एक वृत्त.

**विज्ञापन**-पु. ( सं. ) १ सूचना. २ जाहिरात.

**विट**-पु. ( सं. ) १ कामुक; लंपट. २ वेश्यागामी. ३ धूर्त; चलाख. ४ धूर्तनायक. ५ विष्टा.

**विटलवण**-पु. (सं.) पादेलोण.

**विडंबना**-स्त्री. (सं.) १ विडंबना; चेष्टा. २ थट्टा; हंसें करणें.

**विडरना**-क्रि.अ. (सं.) १ पळणें. २ इकडेतिकडे होणें; विस्कळित होणें.

**विडराना-विडारना**-क्रि.स. (सं.) १ इकडेतिकडे करणें. विस्काळित होणें. २ नाश करणें. २ पळणें; धांवणें.

**विडाल**-पु. (सं.) मांजर.

**विडौजा**-पु. (सं.) इंद्राचें नांव.

**वितंडा**-स्त्री. (सं.) १ दुसऱ्याचा पक्ष दाबून टाकून आपलें मत प्रस्थापित करणें. २ व्यर्थ वादविवाद.

**वितंत**-पु. (सं.) बिनतारी वाद्य.

**वित**-वि. (सं.) १ ज्ञाता. २ चतुर; निपुण.

**वितताना**-क्रि.ज; (सं.) व्याकुळ होणें.

**वितद्रु**-पु. (सं.) झेलम नदी.

**वितपन्न**-पु. (सं.) व्युत्पन्न; निपुण. -वि. व्याकुळ; घाबरलेला.

**वितरण-वितरन**-पु. (सं.) १ देणें. २ वाटणें.

**वितरना**-क्रि.स. (सं.) वांटणें.

**वितरेक**-क्रिवि. (सं.) व्यतिरिक्त; सोडून; शिवाय.

**वितर्क**-पु. (सं.) १ संदेह; संशय. २ एक अलंकार. ३ तर्कवितर्क.

**वितल**-पु. (सं.) सप्त पातलांपैकी एक.

**वितस्ता**-स्त्री. (सं.) झेलम नदी.

**वितान**-पु. (सं.) १ यज्ञ. २ विस्तार. ३ मोठा तंबू; शामियाना. ४ समूह. ५ शून्य. ६ एक छंद.

**वितान**-बि. १ शून्य; रिकामा. २ मंद; धिम्मा.

**वितानना**-क्रि.स. (सं.) शामियाना लावणें.

**वितिक्रम**-पु. व्यतिक्रम पहा.

**वितुंड**-पु. (सं.) हत्ती.

**वितु-वित्त**-पु. (सं.) वित्त; द्रव्य; धन.

**वित्तपति**-पु. (सं.) कुबेर.

**विथक**-पु. (सं.) वारा; हवा.

**विथकना**-क्रि.अ. (सं.) १ थकणें; दमणें. २ बिचकणें.

**विथकित**-वि. (सं.) १ थकलेला; २ बिचकलेला.

**विथराना**-क्रि.स. (सं.) १ पसरणें. २ विस्कळित करणें.

**विथा**-स्त्री. व्यथा पहा.

**विथारना**-क्रि.स. (सं.) पसरणें; विस्तारणें.

**विथित**–वि. (सं.) व्यथित; दुःखी.

**विदग्ध**–पु. (सं.) १ रसिक पुरुष. २ पंडित; विद्वान. ३ चतुर; चलाख.

**विदग्धता**–स्त्री. (सं.) विद्वत्ता.

**विदग्धा**–स्त्री. (सं.) कुशलनायिका.

**विदमान**–अव्य. विद्यमान .

**विदरना**–क्रि.अ. विदरणें; फाटणें. –क्रि.स. विदारणें; फाडणें.

**विदलन**–पु. (सं.) १ दाबणें; चुरगळणें. २ फाडणें.

**विदलना**–क्रि.स. (सं.) चुरगळणें; नाश करणें.

**विदा**–स्त्री. (सं.) १ प्रस्थान; रवाना होणें. २ जाण्याची अनुमति; निरोप. ३ प्रस्थान समयीं दिलेलें धन; बिदागी.

**विदारीकंद**–पु. (सं.) भुइकोहळा.

**विदाही**–पु. (सं.) जळणारा; पेट घेणारा पदार्थ.

**विदिशा**–स्त्री. (सं.) भेलशा गांवाचें प्राचीन नांव.

**विदिश**–स्त्री. (सं.) दोन दिशांमधील कोण.

**विदुर**–पु. (सं.) १ जाणणारा ज्ञाता. २ पंडित; ज्ञानी; पंडूचा भाऊ.

**विदुष**–पु. (सं.) विद्वान; पंडित.

**विदुषी**–स्त्री. (सं.) पंडिता.

**विदूर**–वि. (सं.) पुष्कळ दूरचा. –पु. (सं.) वैदूर्य पहा.

**विदूषक**–पु. (सं.) १ विषयी. २ विदूषक. ३ नायकमित्र. ४ भांड.

**विदूषना**–क्रि.स. (सं.) १ त्रास देणें. २ दोष देणें; दूषण देणें.

**विदेह**–पु. (सं.) १ देहविरहित. २ अयोनिंसभव. ३ जनक. ४ मिथिलादेश –वि. (सं.) बेशुद्ध; देहभान नसलेला.

**विदेही**–पु. (सं.) ब्रह्म.

**विद्**–पु. (सं.) १ जाणता. २ पंडित; विद्वान. ३ बुधग्रह.

**विद्ध**–वि. (सं.) १ भोंक पडलेला. २ जखमी; घायाळ. ३ वांकडा. ४ चिकटलेला; भिडलेला.

**विद्याधर**–पु. (सं.) १ एक देवयोनि. २ एक अस्त्र. ३ विद्वान पंडित.

**विद्याधरी**–स्त्री. (सं.) एका देवयोनीतील स्त्री.

**विद्यारंभ**–पु. (सं.) शिक्षणाच्या आरंभीचा संस्कार.

**विद्युन्माला**–स्त्री. (सं.) १ विजेचा समूह. २ एक छंद.

**विद्युन्माली**-पु. ( सं. ) एक राक्षस. २ एक छंद.

**विद्युल्लेखा**-स्त्री. (सं.) १ वीज. २ एक वृत्त.

**विद्रधि**-पु ( सं. ) एक घातक फोड.

**विद्रावण**-पु. ( सं. ) १ पळणें. २ विरघळणें. ३ उडून जाणें. ४ फाडणें. ५ नष्ट करणारा.

**विद्रुम**-पु. (सं.) पोंवळें.

**विद्रोह**-पु. ( सं. ) १ द्वेष. २ बंड.

**विद्रोही**-पु. (सं.) १ द्वेष करणारा. २ बंडखोर.

**विद्वेष**-पु. ( सं. ) वैर; शत्रुता.

**विद्वेषण**-पु. ( सं. ) १ वैर; शत्रुता. २ वैर उत्पन्न करणारें तांत्रिक कर्म. ३ शत्रुता. ४ दुष्टता.

**विधंसना**-क्रि.स. नष्ट करणें; नाश करणें.

**विध**-पु. (सं. ) ब्रह्मा; विधि.

**विधना**-क्रि.स. ( सं. ) प्राप्त करणें; बरोबर घेणें. -स्त्री. ( सं. ) भवितव्यता; भविष्य. -पु. ब्रह्मा; विधि.

**विधर**-क्रि.वि. उधर पहा.

**विधाँसना**-क्रि.स. विधंसना पहा.

**विधाता**-पु. (सं. ) १ ब्रह्मा; ईश्वर. २ विधान करणारा. २ उत्पत्तिकर्ता. ४ प्रबंध करणारा.

**विधान**-पु. (सं.) १ आयोजन; अनुष्ठान. २ व्यवस्था; प्रबंध. ३ विधि; प्रणाली. ४ रचना. ५ उपाय; युक्ति. ६ आज्ञापणें.

**विधायक**-पु. ( सं. ) १ विधान करणारा. २ करणारा; रचणारा. ३ प्रबंध करणारा.

**विधि**-स्त्री. (सं.) १ रीति; प्रणालि; पद्धति. २ व्यवस्था; योजना. ३ शास्त्रोक्त विधान. ४ शास्त्राची आज्ञा. ५ आज्ञार्थ. ६ एक अलंकार. ७ आचार-व्यवहार; चाल. ८ प्रकार; तऱ्हा.

**विधिपुर**-पु. ( सं. ) ब्रह्मलोक.

**विधिरानी**-स्त्री ( सं. ) सरस्वती; ब्रह्मदेवाची पत्नी.

**विधिवत्**-क्रीव. (सं. ) १ विधिपूर्वक. २ उचितरूपानें; पाहिजे तसा.

**विधुंतुद**-पु. ( सं. ) राहु.

**विधु**-पु. ( सं. ) १ चंद्र. २ ब्रह्मा. ३ विष्णु.

**विधुदार**-पु. (सं.) रोहिणी.

**विधुबंधु**-पु. ( सं. ) कुमुद.

**विधुबैनी-विधुवदनी**-स्त्री. (सं.) चंद्रवदना स्त्री.

**विधुर**-पु. (सं.) १ दुःखी. २ व्याकुल. ३ असमर्थ; अशक्त.

**विधेय**-वि. (सं.) १ कर्तव्य. २ ज्याचें विधान करावयाचें तें. ३ विधिद्वारा करावयाचा नियम. ४ अधीन; वशीभूत. ५ ज्याच्या योगानें कांहीं सांगितलें जातें तो शब्द अथवा वाक्य; विधेय.

**विध्याभ्यास**-पु. (सं.) एक अर्थालंकार.

**विन**-अव्य. विना.

**विन**-सर्व. (सं.) ते.

**विनत**-वि. (सं.) १ नम्र. २ झुकलेला. ३ सुशिक्षित.

**विनतडी**-स्त्री. (सं.) विनति.

**विनता**-स्त्री. (सं.) गरुडाची माता.

**विनति-विनती**-स्त्री. (सं.) १ १ नम्रता; विनय. २ प्रार्थना; विनंती. ३ झुकाव

**विनम्र**-वि. (सं.) १ विनीत; सुशील. २ झुकलेलें.

**विनय**-स्त्री. (सं.) १ नम्रता. २ शिक्षण. ३ प्रार्थना. ४ शासन. ५ नीति.

**विनयशील**-वि. (सं.) नम्र; सुशील.

**विनयी**-वि. (सं.) नम्र; विनययुक्त.

**विनशन**-पु. (सं.) नष्ट होणें; नाश.

**विनश्वर**-वि. (सं.) अनित्य.

**विनष्ट**-वि. (सं.) १ उध्वस्त. २ मृत. ३ विघडललें. ४ भ्रष्ट; पतित.

**विनसना-विनसाना**-क्रि अ. नष्ट होणे; बिघडणें.

**विनसाना**-क्रि.स. (सं.) १ नष्ट करणें. २ बिघडविणें; बिनसविणें.

**विना**-अव्य (सं.) १ वाचून; अभावीं. २ सोडून; व्यतिरिक्त.

**विनाती**-स्त्री. (सं.) विनय.

**विनाथ**-वि. (सं.) अनाथ.

**विनिमय**-पु. (सं.) अदलाबदल.

**विनियोग**-पु. (सं.) १ उपयोग; प्रयोग. २ मंत्राचा प्रयोग. ३ पाठविणें; प्रेषण.

**विनीत**-वि. (सं.) १ विनययुक्त; सुशील. २ शिष्ट; नम्र. ३ धार्मिक.

**विनु**-अव्य. (सं.) विना. पहा.

**विनूठा**-वि. (सं.) सुंदर; अनूठा.

**विनोक्ति**-स्त्री. (सं.) एक अलंकार.

**विनोद**-पु. (सं.) १ कुतूहल; कौतुक. २ खेळ; क्रीडा. ३ थट्टा; परिहास. ४ हर्ष; आनंद.

**विनोदी**-वि. (सं.) १ थट्टेखोर. २ आनंदी. ३ खेळाडू. ४ गमत्या.

**विन्यास**-पु. (सं.) १ स्थापना; ठेवणें. २ जागच्याजागीं ठेवणें. ३ जडणें.

**विपंची**-स्त्री (सं.) १ एकवीणा. २ क्रीडा; खेळ.

**विपक्ष**-पु. (सं.) १ विरुद्ध पक्ष. २ विरोधी; प्रतिद्वंदी. ३ प्रतिवादी. ४ विरोध; खंडन. ५ अपवाद.

**विपक्षी**-पु. (सं.) १ विरुद्ध पक्षाचा. २ शत्रु; प्रतिवादी. ३ बिनपंखांचा.

**विपल**-पु. (सं.) एका पळाचा साठावा भाग.

**विपाक**-पु. (सं.) १ पिकणें. २ पूर्णावस्थेस येणें. ३ फल; परिणाम. ४ कर्मफल. ५ पचणें. ६ दुर्गति.

**विपादिका**-स्त्री. (सं.) १ एक रोग. २ प्रहेलिका.

**विपासा**-स्त्री. (सं.) बिआस नदी.

**विपिनपति**-पु. (सं.) सिंह.

**विपिनविहारी**-पु: (सं.) रानांत विहार करणारा. २ कृष्ण.

**विपुला**-स्त्री. (सं.) पृथ्वी. २ एक छंद. ३ आर्येचा प्रकार.

**विपोहना**-क्रिस. (सं.) १ सारवणें. २ नाश करणें. ३ पोहना पहा.

**विप्रलंभ**-पु. (सं.) १ इच्छित वस्तु न मिळणें. २ प्रियतमवियोग; विरह. ३ विच्छेद; वेगळें; होणें. ४ धूर्तता; कपट.

**विप्रलब्ध**-वि. (सं.) १ वंचित. २ वियोगी.

**विप्रलब्धा**-स्त्री. (सं.) संकेतस्थानीं प्रियकर न भेटलेली नायिका.

**विप्लव**-पु. (सं.) १ उपद्रव. २ बंड. ३ विपत्ति. ४ पूर.

**विबुधविलासिनी**-स्त्री. (सं.) १ देवांगना. २ अप्सरा.

**विबोध**-पु. (सं.) १ जागरण. २ चांगलें ज्ञान. २ सावधान होणें.

**विभंग**-पु. (सं.) गार; प्रस्तर.

**विभक्त**-वि. (सं.) १ विभाजित. २ अलग केलेला.

**विभक्ति**-स्त्री. (सं.) १ विभागणी; वांटणी. २ पृथकता. ३ संबंध दर्शक प्रत्यय.

**विभव**-पु. (सं.) १ धन; संपति. २ ऐश्वर्य. ३ समृद्धि. ४ मोक्ष.

**विभाँति**-स्त्री. (सं.) प्रकार; भेद. -वि. अनेकप्रकारचा. -क्रिवि. नाना· प्रकार. -पु. (सं.) वांटा.

**विभाति**-स्त्री. (सं.) शोभा.

**विभाना-विभारना**-क्रिअ. (सं.) १ चमकणें. २ शोभणें; शोभिवंत होणें.

**विभाव**-पु. ( सं. ) भाव उत्पन्न करणारा.

**विभावरी**-स्त्री. ( सं. ) १ रात्र. २ चांदणी रात्र. ३ दूती; कुंटीण.

**विभासना**-क्रि.अ.; ( सं. ) चमकणें.

**विभीति**-स्त्री. ( सं. ) १ भय; भीति. २ शंका.

**विभीषिका**-स्त्री. (सं.) १ भिवविणें. २ भयानक दृश्य.

**विभु**-वि. ( सं. ) १ सर्वव्यापक. २ सर्वगामी. ३ महान. ४ नित्य. ५ दृढ; अचल. ५ शक्तिमान. -पु.(सं.) १ ब्रह्मा. २ जीवात्मा. ३ प्रभु. ४ ईश्वर. ६ शिव. ६ विष्णु.

**विभूति**-स्त्री. ( सं. ) १ वृद्धि; वाढ. २ वैभव; ऐश्वर्य. ३ संपत्ति; धन. ४ सिद्धि; प्राप्ति. ५ भस्म. ६ लक्ष्मी. ७ एक दिव्यास्त्र. ८ सृष्टि.

**विभूषना**-क्रि.स. ( सं. ) १ दागिने घालणें. २ सुशोभित करणें.

**विभेटन**-पु. ( अ. ) मिठी मारणें; भेटणे.

**विभेद**-पु. ( सं. ) १ विभिन्नता; अंतर. २ भेद; प्रकार. ३ भेदून घुसणें.

**विभौ**-पु. ( सं. ) विभव पहा.

**विभ्रम**-पु. (सं.) १ भ्रमण, चक्कर. २ भ्रांति. ३ संदेह; संशय. ४ घाबरघुंडी. ५ स्त्रियांचा एक हावभाव.

**विभ्राट**-पु. ( सं. ) १ आपत्ति; विपत्ति. २ उपद्रव.

**विमंडन**-पु. ( सं. ) सजविणें; शृंगारणें.

**विमत**-पु. (सं.) १ विरुद्ध मत; विपरीत सिद्धांत. २ प्रतिकूल.

**विमत्सर**-पु. ( सं. ) मोठा अहंकार; औद्धत्य.

**विमन**-वि. (सं.) उदास.

**विमर्दन**-पु. (सं.) १ मळणें. २ नष्ट करणें. ३ मारणें.

**विमर्श-विमर्ष**-पु. ( सं. ) १ विचार. २ समीक्षा. ३ परीक्षा. ४ परामर्ष.

**विमलापति**-पु. ( सं. ) ब्रह्मा.

**विमाता**-स्त्री. ( सं.) सापत्न माता; सावत्र आई.

**विमान**-पु. ( सं. ) १ आकाशयान. २ वृद्ध मनुष्याच्या प्रेताचें वाहन. ३ रथ; गाडी. ४ घोडा.

**विमुख**-वि. ( सं. ) उदास; खिन्न.

**विमूढ**-वि. (सं.) १ विशेष मुग्ध; मोहित. २ भ्रमांत पडलेला. ३ बेशुद्ध. ४ मूर्ख.

**विमूढगर्भ**-पु. ( सं. ) मूर्च्छित असलेला गर्भ.

**विमोह**-पु. (सं.) १ मोह; अज्ञान; भ्रम. २ बेशुद्धि ३ आसक्ति.

**विमोहन**-पु. (सं.) १ लोभविणें; मोहित करणें. २ शुद्ध घालविणें; बेशुद्ध करणें. ३ कामदेवाचा बाण.

**विमोहना**-क्रि.अ. (सं.) १ मोहित होणें; लुब्ध होणें. २ बेशुद्ध होणे. ३ फसणें. -क्रि.स. १ मोहित करणें. २ फसणें.

**विमोहित**-वि. (सं.) १ मुग्ध. २ बेशुद्ध. ३ मूर्छित.

**विमोही**-वि. (सं.) १ मोहित करणारा. २ शुद्धबुद्ध घालविणारा. ३ मूर्छित करणारा. ४ भ्रमांत घालणारा. ५ निष्ठुर.

**विमौट**-पु. (सं.) वारुळ.

**वियंग**-पु. (सं.) महादेव.

**विय**-पु. (सं.) १ दोन; जोडी. २ दुसरा.

**वियुक्त**-वि. (सं.) १ वेगळा केलेला. २ अलग केलेला. ३ रहित; हीन.

**वियो**-वि. (सं.) दुसरा.

**वियोगांत**-वि. (अ.) शोकांत (नाटिका).

**वियोजक**-पु. (सं.) १ वेगळा करणारा. २ वजा करावयाची रक्कम.

**विरंग**-वि. (सं.) १ फिक्का; वाईट रंगाचा. २ अनेक रंगाचा.

**विरंचि**-पु. (सं.) ब्रह्मा; विधाता.

**विरंचिसुत**-पु. (सं.) नारद.

**विरक्त**-वि. (सं.) १ विमुख. २ उदासीन. ३ अप्रसन्न.

**विरक्ति**-स्त्री. (सं) १ वैराग्य. २ उदासीनता. ३ अप्रसन्नता.

**विरचन**-पु. (सं.) निर्मिति; रचना.

**विरचना**-क्रि.स. (सं.) १ रचना; बनविणें. २ सजविणें. -क्रि.अ. विरक्त होणें.

**विरत**-वि. (सं.) १ विन्मुख. २ निवृत्त. ३ वैरागी. ४ विशेष रत; फार लीन.

**विरति**-स्त्री. (सं.) २ अनिच्छा. २ उदासीनता. ३ वैराग्य.

**विरथ**-वि. (सं.) १ रथ नसलेला. २ पदाति; पाय उतार.

**विरद**-पु. (सं.) १ ख्याति; प्रसिद्धी. २ यश; कीर्ति; ब्रीद.

**विरदावली**-स्त्री. (सं.) १ बिरुदावली; यशोगान. ५ कीर्तिकथा.

**विरदैत**-वि. (सं.) ब्रीदधारी; कीर्तिवान; यशवंत.

**विरमना**-क्रि.अ. (सं.) १ रमणें; मन लागणें. २ थांबणें; विराम करणें. ३ मोहित होऊन थांबणें. ४ वेग थांबणें. ५ विलंबना पहा.

**विरमाना**-क्रि.स. (सं.) विरमणें प्रयोजक; थांबविणें.

**विरस**-वि. (सं.) १ रसहीन; नीरस. २ अप्रिय. ३ रुक्ष (काव्य वगैरे).

**विराग**-पु. (सं.) १ अनिच्छा; अनासक्ति, २ वैराग्य.

**विराजना**-क्रि.अ. (सं.) विराजणें.

**विराध**-पु. (सं.) १ पीडा. २ पीडाकारक. ३ एक राक्षस.

**विराव**-पु. (सं.) १ शब्द; रव. २ आरडाओरडा; गलका.

**विराव**-वि. शब्दरहित.

**विरुझना**-क्रि.अ. उलझना पहा.

**विरुद**-पु. (सं.)१ प्रशस्ति. २ पदवी. ३ यश.

**विरुदावली**-स्त्री. (सं.) बिरुदावली; प्रशंसाः यशवर्णन.

**विरुध्द**-वि. (सं.) १ प्रतिकूल. २ अप्रसन्न. ३ विपरीत. ४ अनुचित. -क्रिवि. प्रतिकूल स्थितींत.

**विरुद्धकर्मा**-पु. (सं.) १ दुर्वर्तनी; कुकर्मा. २ श्लेषालंकार भेद.

**विरुद्धरूपक**-पु. (सं.) रूपकातिशयोक्ति.

**विरूप**-वि. (सं.) १ कुरूप. २ बदललेला; परिवर्तित. ३ शोभारहित. ४ विरुध्द. ५ अनेक रंगांचा व रूपांचा.

**विरोचन**-पु. (सं.) १ चमकणें. २ प्रकाशमान. ३ सूर्यकिरण. ४ सूर्य. ५ चंद्र. ६ अग्नि. ७ विष्णु. ८ प्रल्हादाचा पुत्र; बलीचा पिता.

**विरोध**-पु. (सं.) १ विरोध. २नाश.

**विरोधना**-क्रि.स. (सं.) विरोध करणें.

**विलंबना**-क्रि. अ. १ उशीर करणें. २ गमणें. ३ लोंबणें. ४ आश्रय घेणें.

**विलंबित**-वि. (सं.) १ लोंबता; लटकत असलेला. २ उशीर झालेला.

**विलखना**-क्रि.अ. (सं.) बिलखना पहा. २ दुःखी होणें.

**विलग**-वि. (सं.) अलग.

**विलगाना**-क्रि.अ. १ अलग होणें; पृथक होणें. २ सुटासुटा दिसणें. -क्रि.स. वेगळे करणें. २ अलगअलग करणें.

**विलच्छन**-वि. (सं.) विलक्षण.

**विलपना**-क्रि.अ. (सं.) रडणें.

**विलम**-पु. (सं.) विलंब; उशीर.

**विलमना**-क्रि.अ. (सं.) विलंबना पहा.

**विलसन**-पु. (सं.) १ चमकणें; विलीसणें. २ क्रीडा; प्रमोद.

**विलसना**-क्रि.अ. (सं.) १ शोभा देणें. २ विलास करणें. ३ आनंद मानण.

**विलापना**-क्रि.स. ( सं. ) शोक करणें; विलाप करणें.

**विलायत**-पु. ( सं. ) १ परदेश. २ दूरदेश.

**विलास**-पु. (सं.) १ मनोरंजन. २ आनंद; हर्ष ३ हावभाव. ४ प्रसन्न करणारी क्रिया. ५ अवयवाची हालचाल. ६ हालचाल. ७ सुखोपभोग.

**विलासिका**-स्त्री. (सं.) एक एकांकी रूपक.

**विलासिनी**-स्त्री. (सं.) १ सुंदरी; कामिनी. २ वेश्या. ३ एक वृत्त.

**विलासी**-पु. ( सं. ) १ सुखोपभोगानुरक्त; कामी. २ क्रीडाशील. ३ आराम करणारा.

**विलीक**-वि. पु. (सं.) व्यलीक; अनुचित.

**विलोचन**-पु. (सं.) १ नेत्र; नयन; डोळे. २ डोळे फोडणें.

**विलोम**-वि. ( सं. ) विपरीत; उलटा. -पु. व्युत्क्रम.

**विलोल**-वि. ( सं. ) १ चंचल. २ सुंदर.

**विल्व**-पु. ( सं. ) बिल्व; बेल.

**विल्वमंगल**-पु. (सं.) सूरदासाचें अंधत्वपूर्व नांव

**विवक्षा**-स्त्री. ( सं. ) १ सांगण्याची इच्छा. २ अर्थ; तात्पर्य. ३ अनिश्चय; शंका.

**विवक्षित**-वि. ( सं. ) अपेक्षित; इच्छित; नेमका.

**विवदना**-क्रि अ. ( सं. ) विवाद करणें.

**विवर्ण**-पु. ( सं. ) एक साहित्यांतील भाव. -वि. ( सं. ) १ नीच; कमी प्रतीचा. २ कुजाति; हलक्या जातीचा. ३ बेरंगी; वाईट रंगाचा. ४ कांतिहीन.

**विवर्त**-पु. ( सं. ) १ समुदाय; समूह. २ आकाश. ३ भ्रांती; भ्रम.

**विवर्तन**-पु. ( सं. ) फिरणें.

**विवर्तवाद**-पु. ( सं. ) परिणामवाद; मायावाद.

**विवश**-वि. ( सं. ) १ लाचार. २ पराधीन.

**विवस्वान्**-पु. ( सं. ) १ सूर्य. २ अरुण.

**विवाद**-पु. ( सं. ) १ वाग्युद्ध. २ कलह; तंटा. ३ दावेबाजी.

**विवादी**-पु. ( सं. ) १ कलहप्रिय. २ भांडणारा; वाद करणारा.

**विवाहना**-क्रिस. ब्याहना पहा.

**विवाही**-वि. स्त्री. विवाह झालेली.

**विवि**-वि. (सं.) १ द्वि; दोन. २ दुसरा.

**विविचार**-वि. (सं.) १ विचार रहित; विवेकरहित. २ आचाररहित.

**विवर**-वि. (सं.) १ विवर; गुहा. २ खाच; खळगा.

**विवृत**-वि. (सं.) १ विस्तृत. २ मोकळ.

**विवकी**-पु. (सं.) १ विवेकी. २ ज्ञानी. ३ न्यायाधीश. ४ न्यायशील.

**विवेचन**-पु. (सं.) १ परीक्षा करणे; तपास करणे. २ निर्णय; तर्कवितर्क. ३ मीमांसा.

**विव्वोक**-पु. (सं.) साहित्यांतील एक हावभाव.

**विशद**-वि. (सं.) १ स्वच्छ; विमल. २ साफ; स्पष्ट. ३ व्यक्त. ४ श्वेत; पांढरा. ५ सुंदर.

**विशांपति**-पु. (सं.) राजा.

**विशाख**-पु. (सं.) १ कार्तिकेय. २ एक देवता. ३ शिव.

**विशाल**-वि. (सं.) १ लांब रुंद. २ भव्य. ३ प्रसिद्ध.

**विशालाक्ष**-पु. (सं.) १ महादेव. २ विष्णु. ३ एक देवी.

**विशिख**-पु. (सं.) बाण.

**विशिष्ट**-वि. (सं.) १ युक्त; मिळालेला. २ विशेषतायुक्त. ३ विलक्षण.

**विशुद्ध**-वि. (सं.) १ विशुद्ध. २ सत्य; खरा.

**विशूचिका**-स्त्री. (सं.) विसूचिका पहा.

**विशृंखल**-वि. (सं.) क्रमरहित; अनिर्बाधित.

**विशेष**-पु. (सं.) १ भेद; अंतर. २ अधिकता; आधिक्य. ३ वस्तु; पदार्थ. ४ एक अलंकार. ५ सात पदार्थांतील एक.

**विशेषज्ञ**-पु. (सं.) एकाद्या विषयाचें विशेष ज्ञान असलेला तज्ज्ञ; निपुण.

**विशेषण**-पु. (सं.) १ वैशिष्ट्य दाखविणारा. २ विशेषण.

**विशेषना**-क्रि.अ. (सं.) १ निश्चय; निर्णय करणें. २ विशेष रूप देणें.

**विशेषोक्ति**-स्त्री. (सं.) एक अलंकार.

**विशेष्य**-पु. (सं.) विशेषणयुक्त शब्द; नाम.

**विश्**-स्त्री. (सं.) १ प्रजा. २ कन्या.

**विश्पति**-पु. (सं.) राजा.

**विश्रंभ**-पु. (सं.) १ विश्वास. २ प्रेमी व प्रेमिका यांतील प्रेमकलह. ३ प्रेम.

**विश्रब्ध**–वि. (सं.) १ शांत. २ विश्वसनीय. ३ निर्भय.

**विश्रवा**–पु. (सं.) कुबेरपिता.

**विश्लिष्ट**–वि. (सं.) १ विकसित. २ प्रकट; प्रकाशित. ३ पृथक्करण केलेला.

**विश्लेषण**–पु. (सं.) पृथक्करण.

**विश्वंभरा**–स्त्री. (स.) पृथ्वी.

**विश्व**–पु. (सं.) १ विश्व. २ एक देवतागण. ३ विष्णु. ४ शरीर. –वि. १ समस्त; सर्व. २ पुष्कळ.

**विश्वकर्मा**–पु. (सं.) १ ईश्वर. २ ब्रह्मा. ३ सूर्य. ४ त्वष्टा; देवतांचा शिल्पकार. ५ शिव. ६ सुतार. ७ गवंडी. ८ लोहार.

**विश्वकोश**–पु. (सं.) ज्ञानकोश.

**विश्वरूप**–पु. (सं.) १ विष्णु. २ शिव. ३ कृष्णानें अर्जुनास दाखविलेलें रूप.

**विश्वलोचन**–पु. (सं.) सूर्य व चंद्र.

**विश्वश्रवा**–पु. (सं.) रावणाचा पिता.

**विश्वस्त**–वि. (सं.) विश्वसनीय.

**विश्वात्मा**–पु. (सं.) १ विष्णु. २ शिव. ३ ब्रह्मा.

**विश्वेदेव**–पु. (सं.) १ अग्नि २ सर्व देव; एक देवतागण.

**विषकन्या**–स्त्री. अंगामध्यें विष असलेली स्त्री.

**विषदंड**–पु. (सं.) कमलनाल; देंठ.

**विषमंत्र**–पु. (सं.) १ विष उतरण्याचा मंत्र. २ गारुडी.

**विषम**–वि. (सं.) १ असमान. २ दोहोंनी भाग न जाणारी संख्या. ३ कठीण. ४ तीव्र. ५ भीषण. –पु. १ एक वृत्त. २ एक अर्थालंकार.

**विषमता**–स्त्री. (सं) १ विषमत्व. २ वैर; विरोध.

**विषमबाण**–पु. (सं.) कामदेव.

**विषमवृत्त**–पु. (सं.) एक वृत्त.

**विषयी**–पु. (सं.) १ विलासी; कामी. २ कामदेव. ३ धनवान.

**विषविद्या**–स्त्री. (सं.) विष उतरण्याचा मंत्र.

**विषांगना**–स्त्री. (सं.) विषकन्या पहा.

**विषाक्त**–वि. (सं.) विषयुक्त; विषपूर्ण.

**विषाण**–पु. (सं.) १ शिंग. २ डुकराचा दांत.

**विषाद**–पु. (सं.) १ खेद; दुःख. २ निश्चेष्टता.

**विषुव**–पु. (सं.) रात्र व दिवस सारखा असणारा दिवस.

**विषुवरेखा**–स्त्री. (सं.) भूमध्यरेषा; स्ववध्यरेषा.

**विषूचिका**–स्त्री. (सं.) विसूचिका पहा.

**विष्कंभ-विष्कंभक**–पु. (सं.) १ एक योग. २ विस्तार. ३ विघ्न. ४ नाटकांतील एक छोटा अंक.

**विष्कीर**–पु. (सं.) पक्षी; चिमणी.

**विष्टंभ**–पु. (सं.) १ अडथळा; बांधा. २ पोटफुगी.

**विष्टंभना**–पु. (सं.) संकोचन.

**विष्णुक्रांता**–स्त्री. (अ.) निळी अपराजिता.

**विष्णुपदी**–स्त्री. (सं.) गंगानदी.

**विसदृश**–वि. (सं.) १ विपरीत; विरुद्ध. २ विलक्षण; अद्‌भूत.

**विसर्ग**–पु. (सं.) १ दान. २ त्याग. ३ एक वर्ण. ४ मोक्ष. ५ मृत्यु. ६ प्रलय. ७ वियोग.

**विसर्प**–पु. (सं.) इसब; गजकर्ण.

**विसर्पी**–वि. (सं.) पसरणारा.

**विसाल**–पु. (सं.) १ संयोग. २ मृत्यु.

**विसूचिका**–स्त्री. (सं.) पटकी; कॉलरा.

**विस्फोट**–पु. (सं.) १ फुटणें. २ फोड.

**विस्फोटक**–पु. (सं.) १ विषारी २ फुटणारा; स्फोट होणारा पदार्थ. ३ देवींचा रोग.

**विहंग-विहग**–पु. (सं.) १ पक्षी. २ बाण; तीर. ३ मेघ. ४ चंद्र. ५ सूर्य.

**विहसित**–पु. (सं.) मध्यम हास्य.

**विहार**–पु. (सं.) १ फिरणें; सहल करणें. २ संभोग; रासक्रीडा. ३ बौद्धांचा संघाराम.

**विहारी**–पु. (सं.) १ विहार करणारा. २ कृष्ण.

**विहित**–वि. (सं.) विधान केलेलें; आज्ञापिलेलें.

**वीचि**–स्त्री. (सं.) लहर; लाट; तरंग.

**वीचिमाली**–पु. (सं.) समुद्र.

**वीची**–स्त्री. (सं.) तरंग; लाट; लहर.

**वीज़**–स्त्री. (सं.) बीज पहा.

**वीजगणित**–पु. (सं.) बीजगणित.

**वीणापाणि**–स्त्री. (सं.) सरस्वती.

**वीत**–वि. (सं.) १ सोडलेला. २ मुक्त; सुटलेला. ३ गेलेला; उतरलेला (काळ). ४ निवृत्त झालेला.

**वीतराग**–पु. (सं.) १ आसक्ति सोडलेला; निरासक्त. २ बुद्धाचें एक नांव.

**वीथिका-वीथी**-स्त्री. ( सं. ) १ एक रूपक. २ मार्ग; रस्ता. ३ रवि-मार्ग. ४ नक्षत्रमार्ग.

**वीथ्यंग**-पु. ( सं. ) रूपकाचें अंग.

**वीर**-पु. ( सं. ) १ शूर; पराक्रमी. २ योद्धा; सैनिक. ३ अग्रणी. ४ पुत्र. ५ पति. ६ भाऊ.

**वीरकशोरी**-पु. ( सं. ) वीरश्रेष्ठ.

**वीरगति**-स्त्री. ( सं. ) युध्दांत मृत्यु.

**वीरता**-स्त्री. ( सं. ) वीर्य; शौर्य.

**वीरभद्र**-पु. ( सं. ) १ अश्वमेध यज्ञांतील घोडा. २ वाळा. ३ एक शिवगण; शिवपुत्र.

**वीरमाता**-स्त्री. ( सं. ) वीराची आई.

**वीरललित**-पु. ( सं. ) वीरासारखा पण कोमल स्वभाव.

**वीरशय्या**-स्त्री. ( सं. ) रणभूमि.

**वीरा**-स्त्री. ( सं. ) १ मदिरा. २ पुत्रयुक्त स्त्री.

**वीराचारी**-पु. ( सं. ) एक वाम-मार्गी संप्रदाय.

**वीरान**-स्त्री.वि. ( फा. ) १ उजाड; वैराण. २ श्रीहीन.

**वीरासन**-पु. ( सं. ) एक बसण्याची तऱ्हा.

**वृंत**-पु. ( सं. ) १ स्तनाग्र. २ बोंडी. ३ देठ.

**वृंदा**-स्त्री. ( सं. ) १ तुळस. २ राधेचें एक नांव.

**वृजिन**-पु. ( सं. ) १ पाप; अपराध. २ दुःख; कष्ट. ३ कातडें.

**वृत्त**-पु. ( सं. ) १ चरित्र. २ आचार ३ समाचार. ४ जीविका; वृत्ति. ५ एक छंद. ६ मंडल; गोल. ७ वर्तुळ.

**वृत्तखंड**-पु. ( सं. ) १ वर्तुळाचा भाग. २ मेहरप.

**वृत्ति**-स्त्री. ( सं. ) १ जीविका. २ रोजगार. २ छात्र वगैरेस दिलें जाणारें वेतन. ३ विवरण. ४ वर्णन-शैली. ५ चित्ताची अवस्था. ६ व्यापार; कार्य. ७ स्वभाव; प्रकृति. ८ एक शास्त्र.

**वृत्र**-पु. ( सं. ) १ अंधकार. २ मेघ. ३ शत्रु. ४ एक असुर.

**वृद्ध**-पु. ( सं. ) १ म्हातारपण; जरा. २ म्हातारा; बुड्ढा. ३ पंडित; विद्वान.

**वृद्धता**-स्त्री. ( सं. ) १ वार्धक्य; म्हातारपण. २ पांडित्य.

**वृष**-पु. ( सं. ) १ सांड; बैल. २ कामशास्त्रांतील एक पुरुष जाति. ३ कृष्ण. ४ दुसरी रास.

**वृषकेतन-वृषकेतु**-पु. ( सं. ) शिव.

**वृषण**-पु. ( सं. ) १ इंद्र. २ कर्ण. ३ विष्णु. ४ सांड. ६ घोडा. ६ अंड.

**वृषध्वज**–पु. (सं.) १ शिव. २ गणपति. ३ एक पर्व.

**वृषभधुज-वृषभध्वज**–पु. (सं.) शिव; महादेव.

**वृषभानु**–पु. (सं.) राधेचा पिता.

**वृषल**–पु. (सं.) १ शूद्र. २ पापी. ३ घोडा. ४ चंद्रगुप्त.

**वृषली**–स्त्री. (सं.) १ रजस्वलाकुमारी. २ कुलटा. ३ नीच जातीची स्त्री. ४ रजस्वला.

**वृषवासी**–पु. (सं.) शिव.

**वृषासुर**–पु. (सं.) भस्मासुर.

**वृषोत्सर्ग**–पु. (सं.) मृतास उद्देशून बैल सोडून देणें.

**वृष्टिमान**–पु. (सं.) पाऊस मोजण्याचें यंत्र.

**वृष्ण**–पु. (सं.) वीर्य, बल प्राप्त करून देणारी वस्तु.

**वेग**–पु. (सं.) १ प्रवाह. २ शरीरांतून मल-मूत्रादि निघून जाण्याची प्रवृत्ति. ३ जोराची प्रवृत्ति. ४ शीघ्रता; जलदी. ५ आनंद; प्रसन्नता.

**वेतनभोगी**–पु. (सं.) वेतन घेऊन काम करणारा.

**वेताल**–पु. (सं.) १ द्वारपाल. २ शिवगण. ३ एकयोनि. ४ भूत; पिशाच्च; वेताळ.

**वेत्रधर**–पु. (सं.) द्वारपाल.

**वेद**–पु. (सं.) १ वेद. २ वृत्त. ३ वित्त. ४ यज्ञांग. ५ वास्तविक ज्ञान.

**वेदज्ञ**–पु. (सं.) १ वेद जाणणारा. २ ब्रह्मज्ञानी.

**वेदमाता**–स्त्री. (सं.) १ गायत्री; सावित्री. २ दुर्गा. ३ सरस्वती.

**वेदवाक्य**–पु. (सं.) पूर्ण प्रमाण गोष्ट.

**वेदांग**–पु. (सं.) वेदाच्या षडंगां पैकीं एक.

**वेदांत**–पु. (सं.) १ अध्यात्म; ब्रह्मविद्या; वेदांचा उपनिषदादि भाग. २ षड्दर्शनांपैकीं सहावें दर्शन.

**वेदांतसूत्र**–पु. (सं.) बादरायणाचीं सूत्रें.

**वेदांती**–पु. (सं.) ब्रह्मवादी; वेदांत जाणणारा.

**वेध**–पु. (सं.) १ छेदणें; विद्ध करणें. २ यंत्रसाह्यानें नक्षत्रादि पाहणें.

**वेधा**–पु. (सं.) १ ब्रह्मा. २ विष्णु. ३ शिव. ४ सूर्य.

**वेपथु**–पु. (सं.) कंप.

**वेपन**–पु. (सं.) कंप; कापणें.

**वेला**–स्त्री. (सं.) १ वेळ; समय. २ तास. ३ समुद्राची लाट.

**वेष्टन**–पु. (सं.) १ गुंडाळलेलें वस्त्र. २ गुंडाळणें. ३ पागोटें.

**वैकल्पिक**–वि. (सं.) १ एकांगी २ संदिग्ध. ३ इच्छेनुसार ग्रहण करण्यासारखा.

**वैकृत**–पु. (सं.) १ विकार. २ बीभत्स रस. ३ बीभत्स रसाचें आलंबन. –वि. १ विकारजन्य. २ दुःसाध्य.

**वैक्रांत**–पु. (सं.) एक रत्न.

**वैखरी**–स्त्री. (सं.) १ स्पष्ट स्वर; वाणी. २ वाक्शक्ति. ३ वाग्देवी.

**वैखानस**–पु. (सं.) १ वानप्रस्थाश्रमी. २ वनवासी ब्रह्मचारी.

**वैजयंत**–पु. (सं.) १ इंद्रपुरी. २ इंद्र.

**वैजयंति**–स्त्री. (सं.) १ पताका. २ एक पांचरंगी माळ.

**वैज्ञानिक**–पु. (सं.) १ शास्त्रज्ञ. २ निपुण. –वि. विज्ञानसंबंधी.

**वैतरणी**–स्त्री. (सं.) यम लोकाच्या वाटेवरील नदी.

**वैतालिक**–पु. (सं.) स्तुतिपाठक.

**वैतालीय**–पु. (सं.) एक वर्णवृत्त. –वि. वेतालसंबंधी.

**वैदर्भ**–पु. (सं.) १ विदर्भ देशाचा राजा. २ भीमक; दमयंतीचा पिता. ३ रुक्मिणीचा पिता. –वि. विदर्भ देशाचा.

**वैदर्भी**–वि. (सं.) १ एक काव्यरीति २ दमयंती. ३ रुक्मिणी.

**वैदिक**–पु. (सं.) १ वेदोक्त कर्म करणारा. २ वेदपाठक. –वि. वेदसंबंधी.

**वैदूर्य**–पु. (सं.) एक रत्न; लसण्या.

**वैदेशिक**–वि. (सं.) विदेशसंबंधी.

**वैद्य**–पु. (सं.) १ पंडित; विद्वान. २ चिकित्सक; भिषक्.

**वैध**–वि. (सं.) विधिनुसार; ठीक; कायदेशीर.

**वैधर्म्य**–पु. (सं.) १ विधर्मीपणा. २ नास्तिकता.

**वैधेय**–वि. (सं.) विधिसंबंधी.

**वैरशुद्धि**–स्त्री. वैराचा बदला.

**वैरागी**–पु. (सं.) १ विरक्त. २ बैरागी.

**वैराग्य**–पु. (सं.) विरक्ति.

**वैराज्य**–पु. (सं.) १ दोन राजांनी मिळून एकत्र राज्य करण्याची जुनी पद्धती. २ वरील पद्धतीनें चाललेलें राज्य.

**वैलक्षण्य**–पु. (सं.) १ विलक्षणता. विभिन्नता.

**वैवाहिक**–पु. (सं.) १ व्याही. २ –वि. विवाहसंबंधी.

**वैशाखी**–स्त्री. ( सं. ) वैशाख शुद्ध पूर्णिमा.

**वैशाली**–स्त्री. ( सं. ) विशाल नगरी; प्राचीन बौद्ध नगर.

**वैशिक**–पु. ( सं. ) वेश्यागामी नायक.

**वैशेषिक**–पु. ( सं. ) १ षड्दर्शनांपैकीं एक. २ हें दर्शन मानणारा.

**वैश्वजनीन**–वि. (सं.) सर्व लोकांचा.

**वैषम्य**–पु. ( सं. ) विषमता.

**वैष्णवी**–स्त्री. ( सं. ) १ विष्णुशक्ति. २ दुर्गा. ३ गंगा. ४ तुळस.

**वोल्लाह**–पु. ( सं. ) पिवळी आयाळ व शेपटी असणारा घोडा.

**वोहित्थ**–पु. ( सं. ) मोठी नाव; वहित्र

**व्यंग्य**–पु. ( सं. ) १ गूढ अर्थाचा शब्द. २ व्यंगार्थी बोलणें.

**व्यंजन**–पु. ( सं. ) १ व्यक्त करणें. २ अंग; अवयव. ३ भाजी; तोंडी लावणें. ४ अन्न. ५ स्वराशिवाय उच्चार न होणारा वर्ण.

**व्यंजना**–स्त्री. ( सं. ) १ प्रकटन. २ वाच्यार्थाशिवाय इतर अर्थ व्यक्त करण्याची शक्ति.

**व्यक्त**–वि. ( सं. ) १ प्रकट. २ साफ स्पष्ट.

**व्यक्तगणित**–पु. ( सं. ) अंकगणित.

**व्यक्ति**–स्त्री. (सं.) १ प्रकट होण्याची क्रिया. २ व्यष्टि; शरीर. ३ मनुष्य.

**व्यग्र**–वि. ( सं. ) १ व्याकुल. २ भ्यालेला. ३ कामांत मग्न.

**व्यतिक्रम**–पु. ( सं. ) १ उलट क्रम. २ विघ्न; अडचण.

**व्यतिरेक**–पु. (सं.) १ अभाव. अतिक्रम. ३ एक अर्थालंकार.

**व्यतीत**–वि. (सं.) गत; गेलेला.

**व्यत्यय**–पु. व्यतिक्रम पहा.

**व्यर्थ**–वि. (सं.) १ अर्थहीन. २ लाभरहित. –क्रिवि. उगाच.

**व्यलीक**–पु. ( सं. ) १ अपराध; कसूर. २ धाकदपटशा. ३ दुःख. ४ विट.

**व्यवकलन**–पु. ( सं. ) वजाबाकी.

**व्यवच्छेद**–पु. ( सं. ) पृथकता. २ विभाग. ३ विराम.

**व्यवधान**–पु. ( सं. ) १ पडदा. २ भेद; विभाग. ३ विच्छेद.

**व्यवस्था**–स्त्री. ( सं. ) १ शास्त्रोक्त विधान. २ जागच्याजागीं ठेवणें. ३ प्रबंध; व्यवस्था. ४ स्थिरता; स्थिति.

**व्यवस्थान**–पु. (सं.) १ उपस्थिति; हजेरी. २ व्यवस्था; प्रबंध. ३ विष्णूचें एक नांव.

